॥ श्री ॥

भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-स्वीयग्रंथमाला क्रमांक ३२

# पुरंदरे-दप्तर भाग १ ला.

( शके १६१४ ते १६८३ )

——:0:——

श्री. मल्हारराव चिमणराव व मल्हारराव त्र्यंबकराव
पुरंदरे यांच्या संग्रहांतील.

संपादक
कृष्णाजी वासुदेव पुरंदरे

प्रकाशकः
दत्तो वामन पोतदार, बी. ए.
गंगाधरराव नारायणराव मुजुमदार.
चिटणीस, भा. इ. सं. मंडळ, पुणें.

श. १८५१ ] किं. ४ रुपये [ इ. स. १९२९

# निवेदन.

म. इ. साधनें खंड ६ यांत पुरंदरे यादी प्रसिद्ध करून कै. राजवाडे यांनीं पुरंदरे दप्तराची ओळख इतिहासभक्तांस प्रथम करून दिली. पुढें आपल्या मंडळांतील कै. पांडोबा पटवर्धन यांनीं शके १८३९ सालीं तिकडे दृष्टि फिरविली ( पहा षष्ठ संमेलन वृत्त पृ. ८१ ). शके १८४१ सालीं या कामीं मदत मिळण्याचें आश्वासन प्रसिद्ध झालें ( पहा सप्तम संमेलन वृत्त पृ. १८२ ). या प्रस्तुतच्या खण्डाचे संपादक रा. कृष्णाजी वासुदेव पुरंदरे यांचा मंडळाशीं प्रत्यक्ष परिचय शके १८४१ सालींच झाला. त्याची उभयपक्षीं अभिवृद्धि होत होत आजचें हें खण्डरूपी गोड फळ सर्वांसमोर येत आहे. पुरंदरे दप्तराचें काम चालू असतांच रा. कृष्णाजीपंत यांनीं श्रीशिवचरित्रसाहित्याचाहि संग्रह मंडळासाठीं केला व त्याचा एक खण्ड यापूर्वींच प्रसिद्ध झाला आहे. तो एक प्रवाह आणि पुरंदरे दप्तराच्या अफाट सरोवरांतून फुटणारा साहित्यखण्डाचा हा दुसरा प्रवाह या दोन प्रवाहांच्या '**दुआबांत**' रमण्यास इतिहासभक्तांस परम उल्हास वाटेल अशी आशा आहे.

पुरंदरे—दप्तरांत खुद्द पेशवाईतील खाशांनीं खाशांस लिहिलेलीं खाशीं पत्रें शेकडों आहेत. त्यांतील निवडकांचा एक खंड आज प्रसिद्ध करण्याचें श्रेय मंडळास मिळतें याबद्दल मंडळास केव्हांहि अभिमानच वाटेल. फारा दिवसांनीं अस्सल पत्रांचा एवढा महत्वाचा संग्रह महाराष्ट्रांत प्रसिद्ध झाला असें म्हटलें पाहिजे. निरनिराळ्या शाखेंतील पुरंदरे मंडळींचे संग्रह मंडळाकडे येत आहेत आणि दुसरा खण्ड पुरस्कृत ग्रंथमालेचे द्वारें लवकरच बाहेर पडेल. तिसऱ्या खण्डाचीही तयारी चालू आहे. उदार प्रकाशकाची वाट पाहात आहों. खुद्द पुरंदरे घराण्यांतील मंडळी सर्वप्रकारें या कार्याचा अभिमान धरून प्रकाशनास आर्थिक सहाय्य हि भरपूर करण्यास मागें घेणार नाहींत असा मला भरंवसा वाटतो.

रा. कृष्णाजीपंत यांनीं श्री. मल्हारराव प्रभृतींचे आभार मानिलेच आहेत. आतां रा. कृष्णाजीपंतांचें अभिनंदन येथें मनापासून करण्याचें उरलेलें कार्य या निवेदनांत आम्ही मोठ्या आनंदानें, मंडळातर्फे, करीत आहों. योगायोग

मोठा औचित्याचा म्हटला पाहिजे कीं, पुरंदरे दप्तराचें संपादनकार्य करण्यास त्याच वंशांतील एक उत्साही गृहस्थ पुढें यावा. रा. कृष्णाजीपंत हें काम करण्यास फार संकोचत होते. परंतु जसे ते त्यांत रंगले तसे प्रस्तावना देखील लिहिण्याचें त्यांना वाटणारें साहसहि त्यांनीं धडाडीनें तडीस नेलें याबद्दल त्यांचें कोणीहि कौतुकच करील. त्यांची लेखणी वर्ण्य विषयाशीं तद्रूप झाल्यामुळें मोठी रंगली आहे. आणि ' आवरितों मी बळेंचि रसनेला' असा प्रकार त्यांचाही साहजिकच झाला आहे. यांत जर कां आयार्व्हिन, फॉरेस्ट प्रभृती इंग्रजी विद्वानांचे साधनग्रंथांचा परामर्ष घेण्याची अनुकूलता त्यांस असती तर तूलनात्मक अभ्यासाचें प्रकरण हि त्यांना हातीं घेऊन संपवावें लागलें असतें. तीहि उणीव ते आपल्या दांडग्या उत्साहानें व चिकाटीनें सहज भरून काढतील अशी उमेद आहे.

प्रस्तुतच्या खंडांत अस्सल पत्रेंच सर्वत्र असल्यामुळें व त्यांत राजकारणी घडामोडी भरपूर असल्यामुळें अनेक महत्त्वाच्या प्रश्नांचा विचार प्रस्तावनेंत करावा लागला. आपलें म्हणणें रा. पुरंदरे यांनीं आपल्या जबाबदारीवरच पुढें मांडलें आहे. तथापि अभ्यासकाला खरें महत्त्व अर्थात् मूळ साधनांचेंच आहे; ही गोष्ट त्यांनीं सतत डोळ्यांपुढें ठेविली आहे, तिकडे सर्व वाचकांनीं सहृदयतेनें लक्ष्य द्यावें. रा. पुरंदरे हे एक मराठी शिक्षक आहेत; परंतु दृढव्यासंगानें आणि अंतरींच्या दुर्दमनीय इच्छेमुळें दारिद्यादि अडचणींना निर्भयपणें तोंड देत देत त्यांनीं केवढी मजल गांठली हें पाहिलें म्हणजे महाराष्ट्रांत जी ऐतिहासिक जागृती झाली आहे तिचीं पाळेंमुळें बरींच खोल रुजत जात आहेत असें स्पष्ट दिसतें.

हा खंड शके १८५० च्या आश्रयदाते, हितकर्ते व वर्ग १।२ च्या सभासदांस मोबदल्यांत मिळावा असें कारभारी मंडळानें ठरविलें आहे.

**द. वा. पोतदार**
**ग. ना. मुजुमदार**
चिटणीस—**भा. इ. सं. मंडळ**, पुणें

# प्रस्तावना

१ शके १८२८ पासून शके १८४४ पर्यंत सासवड येथें म्यु. मराठी शाळेंत शिक्षक होतों. त्या अवधींत एका प्रापंचिक व्यवसायांत स्वतःचें जुनें दफ्तर बारकाईनें पाहावें लागलें. त्या पूर्वींहि मला विद्यार्थिदशेपासून मराठ्यांचा इतिहास मनापासून आवडत असे व तोच शाळेंत शिकवावाहि लागे; त्यामुळें तत्संबंधीचा जर कोठें उल्लेख आढळला तर मोठा आनंद होई. पण इतिहास हा जुन्या रद्दींतून निघतो ही कल्पना कित्येक दिवस नव्हती; ती स्वतःचें दफ्तर चाळावें लागल्यानें किंचितशी आली. जुन्या रद्दींतून आपला आवडता इतिहास सांठविलेला असतो हें पटल्यावर असली रद्दी चाळण्याचा जणू छंदच लागला. महाराष्ट्रांतील ऐतिहासिक क्षेत्रांत सासवडचा नंबर बराच वर लागेल. शिवशाहींतील प्रख्यात व्यक्ति पंताजी गोपिनाथ व पुढें पेशवाईंत प्रसिद्धीला आलेले पुरंदरे, राजे बहादर, विंचूरकर, सखाराम बापू हे सर्व महत्त्वाचे पुरुष सासवडांतूनच बाहेर पडले. तेव्हां अशा ठिकाणीं नवीन जडलेल्या छंदास भरपूर खाद्य मिळावें हें क्रमप्राप्तच होतें. सासवडचें पुरंदऱ्यांचें दफ्तर इतिहास--संशोधनाची चळवळ निघाल्यापासून गाजत आहे. रा. ब. साने, रा. ब. पारसनीस, इतिहासाचार्य राजवाडे यांच्या ग्रंथांतून पुरंदरे दफ्तरांतील महत्त्वाचीं पत्रें सांपडतात. तरीहि पण रा. खरे शास्त्रीबुवांनीं सबंध आयुष्य घालून पटवर्धनी दफ्तराचा जसा शेवट लावला तशा चिकाटीचा संशोधक पुरंदरे दफ्तराच्या वांट्यास आला नाहीं. राजवाड्यांनीं श. १८२३ सालीं पुरंदरे दफ्तर चाळून त्यांतील बरींच पत्रें नेलीं; पण नेटानें बसून त्याचा अंत पहाण्याची खटपट त्यांनीं केली नाहीं. पुढें कित्येक दिवस पुरंदरे--दफ्तरकडे कोणाहि संशोधकाचें लक्ष गेलें नाहीं. शेवटीं आठ वर्षांपूर्वीं मीं हें दफ्तर पाहून त्याचा शेवट लावण्याचा निश्चय केला. पोटाचा व्यवसाय सांभाळून उर्वरित वळ दफ्तर पाहाण्याकडे घालवावयाचा असा क्रम ठेऊन सासवडांतील पूर्वी राजवाड्यादिकांनीं ज्या एका शाखेचें दफ्तर पाहण्याचा उपक्रम केला होता तें दफ्तर पुरें केलें. नंतर सहा महिन्यांपूर्वीं पुरंदऱ्यांची जी एक शाखा पुण्यास मोढवेकर म्हणून प्रसिद्ध आहे तिचेंहि दफ्तर पाहाव-

यास मिळालें. या दोन्ही दफ्तरांत मिळालेल्या निवडक पत्रांपैकीं कांहीं पत्रें या भागांत घेतलीं आहेत.

२ श. १६१४ पासून श. १६८२ पर्यंतच्या ६८ वर्षांतील पत्रें या भागांत आहेत. बहुतेक पत्रें पुरंदरे दफ्तरांतील आहेत; पण इतर ठिकाणीं मिळालेलीं या काळांतील महत्त्वाचीं कांहीं पत्रें यांत घेतलीं आहेत. या सर्वांचा हिशोब असा– ३१० श्री. मल्हारराव त्र्यंबकराव पुरंदरे–सासवड; ८० श्री. मल्हारराव चिमणराव पुरंदरे–मोढवेकर, पुणे; १५ रा. शंकराजी नीळकंठ बोकील, महादेव रामचंद्र बोकील–हिवरे; १ रा. देव–काळदरी; १० रा. विष्णु गोविंद अत्रे, काशिनाथ वासुदेव अत्रे–चांबळी व कोढीत; १ रा. सोमवंशी–मोहाडी (नाशिक); ७ रा. भालचंद्रपंत इनामदार–मोरगांव; १ रा. गोंधळेकर–पुणें; बाकीचीं अवांतर.

३ या सर्व पत्रांचा परामर्ष घ्यावयाचा झाल्यास स्वतंत्र ग्रंथच लिहावा लागेल. प्रस्तावनेच्या संकुचित क्षेत्रांत हें व्हावें कसें? तेव्हां कांहीं महत्त्वाच्या प्रकरणांची संक्षिप्त चर्चा करून बाकीचा विषय इतर अभ्यासकांकरितां शिल्लक ठेविला आहे.

४ या ६८ वर्षांत छत्रपति राजाराम, दुसरा शिवाजी, शाहू, व नानासाहेब पेशवे या चार कारकीर्दी होऊन जातात. गंडांतर चुकवून मराठशाही दिवसेंदिवस वर्धमान होत होत तिनें पानपतापूर्वी वैभवशिखरावर आरोहण केलें. इतक्यांत तिला पानपतचा जबर धक्का बसून तें स्थान सोडावें लागलें. व ही सत्ता उतरणीस लागली; असा देखावा यांत पहावयास मिळतो. या काळांत हजारों पुरुष व शेंकडों घराणीं आपल्या आंगच्या निरनिराळ्या गुणांमुळें महाराष्ट्रांत पुढें आलीं. महाराष्ट्राचें ब्रह्मतेज व क्षात्रतेज एकवटून त्यांनीं आपल्या करामतीनें काळाचा ओघच बदलविला. औरंगजेबाच्या हयातींतील शेवटच्या पंचवीस वर्षांची सर्व करामत निष्फळ करून अखिल भारतवर्षांत एकच एक निर्माण झालेलें स्वतंत्र राष्ट्र मराठ्यांनीं जगवून कसें दाखविलें, या महत्त्वाच्या प्रसंगासंबंधीं अलीकडे पांच चार वर्षांत प्रसिद्ध झालेलीं जीं पत्रें आहेत तीं व या भागांत आलेलीं तत्संबंधींचीं पत्रें विचारांत घेऊन छत्रपति राजाराममहाराजांच्या शेवटच्या सात वर्षांच्या कारकीर्दीचा प्रथम विचार करूं.

## १ छत्रपति राजाराम

५ मोंगलमराठ्यांच्या झगड्यांत शके १६१४ साल मराठ्यांच्या सरशीचें आहे. कर्नाटकांत चंदीच्या वेढ्यांत सांपडलेल्या राजाराममहाराजांस सोडविण्यास महाराष्ट्रांतून शंकराजीपंत सचीव व रामचंद्रपंत यांनीं धनाजी जाधव व संताजी घोरपडे यांस ससैन्य पाठविलें. जाधवांनीं वेढा मारून काढण्याची व घोरपड्यांनीं कर्नाटकांत धुमाकूळ घालणाऱ्या मोगली सरदारांस तंबी देण्याची कामगिरी पतकरली व त्यांत दोघांनाहि चांगलें यश आलें; त्यामुळें चंदीस वेढा देऊन बसलेल्या झुलपिकारखानानें या सालच्या पौषांत सल्ला करून चंदीचा वेढा उठविला ( जे. श. ). वेढ्यांत कष्ट–मेहनत करणाऱ्यांचा राजारामानें बक्षिसें देऊन चांगला गौरव केला; त्यांत जाधवांच्या लष्करांतील तुको त्रिंबक पुरंदऱ्यास त्याच्या वतनी गांवीं दोन जमिनी इनाम मिळाल्या (ले.१,२). चंदीच्या वेढ्यांतून राजाराममहाराज मोकळे झाले तरी त्यांना कर्नाटक सोडून एकदम महाराष्ट्रांत येतां आलें नाहीं. त्रिचनापल्लीकर व याचप्पा नायक हे तिकडील प्रमुख सत्ताधीश मराठ्यांस त्रास देत असत, त्यांचा व राजारामाचा पक्ष सोडणाऱ्या बहिरजी घोरपड्यास वठणीवर आणण्याचा उद्योग वेढ्यांतून बाहेर पडल्यावर त्यांस हातीं घ्यावा लागला. रुसलेल्या घोरपड्याची समजूत घालून त्यास पुन्हां कामास लाविलें व त्रिचनापल्लीकरांशीं सल्ला केला. वेरुळाजवळ याचप्पा नायकाचा राजारामानें जातीनिशीं जाऊन पराभव केल्यामुळें तो मोगलांस जाऊन मिळाला. पण इतक्यांत संताजी घोरपड्याचें नवीनच प्रकरण उपस्थित झालें. त्याचा राजारामाशीं खटका उडून तो महाराष्ट्रांत गेल्यामुळें त्यावर धनाजीची रवानगी करावी लागली. या सर्व कृत्यांत शके १६१५ चा चैत्र खलास झाला.

६ यानंतर महाराष्ट्रांतहि मोंगलाच्या हालचाली जोरानें सुरू झाल्या. त्यांनीं पन्हाळ्यास वेढा घातला तो रामचंद्रपंत, सचीव व धनाजी जाधव यांनीं जाऊन शके १६१५ च्या मार्गशीर्षांत मारून काढला. इकडे कर्नाटकांत पुन्हा चंदीला वेढा बसून त्या भोंवतालचा मुलूख मारला गेला. तेव्हां सचिवानें संताजीची समजूत घालून त्याच्याबरोबर हणमंतराव निंबाळकर सरलष्कर व इतर सरदार मिळोन पंचवीस हजार फौज दिली. येसाजी मल्हारास मुतालकी देऊन त्याबरोबर पाठविलें. धनाजी कर्नाटकांतच

होता. उभयतांनीं कर्नाटकांतून मोंगलांस बहुतेक हाकून दिलें. सचिवानें मावळांतील कोरीगडचा वेढा उठविण्याचा प्रयत्न केला; पण भेदामुळें किल्ला शत्रूच्या ताब्यांत गेला; आंतील बडे लोकांचे कबिले मात्र मोठ्या शिकस्तीनें काढून भोरपेस नेले. इतक्यांत कर्नाटकांत पुन्हां संताजीचा राजारामाशीं तंटा होऊन संताजी व धनाजी यांची कांचीजवळ लढाई झाली तींत जाधवाचा पराभव झाल्यामुळें तो महाराष्ट्रांत पळून आला. संताजीहि त्याच्या मागोमाग आला. अखेर माने यांनीं महादेवाजवळ दग्यानें त्याचा शके १६१९ च्या आषाढांत खून केला. अशी मराठ्यांची यादवीमुळें पांगापांग झालेली पाहून झुलपिकारखानानें श. १६१९ च्या मार्गशीर्षांत तिसऱ्यानें चंदीस वेढा दिला व महिना पंधरा दिवसांच्या आंतच पौष वा १२ स दग्यानें खानानें चंदींत प्रवेश केला. राजाराम आधींच पळून वेलुरास गेला होता. या वर्षीं बादशाही छावणी महाराष्ट्रांत माणनदी-च्या कांठच्या बनपुरीस होती. धनाजी वेलुरास जाऊन राजारामास खेळण्यास घेऊन आला. पण बादशहानें त्यास पकडण्यास बेदरबख्तास पाठविल्यामुळें त्याला पुनरपि कर्नाटकचा रस्ता सुधारावा लागला. त्यांच्या पाठीवर बेदरबख्त होता. गदगजवळ छत्रपतींनीं शहाजाद्याशीं लढाई दिली. नंतर ते शके १६२० च्या फाल्गुनांत महाराष्ट्रांत आले. इकडे येतांच कोंकणांतून सचिवास बोलावून घेऊन तिकडे रामचंद्रपंतास पाठविलें ( ले. ३ ). इतउत्तर मोंगल—मराठ्यांच्या झगड्याची महाराष्ट्र हीच रण-भूमि झाली. मोंगलांच्या हालचाली जोरानें सुरू झाल्या; मांजरीच्या पिला-सारखी बादशहा आपली छावणी वारंवार बदलूं लागला. माणनदीवरून बादशाहा निघाला तो भीमेच्या कांठीं ब्रह्मपुरीस छावणी करून राहिला होता. श. १६२१ च्या कार्तिकांत ब्रह्मपुरीचें ठाणें उठवून बादशहा स्वतःच राजारामाच्या पिछावर राहिला. बादशहा व बेदरबख्त झुलपिकारखान यास झुकांड्या देत देत राजाराममहाराज सिंहगडास आले. तेथें ते आजारी पडले व त्यांतच त्यांचा श. १६२१ फाल्गुन शुा ९ स अंत झाला. दहा वर्षें कायेला क्षणाचाहि विसावा न देतां शिवछत्रपतींचें आव-डतें कोंवळें स्वराज्यरोपडें वांचविण्याची पराकाष्ठा करून व करवून महा-राष्ट्राच्या इतिहासांत छत्रपति राजाराममहाराजांनीं आपलें नांव अजरा-मर करून ठेविलें आहे. याचें दृश्य स्मारक सिंहगडावर अद्याप टिकलें

आहे. राजारामाच्या कारकीर्दींत कर्त्या माणसांस कर्तृत्व दाखविण्यास भरपूर अवकाश असल्यानें महाराष्ट्रीय शेंकडों नरपुंगव या काळांत चमकले. यांच्या अकाली निधनानें मराठशाहीचें अपरिमित नुकसान झालें. मोठ्या गंडांतरांतून शीर सलामत राखून मराठशाही हळू हळू प्रगतीच्या मार्गावर पावलें टाकीत आहे तोंच तिला हा पुन्हां एक जबर धक्का बसला. आतां तिचे पुरे बारा वाजले असें तिच्या शत्रुमित्रांना वाटल्यामुळें महाराष्ट्रांत निराशेचा वारा पुन्हां जोरानें वाहूं लागला. पण शिवछत्रपतींची इवलीशी इमारत भक्कम पायावर मोठ्या खबरदारीनें प्रयत्नपूर्वक शक्य तितकी मजबूत उभारलेली असल्यानें तिनें इतर आघातांप्रमाणें हाहि आघात मोठ्या धिम्मेपणानें सहन केला व ‘ कीं तोडिला तरु फुटे अणखी भरानें । ’ या न्यायानें प्रगतीचा मार्ग तसाच नेटानें क्रमशः आक्रमिला.

## २ छत्रपति दुसरा शिवाजी

७ राजाराममहाराजांचा थोरला मुलगा शिवाजी हा या वेळीं केवळ ३॥ वर्षांचा बालक होता. त्याला गादीवर बसवून रामचंद्रपंत, धनाजी जाधव, परशरामपंत, शंकराजीपंत वगैरे वीर मुत्सद्यांनीं राजारामाची थोरली बायको ताराबाई हिच्या देखरेखीखालीं स्वराज्य वांचविण्याचा आटोकाट प्रयत्न चालविला. वीरस्नुषा, वीरपत्नी ताराऊंनीं पादशहास त्राहि भगवन् करून सोडलें; आणि मराठ्यांच्या अबलाहि प्रसंगविशेषीं शत्रूला आखाड्यांत नामोहरम करण्यास कशा समर्थ असतात, याचा जगाला प्रथम परिचय करून दिला. शके १६२२ त सातारा, परळी, भूषणगड वगैरे सातारा भागांतील किल्ले एकामागून एक मोगलांनीं पाडाव केले. कार्तिकांत माणनदीच्या पुरानें बादशहाचें बरेंच लष्कर वाहवलें. या वेळीं मराठ्यांनीं आपल्या लाडक्या गनिमी काव्यांत एक महत्वाची दुरुस्ती केली. गेल्या सतरा वर्षांत औरंगजेबानें क्रोडों रुपये वेंचून व लाखो माणसांचे बळी देऊन किंबहुना मोंगली साम्राज्य पणाला लावून मराठशाहीचें मरण त्यांच्या डोंगरी किल्ल्यांत दडून बसल्याचें ज्ञान मिळविलें होतें. तेव्हां बादशाहास किल्ले घेण्याचा जणूं छंदच लागला. मिळविलेले किल्ले रक्षणें किती दुर्घट असतें हें त्या वृद्धाला जसें उमगावयास पाहिजे तसें उगमलेलें दिसत नाहीं. बादशाहाला किल्ले पाहिजेत असें

पाहिल्यानंतर शक्य तोंवर किल्ला लढवून नंतर दक्षणा घेऊन तो खालीं करून देण्याची नवीन युक्ति मराठ्यांनीं अमलांत आणिली. त्याप्रमाणें पंचावन्न हजार रुपये घेऊन पन्हाळा शके १६२३ च्या ज्येष्ठांत खालीं करून दिला. थोड्याच अवकाशांत चंदनवंदन, नांदगिरी हे किल्ले पाडाव झाले. पुढल्या सालीं दोन लाखांची भली मोठी दक्षणा घेऊन परशरामपंतानें खेळणा मोगलांस दान केला. या वर्षीं मराठ्यांच्या सहाय्यास वरुणराजानें येऊन पन्हाळ्याजवळच्या वडगांवीं बादशाही लष्कराचा तळ पडला असतां त्याचा बराच संहार केला.

८ सातारा भागांतील कामगिरी चालू असतांच शेजारच्या पुणें प्रांतावर संक्रांतीची वक्रगति चक्राकार होऊन सिंहगड किल्ला त्या भोंवऱ्यांत सांपडला. संभाजी महाराजांच्या वेळीं पाडाव झालेल्या प्रदेशांपैकीं कांहीं प्रदेश मराठ्यांनीं सोडविला; परंतु पुणें, पुरंदर वगैरेवर त्यांचा पक्का अंमल बसला नाहीं. वस्तुतः पुणें, पुरंदर टापूंत मराठे व मोंगल यांपैकीं कोणाचीच पुरी सत्ता नव्हती. ज्याला जसा हात मारतां येईल त्यानें तसा हात मारून उद्योग चालवावा. पुणें व पुरंदर हीं दोन्ही ठाणीं मात्र मोंगलाच्या ताब्यांत होतीं. मधील मुलूख दुअमली. या प्रदेशांत प्रजेची जी दुर्दशा उडे तिला पारावार नसे. रयतेपैकीं लबाडांची केवळ पंढरी पिके. या भागांतील ले. १०, १५, २९, वगैरे कित्येक पत्रें हा दुअमली प्रकार स्पष्ट करीत आहेत. शके १६२२ त मोगलांतर्फें राऊखान ज्याबती हा पुरंदरचा किल्लेदार आहे ( त्रै. व. ७ पृ. ५१ ) आणि शके १६२४ खानचंद आहे ( ले. २८ ). पुरंदरचें मोगली नांव अजमगड.

## ३ सिंहगडचा वेढा

९ पुणें ताब्यांत ठेवणारांनीं सिंहगड अवश्य घेतला पाहिजे. सिंहगडच्या अभावीं पुणें हातीं असून नसल्यांतच जमा होतें. तेव्हां सातारा भागांतील कामगिरी होतांच बादशहानें प्रथम शके १६२३ च्या वैशाखांत सिंहगडास वेढा दिला. त्रिंबक शिवदेव, सिदोजी जाधव मुद्राधारी, यांनीं आंतून किल्ला लढविण्याची पराकाष्ठा चालविली व बाहेरून सेनापति जाधवराव व त्यांचे दिवाण बाळाजी विश्वनाथ हे वेढा मारण्याच्या तजविजीस लागले. पण हे ' जीवावरचे खेळ ' युद्ध सामुग्रीच्या अभावीं फिक्के पडत चालले. तेव्हां सेनापति व बाळाजी विश्वनाथ

यानीं पुरंदऱ्यांकडे कृष्ण मृत्तिकेची [ बंदुकीची दारू ] मोठ्या तातडीनें मागणी केली. ' या उपर मऱ्हाटा आज कूल रक्षिता तरच तुमचे राहाणे या मुलकात होऊन सर्वहि आनकूल होते ' असा महत्त्वाचा इषारा बाळाजीनें पुरंदऱ्यांस दिला आहे ( ले. २१ ). आंतील गडकऱ्यास ताराबाई एकसारखी उत्तेजन देत होती. पण अखेर पन्नास हजार रुपये घेऊन श. १६२५ च्या वैशाखांत किल्ला बादशहाच्या ताब्यांत दिला. किल्ला खालीं करून देण्यांत युद्धसामुग्री व माणसें यांची वरचेवर मदत होत असतांहि घाई झाली, पावसाळ्यापर्यंत किल्ला लढवावयास पाहिजे होता अशी ताराबाईची तक्रार आहे. स्वतः बादशाहा वैशाख शुा १२ स किल्ला पाहावयास गेला ( ले. २२ ).

## ४ मराठ्यांची नर्मदापार स्वारी

१० सिंहगड नंतर राजगड, तोरणा वगैरे मावळांतील महत्त्वाचे किल्ले बादशहानें घेतले. सिंहगड दिल्याबद्दल दोष खाऊन अप्रिय झालेल्या पुरंदरच्या सनदी गडकऱ्यांनीं मोंगलाचा वांई व शिरवळ येथील न्यामतखान फौजदार नगारा निशाण पाडाव करून दस्त केला, तेव्हां प्रभूंनीं ' शाबास तुमची बरी शर्त केली स्वामी तुमची सर्फराजी करितील ' असें म्हणून त्यास गौरविलें, किल्ले गेल्याचा वचपा, मराठ्यांनीं मोंगली मुलूख मारून, काढला. या सालीं नेमाजी सिंदा व केसोपंत ( पिंगळे ? ) यांनीं नर्मदापार होऊन शिरोज मारली व नर्मदापार स्वारी करण्याचा प्रथम मान पटकाविला ( ग. प्र. शकावली ).

११ या सालीं पर्जन्याच्या अभावीं मोठा दुष्काळ पडला. या दुष्काळानें वऱ्हाड खानदेशपर्यंत अखिल महाराष्ट्रावर अंमल बसविला. पांचावर धारण बसली. तरी स्वाऱ्या शिकाऱ्यांचा मागचा कांच सुटला नाहीं. किल्ले घेऊन हें सैतान कायम असलेलें पाहून बादशहास काय वाटलें असेल ? तुमचा हात कर्नाटकापर्यंत पोंहोचतो तर आम्हालाहि माळव्यांत धुमाकूळ घालतां येतो; तुम्ही परिश्रमानें मिळविलेले किल्ले चुटकीसरसे आम्ही परत घेऊं शकतो;. आम्ही श्रीशिवरायाचे शिष्य, रायगडच्या गादीचा अपमान करणाऱ्याच्या दिल्लीच्या सिंहासनालाहि हात घालण्याच्या लायकीचे आहोंत हें मराठ्यांनीं आपल्या कृतीनें बादशहास 'याचि जन्मे येणेंचि काळें' पटवून दिलें. मराठ्यांनीं गेलेला मुलूख

सोडविण्याचा सपाटा चालविलेला पाहून बादशहा पुण्याहून बाडबिछाना कसाबसा सांभाळीत मागें पुढें पहात पहात शके १६२७ च्या फाल्गुनांत कृतकृत्य ( ! ) होऊन नगरास दाखल झाला. तेथें त्याचा एक वर्ष मुक्काम होता.

१२ कोणत्याहि उपायानें मराठे हार जात नाहींतसें पाहून त्यानें आपल्या संग्रहींचें निर्वाणीचें शस्त्र मराठ्यांवर फेकून त्यांच्यांत फूट पाडण्याचा यत्न चालविला. शाहूची सुटका करण्याचे बहुत प्रयत्न झाले असूनहि त्यांत मराठ्यांस यश येऊं शकलें नाहीं. मराठ्यांनीं सिंहगड जिंकून घेतला होता, तो परत मिळविण्याकरितां बादशहानें झुल्फिकारखानास पाठविलें व त्याजबरोबर शाहूला दिलें. शाहूवर मराठ्यांकडून शस्त्र चालविलें जाणार नाहीं आणि कोणतेंहि ठाणें सुलभपणें घेतां येईल हा शाहूला खानाबरोबर देण्यांत बादशहाचा मुख्य डाव होता. पण या डावापासून त्याचा कितपत फायदा झाला याचा नीटसा उलगडा होत नाहीं. पण अक्कलहुशारीनें फेकलेलें हें शस्त्र कांहींतरी काम करूं शकलें असलें पाहिजे हें खास. बादशहाचा मुक्काम नगरास झाल्यावर त्याच्या बुणग्यावर धनाजीनें एकदां हल्ला करून तें लुटल्याचा उल्लेख सांपडतो. बादशहाचें नगरांतील आयुष्य आजारीपणांत व भावी अनर्थाच्या चिंतेंतच गेलें. आपल्या मुलांत गादीकरितां तंटे होऊन त्यांत वडिलाप्रमाणें आपणांसहि कैद होण्याचा प्रसंग येईल या भीतीनें त्यानें आपल्या मुलांना आपणापासून दूर केलें. अजमशहास माळव्यांत व कामबक्षास विजापुरास पाठविलें. वडील मुलगा बहादूरशहा हा उत्तरेसच होता. इतकी निरवानिरव केल्यावर बादशहा शके १६२८ च्या माघ वा। अमावास्येस नगर येथें समाप्त झाला.

१३ औरंगजेबासारखा पराक्रमी व दीर्घोद्योगी सम्राट् आपलें शक्तिसर्वस्व पणाला लावून सतत २५ वर्षें अहर्निश झटूनहि मराठशाही नाहींशी होऊं शकली नाहीं; उलट ती मोठ्या दिमाखानें ताठ उभी राहून साम्राज्यस्थापनेच्या गोष्टी बोलून कृतीहि करूं लागली, ही तिच्या संस्थापकाची करामत तर खरीच; पण असल्या तुफानांतहि हें मराठी राज्याचें तारूं नानाप्रकारच्या दैवी मानवी आपत्तींतून सुरक्षित स्थळीं पोहोचविणाऱ्या कुशल कर्णधाराकडेहि याचें बरेंच श्रेय जातें. श्रीशिवरायांचें उभयतां

पुत्र, त्यांची वीरस्नुषा व त्यांचे शिष्यप्रशिष्य यांची या वेळची करामत महाराष्ट्रेतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहिली जाईल. या काळीं महाराष्ट्रीय क्षात्रतेज तर चमकलेंच, पण ब्रह्मतेजहि कांहीं झोपा घेत बसलें नव्हतें. महाराष्ट्रीय ब्राह्मणांनीं, स्वराज्यस्थापनेपासून राजकारणाच्या आखाड्यांत उतरून श्रेष्ठतर राजकारणकौशल्य तर जगाच्या प्रत्ययास आणून दिलेंच, पण दरबारांतील बैठी कारस्थानें लढविण्यांत तरबेज असलेले हे ब्राह्मण रणांगणां-तील कर्तबगारींतहि कोणाला हार जात नाहींत हेंहि सिद्ध केलें. औरंगजे-बाशीं धनाजी, बहीरजी घोरपडे, खंडेराव दाभाडे, नेमाजी शिंदे वगैरे मराठा गड्यांच्या खांद्यास खांदा लाऊन प्रल्हाद निराजी, रामचंद्रपंत, शंकराजी नारायण, निळकंठ मोरेश्वर, केसोपंत, पंताजी शिवदेव वगैरे ब्राह्मण रणांगणांत झुंजले. करितां पेशवाईपासून ब्राह्मण पुढें आले असें म्हणणाऱ्या लेखकांस मागील इतिहासाची विस्मृति कां पडावी हें कळत नाहीं. वास्तविक शिवाजी-महाराजापासूनच काय पण तत्पूर्वीपासूनहि ब्राह्मण राजकारणांत प्रामु-ख्यानें भाग घेत आले आहेत. मुसलमानी अमलामुळें महाराष्ट्राचें स्वातंत्र्य जरी हरण झालें, तरी त्यांतील प्रमुख घटक जे ब्राह्मण मराठे यांचें महत्त्व कमी झालें नव्हतें. हिंदुस्थानांतील मुसलमान समाजांत परदेशी मुसलमान व हिंदूसमाजांतूनच निर्माण झालेले स्वदेशी मुसलमान असे जे मुख्य भेद पडले त्यांच्यांत लवकरच बेबनाव होऊन ते परस्परांच्या नाशास प्रवृत्त झाले. पर-देशी मुसलमान स्वदेशी हिंदी मुसलमानांचा अत्यंत द्वेष करीत असून ते त्यां-च्या नाशाच्या चळवळी करीत. दक्षिणेंत मूळ स्थापन झालेलें बाहामणी राज्य हिंदी मुसलमानाचें असून त्यांत उदयास आलेले बहुतेक मुसलमान गृहस्थ हिंदी मुसलमान होते. पुढें बाहामणी राज्याचे जे निजामशाही, आदीलशाही वगैरे तुकडे झाले तेहि स्वदेशी मुसलमानांचेच पक्षपाती होते. या स्वदेशी परदेशी मुसलमानांच्या झगड्यांत प्रथम प्रथम स्वदेशी मुसलमान कमकुवत असल्यानें त्यांना एकाच रक्तामांसाच्या हिंदूंना आपलेसे करून घेण्यास संकोच वाटला नाहीं. याचा परिणाम असा झाला कीं, लष्करी, मुलकी कारभारांत दक्षिणेंतील प्रमुख मुसलमानी शाह्यांतून पूर्वीच्या काळच्या कर्त्या महाराष्ट्रीय जातींचेंच प्राबल्य कायम राहिलें. अर्थात् मुसलमानी अमलापूर्वीच्या हिंदू राजांचे मंत्री, सेनापति, असलेले ब्राह्मण निजामशाही, आदिलशाही, कुतूबशाहींतहि मंत्री व सेनापति

२

म्हणून चमकले. निजामशाहींतील जनार्दन स्वामी, साबाजी अनंत; आदिलशाहींतील मुरार जगदेवराव, खानरावराव; कुतुबशाहींतील मादणा, आकणा ब्राह्मणच आहेत. शिवशाहींत तर लोकसंख्येच्या मानानें पाहिलें असतां राजकारणी पुरुषांत ब्राह्मणांचा पहिला नंबर लागेल. एवंच ब्राह्मण पेशवाईपासून पुढें येऊं लागले या अधिकारी लेखकांच्या लेखांतून निघणारा ध्वनि वस्तुस्थितीचा विपर्यास करणारा असल्यानें थोडेंसें विषयांतर पत्करून हा खुलासा करावा लागला.

## ५ भटपुरंदऱ्यांचा उदय

१४ या भागांत ज्या दोन प्रमुख घराण्यांचा इतिहास येत आहे व ज्यांनीं पुढील राजकारणांत प्रामुख्यानें भाग घेतला त्या भटपुरंदरे–घराण्यांचा उदय छत्रपति राजाराममहाराजांच्या कारकीर्दींतच झाला आहे. या भागांत भटपुरंदऱ्यांच्या उदयासंबंधींचा विश्वसनीय पुरावा बराच आहे. तो बखरकारांच्या बिन खबरी मांडणीस ठिकठिकाणीं प्रतिरोध करीत जाणार यास नाइलाज आहे. ले. १३ मध्यें बाळाजी विश्वनाथाचें प्रथम नांव ऐकूं येतें. त्यावरून शके १६२३ त तो पुणें प्रांताचा सुभेदार होता असें दिसतें. तेव्हां हा मराठशाहींत निदान दहा वर्षांपूर्वींच सामील झाला असला पाहिजे असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. यानंतर तो क्रमाक्रमानें वाढत वाढत शके १६३४ त शाहू महाराजांचा पेशवा झाला. पुणें प्रांताच्या सुभेदारीपासून पेशवेपदप्राप्तीपर्यंतच्या बाळाजीच्या पायऱ्या पुढीलप्रमाणें होत. शके १६२३ सरसुभेदार प्रा पुणें ( ले. १२ ). श. १६२४ दिासेनापति (ले. १४). श. १६३४ सेनाकर्ते (ले.४३ टीप). पण शके१६३० पासून बाळाजीपंत सेनाकर्ते होते असें अन्यत्र सांपडतें(रि. पृ. ३२ ). या सर्व हुद्यांवर असतां बाळाजीपंत पुढील शिक्का चालवीत–‘ श्री उमाकांत पदांभोज भजनाप्त समुन्नतेः बाळाजी विश्वनाथस्य मुद्रा विजयतेतरां ’ ( ले. १४ ). पुढें पेशवाई मिळविणारा बाळाजी विश्वनाथ भट हाच सुभेदार, सर सुभेदार बाळाजी विश्वनाथ कशावरून ? अशी कोणालाहि रास्त शंका काढतां येईल; कारण एकाच नांवाच्या अनेक व्यक्ति इतिहासांत एकाच काळीं वावरत असतात. शिवाजीमहाराजांच्या अमदानींत रघुनाथ बल्लाळ नांवाचे तीन पुरुष प्रमुख स्थानीं आढळतात. करितां शंकित होण्यास भरपूर वाव आहे.ले. ७२ वरून पाहातां बेलसरच्या गोंदजी गरूड,

राणोजी जगथाप, व सोनजी जगथाप यांचा ‘ राजश्री बाळाजी विश्वनाथ सर सुभेदार ’ यांपुढें एक देवघेवीचा खटला आला होता. बेलसर पुणें परगण्यांत आहे व बाळाजी विश्वनाथ तेथला सर सुभेदार आहे हें आपणास माहीत आहे. त्रिवर्ग बेलसरकरांचें हेंच भांडण जरा बदलून शके १६४३त बाजिराव बल्लाळ पेशव्यापुढें आलें. त्याचा निकाल लाऊन ‘ मोकदमानी मौजे बेलसर का। सासवड ’ ( का। सासवड पुणें परगण्यांत मोडतें. ) यास पेशव्यानें जें पत्र लिहिलें आहे त्यांत पुढील उल्लेख आढळतो. ‘ तीर्थरूप पंत कैलासवासी याणी आज्ञापत्र सादर केलें आहे परंतु त्याचा भाग वारून दिल्हा नाही सोनजी साहेब कामावरी पडला आहे ’( ले ७३ ). यांत पुणें प्रांताच्या बाळाजी विश्वनाथ सरसुभेदारास बाजिराव पेशवा ‘तीर्थरूप’ म्हणत आहे. तेव्हां बाजिराव पेशव्याचा ‘तीर्थरूप’ पुणें प्रांताचा सरसुभेदार होता येथपर्यंत निर्विवाद सिद्ध होत आहे. अर्थात् शाहूचा पेशवा बाळाजी विश्वनाथ भट हाच पूर्वीचा सुभेदार, सरसुभेदार बाळाजी विश्वनाथ होय असें बेशक समजावें असें आम्हांस वाटतें. बाळाजी विश्वनाथाच्या शिक्क्याचें सूक्ष्म निरीक्षणहि शंकासमाधान करूं शकेल. असो. शके १६२४-२५ सालीं पुण्याभोंवतालचा मुलूख हाताखालीं घालण्याकरितां बादशाही लष्कर पराकाष्ठा करीत असतां, सेनापति जाधवराव त्यास जोरानें प्रतिरोध करीत आहे; त्यावेळीं त्याला त्याच्या दिमतीस असलेल्या बाळाजीनें महत्त्वाची मदत केली ( ले. २१ ). आतां बाळाजीचा सासवडच्या अंबाजीपंत पुरंदऱ्यांशीं केव्हांपासून संबंध आला हें पाहावयाचें झाल्यास पुरंदऱ्यांचा उदयकाळ ठरविला पाहिजे.

१५ कसबे सासवडचें कुलकर्ण व कर्यात सासवडचें देशकुलकर्णाबद्दल समस्त पुरंदऱ्यांनीं अन्याशीं वाद घातला; त्यासंबंधाचे बरेच लेखांक यांत आहेत. त्यांतील ले. ३१ (श. १६२५) मध्यें अंबाजीपंत पुरंधऱ्याचा सखा भाऊ तुकोपंत यास त्याच्या भाऊपणाचें जें पत्र करून दिलें आहे त्यांत ‘तुम्ही पूर्वीं गनिमाकडे चाकरीस होते हाली हजरत पातशहानी या प्राती आले तुम्ही चाकरी सोडून वतनाच्या भांडणास गावावर राहिले,’ असा मजकूर आढळतो. शके १६१४च्या फाल्गुनांत हाच तुकोपंत धनाजी जाधवाबरोबर चंदीस जाऊन राजाराम महाराजांकडून जमिनीच्या सनदा घेत आहे (ले. १, २).

शके १६२४ भाद्र. वा ४ च्या पत्रांत आबाजीपंत ( आबाजी व अंबाजी दोन्ही एकच ) पुरंदऱ्यांकडे जाधवराव व बाळाजी विश्वनाथ दारुगोळा पाठविण्याबद्दल लिहीत आहेत. त्यांतील भाषा हुकमाची नसून बरोबरीची आहे ( ले. २०, २१ ). या सर्वांचा इत्यर्थ हाच कीं, शके १६१४ सालीं पुरंदरे मराठ्यांचे साक्षात् नोकर होते परंतु त्यानंतर ते नोकरी सोडून वतनाच्या भांडणाकरितां घरीं राहिले. शके १६२४ त ते बादशहा किंवा मराठे यांपैकीं कोणाकडेहि नौकर नसून सुखवस्तु रयत आहेत. त्यांच्या वतनाचा तंटा प्रत्येक कारकीर्दीत उभा होता. सासवड गांव आज मराठ्यांकडे तर उद्यां मोंगलांकडे जसे हेलकावे खाई तसा पुरंदऱ्यांचा वादहि त्या त्या स्थळीं उभा राही. शके १६२३ त अत्रेपुरंदरे वाद मराठ्यांच्या दरबारांत सुरू आहे ( ले. ११-१३ ). तर पुढल्या सालीं तो हजरत साहेबांच्या पायांशीं लोटांगणें घेत आहे ( ले. ३१ ). या वादाशीं तूर्त आपणास कांहीं कर्तव्य नाहीं. यावरून पुरंदरे मराठशाहीशीं शके १६१४ पासून अधूनमधून संबंध ठेवीत असून ते तेव्हांपासून बाळाजीपंतांच्या परिचयाचे असावेत आतां हे मराठ्यांकडे केव्हांपासून व कोणत्या हुद्यावर कायमचे राहिले याचा उलगडा या पत्रव्यवहारांत तरी होत नाहीं. रामचंद्रपंत, जाधवराव, शंकराजीपंत सचीव यांशीं, पुरंदऱ्यांचा दृढ परिचय असून यांच्यांतील कोणी 'हेरंब' नामक बराच वजनदार दिसतो ( ले. ५७-५८ ). तुको त्र्यंबक व अंबाजी या बंधुद्वयाखेरीज यांचे चुलत भाऊ काशी विश्वनाथ, गोमाजी विश्वनाथ, गिरमाजी विश्वनाथ व भाऊबंद चिंतो महादेव वगैरे पुरंदरेहि आपापल्या मगदुराप्रमाणें राजकारणांत भाग घेत आहेत. या घराण्यावर सेनापति जाधवरावाची प्रथमपासून कृपा दिसते. आणि त्यापासून हे महत्पदास चढलेले आहेत पण शाहू येईपर्यंत हें घराणें विशेषसें पुढें नाहीं.

## ६ छत्रपति शाहूमहाराज

१६ मुसलमानी रिवाजाप्रमाणें औरंगजेबाच्या पश्चात् गादीबद्दल तंटे सुरू झाले. त्याच्या तिघां मुलांपैकीं अजमशाह व कामबक्ष दक्षिणेंत असून बहादूरशहा उत्तरेस होता. पादशहा माघ वा ३० स मेल्यावर लागलीच फाल्गुनांत शुद्ध एकादशीस अजमशहा नगरास सिंहासनारूढ झाला. आणि दक्षिणेची तात्पुरती व्यवस्था लावून लगेच हा नूतन बादशहा फाल्गुन वा १

स दिल्लीस जावयास निघाला. त्याला शके १६२९ च्या गुढीपाडव्यास मराठ्यांचा मुलूख सोडविण्याच्या कामावर असलेले झुलपुकारखान व शाहू औरंगाबादेस जाऊन मिळाले. शाहूला पुढें करून मराठे धुळीस मिळविण्याचा औरंगजेबाचा नवा उपक्रम विशेष फलदाई न होतां या वर्षा दिढा वर्षांत पुणें सातारा भागांतील त्यांनीं बहुतेक किल्ले पुन्हां सर करून आपला बराच मुलूख सोडविला होता. आपली पाठ फिरतांच मराठे मोगली मुलूख मारणार हें अजमशहा जाणून होता. तेव्हां त्यांची भावी चढाई खुंटवून त्यांस पायबंद देण्याची एक अजब शक्कल बादशहानें अमलांत आणिली. त्यानें झुलपुकारखानाच्या सल्ल्यानें व सवाई जयसिंग वगैरे बादशाही लष्करांतील वजनदार रजपूत राजांच्या शिफारशीवरून बरोबर घेतलेल्या शाहूची वैशाखांत सुटका केली. शाहूची मातुश्री व त्याचा भाऊ मदनसिंग यांस त्यानें सोडिलें नाहीं. शाहू राजे खानदेशांत येतांच त्यांच्या भोंवती तेथचे मराठे सरदार जमा होऊन मोंगलांच्या अंदाजाप्रमाणें मराठ्यांत यादवीचें बीजारोपण झालें. स्वतंत्र रीतीनें शाहूची सुटका मराठ्यांस न करितां आल्यामुळें मोंगलांचें अंकितत्व पत्करल्यावांचून त्याला मुक्त होण्यास दुसरा मार्गच शिल्लक नव्हता. दीर्घकाल कैदखान्यांत राहूनहि शाहूचा स्वाभिमान नष्ट न होतां मराठशाही वांचवून ती वृद्धिंगत करण्याची त्याची मनीषा जागृत असावी. असें त्याच्या पुढील उद्योगावरून अनुमान करितां येतें तेव्हां मोंगलांचा कावा ओळखून या वळीं ताराबाई व शाहू एक होऊन उद्योग सुरू होता तर त्यांत मराठशाहीचें मोठें हित झालें असतें. परंतु मोंगलाचा डाव यशस्वी व्हावा असा ईश्वरी संकेत असल्यानें मिटतें घेऊन एकजुटीनें काम करण्याची कोणासच बुद्धि झाली नाहीं.

१७ दगडाखालीं सांपडलेला हात जपूनच काढून घेतला पाहिजे. तेव्हां सुटकेकरितां दास्यत्व पतकरण्यांत व्यक्ति या नात्यानें शाहूचें मोठेंसें चुकलें असें होत नाहीं. प्रसंगावर नजर देऊन स्वीकारलेलें हीनत्व योग्य परिस्थितींत झुगारून देण्याची दक्षता मात्र शाहू व त्याच्या पश्चातचे मराठशाहीचे चालक यांनीं प्रत्ययास आणून न दिल्यानेंच ते खरे दोषी ठरतात. शाहूच्या सुटकेपूर्वींचे मोंगल-मराठ्यांचें नातें कायम राहातें तर पुढील उद्योग वेगळ्या प्रकारचे सुरू होऊन पुढें मराठ्यांना पातशाही

सिंहासनाचा जेथें तेथें नडणारा मान आपोआपच दूर होता. तेव्हां पादशाही बुडविण्याकरितां निर्माण झालेली मराठशाही तिला सावरीत असल्याचा यानंतरचा देखावा, तिच्या मूळ ध्येयास मूठमाती देऊन पंचवीस वर्षांच्या उद्योगावर एका दृष्टीनें पाणी पाडणारा वाटतो. मराठ्यांच्या राज्याचें साम्राज्य झालें पण शाहूच्या सुटकेकरितां गमाविलेलें निर्भेळ स्वातंत्र्य इतउत्तर त्यास कधींच लाधलें नाहीं.

१८ शाहूमहाराज सुटून येतांच अंबाजीपंत पुरंदऱ्याचा पुतण्या मल्हार तुकदेव हा सर्वांआधीं खानदेशांत लांबकानीच्या मुक्कामीं त्यास येऊन भेटला ( ले. २३१ ). त्यामुळें सेनापति जाधवराव फोडणें बरेंच सुलभ झालें. पुरंदऱ्यांशिवाय पुरंदर टापूंतील गणेश शंकर निळकंठराव, शामजी गोविंद अत्रे वगैरे पुरंदर टापूंतील लोकहि याच ठिकाणीं शाहूच्या पक्षांत सामील झाले ( ले. ३७८ ). पंताजी गोपिनाथाचा पुतण्या महादाजी यमाजी बोकील हा गृहस्थ थोरल्या शिवाजीमहाराजांच्या कारकीर्दींत संभाजी महाराजांच्या वाकनिसाचा मुतालीक होता (रा. खं. ८ ले. २५). पुढें हा व याचा भाऊ गंगाजी यमाजी—सुप्रसिद्ध सखारामबापूंचा आजा—शाहूबरोबर मोगलांच्या अटकेंत होते. हे दोघे भाऊ रायगडच्या पाडावांत पाडाव झाले कां संभाजी महाराजांबरोबर गिरफदार झाले याचा नीटसा उलगडा होत नाहीं. अटकेंत उभयतां बंधूंनीं शाहूची चांगली सेवा केली. हे शाहूपूर्वींच सुटून आले ( ले. ३३ ). त्यांच्या योगक्षेमाची ताराबाईनें व्यवस्था करून दिली. पुढें शाहू सुटून येतांच महादाजी यमाजी त्याच्या पक्षास जाऊन मिळाला. अशा रीतीनें पुरंदर टापूंतील लोकांनीं शाहूचा पक्ष स्वीकारून त्याला ‘या राजियावरी बसविले’ असल्यानें या भागांतील शेंकडों लोक पुढील राज्यकारभारांत चमकून ‘सासवडकर पंचायतन’ करील तें होऊं लागलें.

१९ शाहू व ताराबाई यांचा झगडा सुरू असतां विजापूरला कामबक्षानें बादशाहीपद धारण केलें तेव्हां त्याचें बंड मोडण्याकरितां बहादूरशहानें दाक्षिणेंत स्वारी केली. या पूर्वींच त्यानें अजमशहाची व्यवस्था लाविली होती. बहादूरशहाचीहि शाहूवर मर्जी होती; करितां बादशहानें मदत मागितल्यावरून त्यानें त्याच्या मदतीस नेमाजी शिंद्यास फौज देऊन पाठविलें. या मदतीचा बादशहास फार उपयोग झाला. अखेर श. १६३१

च्या पौषांत कामबक्षाचा शेवट झाला. देशमुखीच्या हक्काची सनद, मातोश्रीची सुटका वगैरे ‘ स्वामीच्या हिताचा प्रसंग ’ साधण्याकरितां गदाधर प्रल्हाद प्रतिनिधीस शाहूनें बादशहाकडे वकिलीस पाठविलें. त्यानें बहुतेक मुद्यांचा समाधानकारक निकाल लावून घेतला. अखेर ‘ हा प्रांत अनुकूल ’ झाला असें पाहून श. १६३२ च्या वैशाखांत पातशाह सेनासमुदायानिसी उत्तर पथास चालिला. या वेळीं सेनापति जाधवाच्या हाताखालीं मराठ्यांचें भलें मोठें सैन्य खानदेशांत स्वारीच्या उद्देशें होतें. परंतु बादशहा खानदेशांतून जातांना त्याला आपल्या सैन्याकडून उपसर्ग पोहोंचून कृपेंत अंतर न पडावें म्हणून सेनापतीस पत्र पाठवून शाहूनें आपणाजवळ आणाविण्याची व्यवस्था केली. पत्राप्रमाणें जाधवराव यावयास निघाला. वाटेनें येत असतां त्यानें, रुसलेल्या थोरात दाभाड्यांची समजूत घालण्याचा उद्योग चालविला. रायाजी प्रभूस त्यांजकडे पाठविलें. त्यांकडूनहि जिवाजी गोविंद व शामजी वामन सेनापतीकडे आले. बोलाचाली होऊन पिंपळनेर परगणे बागलाण येथें दाभाडेथोरातांची गाठ पडून “ आपले सर्व अन्याय क्षमा करावे, दाभाड्यांचा सरंजाम पूर्ववत् करार करून द्यावा, स्वामीपासून बहुमान गौरवास अंतर न करावें ” वगैरे त्यांचे सर्व मुद्दे मान्य करून त्यांची सारी फौज समागमें घेऊन सेनापति हुजूर येऊं लागले. तेव्हां त्याबरोबर खंडेराव दाभाडे, दमाजी थोरात, बाळाजी विश्वनाथ वगैरे बारा सरदार होते. मोंगलांचें व शाहूचें सख्य होतें; तरी ठिकाठिकाणच्या मोंगली ठाणेदारांकडून त्यांस त्रास पोंहोंचत होताच. त्यांचा बंदोबस्त करणें हाहि गदाधर प्रल्हादच्या वकिली कामांतील एक भाग होता. चाकणकर लोधीखान पठाणानें पुणें वगैरे प्रांत पुरंधरपावेतों स्वाऱ्या करून उद्वस्त केला. त्यानें धनाजीचें सैन्य डोंगरवाटेनें येतें हें ऐकून भिल्लादींचा जमाव करून नाशिकपुणें—रस्त्यावरील संगमनेर जवळचा ब्राह्मणवाड्याचा घाट बंद केला. सेनापतीनें घाट मोकळा करण्याविषयीं आपणाकडून सांगून पाहिलें. ‘ लोक अनिवार आहेत एखादी कटकट माजेल ’ असें कळविलें असतां खानानें तिकडे दुर्लक्ष केलें; इतकेंच नव्हे तर तो लढाईस उभा राहिला. परस्पर लढाई होऊन लोधीखान मारला गेला. यांत मराठ्यांचेहि बहुत लोक जाया झाले. लोधीखान संपतो न संपतो तोंच जुन्नरकर करीमबेग आडवा आला. अखेर त्याचाहि पराभव होऊन तो कैद झाला. वास्तविक मोगल मराठ्यांचें सख्य असतां ठाणेदारांकडून

अशा आगळिकी व्हावयास नको होत्या. शाहू, बादशहाचें व आपलें सौरस्य बिघडूं नये म्हणून बरीच काळजी घेई. करीमबेगाच्या सुटकेविषयीं शाहूनें "करीम बेग स्वामीशीं एकनिष्ठ होता त्यास सोडावें हें स्वामीस अगत्य आहे. सोडविला जाईल" असें प्रतिनिधीस कळविलें. यासीनखान, सोमाजी जगथाप वगैरे यांची धामधूम चालू होतीच. पुणें अद्याप मराठ्यांच्या ताब्यांत नव्हतें. मोंगली ठाणेदारांप्रमाणें ताराबाई व कोंकणांतील शामळ याचाहि बंदोबस्त व्हावयाचा होता. कोंकणप्रांत अधिराज्य त्यांतील किल्ले केवळ राज्याचा जीव तो कसा सुटेल याची शाहू व त्याचे हितचिंतक यांना सारखी तळमळ लागून राहिली होती. पन्हाळा प्रांतावर स्वारी करून रांगणा घेऊन ताराबाईचा पुरा बंदोबस्त करण्याकरितां वाडीच्या सावंतास अनुकूल करून घेण्याचा उद्योग सुरू होताच. बहादूर शहा गेल्यानंतर दक्षणच्या सहा सुभ्याची व्यवस्था पाहणाऱ्या नबाबामार्फत मातोश्रीच्या सुटकेबद्दल शाहूचे एकसारखे प्रयत्न सुरू आहेत. अशीं हीं शाहूच्या कारकीर्दींतील पहिलीं दोन वर्षें मोठ्या भानगडीचीं गेलीं. यावेळीं त्याला गदाधर प्रल्हादाचा फार उपयोग झाला. अशा या पुरुषाचें पूर्ववृत्त देतां येण्याजोगा पुरावा अद्याप बाहेर येऊं नये यावरून इतिहासाच्या सामुग्रीचा अपुरेपणा सहज लक्षांत येईल. मराठी राज्याचा जुना माहितगार असल्यावांचून शाहूनें त्यास महत् पदावर नेऊन ठेवलें नसेल. तो शिवशाहींत वापरलेला खास असला पाहिजे. याला माहादाजी गदाधर व काशीनाथ गदाधर असे दोन मुलगे होते. पैकीं माहादाजी गदाधर शके १६५६ त अमात्यपदावर आढळतो. या घराण्याचा शरीरसंबंध अत्रे घराण्याशीं आहे तेव्हां ते देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होते याबद्दल शंका रहात नाहीं. नाशिक जिल्ह्यांत चांदवडचे बाजूला यांचा वंश असावा असें अनुमान आहे. ( त्रै. व. ७ ग. प्र. चा पत्रव्यवहार. )

**२०** खंडेराव दाभाड्याचा रुसवा निघाल्यानंतर शाहूनें त्यांस सेनाखासखेलीचें पद दिलें. त्यापूर्वीं शके १६३१ त शहाजी शिंदे सेनाखासखेल आहे. पुणें प्रांताची जहागीर मोंगलांकडून रंभाजी निंबाळकराकडे होती; त्याच्यातर्फें बाजी कदम फौजदार, गुंडाजी त्रिंबक सेखदार, मोरो बल्लाळ कारकून व्यवस्था पहात [ ले. ५० ]. करीमबेगाचें ठाणें पुण्याहून उठलें तरी संपूर्ण पुणें प्रांत शाहूच्या ताब्यांत येण्यास बरेच दिवस लागले. शाहू

व रंभाजी निंबाळकर यांच्या जोडीला दमाजी थोरात रुस्तुमराव, हाहि ताराबाईच्या तर्फे पुणें प्रांतावर अंमल गाजवितांना दिसतो. दमाजी हा शाहूच्या पक्षांतून पुनः ताराबाईकडे केव्हां व कां गेला, हें नीटसें लक्षांत येत नाहीं. शके १६३१ त त्याची व शाहूची गोडी झाल्यापासून १।२ वर्षांतच तो ताराबाईकडे गेला असला पाहिजे. कारण, शके १६३४ च्या आश्विनांत त्याला मौजे मोरगांव प्रांत पुणें, येथील इनाम चालविण्याबद्दल राजा शिवछत्रपतीचें आज्ञापत्र ( ले. ४४ ) आहे. याशिवाय तो व त्याचा हस्तक येसाजी गाईकवाड माळी यांनीं याच सालांत सासवड जवळच्या कोढीत गांवास लिहिलेलीं पत्रें मिळतात ( ले. ४३–४६ ). हा दमाजी जातीचा हाटकर धनगर आहे. धनगरांतील हाटकर[1] व खुटेकर या दोन प्रमुख जातींतील लोकांनीं स्वराज्य–स्थापनेपूर्वीपासून लढवय्ये-पणांत नांव मिळविलें आहे. अभंगराव आढळराव धायगुडे, कोकरे, देव-काते, थोरात, वाघ, काटकर वगैरे सरदार हटकर धनगरापैकीं असून होळकर, फणसे, बुळे हे खुटेकरांतील होत. यांचीं बहुतेक वतनी गांवें फल-टण–चौऱ्यांशी व सुपें-बारामती ह्या भागांत आहेत. मेंढयांचे कळप पाळून त्यांना सालोसाल देशावरून कोकणांत उतरवून खारें पाणी दाखविणारे ते हाटकर व घोंगड्या विणून राहणारे ते खुटेकर; अशीं या जाती ओळ-खण्याचीं मुख्य गमकें आहेत. मराठे व तत्सम जातींशीं यांचा रोटीव्यव-हार निःशंक होतो. पण बेटीव्यवहार मात्र जातीजातींतच होत असतो. इतकेंच नव्हे तर, धनगरांतील पोटजातींतहि परस्पर लग्नसंबंध होत नाहींत. धनगर शूरत्वांत कोणालाहि हार जावयाचे नाहींत. दमाजीचा हस्तक येसाजी गाईकवाड हा जातीचा माळी आहे, यावरून महाराष्ट्रांतील कृषी–कुशल माळ्यांतहि स्वराज्यकालीं मर्दुमकी गाजवून पुढें आलेलीं कित्येक घराणीं असावींत असें वाटतें. नारायणराव पेशव्यांबरोबर मारला गेलेला स्वामिभक्त चापाजी टिळेकर हाहि जातीचा माळी आहे. या येस माळ्याचा श. १६३२ च्या फाल्गुनांत तो पुरंदरवर चालून आला असतां पुरंदर-गडच्या पायथ्याशीं पराभव केला ( त्रै. व. ७ पृ. ७६ ). दमाजीची शाहू-च्या मुलखांतील धामधूम ताराबाईकरितां असल्यानें त्याच्या उद्योगास पुंडावा, बंड, असलीं विशिष्ट अर्थदर्शक विशेषणें लावितां येत नाहींत.

[1] ह्या वर्गांतील हटकर ही अत्यंत सोशीक व दणक आणि धाडसी ज्ञाति होय.

कोल्हापूरकरांकरिता शाहूला त्रास देणारे जर पुंड, बंडखोर ठरले तर शाहू-तर्फे उद्योग करणारे त्याच सदरांत ओढले जातील. पण तसें कोणी समजत नाहीं. दमाजीचा 'रुस्तुमराव' किताब त्याला कोणीं दिला हा प्रश्न सोडविण्यास जास्त पुराव्याची जरूरी आहे. राजारामाच्या कारकीर्दींत मर्दुमकी गाजविणाऱ्या वीरांना निरनिराळे किताब त्यांनीं देऊन गौरविलें आहे. आणि तोच दमाजीचाहि उदयकाळ आहे. तेव्हां त्याचा 'रुस्तुमराव' किताब मराठ्यांचाच असावा असें आम्हास वाटतें. या बिरुदाचा त्यानें आपल्या शिक्क्यांतहि उपयोग केलेला आहे ( ले. ४९. ). सेनापति, सर-लष्कर, सेनाकर्ते, हिंदुराव, सेनाखासखेल या लष्करी पदांप्रमाणें 'रुस्तुमराव' हेंहि लष्करी पद असावें असाहि एक तर्क वाहतो. कारण पेशवाईंत मौजे नायगांवच्या 'कद्रू' उपनामक मराठा घराण्यांतील पुरुषांना 'रुस्तुमराव' म्हटल्याचें आढळतें. 'रुस्तुमराव' हा किताब असो अगर पद असो तें दमाजीला मोगलाकडून मिळालें असें मानण्याचें कारण नाहीं. दमाजीची ता। पाटस ही जहागीर पुणें प्रांतांत व तोच भाग शाहू महाराजांनीं पेशव्यांच्या दिमतीस दिला असल्यानें दमाजी व बाळाजी विश्वनाथ यांचे खटके उडूं लागले. यापुढील प्रकार प्रसिद्ध असून त्यांत बदल करण्याजोगा पुरावा येथें नसल्यानें हा विषय येथेंच संपवूं.

## ७ जंजिऱ्याची मोहीम

२१ या प्रसिद्ध मोहिमेसंबंधीं हरी मोरेश्वर राजाज्ञा, बाजिरावसाो पेशवे, अंबाजीपंत वगैरेंचीं दहा बारा पत्रें यांत आलेलीं असून तीं सर्व भरपूर खुलाशाचीं व महत्वाचीं आहेत. त्यामुळें सदर मोहिमेंतील प्रचलित हकीकत ठिकठिकाणीं दुरुस्त करावी लागेल. श. १६५५ च्या चैत्रांत राजाज्ञा फौजेसह कोंकणांत उतरून महाडास आला. महाडच्या ठाण्यांत केदारजी केसकर, आपाजी सोमवंशी, निंबाजी सोमवंसी, सुभानजी गोळे व बाल-केशव दरेकर यांस ठेवून 'फौजेसहवर्तमान जाऊन बाणकोट सत्वर घेणे' अशी त्यास शाहूची आज्ञा होती. संभाजी आंग्रे जमावासुद्धां जलमार्गें तिकडे अगोदरच गेले होते. तेव्हां आपण जाण्याच्या अगोदरच ठाणें पाडाव होईल असा राजाज्ञांचा अंदाज होता ( ले. १०० ). पण बाणकोटनें बराच टिकाव धरला व अखेर तें ज्येष्ठ शु. १४ स फत्ते झालें. याच वेळीं बाजीरावहि कोंकणांत आला. त्यानें सूक्ष्मावलोकन करून 'हबशी शत्रू कांहीं

सामान्य नव्हे. ' ' एक जंजिरा पहिला होता त्यावरी इतकें राज्य सोडविले आतां तो चार जंजिरे आहेत.' ' पहिले एक जंजिरा होता त्यावर मोहिमा कैशा होत होत्या त्या कलल्याच आहेत. परंतु तो हारीस आला नाहीं, दम धरून राहिला. मागती इतकें राज्य सोडविलें;' असें हुजूर कळविलें. बिरवाडी, अवचितगड, सुरगड, घोसाळा, बाणकोट वगैरे स्थळें घेतलीं. परंतु ' निर्मूलच करावें तेव्हां मेहनत फारशी पाहिजे. ' ' त्याचे दोन हात जबरदस्त आहेत येक आजणवेल व येक उद्देरी ' करितां ' प्रतिनिधी आजणवेलीस जातील ' व ' उद्देरीस सरखेल खटपट करितील ' तर याची हिमत कम होईल व आस्राहि सुटेल ' तेव्हां ' प्रतिनिधी रवाना केले ते महाडास येऊन छावणी करणार ' हें बाजिरावास पसंत पडलें नाहीं. प्रतिनिधीनें अंजनवेलीस जाऊन मोर्चे देऊन तिला बंद करावी म्हणजे जंजि-याचे हातपाय बंद होतील असें पेशव्यानें आपलें स्पष्ट मत हुजूर कळविलें. मोहीम तडकाफडकी संपणारी नव्हती. कारण भोंवतालचे चार जंजिरे घ्यावेत तेव्हां मुख्य जंजि-यास शह बसणार ' आंत सामान म्हणावें तरी दाहा वर्षांचें आहे ' ' आरमारानें त्याचें गलबत कोठें बाहेर न फिरे थैसे होईल ' ' बाहेर त्याचा रीघ न जाला ' ' म्हणजे वर्षा दोन वर्षात कार्य जंजि-याचे होईल. ' हबशाची वळवळ कायमची बंद करावयाची तर पेशव्यांचें मतें 'मबलग पैका' व 'कनिष्ठ पक्ष पंधरा हजार' माणसांची जरूरी होती. तशांत पावसाळयांत फौज ठेवण्याची सोय नव्हती. कोंकणची पावसाळी हवा घोड्या माणसास मानवणारी नाहीं. तेव्हां त्या मुलकांत राहूं शकेल असें पायदळ पाठवून द्या असा पेशवा एकसारखा तगादा करीत आहे. हिमतीच्या दृष्टीनें लष्करांत नवीन भरती केलेलें सैन्य अगदीं कुचकामाचें होतें. एके ठिकाणीं दीडशें लोकांची चौकी होती ती हबशांकडील पंचवीस माणसांनीं उधळून लाविली. पंचविसांपुढें दीडशांना टिकाव धरवला नाहीं. पावसाळयांत लष्कर कोंकणांत राहील तर 'विशालगडी पातशाहाची हगवणी जाली तैसा विचार होईल.' त्यामुळें मोहीम टाकून बाजिराव परत येतो कीं काय,असाहि दरबारास संशय येऊं लागला. तेव्हा अंबाजीपंत व नारो राम मंत्री यानीं त्यास तसें न करण्याबद्दल कळविलें. इतक्यांत खानजादा सिद्दी रहिमानचें पेशव्यांकडे राजकारण आलें. हा खानजादा खरा वारसदार असतां त्याला मागें सारून दुसऱ्यानेंच जंजि-याची गादी बळकाविली होती. तेव्हां याचें म्हणणें ' छत्रपति शाहूनें माझी स्थापना करावी. मी तुमचीं कित्येक

कामकाजें करीन आणि स्थापनेनंतर चार महिन्यांच्या आंत तुम्हांस रायगड देईन.' जंजिऱ्यांतील हबशी सिद्दी संबूळ व सिद्दी अंबर होते; ते शहाजाद्यास आरमार देऊन जंजिऱ्यांत घ्यावयास कबूल होते; परंतु रायगड मराठ्यांस देण्याची त्यांची तयारी नव्हती. ही कनिष्ठ पक्षाची मसलत म्हणून बाजिरावानें सुचविली आहे. "राजश्रीनी खर्चाची व लोकाची बेहबुदी करून मनसुबा सिधी पावावा हे उत्तमच आहे' पण ही करामत शाहूंत या वेळीं नाहीं असा बाजिरावाचा दृढतर समज दिसतो. अंजनवेल, गोवळकोट, जंजिरा, रायगड व विजयगड हीं पांचीं स्थळें हातीं आल्यांवांचून सोडविलेले किल्ले व मुलूख राखतां येणार नाहीं. अखेर किल्लेहि जातील व कोंकणलगतचीं मावळें मारलीं जाऊन आपलें राखतां पुरेवाट होईल, अशी बाजिरावास भीती वाटत आहे. सेखोजी अंगऱ्यानें राजपुरी खोकरी लुटली. या लुटींत पांच गुराबा व कांहीं गलबतें मिळालीं तीं अंगऱ्यानें कुलाब्यास रवाना केलीं. पण ही लूट कौल दिला असतां झाली होती. या बाबतींत अंगऱ्यावर मोठा ठपका आला. सेखोजीची व बाजिरावाची गांठ पडून उभयतां काहीं दिवस एकत्र होते. आणखी कांहीं दिवस त्यानें आपणाजवळ राहावें असा पेशव्यानें बराच आग्रह केला परंतु कुलाब्याचा बंदोबस्त ठीक नसल्यानें तो तिकडे तांतडीनें निघून गेला. तरी त्यानें आपला भाऊ मानाजी सात आठसें लोकांनिशीं पेशव्यांच्या मदतीस ठेविला व रघुनाथजीसाहि जयेगडाहून बाजिरावाकडे येण्याबद्दल पत्रानें कळविलें. बकाजी महाडिकानें मंडणगडास मोर्चे दिले होते. कुलाब्याचा बंदोबस्त करून स्वतः सेखोजी उंदेरीस लागणार होता. अशी अंग्र्यांची सख्त मेहनत चालूं होती. शाहूकडून वेळेवर पैसा येईना तेव्हांतर पेशवा अगदीं एकेरीवर येऊन 'आजी ताा आम्हास अनकूल पडले तितका खर्च केला याजउपरी आमचे वस्तु खर्च कैचा करविती बेमबलगा खर्च पाहिजे त्यास कार्यहि धण्याचे साधले राज्य धण्याचे आहे खर्च लागेल तो धण्यानीच केला पाहिजे' 'आम्हास कर्ज घेऊन मनसुबा होत नाही धणी खर्चास पुरवितील तरी मेहनत करून **जिवाकडे न पाहतां धण्याचें काम होईल तें करून.** यामागेंहि कर्ज झालें तें धणीच देईल सुटले राज्य तेंहि धण्याचेंच आहे आम्हापासून चाकरीस कोताई होणार नाहीं आम्ही तो जीवाभ्य श्रम करावयास चुकत नाहीं.' हीं अवतरणें खास

बाजिरावाच्या पत्रांतील असून तीं त्याचा मराठी राज्याशीं असलेला संबंध दर्शवितात. स्वतः बाजिराव, आपले सर्व उद्योग शाहूमहाराजांकरितां असून मी केवळ चाकर आहे, अशी कबुली देऊन कृति करीत आहे. तेथें आम्ही त्याच्या माथीं मराठी राज्याचा धनीपणा मारणें शुद्ध अन्यायाचें ठरेल. शाहू-महाराजांनीं आपल्या हयातींत केव्हांहि आपला धनीपणा गमाविलेला नाहीं. आतां यांच्या उत्तरवयांत त्यांचे सगळेच चाकर शिरजोर होऊन मुख्य सत्तेला धाब्यावर बसवूं लागले होते हें खरें आहे. पण त्याचा अर्थ शाहूची सत्ता नष्ट झाली होती इतपत ताणतां येत नाहीं ( ले. १०० ते १०६ ).

२२ शके १६५५ च्या चैत्रापासून ज्येष्ठ वा। पक्षापर्यंतची ही हकीकत आहे. ज्येष्ठांत अंबाजीपंत कोंकणात उतरला. त्यानें पाचाड माची किल्ले रायगडहून अ. आषाढ शु. ७ स पत्र लिहून या मोहिमेचा जंजिरेकरा-कडील जो भेद्या शेखजी, त्याचा, शाहू महाराजांकडून गौरव होण्याबद्दल सुचविलें आहे. हिंदी रयत आपल्या राजकर्त्यांविरुद्ध खटपट करीत अस-ल्याचा पुरावा जुन्या इतिहासांत सहसा पहावयास मिळत नाहीं. पण ले. १०८ मध्यें रयतेनें आपल्या सरकाराविरुद्ध त्याच्या शत्रूकडे गुप्त संधान बांधल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. सिद्दीच्या राज्यांतील रयतेनें 'आंजिनवेल गोवळकोट स्वामीनें ( पंत प्रधानांनीं ) घ्यावा. त्यास खर्च लागेल त्यास समस्त न्याधीमधे लक्ष रुपये स्वामीस करून देऊ;' असा करार केला आहे. शके १६५५ माघ वा। १४ स बारा हजार स्वार व सातशें मावळे बरोबर देऊन अंजनवेल घ्यावयास रामाजीपंतास पाठविलें. हा रामाजी पंत बहुधा फतेसिंग भोसल्याकडील असावा. कारण, हें पत्र त्याच्या पद-रच्या अत्र्यांकडे मिळालें ( ले. १०९ ). या सर्व पत्रांवरून दोहीं पक्षांचें बलाबल, मराठी सरदारांतील फाटाफूट, बाजिरावाच्या उद्योगाचें स्वरूप चांगलें स्पष्ट होतें. ही मोहीम पुढें कित्येक वर्षं चालू होती.

**८ श. १६६१ भाद्रपद ते १६६२ वैशाखः— २३** या आठ महिन्यांतील ( १ ) बाजिरावाचा पुण्याचा मुक्काम, ( २ ) नासरजंगावरील स्वारी, ( ३ ) आपा–नानाची कोंकणांत सफर या बाबतींत ले. १३२ ते १४४हे माहिती देत आहेत. श. १६६१ च्या भाद्रपदांत बाजिराव, चिमाजी आपा व नानासाहेब पुण्यास असून झालेला कारभार नानासाहेब बाबाला कळवीत आहे. नुकत्याच होऊन गेलेल्या मस्तानीच्या भानगडीमुळें गढूळ

झालेलीं पितापुत्रांचीं मनें अद्याप व्हावीं तशीं स्वच्छ झालेलीं नव्हतीं. यावेळीं बाजिरावावर खरा पगडा वासुदेव जोशाचा आहे. या वासुदेव जोशाबद्दल अद्याप आम्हास कांहींच माहिती नाहीं. त्याचा तपास अवश्य व्हावयास पाहिजे. या पुण्याच्या मुक्कामांत बाजिराव ( १ ) गोंवें घेण्याबद्दल इंग्रजांशीं मसलत, ( २ ) बाबूजी नाइकाची समजूत, ( ३ ) 'मामले गिमले विल्हे लावणें, वगैरे कामें उरकीत आहे. बाजिराव व पोर्तुगीज यांत तात्पुरता तह होऊन बाहेरून तंटा मिटलासा दिसत होता ( ले. १३७ ). परंतु वसई घेऊन उत्तर कोंकण पोर्तुगीजजाचांतून मुक्त केलें तरी हा कांटा कायम कसा उपटला जाईल याची मराठी दरबारांत शहानिशा सुरूं होती. गोंवें घेतल्यावांचून पोर्तुगीजांची पूणाहुति होत नव्हती. वसईचा पाडाव होतांच मुंबईच्या इंग्रजांची तारांबळ उडून शाहू व चिमाजी आपा यांकडे इंग्रज वकिलांचे खेटे सुरू होते. यापूर्वी इंग्रज वकील साताऱ्यास गेला होता तो आतां पुण्यास बाजिरावाकडे आला. 'शनिवारीं सकाळी इंग्रजांची भेट जाहाली कुशल प्रश्न मात्र जाहाले बोली पुढें होणे तेव्हां होईल' ( ले. १३३ ). इंग्रजांशीं दोस्ती करून त्यांच्या मदतीनें गोंवें घ्यावें असा 'रामचंद्रजी वगैरे कारभारी' यांचा मानस दिसतो (ले. १३५). गोंवें घेऊन देण्याच्या कामगिरीबद्दल दोन परगणे निदान दीड परगणा द्यावा असें इंग्रज म्हणत होता. चिमाजीआपाच्या मनांत, एक परगणा देऊन तह होत असल्यास करावा नाहीं तर त्यावांचून जरूर नाहीं; असें होतें. बरीच वाटाघाट होऊनहि शेवटीं हा प्रश्न यावेळीं निकालांत न निघाल्यामुळें तहाची वाटाघाट येथें थांबली असावी असें वाटतें.

२४ सुभेदार पिलाजी जाधव, राणोजी शिंदे हे आले होते आवजी कवडे व मल्हारबा यावयाचे होते ते आल्यावर 'मामले गिमले' विल्हे लागावयाचे. पेशवा व रामचंद्रबावा यांत तेढ दिसते. त्यामुळें बावा जेव्हां बोलवितात तेव्हांच मात्र ते येत असत. हे एकत्र झालेले पेशव्यांचे सेनापती पुढील नासरजंगाचे स्वारींत हजर आहेत.

२५ बाबूजी नाइकाच्या देण्याची तोड, त्यांजकडून आणखी पांच सात लाख रुपये घेऊन मामला हवालीं करावा अशी रामचंद्रबावांनीं सुचविली. हा बहुधा कर्नाटकाचा मामला असावा. परंतु तें नाइकानें मान्य केलें नाहीं. तेव्हां बाबूजीच्या भावाकडे—आबाजी नाइकाकडे—'तुम्ही नाइकास

लाख रुपये द्या, तुमच्याखेरीज इतरास इतका पैका देववत नाहीं' असें बोलणें सुरूं होतें; तेंहि शेवटास गेलें नाहीं. बाबूजी नाईक 'आधी मामला द्या म्हणजे जे मिळतील ते देऊं' असें म्हणण्याचा सुमार दिसूं लागल्यामुळें हा कारभार येथेंच थांबला. पुढें बाजिरावाच्या पश्चात् रघूजी भोसल्याच्या मार्फत पेशवाई मिळण्याची केलेली खटपट वाया गेल्यावर नाइकानें नाना साहेबांमागें देण्याची तुंबडी लाविली असतां महादोबा पुरंदऱ्यानें **स्वतःचा पैसा** नाइकास देऊन त्याचें धरणें उठविलें व त्यास पुण्याबाहेर घालविलें.

२६ ले. १४० या यादीची मिती नक्की होत नाहीं. पण ती याच सालांतील अगर आदल्या सालची असावी. शाहू महाराजांचें मन बाजिरावा-विषयीं सदा साशंक असे. यावेळीं तर महाराज त्यावर रुष्ट दिसतात. (१) गाईची भानगड, ( २ ) नासरजंग प्रकरण, ( ३ ) तिघांतून कोणी जवळ राहावें, ( ४ ) लग्नाची भानगड इत्यादि बेबनावाचीं कारणें यादींत नमूद आहेत. गाईची साधी भानगड थोडक्यांत मिटली. नासरजंगाशीं तूर्त बिघाड नको ही शाहू महाराजांची खरीखुरी इच्छा. 'जसा तो आपणासी वर्तेल तैसे आम्ही वर्तू. बिगाड न करूं' हें पेशव्यांचें म्हणणें. तसेंच तिघांतून कोणी तरी एकानें हुजूर राहावें या छत्रपतींच्या बोलण्यास 'आमची वासना हेच आहे.' या पेशव्यांच्या म्हणण्यावर 'त्या घराण्या-इतका ( पुरंदऱ्यांइतका ) श्रेह आमचा कोणाचा आहे ? आता चौघां-तून येक जणे राहयास चिंता काये राहिलीयावरी खिलवंतात बाहेर तेच आहेत दुसरा कोण आहे ?' अखेर माहादोबा महाराजांजवळ राहण्याचें ठरून तात्पुरता हा प्रश्न निकालांत निघाला. लग्नाचा मजकूर ध्यानांत येत नसल्यानें त्यावरचे 'साहेब सर्वांस वडल, साहेबीं लग्ने करावी आम्ही सेवक सेवेसी हाजीर आसो' हें उत्तर घोंटाळ्यांत पाडतें. पुत्रप्राप्ती-करितां स्वतः महाराज लग्नें करण्याच्या बेतांत असतील काय ? त्या काळीं वंशविस्ताराकरितां शेंकडों ऐपतदार वृद्ध सालोसाल नवरदेव बनत. ही लग्नाची भानगड संशोधकांनीं अवश्य विचारांत घ्यावी. 'रघोजी बावांनीं आम्हास हैराण केलें आपला ग्रहभंग होयास मूल रघोजीबावा झाले. बरे रुणानुबंध प्रमाण.' हा 'गृहभंग' म्हणजे राण्यांचीं भांडणें कां पेशव्यासंबंधीं साशंकता ? कसेंहि असलें तरी रघोजीविषयींचा महाराजांचा गढूळपणा यांत स्पष्ट प्रतिबिंबित होतो. तशीच पेशवे घराण्याच्या कर्तृत्वाची शाहूवर

पडलेली छापहि स्पष्ट होते. परंतु उभयतांची चित्तशुद्धि न होतां बाजिरावानें शाहूच्या इच्छेविरुद्ध नासरजंगावर स्वारी केली. त्यामुळें या स्वारींत पेशव्यानें छत्रपतीकडे मदतीची याचना केली असतां ती फुकट जाऊन 'सा सुभे दक्षण मोकळी व्हावी यैसा आलेला समय' वाया गेला. तो प्रकार असा–

नासरजंग कबूल केलेली जहागीर देईना. सबब त्यावर स्वारी करण्याचें ठरवून मार्गशीर्षांत पेशवा त्याच्या मर्दनास डेरेदाखल झाला. बरोबर मल्हारराव होळकर, राणोजी सुभेदार व पिलाजी जाधवराव हे कसलेले नामांकित सेनापती होते. पेशव्यांच्या फौजेनें त्याला रेटीतरेटीत राजधानींत औरंगाबादेंत माघांत कोंडिलें. शहरचे पूर्वेस व उत्तरेस मराठी लष्कराचा तळ पडला. वैरणीचे उपवास घोड्यास पडले म्हणून शाळू कापून चारावे या विचारें नासरजंग माघ वा ४ स शहराचे व डोंगराचे मधून शहर आडवें टाकून पहाड–सिंगापूर यावरून तिसगांवास त्या दिवशीं मुकाम करून दुसरे दिवशीं कूच करून खराडी प्रा वालूज येथें आला. मराठी सैन्यहि त्याच्या पाठीवर, बाजूनें चहूंकडून चालून आलें. संध्याकाळीं तळ पडला तेव्हां दोही सैन्यांत अवघ्या आद कोसाचें अंतर होतें. त्या दिवशीं मल्हारबा, राणबा डावे बाजूस व सुभेदार तोंडावर राहिले. गंगातीरास जाऊन गंगेच्या कांठाकांठानें चालावें असा मोगलाचा विचार होता. तर रान खलपाचें लागलें म्हणजे जरबेंत येईल तेव्हां एकदम हल्ला करून बुडवावा हा मराठ्यांनीं डाव योजिला. पेशव्यानें परभारें मदतीकरितां फत्तेसिंग, रघोजी वगैरेंकडे पत्रें पाठविलीं व हुजूरकडूनहि अशी पत्रें त्यांजकडे ताबडतोब जाण्याबद्दल बाबास कळविलें. 'सा सुभे दक्षण मोकळी व्हावी यैसा समय आहे' परंतु ही मोहीम महाराजांचे इच्छेविरुद्ध पेशव्यानें आपल्या जबाबदारीवर सुरू केली असल्यानें त्यांजकडून योग्य मदत झाली नसावी असें वाटतें. अखेर फाल्गुन शुद्ध पक्षीं गंगेच्या कांठीं मुंगीपैठण येथें तह होऊन ही स्वारी संपली ( ले. १३८,१३९ ).

## ९ चित्पावन, कऱ्हाडे आणि देवरुखे

२७ संशोधकांची कित्येक वेळां 'इकडे आड व तिकडे विहीर' अशी शोचनीय स्थिती होत असते. त्यांतले त्यांत सामाजिक पत्रव्यवहार हातीं आला असतां फारच त्रास होतो. हातीं आलेला कागद महत्वाची

हकीकत देत असल्यानें तो नाइलाजास्तव प्रसिद्ध करावा लागतो. तसें न केल्यास कर्तव्यभ्रष्टता पदरीं पडते. बरें, प्रसिद्ध करावा तर त्यामुळें कित्येक रुष्ट होतात. असा पेच असल्यानें सामाजिक पत्रव्यवहार प्रसिद्ध करून शिव्याशाप खाण्याचें पूर्वींच्या पिढींतील संशोधकांच्या नशिबीं आलें. आम्हीं तोच व्यवसाय पतकरला असल्यानें त्या शेलापागोट्याचा अव्हेर करून आमचे कसें बरें चालणार? असो. ले. १४६ हा चित्पावन, कऱ्हाडे व देवरुखे यांमधील पूर्वापार तेढीवर एक महत्वाचा प्रकाश पाडीत आहे. पत्र अस्सल असून ते खुद्द चिमाजी आप्पाच्या हातचें आहे. कोंकणांत या त्रिवर्ग ब्राम्हण जातींत शके १४०० पासून एक सामाजिक तेढ आहे. त्यांत चित्पावनकऱ्हाड्यांचें म्हणणें कीं देवरुखे ब्राह्मण अपंक्त असून त्यांच्याकडे भोजनादि व्यवहार करणें निषिद्ध आहे. उलट, देवरुख्यांचें म्हणणें, चित्पावनकऱ्हाड्यांचा आरोप द्वेषमूलक असून याच्या मुळाशीं अगदीं क्षुल्लक कारण आहे. ज्ञातिबहिष्कार किती क्षुल्लक कारणावरून पडतात हें सुप्रसिद्ध आहे. पांचसहा वर्षांपूर्वींची गोष्ट. श्रीमच्छंकराचार्यांचा मुकाम एका खेडे गांवीं पडला. तेथें एकच ब्राह्मणाचें घर होतें. श्रींची स्वारी आपल्या गांवीं आली असतां नारायणानें ऐपत दिली असूनहि सदर ब्राम्हणानें श्रींची मुळींच विचारपूस केली नाहीं. त्यामुळें श्रींचा अपमान झाला व त्यांनीं सदर ब्राह्मणास तो श्रींची माफी मागेपर्यंत अपंक्त केलें. सध्यांच्या श्रींच्या अधिकाराची माहिती असल्यानें या खमंग ब्राह्मणानें अद्यापहि माफी न मागितल्यामुळें तें आचार्यांचें आज्ञापत्र जसेंच्या तसें कायमच आहे. अशा प्रकारचा अगदीं क्षुल्लक प्रकार देवरुखे प्रकरणाच्या मुळाशीं आहे असें वाटतें. कोणी चितळे भट्टानें तळ्यांतील माती काढण्यास सांगितली असतां ती एका देवरुखे ब्राह्मणानें काढली नाहीं म्हणून त्यानें त्यावर सामाजिक बहिष्कार घातला व त्यामुळें हा कलह उत्पन्न झाला. चौदाशेंपासून पेशवाईपर्यंत हे वाद निरनिराळ्या काळीं उत्पन्न झाले व प्रत्येक वेळीं देवरुख्यांचें सद्ब्राम्हण्य सिद्ध झालें. या पत्रांतहि देवरुख्यांचें सद्ब्राम्हण्य सिद्धच धरलेलें आहे. देवरुखे वादांत कोंकणांतील चित्पावनकऱ्हाडेच भाग घेत आहेत. त्यांत देशावरील ब्राम्हण केव्हांच पडलेले दिसत नाहींत. त्यामुळें हा वाद विवक्षित क्षेत्रांतील सामान्य कारणानें उत्पन्न झालेला होता हें निर्विवाद सिद्ध होतें. हे देवरुख्यां-

वरील आरोपाचें साधार खंडण करणारें रा. पिंपुटकरांचें पुस्तक या वादांत लक्ष घालणारांनीं अवश्य पाहावें. यांतील परिशिष्टांतील नं. ५ चें पत्र व सोपारे येथील कै. राजवाडे यांनीं छापलेलें पत्र यांची सांखळी या चिमाजी आपाच्या पत्रानें बरोबर जमते. रा. पिंपुटकरांच्या नं. ५ च्या पत्रांतील शक मात्र सपशेल चुकला आहे. ही बहुधा नकलकाराची चूक असावी. मुद्गल भट पंडितराव शके १६५० चे सुमारास वारला. तेव्हां हें पत्र तत्पूर्वींचें असलें पाहिजे. शकाप्रमाणें इतरहि कित्येक चुका यांत आहेत. पण त्यांतील गोळाबेरीज अर्थाला कशानेंच बाध येत नाहीं. चिमाजी आपाच्या पत्रांत शाहू महाराजांच्या दरबारांत देवरुखे प्रकरण निघाल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. सोपारे येथील निर्णयहि शाहूच्या दरबारांतील निर्णयाचा उल्लेख करीत आहे आणि तोहि निर्णय देवरुख्यांतर्फेचाच आहे. शिवाय, मुद्गलभटाप्रमाणें पैठणचे तत्कालीन विद्वन्मान्य यादव भट कोरान्ने हेहि देवरुख्यांचें सद्ब्राह्मण्य स्पष्ट कबूल करीत आहेत. अर्थात् जंजिरेकरालाहि चित्पावनकऱ्हाड्यांच्या विरुद्ध जाण्यावांचून गत्यंतरच नव्हतें. त्यामुळें चित्तपावनकऱ्हाडे पुन्हां यादव भटाचें पत्र पेशव्यांच्या मार्फत बदलण्याचा प्रयत्न करूं लागले. एकंदरींत हा देवरुखे वाद या काळीं स्पष्टपणें निकालांत निघाल्यामुळें एव्हांपासून चित्पावन, कऱ्हाडे व देवरुखे यांत कोंकणांतहि भोजनादि प्रकार सुरू झाला असावा. यानंतर हा वाद केव्हांहि पुढें आला नाहीं. बरेच दिवस राजवाडे व ज्ञानकोशकार यांच्या लिहिण्यामुळें चिघळलेल्या देवरुखे प्रकरणाचा शेवट गोड करण्याचें श्रेय परमेश्वरानें मंडळाकडेच दिलेलें पाहून आनंद होतो. असो; मला मिळालेल्या पाध्यांच्या दप्तरांतील एक शके १५२२ च्या पत्रामधील देवरुख्यांचा संबंध चिमाजी आपाच्या ह्या पत्रा पूर्वींचा असल्यानें व पाध्याकडील पत्रानंतर गागाभट्टादि काशिकर पंडितांचा निर्णय झाला असल्यानें त्या पत्रांतील मजकूर शिळा आणि चित्पावन, कऱ्हाडे व देवरुखे यांच्यांतील तत्कालीन वादाचा अवशेष ठरतो. हें पत्र शिवचरित्रसाहित्य भाग २ मध्यें छापलें आहे.

## १० भट घराण्याचा भ्रम

२८ सवाई माधवरावानें भ्रमांत आत्महत्या केली; नारायणराव भ्रमिष्टासारखा वागे; नानासाहेब तर भ्रमिष्ट होऊनच वारला. हें भ्रमिष्टपणाचें

लोण याहि मार्गें पोहोंचतें. नानासाहेब लिहितो ‘ आरोग्य तीर्थरूपास जाहाले आहे सर्व रोग दूर करणार ईश्वर समर्थ आहे ’ ( ले. १२८ ). लगेच पुढल्या पत्रांत रोगाचा खुलासा केला आहे तो असा—‘ तीर्थरूप राजश्री राऊ उद्या अथवा परवा येतील. तीर्थरूपास काही बरे वाटलें. परंतु भ्रम गेला नाहीं. ईश्वर इछेन होणे ते होईल.’ ‘ तीर्थरूप ’ म्हणजे बाजिराव का चिमाजी आपा याचा नीटसा बोध होत नाहीं. एकंदरींत पेशव्यांच्या घराण्यांतील भ्रमिष्टपणा हा आनुवंशिक दिसतो.

## ११ नानासाहेबांची हिंदुस्थानांतील पहिली स्वारी

२९ श. १६६२ वैशाख शुा १२ रात्रीं नर्मदातीरीं बाजीराव निधन पावल्यावर ( ले. ४२६ ) बरोबर एक महिन्यानें आषाढ शुा १२ स नाना साहेबांस पेशवाईचीं वस्त्रें झालीं ( ले. १४७ ). त्यानंतर पावसाळा संपताच कार्तिक वद्यांत नानासाहेब, चिमाजी आपा व दिवाण महादोबा पुरंदरे हिंदुस्थानच्या स्वारीस निघाले. पण आपा आजारी पडल्यामुळें भांबुरड्याहूनच घरीं परत आले. नाना व माहादोबा पुढें चालूं लागले. स्वारी खानदेशांत एदलाबादेपर्यंत पोहोचली तों इकडे आपानी पौष शुा ११ स पुण्यास कैलासवास केला; बायको ‘ आनपुर्णाबाई सहगमन गेली ’ ( ले. ४२६ ). पुढील व्यवहार नीट लक्षांत येण्याकरितां प्रथम पुरंदरे मंडळींची ओळख करून घेणें जरूर आहे.

३० तुको त्र्यंबक व अंबाजी त्र्यंबक या बंधुद्वयांपैकीं तुकोपंताची माहिती फारशी उपलब्ध नाहीं. अंबाजीपंत व तुकोपंताचा मुलगा मल्हार तुकदेव शाहू सुटून येतांच प्रथम त्याच्या पक्षास सामील झाले व पुढील उद्योगांत त्यांचा त्याला फार उपयोग झाला. तेव्हां शाहूनें अंबाजीपंतास पेशव्याची मुतालकी दिली व मल्हार तुकदेवास हुजूरची फडणीशी सांगितली. हे चुलते पुतणे एकत्र रहात असून प्रपंच्यांत व राजकारणांत मोठ्या एकोप्यानें वागत. पेशव्यांच्या मुतालकीखेरीज बाळाजी विश्वनाथानें आपली पोतनिशी व जामदारखाना हाहि अंबाजीपंताकडे दिला. त्यानें ते हुद्दे आपल्यातर्फे दुसऱ्यास लावून दिले. पोतनिशीवर नारो मोरदेव नांवाचा एक विश्वासूक पुरुष अंबाजीपंतानें आपल्यातर्फे नेमिला. बाजिरावास पेशवाई मिळाल्यानंतर त्यानें दिवाणगिरीवर अंबाजीपंतास नेमिले तेव्हां

मल्हार तुकदेव ऊर्फ दादोबा मुतालकी पाहूं लागला. दादोबास धोंडो मल्हार ऊर्फ आप्पा आणि अंबाजीपंताला सदाशिव व माहादजी ऊर्फ बाबा असे दोन मुलगे होते. पैकीं सदाशिव हा एक मूल होऊन अंबाजीपंताच्या हयातींतच वारला. याचा मुलगा त्र्यंबक सदाशिव उर्फ नाना. सोमवंशी सरलष्कर, फलटणचे निंबाळकर, विठ्ठल शिवदेव, होळकर वगैरेंकडे अंबाजी पंतांच्या असाम्या होत्या. त्याप्रमाणें अंबाजीपंतांच्या हयातीपर्यंत महादोबा सरलष्करचे मुजूमदारीवर होता. शाहूच्या खास मर्जींतील लोकांत अंबाजीपंतांचा समावेश होई. दरबारांत बाजिरावाची बाजू राखण्याचा पुरंदरे मंडळी कसून प्रयत्न करीत. अंबाजीपंत व दादोबा असे खंबीर पुरुष दरबारांत बाजिरावाचा पाठपुरावा करीत असल्यानें तो निर्धास्तपणें मुलूखगिऱ्या करीत असे. ज्या मोहिमेंत पेशव्यांचा खासा पुरुष असे तेथें पुरंदऱ्यांचा पुरुष हजर असावयाचा. अंबाजीपंत शके १६५६ भाद्रपद शुद्ध अष्टमीस माहुलीस निधन पावले. बयाबाई बरोबर सहगमन गेली (ले. ४२६). पश्चात् चिमाजी आप्पा दिवाणगिरी करूं लागले. तेव्हां महादाजी अंबाजीस सरदारी मिळाली. नानासाहेबांस पेशवाई मिळाल्यावर तात्यांची दिवाणगिरी पुन्हां महादोबास मिळाली. मुतालकीचें काम दादोबा पहात होताच. नाना व धोंडोबाआप्पा पुढील राजकारणाचे धडे घरीं सासवडास बसून गिरवीत होते. चिमाजीआप्पास देवआज्ञा होताच सातान्याहून दादोबानें सासवडास नानास पत्र लिहून, पुण्यास सदोबाच्या—सदाशिवराव भाऊच्या— समाचारास जावे व बाराव्या दिवशीं त्यांस दुखोटा करावा म्हणून सुचविलें ( ले. १४८ ). तसेंच आप्पास कैलासवास झाला यामुळें कितेक चोरचरित आवडाव करितील यास्तव सावध राहावें, म्हणून बाबानें स्वारींतून इशारा दिला ( ले. १४८ ). पेशव्यांची स्वारी श. १६६३ च्या जेष्ठ शुद्ध पक्षांत दिल्ली जवळ आली. तेव्हां गत वर्षाप्रमाणें आवंदांहि मराठे अंतर्वेदींत धुमाकूळ घालणार असें पाहून बादशहानें सर्व लहान मोठे सरदार सवाई जयसिंगाबरोबर देऊन त्यास मराठ्यांवर पाठविले, तो आग्र्यास आला. प्रयागचा सुभा अमीरखान व अयोध्येचा सुभा मनसूरअल्लीखान यांसहि सवाईजीस सामील होण्याबद्दल हुकूम गेले. ते दोघे गंगेवर नावांचा पूल बांधून येतात असें पाहून पेशव्यानें मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे यांस आपणाजवळ बोलावून घेतले; व त्यांच्या

वाटेवर आवजी कवडे, गोविंद हरी वगैरे पथकें यमुनेच्या दक्षिणतीरीं प्रयागपर्यंत पाठविलीं. अशा रीतीनें अमीरखान व मनसूरअली यांची मराठी सैन्यानें वाट रोखलेली पाहून, व आपण एकट्यानेंच कलह केल्यास पुरी पडणार नाहीं, हा विचार ध्यानांत आणून सवाईजीनें सलूखाकारितां आपला वकील आपामल पेशव्याकडे पाठविला. ‘ सवाईजी याणी जे राजकारण केले ते सिद्धीस न्यावे उभयपक्षी ( बादशहा व मराठे यांत ) स्नेह करून द्यावा ’ ( खं.६–१५२ ). अशाप्रकारें बोलणें होऊन उभयतांची भेट होण्याचें ठरून व बुणग्यांत पिलाजी जाधवराव यास ठेऊन नानासाहेब राणोजी शिंदे, होळकर व पवार यांस बरोबर घेऊन आले. सवाईजीहि आगऱ्याहून कूच करून आले. परस्पर आपल्या लष्कराबाहेर येऊन मोकळया मनानें भेटले. ही भेट ढवलपूर येथें ज्येष्ठ शुा ८ स झाली. हा भेटीचा वृत्तांत नव्यानेंच येथें बाहेर येत आहे ( ले. १४९ ).

## १२ शाहू व नानासाहेब यांतलि तेढ (शके १६६९)

३१ श. १६६८ च्या मार्चांत सदाशिवरावानें कर्नाटकांत स्वारी केली तेव्हां नानासाहेब साताऱ्यास शाहूजवळ होता. आजपर्यंतच्या खटाटोपांत शाहूस अतिशय कर्ज झालें होतें. तशांत त्याला मुलगाहि नव्हता. रघोजी भोसले, नानासाहेब पेशवे, हे फौजबंद सरदार फौजेच्या बळावर मुख्य सत्तेस फारसें मोजीत नसत. तेव्हां आपल्या पश्चात् ह्या राज्याची काय वाट होणार, हा प्रश्न रात्रंदिवस त्याच्या पुढें दत्त असे. अशा नानाविध विवंचनेंत एक दोन वर्षांपासून तो होता. अशा स्थितींत भाऊसाहेबांची कर्नाटकची स्वारी चालू होती. नानासाहेबाला कांहीं तरी सबब काढून साताऱ्याहून हालावयाचें होतें, तेव्हां ‘नवाबाचा शह चिरंजीव राजश्री भाऊवर आहे ’ असें सांगून पेशवा साताऱ्याहून निघाला. पंढरपुरापर्यंत गेल्यावर नबाब वांजरा संगमाकडे गेले व नासरजंग फौजेसहवतमान शिरे प्रांतीं जाऊन पुढें श्रीरंगपट्टणाकडे जाणार अशी खबर आली. भाऊकडील शह टळला असें पाहून पेशव्यास पुढें जाण्याचें कारण उरलें नाहीं. अखेरसालचे दिवस आले, तेव्हां भाऊहि स्वारी संपवून देशी यावयास निघाले. त्याची व पेशव्याची गाठ वैशाख शुा १३ स इंदापुरानजीक पडली. नाना पुरंदरे हल्लीं कारभार करण्याजोगे झाले असल्यानें साताऱ्यास मुतालकीवर होता. पेशवा साताऱ्याहून

सर्वांची दिलसफाई करून निघाला नव्हता. तेथें त्याच्या विरुद्ध जे होते त्यांत शाहू महाराजांची थोरली राणी सौ सकवारबाई प्रमुख असे. त्यामुळें दरबारांतील नाना पुरंदरे, गोविंदराव चिटणीस वगैरे पेशव्याच्या तर्फेच्या लोकांस तिजपासून बराच त्रास पोहोंचे. तशांत तिची, धाकटी राणी सौ सगुणाबाई इजशींहि याच वेळीं जोराची घासाघीस सुरूं होती. धाकटी बाई सुद्धां आंग्र्यांच्या माणीकगडच्या प्रकरणापासून पेशव्याशीं जरा बाकूनच असे. त्यामुळें पुरंदऱ्यांस साताऱ्यास राहाणेंहि जिकीरीचें झालें. नानास व गोविंदराव चिटणिसास कैद करावें, त्यांच्या पायांत बेड्या ठोकाव्यात, इतकेंच नव्हेतर गोविंदरावाचा तर शिरच्छेद करावा, येथपर्यंत थोरल्या राणीची मजल येऊन पोहोंचली. तेव्हां महादोबांनीं "वाडिलापासून इजती मिळविल्या त्या कांहीं पेशव्याची मध्यस्ती करून घालविण्याकरितां नाहींत ' असा मंत्र देऊन महाराजांच्या पायावर डोई ठेऊन पुर्ते कांगावे करण्यास सुचविलें.पुरंदऱ्यांच्या प्रयत्नानें धाकट्याबाईचा राग जरा शांत झाला तेव्हां तिचा उभयतांत महाराजांकडे मध्यस्ती करण्यास विशेष उपयोग होऊं लागला. याच सुमारास पेशव्याची आत सौ भिऊबाई वारली. तेव्हां बाबूजी नाईकांनीं थोरल्या राणीकडे ' आपली वस्तवानी दाहा पंधरा लक्षाची ( पेशव्यानें ) कूल नेलीं ' अशी पत्रद्वारें तक्रार केली. तेंहि एक प्रकरण सकवारबाई घाशीत बसली होती. ' या नाइकाच्या तक्रारींत कांहीं अर्थ नाहीं भिऊबाई जिवंत असतांच तिनें आपल्या जिंदगीची व्यवस्था लाविली होती. आम्हाकडे तिजपैकीं सुतळीचा तोडाहि नाहीं ' असा पेशव्यातर्फे या बाबतींत खुलासा आहे ( ले. १९१ ). उभयतां राण्यांच्या कज्यांत त्यांचे कारभारीच खरें सूत्रधार असत ( ले. १९०, १९२ ते १९५ ).

३२ फत्तेसिंग, रघूजी व पेशवे यांचा कर्नाटकसंबंधाचा लढाहि निकालांत निघाला नव्हता. तें घोंगडेंहि तसेंच भिजत पडलें होतें. फत्तेसिंगावरहि महाराजांची बेमर्जी होतीच. तेव्हां त्यांस आपल्या कच्छपी लावण्याची तजवीज पेशवा करूं लागला. पेशव्याशीं बोलणें करण्याकरितां स्वतः फत्तेसिंग पुण्यास यावयास निघाला. पेशव्यानें त्याचा अगत्यवाद धरण्याकरितां 'आटाचा' (म्हणजे आठ लक्षाचा का आठ हजाराचा ?),सरंजाम मागितला होता. ही दक्षणा फत्तेसिगांकडून न मिळाल्यास ' राजश्रीचे

मजेस थोडाबहुत रंग भरून. ' असा शिधा डाव त्यानें योजिला होता ! शाहूच्या कर्जाचा बोजा पेशव्याचे वांट्यास जो आला त्याचा निकालहि आतांच झाला. हा कर्जाचा बोजा एकट्या पेशव्यानेंच उचलला कां ? त्याला सर्वांनीं हातभार लाविला हें नीटसें ध्यानांत येत नाहीं. सर्वच कर्ज एकट्या पेशव्यानें दिलें असेल असें वाटत नाहीं. असो, महाराजांनीं प्रथम बावीस लाख कर्ज त्यांजवर लादलें. पण नाना पुरंदऱ्यांनीं खटपट करून वीस लाखांवर आणून ठेविलें. हें कर्ज हप्त्याहप्त्यानें चार वर्षांत फेडावयाचें होतें [ ले. २१४ ]. पक्की याद गोविंद खंडेराव चिटणीसांच्या मार्फत मुा नसरतपूर खोजे प्रा खानदेश येथें झाली [ ले. २१६ ]. पहिल्या हप्त्याच्या फेडीस १ हणुराम मोदी, १ मियालु अतार, १ विष्णु विश्वनाथ, १ दत्तू कासार हे सावकार लावून दिले आहेत [ ले. २१८ ]. या वेळच्या पेशव्याच्या सांपत्तिक स्थितीचा अंदाज त्याच्याच शब्दांत पाहावयास सापडतो तो असा; ' आम्ही ह्मणजे सोन्याचे झाड जितके पेचात येईल तितके आणून ठकवावे नाहींतर आडकून पाडावें'; ' तीस लाख कर्ज जाहाले येदा काय होईल तें पहावें. परंतु कर्ज करीन म्हटल्यास मिळणार नाहीं. सावकारा सर्व अप्रामाणिक सरदारानी बुडविला ' तेव्हां महाराजाच्या कर्जफेडीचा प्रकार एकादशीच्या घरीं शिवरात्रीनें पाहुणे जाण्यासारखाच दिसतो. शाहू महाराज व्यक्ती कर्जमुक्त झाली असेल परंतु मराठी राज्यावरचा बोजा मात्र किंचिन्मात्र ढळला नाहीं [ले. २१३].

### १३ नानासाहेबाचे उत्तरेस पुन्हां प्रयाण.

३३ अशा रीतीनें इकडील तात्पुरती व्यवस्था लागल्यानंतर शिरावर घेतलेल्या कर्जाचा बोजा हलका करितां यावा म्हणून ' पोट भरून मबलग पैसा मिळविण्याच्या आशेनें श. १६६९ च्या फाल्गुनांत पेशवा हिंदुस्थानच्या स्वारीस निघाला. बरोबर महादोबा पुरंदरे होते. महादोबांचें टोपण नांव बाबा. तेव्हां इतउत्तर या सुटसुटीत नांवानेंच यांचा उल्लेख करूं. ' ये समई दिलीत काही जीव नाहीं. ' पण ही दिलीवर शह देण्याची सुसंधी ' रामचंद्रबावा व मल्हारबा येक जागा नाहींत ' यामुळें वाया जाऊन ' दिलीतील प्रसंग आवघड ' होऊन बसला. पेशव्याच्या फौजेचा तळ नर्मदेच्या उत्तरतीरीं असतां त्यास श. १६७० च्या चैत्रांत अहमदशहाच्या दिल्लीवरील चढाईची हकीकत कळली. अबदाली लाहोरची दुर्दशा उडवून

दिल्लीवर यावें या उद्देशें दाहा कोस पुढें आला; तेव्हां त्याला घालविण्या- करितां दिल्लीहून वजीर कमरुद्दीनखान व मनसूर अल्ली शहाजादा अहंमद यास घेऊन निघाले व पेशव्यास सत्वर निघून येण्याविषयीं दिल्ली दरबारां- तून पत्रें रवाना झालीं. पत्राप्रमाणें पेशवेहि मजल दरमजल जाऊं लागले. ( ले. १६३ ). पण पेशवे जाऊन पोहोंचण्यापूर्वींच बादशाही फौजेनें पठाणास मोडले व ते 'दो चौ हजारानिशीं पळालें ( ले. २१९ ). या धामधुमींत वजीर ठार झाला. व थोड्याच दिवसांत अजारी असलेला महंमदशहा बादशहा वैशाख शुा १ मरण पावला. या वेळीं दिल्ली अलीकडे जयनगरावर पेशव्याचा मुकाम होता [ ले. १६८ ] या पुढल्या दिल्लींतील भानगडी सांगण्यापूर्वीं पेशवा उत्तरेस आल्यावर पवार व माधवसिंग ईश्वर- सिंग यांचीं उपस्थित झालेलीं प्रकरणें विचारांत घेऊं.

३४ शाहूच्या दरबारांत चाकर शिरजोर होऊन जसें धन्यास मोजीत नसत तोच प्रकार पेशव्यासंबंधीं त्याच्या सरदारांनीं चालविला होता. लाखो रुपयाचा कर्जाचा बोजा माथीं घेऊन ज्या आपल्या शिंदे, होळकर, पवार वगैरे फौजबंद सरदारांच्या जोरावर पेशव्यानें राजश्रीच्या दरबारां- तील अग्रपूजेचा मान मिळविला होता ते सरदार बाजिरावाच्या पश्चात् उलटच्या गोष्टी सांगूं लागले. इतकेच नव्हे तर, त्यांचे कारभारीसुद्धां प्रसं- गोपात्त शिरजोरी दाखविण्यास चुकत नसत. शिंदे होळकराचें उत्तरेस इतकें बेसुमार वजन होतें कीं, त्यांच्या वाटेस जाण्याची पेशव्याची छा- ती नव्हती. शाहू महाराज पेशव्यापुढें जसे दिसत तीच अवस्था होळकरां- रापुढें नानासाहेबाची असे. मल्हारराव होळकराचा जबरदस्तपणा केवळ शिगलोटीला जाऊन पोहोंचला. त्याला तंबी देण्याची सोय नव्हती. त्यामुळें शिंदेहोळकरांची आपापसांतील चुरस परस्परांचें मर्म असल्यानें पेशव्याच्या पथ्यावरच पडली. वस्तुतः शिंदे होळकरांनीं बाजिरावानंतर पेशव्याचा धाक असा पाळलाच नाहीं. पानपतावर भाऊसाहेबानें व पुढें माधवरावानें या बेताल सरदारांवर कांहीं काळ वचक बसविला खरा; पण तो तेवढ्या पुरताच. राणोजी शिंद्यांपासून शिंदेहोळकरांत चुरस सुरूं झाली ती स्वराज्य घालवून संपली ! असो; शिंदेहोळकरांचा शिरजोरपणा पाहून यशवंतराव पवार, अंताजी माणकेश्वर, हिंगणे बंधू हेहि आपापल्यापरी अधून मधून दंडेली गाजवूं पहात. पण ती मात्र पेश-

त्यांनीं कधींच चालू दिली नाहीं. मोर नाचतो म्हणून लांडोर नाचूं लागल्यास फजीत पावणारच; तोच प्रकार या वेळीं यशवंतराव पवाराचा झाला.

३५ यशवंतराव पवाराच्या प्रकरणाचा उद्भव नीटसा ध्यानांत येत नाहीं. पेशव्याकडील गोविंद हरीची व पवारांची जेष्ठांत चकमक उडाली तींत दोहींकडील दहावीस माणसें जायाजखमी झाली. यशवंतरावांचा भाऊ रायाजी पवार जखमी झाला ( ले. १७२ ). अखेर धार, मांडवगड वगैरे परगणे पवारांनीं सरकारांत द्यावे व पेशव्यांनीं पवारास साडे तीन महाल द्यावे. यशवंतरावांनीं पुढें येकनिष्ठेनें चाकरी करावी येणेप्रमाणें करारांत येऊन हा कारभार उरकला ( ले. १७५ ).

३६ सवाई जयसिंगाचे मुलांपैकीं ईश्वरसिंगाचा पक्ष शिंद्यांनीं उचलला व माधोसिंगाच्या बाजूला होळकर झाले आणि त्यांनीं उत्तरेला सावळागोंधळ माजवून मराठ्यांच्या नीतिमत्तेचें खासें प्रदर्शन उघडिलें. हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांच्या आपापसांतील भांडणावर जगून आस्ते आस्ते सत्ताधीश बनल्याचा पाश्चात्यांचा इतिहास आपणांस अवगत आहे. त्याशीं या वेळच्या मराठ्यांच्या उत्तरेच्या बेताल वागणुकीची तुलना केली असतां ती बरीच मनोरंजक होईल. हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांच्या भांडणांत शिरून प्रबळ होण्याची मूळ कल्पना फ्रेंच मुत्सद्दी डुप्ले याची असें समजलें जातें. परंतु तें बरोबर दिसत नाहीं. डुप्लेच्या पूर्वींहि परकीय व स्वकीय महत्त्वाकांक्षी पुरुषांनीं हा प्रयोग केल्याचा दाखला मिळतो. खुद्द शिवाजी महाराज भोंवतालच्या लहान मोठ्या शाह्यांच्या आपापसांतील भांडणांत शिरून मोठ्या धीमेपणानें एकेक प्यादे पुढें ढकलीत ढकलीत स्वराज्य स्थापनेपर्यंत जाऊन पोहोंचले होते. तेव्हां पेशवे व त्यांचे सरदार उत्तरेंतील सत्ताधीशांच्या आपापसांतील भांडणांत शिरून बळावत होते याबद्दल कोणालाहि दोष देतां येत नाहीं. त्यांजकडे खरा दोष जो येतो तो हा कीं, ते नीति,व्यवहार व आपलें स्वतःचें ध्येय बाजूस सारून उत्तरेस राजकारण खेळले. हिंदुपदपादशाहीच्या ध्येयाकडे दृष्टी दिली असतां मराठ्यांस कोणाहि हिंदु सत्ताधाऱ्याचा पाडाव होईल असें कृत्य करितां येत नव्हतें. हिंदुसत्ताधीश बळावून त्याकरवीं परकीयांचें उच्चाटण करणें हें मराठ्यांचें उच्चतर कर्तव्य होतें. आतां

एखादा हिंदुसत्ताधीश जाणून बुजून त्यांच्या सत्तेस स्वतःकरितां वा परधार्मीयांकरितां विरोध करीत असेल तर त्यावर त्यांनीं शस्त्र उचलल्यास चाललें असतें; व त्याबद्दल त्यास कोणीहि दोष दिला नसता. पण मराठ्यांस रजपूत राजांच्या भांडणांत शिरण्यांत असलें कोणतेंहि बलवत्तर कारण दिसत नाहीं. पैसा मिळविणें हें हीन कारण त्याच्या मुळाशीं आहे. साध्या व्यवहारांतहि केवळ पैशाकरितां कोणी कांहीं कृत्य केल्यास त्याची बोळवण हीन कोटींत होतें. आलेली गरिबी घालविण्याकरितां घेतलेलें ऋण बुडविणारा विद्वान् मोठ्या कुळांतील म्हणून अधमाधम कोटी थोडीच चुकवूं शकेल? या ठिकाणीं आम्हांला ऋण झालें, करितां आम्ही हिंदुपदपादशाहीच्या ध्येयाचा खून करून रजपूत राजेरजवाड्यांच्या भांडणांत शिरलों असलें अमंगळ उत्तर दिल्यावांचून मराठ्यांना सोयच नाहीं. बरें, हे भांडणांत पडूं नव्हेत, पण पडले; पण तेथें त्यांनीं साधा व्यवहार तरी पाळला कां? तोहि नाहीं. इंग्रजांनीं महंमदअल्लीचा एकदां जो पक्ष स्वीकारला तो शेवटाला नेला. तेथें आज महमदअल्ली तर उद्यां त्याचा प्रतिस्पर्धी चंदासाहेब; असला अव्यवहार्य प्रकार तरी केला नाहीं. मराठ्यांनीं असला साधासुधा व्यवहारहि पाळूं नये याला काय नांव द्यावें? त्यांच्या सरदारांप्रमाणें इंग्रजफ्रेंचांचेहि गव्हर्नर निरनिराळ्या स्थळीं कारभार करीत होते. पण मुंबईकरांनीं मराठ्यांचा पक्ष स्वीकारला तर मद्रासकरांनीं त्यांचा प्रतिपक्षी हैदर पकडून एकाच इंग्रजांचीं दोन सैन्यें परक्यांकरितां परस्परावर गोळीबार करीत असल्याचा देखावा जगापुढें आणिला नाहीं. ईश्वरसिंगाच्या बाजूनें ज्या पेशव्याचा सरदार शिंदे लढत आहे त्याला तोंड देण्याकरितां त्याच पेशव्याचा मल्हारराव होळकर माधोसिंगाला सैन्य पुरवितो. या विचित्र करणीचें कोणाला व कसें समर्थन करितां येईल? एवंच शिंदेहोळकरांनीं उत्तरेस जो हीन पायंडा घातला व ज्याला पेशव्यांची मूक संमती होती त्यानें त्यांची खरी अपकीर्ति झाली. हा सर्व प्रकार पुढें पानपतावर प्रामुख्यानें नडला. असो. ईश्वरसिंग व माधोसिंग यांच्या झगड्यांत पेशव्यांनीं हल्लीं माधवसिंगाचा पक्ष स्वीकारला होता. पण दक्षिणेंत निजाम मेल्यामुळें नानासाहेब तातडीनें निघून गेल्यामुळें मल्हाररावाकडे या प्रकरणाचा शेवट लावण्याचें आलें. त्यानें एक दोन लढायांत ईश्वरसिंगास नरम करून माधोसिंगास त्याकडून चार परगणे देवविले.

३७ महंमदशहा मेल्यानंतर दिल्ली दरबारांत बराच महत्त्वाचा फेरबदल झाला. महंमदशहाचा मुलगा अहंमदशहा बादशहा होऊन सादतखानास बक्षिगिरी, माजी वजिराच्या मुलास दुसरी बक्षिगिरी आणि मनसूरअलीस वजिरी झाली. मनसूरअल्ली हा मराठ्यांचा पक्षपाती होता. बादशहा मेला तेव्हां पेशवे उत्तरेस होते; पण निजामनमुलूख मेल्याची खबर ऐकल्यामुळें ते लौकर दक्षिणेंत निघून गेले. निजाम मेल्याबरोबर दक्षिणेंत गडबड उडेल; तेव्हां आपणास तेथें जातिनिशीं हजर राहिलें पाहिजे, हें पेशव्याचें तातडीनें परत फिरण्याचें कारण, त्या वेळीं कोणास पटलें नाहीं. पुण्याच्या कारभारावर भाऊसाहेब असून त्याला बाबुराव ( बरवे कां फडणीस ? ) व सखाराम बापू मदत करीत होते. त्यांनीं निजाम मरतांच जागजागीं नामजादी पाठवून बंदोबस्त केला होता. नवीन आलेला निजाम नासरजंगाची हिदाय मोहिद्दीखान ऊर्फ मुजफरजंग याशीं गादीबद्दल घासाधीस झाली असल्यानें व नवीन दिल्लीदरबार त्यास प्रतिकूल असल्यानें तो मराठ्यांशीं बिघाड करण्यास असमर्थ होता. तेव्हां नानासाहेबानें या वेळीं उत्तरेसच ठासून राहावें असें दक्षिणेतून भाऊनीं कळविलें. उत्तरेची स्थिती वेगळी होती. नवीन झालेल्या व्यवस्थेंतून नाना प्रकारच्या भानगडी हटकून उपस्थित होणार होत्या. माधोसिंगाचे प्रकरणास नुकती कोठें सुरवात झाली होती. पवाराचा पुरता बंदोबस्त झाला नव्हता. शिंदे होळकरांतील तेढ घालविण्याचा उपक्रमहि झाला नव्हता. अशा रीतीनें उत्तरेंतील सर्व कामें अर्धवट ठेऊन परत फिरूं नये असें जवळच्या महादोबांचें म्हणणें पडलें; याला भाऊचाहि सल्ला हाच पडला. परंतु स्वतःचा हेका चालवून पेशवा दक्षिणेंत आला आणि त्यामुळें ईश्वरसिंगाचें प्रकरण चिघळून दिल्ली दरबारांतील मराठ्यांचा पक्ष कमकुवत होऊन पुढील पानपतच्या अनर्थाचें बीजारोपण झालें. पेशवे निघून गेल्यावर बादशहा व वजीर यांत तेढ उत्पन्न होऊन मराठ्यांशीं सख्य ठेवणाऱ्या सातदखानाचा अकबराबादचा सुभा व जयपूरवाल्याचा अजमेरचा सुभा जप्त करण्याची दिल्ली दरबारांत वाटाघाट सुरू झाली. मनसूरअल्ली हा मराठ्यांचा पक्षपाती होता, हें वर आलेंच आहे. याच सालीं नानासाहेब व भाऊसाहेब यांचीं अंतःकरणें गढूळ होऊन द्वैत वाढलें आणि पेशव्यांचा बाबा पुरंद्ऱ्यांशीं तर खटकाच उडाला. सखारामबापू

पुढें येऊन आपल्या अंगच्या हुषारीनें सर्वांवर छाप पाडूं लागला होता. या वेळची सखारामबापूंचीं जीं कित्येक पत्रें यांत आलीं आहेत; तीं त्यांची धूर्तता, आत्मविश्वास, लेखनचातुर्य, एकंदर परिस्थितीचें आकलन करून त्यांतून बिनचूक अनुमानें काढण्याची हातोटी इ. गुण चांगलेच निदर्शनास आणीत आहेत ( ले. १६५ ते १९० व १९६ ते १९८ वगैरे ).

## १५ ताराबाईचें कारस्थान

### ( श. १६७२ कार्तिक ते १६७३ कार्तिक )

३८ रामराजाचे नांवानें उद्योग करणारांत त्याची आजी ताराबाई व बहीण दर्याबाई निंबाळकर याच काय त्या प्रमूख होत्या. ताराबाईचे रामराजाच्या नांवावरचे उद्योग कोणत्या स्वरूपाचे होते हें नक्की सांगतां येत नाहीं; पण दर्याबाई मात्र त्याच्याबद्दल खऱ्या कळवळ्यानें प्रयत्न करतांना आढळते. ती भाऊ गादीवर आल्यामुळें पुढील राजकारणांत प्रामुख्यानें भाग घेणार असें पाहून पेशव्यानें तिचा वेळींच बंदोबस्त करण्याचें ठरविलें. शाहू महाराजांच्या व्यवस्थेंत नाखुष झालेल्यापैकीं प्रतिनिधींस शके १६७२ च्या कार्तिकाच्या आधींच पेशव्यानें ठिकाणीं लाविलें आणि त्याचा खटपटी मुतालीक यमाजी शिवदेव पदरीं बाळगून व प्रतिबंधांत असलेल्या दादोबा प्रतिनिधींस पदभ्रष्ट करून त्या जागीं आणिलेल्या भवानरावांस आपल्या तंत्रानें वागण्यास भाग पाडलें. त्यामुळें दादोबा व अंताजी सिवदेव मुतालीक हे सुसंधींची मार्गप्रतिक्षा करीत घरीं राहिले. छत्रपति रामराजा, दाभाडे, ताराबाई व सचीव यांची विल्हेवाट लागावयाची होती; त्या उद्योगास हल्लीं नानासाहेब पेशवा लागला. सचीव व त्याचा कारभारी कैद करून त्यांकडून सिंहगड व कर्यात मावळ—पुण्यापासून सिंहगडापर्यंतचा प्रदेश—त्याबद्दल दुसरा मोबदल्यांत प्रांत देऊन, मिळवून सचिवाचें प्रकरण विल्हे लागलें. कार्यभाग होतांच कार्तिकांत सचिवांची मुक्तता झाली. भाऊ गादीवर आल्यामुळें जादा सरंजाम मिळवूं इच्छिणाऱ्या दर्याबाईचा जुना बीड वगैरे सरंजामहि फत्तेसिंग भोसल्याच्या तंट्यांत जफ्त झाला. यानें दर्याबाईतर नाखूष झालीच. पण रामराजेहि रागावून गोसावी होऊन काशीस जाण्याच्या वैतागाच्या गोष्टी बोलूं लागले. ताराबाईची व्यवस्था शाहू महाराजांनीं स्वतः कांहीं केलेली नव्हती.

शाहूच्या व्यवस्थेप्रमाणें पेशवे सर्व राज्याचे मालक होऊन आपला नातू नामधारी छत्रपती बनला हें, एका काळीं ऐन आणिबाणीच्या प्रसंगीं महत्त्वाची कामगिरी करून मराठी राज्यावरील गंडांतर चुकवून व तें वाढीला लावून दाखविणाऱ्या कर्तबगार माउलीस कसें खपावें ? ती पेशव्याशीं उघड विरोध दाखवूं लागली. तिनें गडकरी अनकूल करून घेऊन सातारा किल्ला बळकाविला. या वेळीं निजामावरील स्वारीस निघालेला नानासाहेब तळावर पुण्यानजिकच्या चऱ्होलीस उमाबाई दाभाडीला छेडीत होता. त्याजवळ महादोबा पुरंदरे व रामचंद्रबावा होते. आणि सदाशिवरावभाऊ सांगोल्यास कर्नाटकाच्या स्वारीच्या तजविजींत होता. सदाशिवाजवळ सांगोल्यास असलेला नाना पुरंदरे नुकतांच ताराबाईची गडबड ऐकून साताऱ्यास गेला होता. पुढील भानगडी नीट लक्षांत येण्याकरितां हे मुक्काम ध्यानांत ठेविले पाहिजेत. पेशव्यांचे प्रच्छन्न वा गुप्त विरोधक एकत्र करून गमावलेलें सातारकर छत्रपतींचें स्वातंत्र्य मिळवून त्याचें चालकत्व आपल्या हातीं घ्यावें अशी उघड खटपट ताराबाईची सुरूं होती. ती मैदानांत असती तर भाऊ– नानांनीं तेव्हांच तिची वळवळ थांबविली असती, पण ती किल्ल्यावर बसून गोष्टी सांगूं लागल्यामुळें तडकाफडकी निकालाची आशा खुंटली. तशांत पेशव्याचें तिशीं समेटाचें बोलणें सुरूं होतें. त्यांत तिची समजूत आपणास घालितां येईल याचीहि त्यांस खात्री वाटत असावीशी वाटते. ताराबाई पुण्याहून निघाली तेव्हां तिनें नातसुनाबरोबर घेतल्या होत्या त्याहि वरच होत्या. भाऊनी सांगोल्याच्या व्यवस्थेकरितां बरोबर पाळलेला रामराजा ताराबाई-नंतर लौकरच साताऱ्यास आला. तेव्हां त्याला आपल्या कारस्थानांत ओढण्याचा ताराबाई प्रयत्न करूं लागली. पण तो तिचें ह्मणणें कांहीं केल्या ऐकेना.

२९ इकडे याच वेळीं चऱ्होलीस दाभाडे प्रकरण रंगत चाललें होतें. सेनापती यशवंतराव दाभाडे व्यसनी व नाकर्ता असल्यानें त्याचा बहुतेक कारभार त्याची आई उमाबाई चालवी; हें सुप्रसिद्ध आहे. यामुळें या वेळचें दाभाड्यांचें बोलणें उमाबाईशींच सुरूं होतें. गुजराथ प्रांत दाभाड्यांकडे असून हल्लीं त्याची सर्व व्यवस्था त्यांचा हस्तक दमाजी गाईकवाड पहात होता.

गुजराथेंत आपला निमा हिसा असून दाभाडे गायकवाडांनीं तो आमचा आम्हास सरसनिरस बिनतकार वाटून द्यावा असें पेशव्याचें म्हणणें होतें. त्यावर, 'दाहापांच लाख रुपये घेऊन हा तंटा तोडावा. गुजराथेंत हिस्सा मागूं नये' हें उमाबाईचें उत्तर येऊं लागलें. परंतु पेशवे पैशावर हा तंटा तोडण्यास राजी होईनात. मुलूख पाहिजे, हा त्यांचा आग्रह पाहून गैर अमली प्रदेश उमाबाई दाखवूं लागली. पण 'श्रीमंताची [ पेशव्याची ] जबरदस्ती आहे त्यामुळें त्याणी ( उमाबाईनें ) लबाडी करीन म्हटल्यानें काये होणे आहे ? मुलूख वाटून देतील.' ( ले. २६१ ) हे महादोबांचें भविष्य खरें झालें. मध्यंतरीं हें प्रकरण चिघळून बडोद्याजवळची डभई पुण्यानजीक येतें कीं काय असें वाटूं लागलें. पेशवे फौजेची जमवाजमव करूं लागले. सांगोल्याहून भाऊकडील फौज बोलाविली, ती लौकर येणार नाहीं करितां तूर्तातूर्त जवळची साताऱ्यास असलेली नाना पुरंदऱ्याजवळील फौज ताबडतोब बोलावून घेतली. चऱ्होलीस पेशव्याजवळच्या फौजेची सुमार २० हजार गणती झाली. चऱ्होलीचा मुकाम हालवून तळेगांवच्या रोखे, चाल करून पेशव्यानें आपला मुकाम चिखलीस नेला. तेथून तळेगांव आवघें पांच कोस होतें. उमाबाईजवळ पांच हजार फौज असून पेशव्याची हालचाल पाहून तीहि बचावाच्या मार्गास लागली. तळेगांवपासून एक कोसावर असलेल्या इंदुरी गांवीं ती कबिले घेऊन इंद्रायणीच्या डोहाच्या आश्रयानें अडचणींत जाऊन राहिली. नेट धरून कोणतेंहि प्रकरण धसाला लावण्याची धमक याकाळीं दाभाड्यांत नव्हती. 'त्याचे घरची खावंदगिरी साता ठाई. एकात एक नाहीं" उमाबाईचे कारभार पाच. त्यांत येक मत नाहीं. सेनापती, अंबिकाबाई, देवजी तापकीर ते मडली येक विचार. याखेरीज गाईकवाड तिकडे वेगले तमत आहेत.' अशा परिस्थितींत पेशव्याच्या जबरदस्तीपुढें मान वाकविण्यावांचून दाभाड्यांस मार्गच शिल्लक नव्हता. अखेर गुजराथेंतील निमे मुलुख व निमे ठाणीं चांगली वाईट उभयतांनीं वाटून घ्यावी आणि मुलखाचा ताबा मिळेपर्यंत त्रिंबकराव दाभाडे सेनासासखेल, यशवंतरावाचा मुलगा, दामाजी गाईकवाडाचा मुलगा, व उमाबाई यांनीं पेशव्याच्या लष्करांत राहावें. अशा अपमानकारक अटी कबूल करून उमाबाईस मिटतें घ्यावें लागलें. ठरावाप्रमाणें मंडळी पेशव्याचे

लष्करांत राहावयास गेली, पण निमे गुजराथचा ताबा मिळण्याला पुढें कांहीं दिवस लागले. हा ताबा सुखासुखी मिळाला नाहीं. या दाभाडे प्रकरणांतूनच महादोबांचा रुसवा व दमाजी गाईकवाडाची चाल उदय पावली. तो प्रकार यथाकाल सांगितला जाईलच. पौष शुद्ध पक्षांत दाभाडे प्रकरणाचा एक अंक संपून पडदा पडला; पण तिकडे साताऱ्यास ताराबाईचें कारस्थान वाढीस लागलें.

४० इकडून ताराबाई व तिकडून पेशव्यातर्फे नाना पुरंदरे रामराजांस आपापल्या पक्षांत ओढीत होते. खावंद लोकांशीं कलह न वाढवितां सामोपचारानें त्यास आपल्या लगामी लाविण्याचें या वेळचें पेशव्याचें धोरण होतें. प्रतिनिधी, सचीव, सेनापती रगडतांना दिल्ली नासरजंग पावेतो दुर्लौकिक होईल याची फिकीर पेशव्यानें पाळली नाहीं, पण खावंद लोकांवर जबरदस्ती करण्यांत लौकिक फटकाळ होईल, ही रुखरुख त्याला सारखी लागून राहिली होती. एक वेळ ताराबाईशीं साक्षात विरोध करावा लागल्यास करूं; पण रामराजाशीं घासाघीस टळेल तितपत टाळावी असा नाना—भाऊचा या वेळचा रोख दिसतो. त्याबरोबर राजे सांगितल्याप्रमाणें ऐकतात किंवा नाहीं याची तपासणी मात्र जारीनें होत असे. आणि हें साताऱ्यांतील नाजूक काम मुतालीक नाना पुरंदऱ्यांवर सोंपविलें होतें. ताराबाई व रामराजे यांत वाटघाट सुरू असतां राजे अधून मधून वर किल्ल्यावर जात येत असत. महिना दीड महिना वाटाघाट होऊनहि राजांना आजीबाईचें म्हणणें पटेना. तेव्हां ती मायावी म्हातारी मनांतून अगदीं संतापून गेली. कित्येक वेळां राजांच्या तोंडावरहि तिनें निर्भर्त्सना करून पाहिली. पण जेव्हां कांहीं मेळ बसेना तेव्हां जबरदस्तीचा निर्वाणीचा प्रयत्न करण्याचें ठरवून म्हातारी संधीची वाट पहात राहिली. चंपाषष्ठीच्या आधीं राजे गडावर जावून 'महाल' घेऊन आले होते. नाना पुरंदऱ्यांस विचारून शष्ठीचे भोजनास किल्ल्यावर गेले.' तेथें आईसाहेबांनीं त्यास खूप छेडले पण 'न आईकले' अखेर रात्रौ तेथे राहून दुसरे दिवशीं सकाळीं 'दोष खाऊन' राजे खालीं येण्यास निघाले. पण दरवाज्यांत येतांच गडकरी आडवे झाले. तेव्हां 'राजश्री ( रामराजे ) घोडियावरून उतरून पटा घेतला तो आवघ्यानी पटा घेऊन घोडीयावर बसऊन माघारें नेलें ! ' तेव्हां आईसाहेबांनीं त्यांस महालसुद्धां वाड्यांत एका सोप्यांत कैदेदाखल ठेविलें. या अटकेविषयीं लोकांत संशय

होता ' राजश्रीसी व मातुश्रीसी विरुध होऊन राजश्रीस अटकाविले किंवा सोनारकल करून हे राहिले हे तत्वता मनास आणून लिहिणे ! ' पण आजींनें नातवास कैद केलें हाच खरा प्रकार होय. राजे वर आडकल्यावर मोठा पेच येऊन पडला. नाना पुरंदरे फौजबंद असून त्यांला सांगोल्याहून भाऊकडून व पुण्याहून पेशव्याकडून फौज यावयास हरकत नव्हती; आणि लगोलग किल्ल्यास चौक्या दिल्या असत्या तर निकाल पडण्यास मुळींच वेळ लागता ना. पण ' तुम्ही आपले बले हरामखोरीनें गडास वेढा घातला दिल्ली नासरजंग पावेतो राजे धरून बसविलें ' हा लौकीक होईल ही खरी भीती त्यास वाटत होती. गडकऱ्यांचे कबिले वगैरे धरून अप्रत्यक्ष त्रास देण्याचीहि सोय नव्हती. कारण त्यामुळें वर आईसाहेबास संकट वाटून ' न करावी ते राजकारणें करितील आयोग्यास हाती धरतील देणे दे देतील ' असें असल्यानें वरून राजाकडून कसेंहि करून मला सोडवा, असे निरोप येत असतांहि पेशवे मध्यस्तामार्फत ताराबाईशी नम्रतेच्याच गोष्टी बोलत होते; आणि त्यांनीं राजानाहि ' तुम्ही आईसाहेबांशीं गोडी करून सुटका करून घ्या या वेळीं शुक्रनीतीने असावें ' असा बुद्धि–वाद सांगून पाठविला. हा सर्व बाह्य देखावा होता. पण आंतून घटित कारस्थान उलथून पाडण्याची पराकाष्ठा चालली होती. कोल्हापूरकर संभाजी महाराज व सेनापती दाभाडे यांजकडे ताराबाईचें प्रथमपासूनच सूत्र होतें. पैकीं सेनापतीची वाट काय झाली हें वर येऊन गेलेंच आहे. संभाजी राज्याच्या वाटेवर वारणातीरीं फौज ठेऊन तिकडचा पक्का बंदोबस्त केला होता. शिवाय, कोल्हापूरकरांनी या फंदांत पडूं नये म्हणून गोविंदराव चिटनिसांमार्फत बाळ प्रभू करवीं खटपट सुरूं होती. चव्हाणाला अष्ट देऊन नुकतेच आपणाकडे घेतले होते; त्याचाहि उपयोग या कामीं करून घ्यावयाचा होता. ताराबाईच्या कारस्थानांत खरी भानगडीची गोष्ट म्हणजे तिचें व संभाजी राजाचें एक मत होऊन तो सातारच्या गादीवर बसण्यास कबूल झाल्यास सर्वच ग्रंथ आटोपला. आणि तोच बागुलबुवा रामराजापुढें करून त्यास पेशव्यानें आपल्या बाजूस ठेविलें होतें. अशा रीतीनें दाभाडे व कोल्हापूरकर संपविल्यानंतर फक्त किल्ल्यावरच्या हालचालीवर लक्ष देणें एवढेंच काम उरलें. मार्गशीर्ष अखेर हें प्रकरण पर-

स्परांच्या हालचाली पहाण्याकडे व तात्विक चर्चा करण्यापलीकडे गेलें नाहीं. यानंतर उभयपक्षीं एकमेकाकडे पहाण्याचा कंटाळा येऊन हालचालीस प्रारंभ झाला. मार्ग. वा। ३० च्या पत्रांत त्र्यंबकराव धायगुडे व शेख मिरा फरीदखान, सिर्के, मोहिते हे ताराबाईच्या पक्षांत सामील झाले व गोविंदराव चिटणीस व यशवंतराव पोतनीस दगा करून गडावर नेणार, असा मजकूर आढळतो. गोविंदराव चिटणीस हा प्रथमपासून पेशव्याचा पक्षपाती असलेला महत्त्वाचा गृहस्थ सध्यां त्यावर रुसलेला होता. याला कारण प्रतिनिधींचें प्रकरण असावें. गोविंदरावाच्या सरंजामी मुलुखापैकीं कांहीं प्रदेश प्रतिनिधीस द्यावा लागल्यानें तो कष्टी होता. पण त्याचें ताराबाईशींहि रहस्य नव्हतें. त्यानें व पोतनिसानें आपल्या पक्षास येऊन मिळावें ही तिची इच्छा होती. पण ती शेवटास गेली नाहीं. अखेर गोविंदराव उदासीन राहिला. पुढें त्याची उदासीनता घालवून त्यास कामाला लावण्याचा पेशव्यानें प्रयत्न केला आहे व तो बराचसा सिद्धीसहि गेला. गोविंदरावाचा व बाबाचा अकृत्रिम स्नेह असून या दोघांनीं पूर्वीं बरींच पेशव्याकरितां कारस्थानें खेळलीं होतीं. पण बाबाहि आतां श्रीमंताच्या मर्जींत नव्हते, तेहि लवकर रुसून घरीं बसले. तो प्रकार असा. दाभाड्याचें प्रकरण पैशावर मिटवावें असें बाबांचें म्हणणें होतें; पण तें नाना—भाऊंनीं ऐकिलें नाहीं. म्हणून पौष शु॥ ८ स महादोबा पुरंदरे कारभार सोडून चिखलीहून पुण्यास आले. त्याबरोबर धोंडोबा आप्पा पुरंदरे व सखारामबापू हेहि आले. आतां पुरंदऱ्यांपैकीं फक्त नाना पुरंदरेच काय ते साताऱ्यास उद्योगावर राहिले. आणीबाणीच्या प्रसंगीं बाबा रुसून घरीं बसल्यामुळें त्या बाबतींत जिकडे तिकडे चर्चा सुरू झाली. हा आतां ताराबाईला जाऊन मिळेल व तो आणि गोविंदराव चिटणीस एक होऊन कारस्थानें सुरू होतील अशीहि भीति वाटूं लागली. महादोबांनीं बाजिरावाच्या पश्चात् शके १६७८ पर्यंत पेशव्याचा कारभार पूर्ण मुखत्यारीनें हाकला होता. शिवाय विंचूरकर, खुद्द मल्हारराव व त्याचा दिवाण गंगोबा तात्या, ही मंडळी महादोबांची पक्षपाती असल्यानें काट्याचा नायटा होण्यास उशीर लागला नसता. तशांत महादोबा, मल्हारराव, जयाप्पा, यांना महत् पदांचीं आमिषें दाखवून त्यांस आपल्या पक्षांत ओढण्याची ताराबाईची खटपट होतीच. भाऊसाहेबाचें व बाबांचें रहस्य असून पेशवा भाऊविषयीं या

वेळीं बराच साशंक होता. तेव्हां दाभाडे प्रकरणांत महादोबांशीं फाट पडत चाललेला पाहून पेशव्यानें भाऊस ताबडतोब सांगोल्याहून आपणाजवळ बोलावून घेतलें. ते मार्ग. व. १० च्या सुमारास नानासाहेबाजवळ येऊन पोंचले. बाबा–नानांतील तेढ काढून उभयतांनीं एकदिलानें कारभार करावा म्हणून भाऊनें खूप प्रयत्न केले; पण त्यांत त्यास यश आलें नाहीं. भाऊ, राघोबा यांना झालेल्या प्रकाराबद्दल फार वाईट वाटलें. पेशवे घराण्यांतील पुरुष पुरंदरे मंडळींस आपल्या घरांतीलच समजत. परस्परांतील बरींवाईट कृत्यें परस्परांस पूर्ण अवगत असल्यानें आंत एक बाहेर एक असला प्रकार करण्याची सोयच नव्हती. भाऊसाहेबाला तर आपल्याकरितां खऱ्या कळवळ्यानें काया–वाचा–मनेंकरून झिजणारे एकटे पुरंदरेच वाटत. पेशवे घराण्यांतील नानासाहेब, भाऊसाहेब व राघोबा व पुरंदऱ्यांतील बाबा, आप्पा, नाना हे एकाच जागीं लहानाचे मोठे झाले. त्यांची शाळा एक, त्यांच्या आवडीनिवडी एक, इतकेंच नव्हे तर दोन्ही घराणीं शेवटीं एकाच म्हणजे क्षय रोगानें समाप्त झालीं; इतका या दोन्ही घराण्यांचा एकजीव झाला होता. अशी स्थिति असल्यानें महादोबांचा वियोग सर्वच पेशवे मंडळीस जाणवला. महादोबा कितीहि रागावले तरी ते आपल्या विरुद्ध पक्षास केव्हांहि सामील होणार नाहींत, ही नानासाहेबास पक्की खात्री होती. अस्सल पत्रें हा ऐतिहासिक साधनांत अव्वल दर्जाचा पुरावा गणला जातो. पण त्यावरहि सर्वस्वी विसंबून राहातां येत नाहीं. पत्र लिहिणाराची लायकी, त्याचा उद्देश, त्यानें वर्णिलेल्या विषयाशीं त्याचा येणारा संबंध विचारांत घेऊनच असल्या पत्रांवर जितपत भरंवसा ठेवितां येईल तितपत ठेविला पाहिजे. हा महादोबांच्या रुसव्याचाच प्रसंग घ्या. या बाबतींत खुद्द नानासाहेबाचें एक विस्तृत पत्र आपणापुढें आज बरेच दिवस आहे. त्यावर इतिहासकारांनीं कितपत भरंवसा ठेवावा असा प्रश्न निघाला तर त्याचें उत्तर पुढीलप्रमाणें देतां येईल. पत्र पाठविणारा लायख असून त्याचा त्या विषयावर लिहिण्याचा पूर्ण अधिकार आहे. पण त्यानें एकतर्फी लिहिलें नसेल कशावरून ? अशी योग्य शंका घेण्यास त्यांत भरपूर वाव आहे. तेव्हां या पत्रांतील पेशवा व पुरंदरे यांच्या बेबनावाविषयींचा मजकूर एक बाजू म्हणूनच विचारांत घेतला पाहिजे व दुसरी बाजू पुढें येईपर्यंत या बाबतींत निश्चित बोलण्याचें टाळलें पाहिजे. आतां

या भागांत पेशवा व पुरंदरे यांच्या विरोधासंबंधीं दोहीं तर्फेची हकीकत पुढें येत आहे ती व पूर्वीं प्रसिद्ध झालेलें नानासाहेबाचें म्हणणें विचारांत घेऊन कोणाहि इतिहासकारांस स्वत:चें निश्चित मत मांडतां येईल. अर्थात् यापूर्वीं या बाबतींत दिलेलीं मतें बदलावीं लागणार हें ओघानेंच आलें. असो. पुढें सवाई माधवरावाच्या वेळेस कारभारी नाना फडणीस व पेशवा यांच्यांतील विरोध ज्या एका प्रमुख कारणानें आला तेंच कारण हल्लींच्या पेशवा व महादोबा यांच्या भांडणांत दिसून येतें. जसा नाना फडणविसानें सवाई माधवरावाच्या बालवयांत पूर्ण मुखत्यारीनें कारभार केला तसा महादोबांनींहि नानासाहेबास पेशवाई मिळाल्यापासून पुढील सहा वर्षें केला. पण यजमान कारभार हांकण्यास जसजसा समर्थ होत जाईल तसतसा आपला हात कारभारांतून काढीत काढीत यजमानास संपूर्ण अधिकार देण्याचें दिवाणाचें धोरण या दोन्हींहि दिवाणांनीं अमलांत न आणल्यामुळें दोघांनाहि फजीत पावावें लागलें.

४१ शके १६७० च्या नेवाईच्या स्वारीपासून नानासाहेबानें स्वतंत्रतेनें कारभार करण्यास प्रारंभ केला. या वेळच्या तेढीचें कारण भाऊसाहेबाच्या पत्रांत दिलें आहे तें असें— ' कारभार मी ( नानासाहेब ) करीन. सर्वांपासून घेईन. बाबानीं अनकूल असावें. रागरंग करीन बाबानीं वाईट दाखवितात तें दाखवूं नये. ' ' आपण बसावे व भाऊनी बाबानी देखील लाहानसाहान जे पुसणें तें पुसावें तेव्हांच करावें. चौघांनीं सारियानी रदबदलीप्रौ वर्तून आपण खावंदगिरीने जाबसाल करावा ' ' दिल्लीकडे नीट जावयाविसीचा यावयाचा मनसुबा वोढ धरून केला आहे. पुढें देसास वोढ धरून आले. नाना प्रकारचे रागरंग करावयाचे मनांत व कितेक जागा बाबा वाचून जाबसाल नाहीं. नानानीं खेलावे. ' असा प्रकार सुरूं झाल्यामुळें बाबांलाहि राग आला व ते तेथें स्वारींतच निराळे राहिले. ' नानानेंच कारभाराचें सूत्र राखून कामकाज करावें. बाबांनीं केव्हां केव्हां यावें; मर्जीप्रमाणें विचार बोलावा असें जालें होतें. ' पण पुढें ज्या कित्येक महत्त्वाच्या भानगडी उत्पन्न झाल्या त्यांमुळें ही तेढ वरपांगीं लौकरच संपल्यासारखी झाली. शाहूच्या आजारीपणांतील कारस्थानांत पेशव्याच्या घरांत मराठी राज्य घालण्याकरितां बाबांनीं कसून प्रयत्न केला. परंतु शाहूनंतर जो कारभार होऊं लागला त्यांत बाबानानांत पुन्हा फाट

पडूं लागला. तशांत रामचंद्रबाबा कारभारांत शिरल्यामुळें एका म्यानांत दोन सुऱ्या कशा राहाव्या ? तेव्हां कोणाला तरी बाहेर पडल्यावांचून गत्यंतरच नव्हतें. ताराबाईशीं संगनमत करून गोविंदराव व बाबा पेशव्यास मुरदाड करण्याचे खेळ खेळत होते; असेंहि एक कारण पेशव्याचे तर्फेनें पुढें आलें आहे. या दुसऱ्या कटकटीचा प्रथम उल्लेख श्रावण वा। ४ च्या पत्रांत पहावयास मिळतो. ताराबाईचें कारस्थान सुरू होण्यास अद्याप तीन महिने अवकाश आहे ( ले. ३४५ ). पण धुमसत असलेल्या या प्रकरणानें पुढें दाभाड्यांच्या वाटाघाटींत पेट घेतला. बाबांचें म्हणणें दाभाड्यांचा प्रश्न पैसे घेऊन मिटवावा. पण हा सल्ला नाना–भाऊंस मुळींच पसंत पडला नाहीं. आज दोन तीन वर्षें धुमसत असलेल्या मतभेदास याहून मोठ्या कारणाची जरूरीच काय ? तापट प्रकृतीच्या बाबांनीं तादृशीं कारभार सोडून घरचा रस्ता सुधारला. घरीं येण्याचें कारण बाबा पुढीलप्रमाणें देतात 'श्रीमंतांची मर्जी आम्ही जवळ नसावेसी पाहिली. यास्तव चिखली-हून श्रीमंतांची आज्ञा घेऊन पुणियासी आलो' ( पौष शुा। ९. ले. २६९). याच दिवशींचें राघोबादादाचें एक पत्र आहे त्यांत बाबांच्या रुसव्याचें आणखी एक कारण सांपडतें. पण पत्र संपल्यावर मुद्दाम जो मजकूर लिहिला आहे तोहि विचार करण्याजोगा आहे. 'रामचंद्रबावाचे मते आताच बाबावर निकर्ष करावयाचे होते. परंतु ते न जाहाले' (ले. २७०); यानंतरच्या चार दिवसांनीं लिहिलेल्या भाऊसाहेबाच्या पत्रांतहि याच प्रश्नाची चर्चा आढळते ( ले. २७२ ). शेवटीं पौष वा। १ च्या पत्रांत बाबांनीं या बाबतींतील आपलें म्हणणें कळविलें. तें सबंध पत्र वाचकांनीं अवश्य वाचावें. यांतील पुरंदऱ्यांची कैफियत व का. स. प. या. तील नाना-साहेबाची बाबाविरुद्धची तक्रार व राघोबा भाऊसाहेब या तिऱ्हाइतांचें सांगणें विचारांत घेऊन या प्रकरणांत कोणाकडे किती दोष येतो हें ठरवितां येईल. महादोबांच्या पत्रांतील 'श्रीमंतास आपले जातीचा अभिमान फार.' यांत सत्यांश असेल तर उत्तर पेशवाईत राज्यकारभारांत पदोपदीं नड-णारा 'देशस्थ–कोकणस्थ वाद' मूळ नानासाहेबाच्या कारकीर्दींत उत्पन्न होऊन त्याचें जनकत्व खुद्द नानासाहेबाकडे जातें. असो. महादोबांनीं 'घरास आलो तरी काही चाकरी टाकली यैसे नाही च्यार महिने घरी राहिलो तर काये चिता आहे' असें लिहून 'तुम्ही तेथे आहा त्याप्रमाणे

असणे. श्रीमंताचे मर्जीप्रमाणे सेवा करणे. आपले तरफेने किमपी अंतर पडूं देऊं नये. ' वगैरे लिहून नानांस ठासून राहून वर अडकलेले राजश्री खालीं आणण्याचा उद्योग नेटानें करण्यास लाविलें. नाना सातार्‍याहून हालल्यास तेथला कारभार करण्याकरितां गोपाळराव पटवर्धन व बाबुराव फडणीस यांस पेशव्यानें फौज देऊन तिकडे रवाना केलें. हे फौज घेऊन येतात असें पाहून गोविंदराव व गोपाळराव चिटणीस बायकामुलें गांवीं कोळयास पाठवून देऊन सडे राहिले. त्यांस हे आपणांस कैद करण्यास येतात असें वाटलें. नानांस सातारा न सोडण्याबद्दल पेशवे व भाऊ यांनीं खुल्या दिलानें अनेक वेळां लिहिलें आहे. त्यांतील भाऊसाहेबाचें लिहिणें खर्‍या कळकळीचें दिसतें. त्रिवर्ग पुरंदरे पुरुषांशीं भाऊचा अकृत्रिम स्नेह असून तो त्यांच्या उन्नतीची आपणाकडून होईल तितकी खटपट करीत असे. भाऊसाहेब हुषार व कर्ता असूनहि त्याचा सबंद जन्म परतंत्रतेंत गेला. बाजिराव व चिमाजीआपा हे सख्खे भाऊ जरी होते तरी त्यांचे कारभार स्वतंत्र असत. बाजिराव हा छत्रपति शाहू महाराजांचा जसा पेशवा तसा चिमाजीआपाहि एक स्वतंत्र सरदार होता. त्याला त्याबद्दल स्वतंत्र नेमणूकहि असे. ती स्थिति सदाशिवराव भाऊची राहिली नाहीं. बाप वारला तेव्हां तो अल्पवयी होता. पुढें मोठा झाला तों छत्रपतीची सत्ता संपुष्टांत येत चालली होती व नानासाहेब पेशवा इकडे वाढत चालला होता. त्यामुळें वयांत आल्यावर भाऊस नानासाहेबाच्या कारभारांत मदत करावी लागली. पण यांत स्वातंत्र्य असें बिलकूल नव्हतें. तशांत कुटुंबांत एकत्र रहावें लागल्यामुळें अनिवार्य भाऊबंदकी टाळतां आली नाहीं. नानासाहेबांत शेंकडों सद्गुण असतील पण त्याच्यांतील बलवत्तर अधिकारलालसा कोणालाहि नाकबूल करितां येत नाहीं. ही नानासाहेबाची वृत्ती भाऊशींहि वागतांना दिसून येते. भाऊसाहेबानें आप्पा व नाना पुरंदरे यांना पाठविलेल्या कित्येक पत्रांतून आपलें हृद्गत ओकलें आहे. त्यांत नानाभाऊंतील तेढ स्पष्ट दिसते. भाऊंनीं सवता सुभा न थाटतां आपणांत राहून कारभार करावा; पण आपण चुलत भावाचें नातें विसरण्यास मात्र तयार नाहीं, असा नानासाहेबाच्या वागणुकीचा झोंक दिसतो. उलट भाऊसाहेब मात्र नानासाहेबाच्या वडीलकीस योग्य मान देऊन आपणाकडून चुलतपणा न दिसूं देण्याबद्दल अत्यंत खबरदारी घेतांना आढळतो. भाऊच्या वरचढ

आपले भाऊ व मुलगे निघावेत ही पेशव्याची इच्छा बलवत्तर होती. नानासाहेबावर गोपिकाबाईचें वजन प्रथमपासूनच इतकें कीं, भाऊला नानाची मर्जी संपादण्याकरितां वहिनीला आळवावें लागे. अशी जरी स्थिती होती तरी भाऊनें निर्लोभ वर्तनानें शेवटीं शेवटीं नानासाहेबास इतकें मोहीत केलें कीं, 'भाऊवाचून दुनिया दौलत व्यर्थ आहे' असे अंतःकरणाला घरे पाडणारे उद्गार काढण्यास लावून खरोखरच वेडें केलें. आणि श्रीराम व भरत यांच्या बंधु–प्रीतिचा आदर्श कलियुगांत नाना–भाऊच्या रूपानें जणूं काय परमेश्वरानें निर्माण केला कीं काय असें जगाच्या तोंडून वदविलें.

४२ नासरजंग मारला जाऊन त्या जागीं फ्रेंचाच्या मदतीनें हिदायत मोहिदीखान ऊर्फ मुजफरजंग निजामी मिळवून औरंगाबादेस यावयास निघालेला पाहून पेशवाहि मोगलाई जफ्तीचा काळ आहे मातबर मनसबा होऊन पैका मिळायाचा लाग आहे असें पाहून पौष वा। ४ स चिखलीचा मुकाम हालवून मोगलाच्या स्वारीस निघाला. या स्वारीसंबंधें विशेष सांगतां येण्याजोगा बराच मजकूर यांत आहे. तसेंच रामराजाच्या सुटकेकरितां सातार्‍यास राहून नाना पुरंदर्‍यांनीं कसकसे प्रयत्न केले; ताराबाई आपलें कारस्थान कसे रंगवीत गेली, दमाजी गाईकवाडानें चढाई करून पेशव्यास कसें घोरांत पाडलें व अखेर पुरंदरे मंडळींच्या पेशव्यावरील निर्व्याज प्रेमामुळेंच या वेळच्या गंडांतरांतून पेशवाई कशी शीरसलामत बाहेर पडली वगैरे विषयांवर जितकें लिहावें तितकें थोडेंच आहे. या सालचीं एकंदर बरींच पत्रें असून तीं अनेक दृष्टीनें फार महत्त्वाचीं आहेत. नानासाहेबाच्या कारकीर्दींतील प्रमुख व्यक्तींचे स्वभाव ठरविण्याचें यांसारखें दुसरें साधनच नाहीं. नानासाहेब पेशव्याचें व्यवहार ज्ञान, त्याची मुत्सद्दीगिरी, त्याचें कारस्थानपटुत्व, इत्यादि राजकारणी सद्गुण पटवून देण्यास हीं पत्रें सर्वथैव पात्र आहेत. पण महाराष्ट्रांत सांप्रतकाळीं अत्यंत जिव्हाळ्याचें होऊन बसलेलें पानपत प्रकरण यापुढें चर्चेस घ्यावयाचें असल्यानें ही चर्चा येथेंच संपवावी लागत आहे, याची वाचकांनीं क्षमा करावी.

## १६ पानपत

४३ यांत पानपत प्रकरणासंबंधीं एकंदर ३९ पत्रें आलीं आहेत. त्यांतील ले. ३८९ हें पुरंदरे दफ्तरपैकींच पण पूर्वीं 'केसरींत' प्रसिद्ध

झालेलें पुन्हां घेतलें आहे. बाकीचीं सर्व नवीन आहेत. पानपतची शेवटची लढाई होईपर्यंतचा भाग ‘ पानपत पूर्वार्ध ’ व नानासाहेब उत्तरेकडे जाऊन पुन्हां पुण्यास येईपर्यंतचा भाग ‘ पानपत उत्तरार्ध ’ मानल्यास यांतील फक्त ६ पत्रें पूर्वार्धासंबंधींचीं असून बाकीचीं सर्व उत्तरार्धांतील आहेत. बहुतेक पत्रें खुद्द नानासाहेब पेशव्याचीं आहेत तेव्हां तीं पूर्वार्धांतील कोणत्या प्रचलित समजुतीस धक्का देतात; आणि तसेंच उत्तरार्धावर काय नवीन प्रकाश पाडतात हें पाहिलें पाहिजे. त्याबरोबर कांहीं महत्त्वाच्या प्रसंगाचीहि चर्चा करावी लागेल.

४२ अबदालीचा ज्या ज्या वेळीं मराठ्यांशीं साक्षात् संबंध आला त्या त्या वेळीं तो त्यांवर मात करून गेला हें निर्विवाद आहे; याचीं कारणें निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळीं सांपडतात. त्यांत अबदालीच्या आडदांड, चपळ, निश्चयी, शूर शिपायांपुढें मराठ्यांच्या ढिल्या सैनिकांचा टिकाव न लागल्यामुळें त्यांनीं प्रत्येक वेळीं पोबारा केला; ह्यावरच बहुतेकांनीं भर दिला आहे. परंतु प्रचलित अव्वल दर्जाचीं साधनें सूक्ष्म रीतीनें अभ्यासणारास हें म्हणणें पटत नाहीं. आडदांड पठाणांना हिंदी शिपाई रणांगणांत स्वारी भरून माती चारूं शकतात याचे मागील इतिहासांत शेंकडों दाखले मिळतील. खुद्द अबदालीलाहि श. १६७० च्या स्वारींत बादशाही फौजेनें नक्षा उतरून अटकेपार केलें होतें. तेव्हां पठाणांची नसती बडेजाव वाढविण्यांत कांहीं अर्थ नाहीं. फार फौजेनिशीं जाऊन एक गटानें अचानक हल्ला चढविल्यास कोणालाहि जय मिळवितां येतो. पुरातन काळापासून आर्यावर्तांत जागोजाग लहान लहान सत्ताधीश असल्यानें कधींच कोणाजवळही भारी व खडी फौज नसे. तशांत शेजाऱ्यांत परस्परांत वैमनस्य नाहीं असें क्वचितच असल्यानें, भारी फौजेनिशीं येऊन एक गटानें अचानक हल्ला चढविणाऱ्या परकीयास एकट्या दुकट्यावर हटकून जय मिळवितां येई. अर्थात् चार दोन सत्ताधीश एकत्र झाल्यावांचून परकीयांशीं झुंजणें हिंदुस्थानांत केव्हांच फायद्याचें होत नसे. तोच प्रकार अबदालीच्या स्वाऱ्यांतून होत असे. अबदालीच्या काळीं त्याच्या इतकें खडे सैन्य उत्तरेस कोणाजवळहि नसे. सालोसाल अबदाली येऊं लागल्यावर उत्तरेंतून पेशव्यास वीस हजार फौज कायम राहील तर अबदालीची बिशाद काय, अशा सूचना होत असतां तेवढीहि व्यवस्था

त्यास करितां आली नाहीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे. अबदाली भारी होऊन येई व आपल्या उद्योगास लागे, तेव्हां कोठें त्याच्या प्रतिकारार्थ सैनिकादि साहित्य जमविण्याची चळवळ सुरू होई. त्यामुळें अबदालीच कृतकार्य होऊन निघून जाण्यास व हिंदी राजे, महाराजे रणांगणावर अवतीर्ण होण्यास एकच वेळ येई. दिल्लीचा बादशाह, मराठे, जाठ व अयोध्येचा वजीर हे उत्तरेंतील बडे सत्ताधीश होत. रजपूत राजांची स्थिति असून अडचण व नसून खोळंबा या सदरांत पडे. यांत मराठे सर्वांत बळानें श्रेष्ठ; पण त्यांतहि एक पठाणी गोम असल्यानें, बाह्यतः सबळ वाटणारे मराठे निर्बळांतच मोडत. मराठ्यांचा कारभार एकसूत्री नसल्यानें जो तो मराठा सरदार स्वतंत्र सत्ताधीशासारखाच कारभार करी. रजपूत राजेरजवाड्यांच्या कारभारांत शिरून त्यांना निष्कारण त्रास दिल्यामुळें ते मनांत मराठ्यांविषयीं सकारण द्वेष वागवून त्यांच्या नाशास प्रवृत्त असत. रजपुतापेक्षां बलिष्ठ असे जाठ त्यांनाहि यांनीं दुखविलें होतें. ज्या दिल्ली दरबारांतील पक्षाकरितां मराठ्यांनीं अबदालीशीं वैर संपादिलें, तो पक्ष अत्यंत दुबळा असून अप्रिय असा होता. शिवाय, तेथेंहि रजपूत राजांसारखेच खेळ खेळले जात. मराठ्यांनीं मूळ मनसूरअल्लीला हाताशीं धरलें; पण थोड्याच वेळांत त्याला सोडून त्यांनीं गाजुद्दीन पकडला. तरी त्याचा प्रतिस्पर्धी नजीबखान होळकराचा मानसपुत्र व्हावयास चुकला नाहीं. दिल्ली दरबारांतील सबळ पक्ष हाताशीं धरून बादशाही पचविण्याचा मराठे जर प्रयत्न करते तर त्यांच्या उद्योगास खात्रीनें यश मिळतें. तेव्हां बादशाहींतील सबळ अशा नजिबाच्या पक्षाशीं प्रामाणिकपणें मराठे सहकार्य करीत राहाते तर त्यांचा बराच फायदा झाला असता असें पुढील उद्योगावरून स्पष्ट दिसतें. पानपतानंतरची स्थीरस्थावर करीत असतां त्यांना नजिबासच हाताशीं धरावें लागलें. याकडे दुर्लक्ष होतां कामा नये हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. सारांश, अशा प्रतिकूल स्थितींत मराठ्यांचे अबदालीशीं सामने होत गेले. राघोबाच्या अटकेपारच्या स्वारींत त्यानें व होळकरानीं अबदाली हिंदुस्थानात असतां त्याशीं तोंड देण्याचें टाळून, तो निघून गेल्यावर वराती मागून घोडें दामटून अटकेवर झेंडे नाचविल्याचा उगाच दिमाख मिरविला म्हणून त्यांची आम्ही निंदा करितों. परंतु तींत कांहींच अर्थ नाहीं. शत्रूचें बलाबल पाहून मगच चांगला सेनापति त्याशीं गांठ घालतो. 'झुरळली

मेठी लांडग्या मार्गे लागून ' आपला व आपल्या सैनिकांचा दुर्लौकिक करून धीर खचविण्याचा भलताच प्रकार खऱ्या सेनानींकडून कधीं होत नाहीं. फौजेचा आब घालविण्यांत कोणता शहाणपणा ? आब राखून बोज कायम ठेवण्यांतच खरें कौशल्य आहे. पहिल्या स्वारीनंतरच्या प्रत्येक स्वारींत पन्नास हजारांपुढें सैन्य, भरपूर खजिना व मुबलक सामुग्री घेतल्या-वांचून अबदाली हिंदुस्थानांत पाऊल टाकीत नसे. त्यामुळें त्याशीं गांठ घालतांना मागला पुढला विचार पाहण्यावांचून गत्यंतरच नसे. राघोबाची ज्या ज्या वेळीं गांठ पडली त्या त्या वेळीं त्याची तयारी अबदालीच्या हद्दीनें हलक्या दर्जाची होती. राघोबा व मल्हारराव यांनीं अबदालीशीं दोन हात केले नाहींत म्हणून त्यांस आम्ही दोष देतों; पण त्या वेळची उभय-तांच्या बलाबलाची स्थिती अस्सल पत्रांतून जी आली आहे; ती लक्षांत घेत नाहींसें वाटतें.'आजी छ २४ रोजी इंदुरास आलों. मल्हारजी होळकर याची भेट जाली. पुढें दरमजल दिल्लीस जात असों. अबदाली दिल्लीस आला. यास्तव चहूंकडून राजे व जमीदार व रांगडे लोकांच्या नजरा फिरल्या, सांप्रत भलता एखादा मनसुबा करून मुलूक अथवा रुपये मिळावयाची सोय दिसत नाहीं. अबदालीचें पारपत्य करावें, तरी फौज अद्यापि जमा जाहली नाहीं. देखील विठलपंत आमची चार व मल्हारबा दोन एकुण सहा हजार आहे. या खेरीज समशेरबहाद्दर व अंताजी माणकेश्वर व नारोशंकर पथके मिळोन पंधरा सतरा हजार फौज (रघुनाथराव खं.१ ले. ५२).' अबदालीची फौज भारी. तमाम रजवाडे तिकडे जाणार. विजेसिंग, माधोसिंग, यांचे वकील नेहमींच त्याजपाशीं ( आबदालीपाशीं ) आहेत. मुख्य दक्षणेचा ( मराठ्यांचा ) बंदोबस्त करावा हें सर्वांचें मानस आहे. आपली फौज व मल्हारबाची झाडून जमा व्हावयास फाल्गुन अखेर लागेल. ' 'फौजाहि येतील. भारी होऊन जावें. तों तो ( आबदाली ) कोणे रोखें होतो हें पाहून सडे होऊन गाठ घालावी हा विचार आहे. गोष्ट तूर्त सर्वप्रकारें भारीच आहे [ सखारामबापू खं. १ ले. ५३ ]. ' पठाणाजवळ फौज पन्ना-सहजार चांगली आहे. खजाना पन्नास लक्ष रुपये समागमे आहेत. ' 'पठा-णांचा नायब दिल्लींत बसला आहे. तो फौज वरचेवर ठेवीत आहे. तेहि फौज याजला सामील होणार ऐसें दिसते. ' असे आणखी किती तरी उतारे देतां येतील. यावरून राघोबाच्या नाकर्त्या, ढिल्या कारभारामुळें पानपतचा प्रसंग ओढवला कां उत्तरेच्या कारभारांत शिरल्यापासून ज्या

शेंकडों चुका मराठ्यांनीं केल्या त्यांच्या एकीकरणानें पानपत अंगलट आलें, याचा शांत चित्तानें विचार व्हावयास पाहिजे. राघोबानें व मल्हाररावानें मराठी फौजेचा आब राखून उद्योग केले. मराठी फौजेचा खरा आब, दत्ताजीला थोड्या फौजेनें भारी आबदालीशीं लढावें लागलें, त्यामुळेंच गेला. त्यामुळें कुंजपुरा घेईपर्यंत मराठी फौज आबदालीवर चालून जाण्यास कचरे असें दिसतें. बरें, राघोबाला आबदालीशीं तोंड न दिल्याबद्दल भाऊसाहेब व नानासाहेब यांनीं दोष दिल्याचें आजपर्यंतच्या प्रसिद्ध पत्रांत आढळत नाहीं. उलट, मागील खेपेला आबदाली ज्या कारणानें विजयी होऊन जात असे तीं कारणें उलथून पाडण्याची तयारी करूनच भाऊसाहेब पडहुरावरून निघाला. त्यानें आपल्याबरोबर मोठी फौज व मुबलक खजिना घेतला. आणि वाटेनें जात असतांहि हा ओघ अव्याहत चालूं राहील अशी व्यवस्था केली. पण अबदालीच्या दृष्टीनें ही तयारी अपुरीच होती. करितां उत्तरेंतील प्रमुख सत्ताधीश अबदालीच्या बाजूस न जातां आपणाकडे यावेत असाहि भाऊचा प्रयत्न एकसारखा सुरू होता. पण या ठिकाणीं मराठ्यांची पूर्वपुण्याई त्यास आडवी आली. धरसोडीच्या वर्तनानें मराठे उत्तरेंत सर्वत्र अप्रिय झाले होते, तशांत अबदाली तेथें मोठ्या सैन्यानिशीं तळ देऊन राहिला असल्यामुळें तिकडे कोणालाहि त्याच्या विरुद्ध गडबड करण्याची छाती नव्हती. परंतु मराठे प्रिय असते तर झाली तितकी निराशा खास होती ना. रजपूत राजेरजवाड्यांशीं क्षुल्लक कारणावरून घासाघीस करण्याचा मराठ्यांचा छंद त्यांना या वेळीं बराच भोवला. भाऊसाहेब ज्याकडे मदत मागतात त्याशीं याच वेळीं त्याचे सरदार क्षुल्लक कारणावरून तंडत बसतात, या शहाणपणाला काय नांव द्यावें ? अखेर कोणीहि महत्त्वाचा रजपूत राजा मराठ्यांच्या तर्फेनें रणांगणांत उतरला नाहीं. उलट रजपुतांनीं अबदालीशींच संगनमत करून मराठ्यांना वेळोवेळीं चिमटे घेण्याचा क्रम सुरू ठेविला ! रजपुतांप्रमाणें सुजानेंहि भाऊची मोठी निराशा केली. सुजाच्या दारांत चाळीस हजार सैन्यानिशीं अबदाली व नजिबखान बसून मदतीचें बोलणें करीत होते; तर भाऊसाहेब पत्रोपत्रीं गोविंदपंतासारख्या साध्या सुभेदारामार्फत त्याला आपणाकडे वळविण्याचा प्रयत्न करीत होते. अर्थात् सुजाला आवडत्या मराठ्यांना सोडून नावडत्या अबदालीशीं एकरूप होण्यावांचून अन्य मार्गच नव्हता. तो मराठ्यांकडे जातो असें पाहिल्यावर नजीब

व अबदाली यांनीं मराठे येण्यापूर्वींच त्याची चटणी उडवली असती. तशांत तो अबदालीच्या कचाट्यांत नसता तर सुरजमल जाठाप्रमाणें त्यानेंहि मराठ्यांच्या पक्षास येण्यास आळस केला नसता. असें मानण्यास भरपूर वाव आहे. जें कोडें सुजाला तेंच इतर राजेरजवाड्यांस. परंतु यमुनेआलीकडच्या लोकांना सुजाइतकी अडचण नव्हती. त्यांचा तटस्थपणा बराचसा अप्रियतेचा दर्शक होय. एवंच, भाऊसाहेब आग्र्यास आल्यावर त्यास आपण अबदालीपेक्षां हलके आहोंत, असें स्पष्ट दिसून आलें; व तेव्हांपासून लढाईचा प्रसंग टाळण्याच्या उद्योगास ते लागले. आषाढांत भाऊजवळ ‘ अगदीं फौज एकत्र एथें जाहली आहे. सत्तर अशी ( ऐंशी ) हजार आहेत ’ व ‘ नजीबखान रोहिला व अबदाली याची फौज साठ हजार आहे ’ म्हणजे हीं दोन्ही पारडीं समतोल होऊन ज्यांत सुजाची ‘वीस हजार फौज व भारी तोफखाना’ जाऊन पडेल तें पारडें जड होणार अशी एकंदर स्थिति होती. याकरितां सुजा अबदालीकडे जातो असें पाहून आग्र्याहून आषाढ वद्यांत भाऊसाहेबांनीं नारो शंकरांस त्याकडे पाठवून तो ‘ मागेल तें द्यावें ऐसें केलें.’ परंतु सुजाचा धोंडा अबदालीच्या पारड्यांत पडून तो जड झाला. व ‘ नजीबखानाचे व अबदालीचे पारपत्यास उसीर नाहीं ’ ही मराठ्यांची भावना नष्ट होऊन त्यांस हें ‘ मोठें विघ्न आहे ’ असें वाटूं लागलें. ( ले. २८७ ). मराठ्यांचे सरदार एरव्हीं कसेहि वागलेले असोत पण यावेळीं ते सर्व एकदील होऊन भाऊस मदत करीत होते. भाद्रपद शुद्धात मराठ्यांनीं दिल्लींत प्रवेश करून किल्ला घेऊन आंत आपला अंमल बसविला. अबदाली यमुनेच्या पलीकडे असून यमुनेला पाणी फार; तेव्हां पाणी उतरल्यावांचून ‘मोकाबला’ होणार नव्हता. तेवढ्या अवधींत तहाची वाटाघाट सुरू झाली. हें तहाचें बोलणें नजीबखान व सुजातदौला यांच्या विचारें सुरू होतें. १ अबदालीस सरहिंदची हद्द करून द्यावी २ पातशाही बंदोबस्त आपल्या ( अबदालीच्या ) हवाला करावा, ३ वजिरी सुजाला व बक्षिगिरी नजिबास द्यावी, ही अबदालीची मागणी असून; ( १ ) अबदालीची अटकची हद्द असावी, ( २ ) बादशाही बंदोबस्त पूर्ववत् चालवावा, असें मराठे म्हणत होते. परंतु दोन हात झाल्यावांचून कधीं कोणाचा तह झाला आहे ? तशांत उत्तरेंत नेहमीं राहणारी

शिंदेहोळकरांची फौज गेले सालच्या दणक्यांत मोडली असल्यानें लढाईचा सर्व भर शत्रूशीं व परिस्थितीशीं पूर्ण अनभिज्ञ अशा नव्या दक्षिणी फौजेवर येऊन पडणार होता. अबदाली सर्व प्रकारें सलाबतींत सैनिक संख्येनें मराठ्यांहून श्रेष्ठ. तोफखान्यां-- सुजाच्या तोफखान्यामुळें मराठ्यांच्या बरोबरीचा व यमुनेच्या आसपास कोठें लढाईला तोंड लागलें तरी स्वतःच्या घरीं अशी स्थिति असल्यानें अबदालीच्या मानानें भाऊ तह करून हें प्रकरण लांबणीवर टाकण्यास उत्सुक होता. ( ले. ३८९ ). परंतु, भाद्रपदअखेर तह जमून आला नाहीं. तेव्हां कुंजपुरा घेऊन एक साहसी डाव टाकण्याचें ठरवून भाऊनें तो लगेच अमलांतहि आणिला. सुजा अबदालीकडे जातांच गोविंदपंत, गोपाळराव बरवे, गणेश संभाजी वगैरे अंतर्वेदींतील सरदारांस सुजाचा व रोहिल्याचा मुलूख मारण्याची कामगिरी भाऊसाहेबानीं सांगितली होती पण तहाची वाटाघाट होत असल्यामुळें मुलूख मारण्याचें काम बंद राहिलें; कां त्यांना तें करितां आलें नाहीं;का त्यानीं तें करण्याची अळमटळम केली; कांहीं असो, सुजाच्या व रोहिल्याचे मुलुखास मराठ्यांकडून उपसर्ग पोंहोचूं शकला नाहीं. त्यामुळें अबदालीस लढाईचें साहित्य भरपूर जमवितां आलें. शिवाय, कुंजपुऱ्याचें मजबूत ठाणें त्याचे ताब्यांत असल्यानें तेथें भरून ठेविलेलें व त्या मार्गानें अफगाणीस्थानाकडून येणारें सामान त्यास मिळण्याची उत्तम व्यवस्था होती. त्यामुळें अबदालीकडून तहाचें बोलणें नेटाचें होत नव्हतें. याकरितां भाऊनें कुंजपुरा घेण्याकरितां भाद्रपद वा। त दिल्लीहून कूच केलें. आपण कूच करितांच अबदालीहि आपला तळ सोडून कुंजपुऱ्याच्या संरक्षणास धांवत येईल व आपण त्याशीं कुंजपुऱ्यावर यमुना उतरून गांठ घालूं ; यदाकदाचित् तो तळ न सोडतां तेथें आहे त्याच जागीं ठासून राहिला अगर खालीं गोविंदपंताकडे वळला तर त्यास आपण परत येऊन गांठू, असा दिल्ली सोडून कुंजपुऱ्याकडे जातांना भाऊसाहेबानें कयास बांधला होता. तेव्हां त्यानें गोविंदपंताची रसद मारण्याची आपल्या अंतर्वेदींतील सरदारांस ताकीद केली. आश्विन शु॥ ६ ला कुंजपुऱ्यास तोंड लागलें व दोनच दिवसांत, कालाष्टमीस, तें ठाणें सर करून तेथें मराठ्यांनीं शेंकडों पठाण यमसदनास पाठवून लाखों रुपयांची लूट मिळविली. भाऊनें दिल्ली सोडतांच त्याच्या अंदाजाप्रमाणें अबदालीहि आपला तळ हालवून पलीकडून कुंजपुऱ्याकडे येऊं लागला. पण तो निम्मीं

वाट उरकतो न उरकतो तोंच मराठ्यांनीं कुंजपुरा घेऊन तो जमीनदोस्त केल्यामुळें अबदालीनें एक कल्पनातीत डाव टाकला. यमुनेच्या उत्तरतीरावरील बागपत गांवाजवळ यमुना उतरण्यास अबदालीनें सुरवात केली. यमुना उतरत असतां त्याचें शेंकडों सैनिक गत झाले तरी त्याची त्यानें पर्वा केली नाहीं. दिल्लीपासून कुंजपुऱ्यापर्यंत सर्व उतारांवर मराठ्यांनीं पहारा ठेविला होता. तेव्हां बागपतावरहि मराठ्यांचें कांहीं लष्कर असावें व त्याशीं अबदालीस दोन हात करावे लागले असावेत, असा तर्क करावा लागतो. अबदाली यमुना उतरत आहे हें ऐकून भाऊहि कुंजपुऱ्याहून परतले व तेथून त्यानें अबदालीची रसद मारण्याची गोविंदपंतांस सकतीची ताकीद दिली. अबदाली सर्व तळ हालवून बागपतावर यमुना उतरत आहे, आतां तिकडे गोविंदपंताकडे त्याचा वसवसा नाहीं, करितां यमुनेच्या पैलतीराकडून बागपतपर्यंत अंतर्वेदींतील मराठे सरदारांनीं धुमाकूळ घातल्यास अबदालीस रसद उतरविण्यास बराच अडथळा होईल, हें भाऊसाहेबाचें लिहिणें सयुक्तिक होतें. दोन तीन दिवसांत अबदाली आपली सर्व फौज उतरून मराठ्यांस आडवा झाला. व कुंजपुऱ्याच्या रोखानें चालूं लागला. तिकडून भाऊहि येत होते. उभयतांचें कुंजपुऱ्यावर अविश्रांत खटपट करून दमलें भागलेलें सैन्य हुश्श करीत आहे, तोंच अबदाली बागपतावर यमुना उतरत असल्याची हकीकत कळली. पाणी उतरल्यावांचून भर यमुनेंतून अबदाली पार होईल ही शक्यता भाऊस कधींच वाटली नाहीं. तेव्हां बागपतावर यमुना उतरून अबदाली आपणास आडवा येतो हें पाहून भाऊसाहेब क्षणाचाहि विलंब न लावितां कुंजपुरा सोडून परत बागपताच्या रोखें चालूं लागला. तिकडून अबदालीहि भाऊशीं गांठ घालण्याकरितां निघाला. उभय सैनिकांची गणोरजवळ दृष्टादृष्टी झाली. अबदालीच्या साहसास प्रतिसाहस करून काट मारण्याचा येथें भाऊसाहेबानें कां प्रयत्न केला नाहीं हें कोडें नीटसें उकलत नाहीं. आडवा आलेला शत्रु खांडल्यावांचून गत्यंतरच नव्हतें. तेव्हां हा विधि याच वेळीं न उरकण्यांत भाऊचा काय हेतु असावा ? 'त्यानें चालून यावें ही वाट पाहातो. आल्यानंतर एकदांच लगटानें मारून बुडवावा ऐसें आहे ' ( ले. २९१ ). असें नाना पुरंदरे चालून न जाण्याचें एक कारण देत आहेत. 'पनास साठा कोसांच्या

दौडी करणार अबदाली त्याच्यानें कोसावरून पुढें येवेना.' यामुळें तो भ्याला असून त्यामुळें तो तोंड देण्यास कांकूं करितो, असा मराठ्यांनीं आपला समज करून घेतलासा दिसतो. शिवाय, या वेळीं मराठ्यांकडे सुबत्ता असून अबदालीकडे दुष्काळाचें साम्राज्य पसरलें होतें. उत्तरोत्तर ही स्थिति वाढत जाणार असा मराठ्यांचा अंदाज होता. परंतु यानंतर उलट प्रकार होऊं लागला. अबदालीचीं रसद यमुनापार होती ती अद्याप पैलतीरास पोंहोचली नसल्यानें ही कांहीं दिवसापुरती हलाखी होती. अंतर्वेदींतील मराठ्यांस ही रसद गारद करितां आली नाहीं; इतकेंच नव्हे तर, सुजा व नजीब यांच्या मुलखांतील रसदीचा प्रवाहहि खुंटवितां आला नाहीं. यांत गोविंदपंतादिकांची कसुरी कां ही त्यांच्या शक्तीबाहेरची गोष्ट, याचा अवश्य खुलासा व्हावयास पाहिजे. मराठ्यांनीं कुंजपुऱ्याहून लुटून आणिलेली रसद जसजशी खर्च होऊं लागली तसतशी त्यांच्या लष्करास अन्नाच्छादनाची कमतरता भासूं लागली. शिवाय, मराठे स्वगृहीं नसून परगृहीं असल्यानें त्यांना सुखानें रसद मिळविण्याचा मार्ग नव्हता. भोंवतालचा प्रदेश मारून आणावा तेव्हां एखादा दाणा हातीं यावयाचा. पण हा प्रदेश उभय सैन्यांनीं या पूर्वींच खाऊन फस्त झाला असल्यामुळें हाहि मार्ग खुंटला. अबदालीनें धिम्मेपणानें किरकोळ नुकसानीकडे दुर्लक्ष करून एक एक पाऊल पुढें टाकीत टाकीत अश्वीन अखेरपर्यंत मराठ्यांभोंवती पक्का वेढा टाकला. त्यामुळें त्यांना भोंवताली खंदक खणून आंत कोंडून घ्यावें लागलें. अर्थात् बाहेरून मदत येण्याची आशाच खुंटली. प्रथम प्रथम कांहीं दिवस मराठ्यांचा दिल्लीशीं संबंध होता. तोंपर्यंत तिकडून रसदीचा पुरवठाहि होत असे. पण तोहि मार्ग कार्तिक शुा च्या सुमारास, पाराशर दादा लुटला गेल्यापासून खुंटला. या परिणामाकडे लक्ष देतां कुंजपुऱ्याहून येतांच मराठे अबदालीशीं धडकी मारते तर पुढील अनर्थ खास टळता. कुंजपुऱ्यावर जय मिळवून आत्मविश्वास वाढलेलें ताजें तवानें मराठी लष्कर अबदालीला जोराचा धक्का देऊन विजयी होऊन पार पडण्यास समर्थ होतें. तेव्हां आम्ही ज्यास सुसंधि समजतों, ती भाऊसाहेबांना तशी कां वाटली नाहीं, त्यांना यावेळीं कां पटली नाहीं; याचें यथातथ्य ज्ञान होण्याजोगा पुरावा अद्याप बाहेर आला नाहीं, असें म्हणावें लागतें. अबदालीच्या भोंवताली त्याचाच—नजीबखान व सुजा

यांचा-मुलूख असल्यानें त्याला कित्येक दिवस दम धरून छावणी टाकतां आली असती. त्याला दक्षिणेंतील सैन्य येऊन तें खालून व भाऊचें सैन्य वरून दामटी वळवीपर्यंत पुरा दम होता. त्यामुळें तो जनकोजी शिंदे, बळवंतराव मेहेंदळे यांच्या लढाया दमानें खेळूं शकला. दिल्लीस पांच सहा हजारांच्या आंत तळ देऊन बसलेल्या नारो शंकरांकडून अबदालीस भय बाळगण्याचें मुळींच कारण नव्हतें. कुंजपुरा घेण्यापूर्वीं ज्यानें भलत्यासलत्या अटी घालण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं तो वेढ्यांत अडकविल्यावर कसा बरळत सुटला असेल याची कल्पनाच केली पाहिजे. वास्तविक या वेळची तहाची वाटाघाट केवळ कालहरणाकरितांच असली पाहिजे. कुडत्यांत जीव आलेल्या शत्रूस नागविल्यावांचून कोण सोडील ? पानपतावर पालटत चाललेला रंग दक्षिणेंत नानासाहेबांस कळतांच नानासाहेब व राघोबा दक्षिणेंतील व्यवस्था लाऊन उरलेली तीस हजार फौज घेऊन भाऊच्या मदतीस दसरा करून निघाले. सरदार बळवंतराव मेहेंदळे कार्तिक वा॥ ३० पडला. त्यानंतरच मराठ्यांच्या हलाखीस खरी सुरवात झाली. त्याची योग्य जाणीव पेशव्यांस दिसत नाहीं. पण इतरांस मात्र पानपतावर भाऊची धडगत नाहीं अशी बालंबाल खात्री वाटत असावी. कारण राक्षसभुवनास पेशव्यांच्या लष्कराचा तळ असतां त्यानें वीस हजार फौज देऊन राघोबास निजामअल्लीस मदतीचें निमंत्रण करण्यास पाठविलें असतां तो येण्यास अळमटळम करूं लागला. इतकेंच नव्हे तर त्रिवर्ग निजामबंधू व मुराररराव घोरपडे, उदाजी चव्हाण वगैरे पेशव्याचे सर्व विरोधक एकत्र होऊन दक्षिणेंत दंगल उडवून देण्याची गुप्त मसलतहि ठरली होती. तेव्हां राघोबास प्रथम हीं कारस्थानें हाणून पाडण्याचें काम हातीं घ्यावें लागलें.

४५ सखारामबापू व मल्हार नाईक रास्ते यांजबरोबर दाहा हजार फौज व तोफा देऊन त्यांस पेशव्यानें निजामच्या सरहद्दीवर पूर्वींच ठेविलें होते. तें व राघोबा एकत्र होऊन त्यांनीं निजामास ठिकाणी लावण्याचा उद्योग हातीं घेतला. ‘निजामअली यास उशिराचें निमित्त करून शब्द ठेवावा असा समय दुसरे वेळेस येणार नाहीं. यावेळेस निजामअलीस जिवें मारावें अथवा कैद करावे’ या पेशव्याच्या इच्छेस ‘निजामआली तो बराबरीचा सरदार, आम्हाजवळ फौज फार व त्याजजवळ तोफखाना गाडदी फार, या अन्वये पाहातां तो थोडासा आम्हा-

पक्षां उणा नाहीं समानच आहे ' असें राघोबानें उत्तर दिलें. पण आपल्या उद्योगांत ढिलाई केली नाहीं. निजामअल्ली, सलाबतजंग व बसालगजंग या त्रिवर्ग निजाम बंधूंत परस्पर वैमनस्य होतें खरें. परंतु 'आज एक बुडविला तरी उद्यां आपली आवस्था तेच आहे ' हें प्रत्येक जाणत असल्यानें ते आपलीं भांडणें तात्पुरतीं विसरून राघोबाशीं तोंड देण्यास सिद्ध झाले. राघोबानें नांदेडाजवळ गंगा उतरून निजामचे हद्दींत प्रवेश केला तेव्हां उभयतांचा बिघाड स्पष्ट झाला. निजामअल्लीनें आपले वकील कृष्णराव व मुरादखान राघोबाकडे पाठवून आपण मेदकाकडे मीरमोगल होता, त्याला सामील होण्यास निघून गेला. ' निजाम अलीजवळ फौज थोडी. टकर न सोसवे व झाडींत तोफखानीयाचा वगैरे गलाठ होईल.' हें मेदका-कडे जाण्याचें कारण होतें. तसें मीर मोगलाजवळ हजार दीड हजार फौज, हजार गाडदी व पांच सहा तोफा होत्या. पण ते दोघे एकत्र होण्यापूर्वींच मीर मोगल एकटा गाठून पारपत्य करावें म्हणून राघोबानें मल्हार नाईक, नागोराम, राघो बापूजी, देवजी ताकपीर, सयाजी बोरगे, मानाजी शिंदे वगैरे पतके सडी चार हजार पुढें रवाना केली. व खुद्द आपण मुख्य फौज व तोफखाना घेऊन मागून हळू हळू जाऊं लागला. कारण 'तोफखाना मातबर व वाट फार वाईट याजमुळें मजल लहान होते.' अद्याप राघोबाला पानपतच्या बिघाडाची हकीकत कळली नव्हती. राघोबाचें या वेळचें निजामाचें मर्दन अगदीं वेळेवर होतें. कारण, जर ' अबदालीची बाजू शेर जाहाली तरी खामखा दक्षिणेंत आमल बसवावा. साऱ्यानी येक विचार केला होता' पेशव्याचा उत्कर्ष कोणासच सहन होत नव्हता. केवळ जबरदस्तीमुळें सर्व दबत असत इतकेंच. या वेळच्या दक्षिणेंत आमल बसाविण्याच्या मोगलाच्या कटांत मुरारराव घोरपडे, उदाजी चव्हाण वगैरे स्वकीय मराठे सरदारहि सामील होते. ' सांप्रतचा दक्षणचा कारभार तरी चहूंकडे कजिये आहेत. पश्चेमेस जंजिरा, दक्षणेस पनाला ( कोल्हापूरकर ) व श्रीरंगपटण, पूर्वेस मोगल, ऐसे तिहींकडे कजिये आहेत.' हे सर्व दक्षिणें-तील पेशव्याचे प्रतिस्पर्धी ' येका दिवसी सारे हगामा करावयास तयार ' होते. हा प्रसंग राघोबाच्या करामतीनें या वेळीं टळला. राघोबानें निजामशा-हींत जोराच्या हालचाली करून ' तोफ बुनगे देखील निजामआली तीन हजार फौजेनसी कोंडिले. सखाराम मल्हार नाईक दाहा हजार फौजेनसी धावोन पुढें गेले. त्यांनी कुमकेस बसालतजंग येणार त्यांस

विसोबानी शह अदवानीस दिला. चिरजीव दादाची उमेद लाव होती. माझी पत्रे, शफत घालून लढाई तुमची (पानपतची) नासल्याचे', गेल्यामुळें ही मोहीम येथें थांबवून राघोबा उत्तरेस नानासाहेबाकडे लागणारी मदत पाठविण्याच्या उद्योगास लागला. एकंदरींत राघोबानें दक्षिणेंत राहून तिकडील पडती बाजू चांगलीच सावरली. नाहींतर पेशवाईवर मोठा खडतर प्रसंग आला होता ( ले. ३९३, ३९८ व ४०२ ).

नानासाहेबाचें उत्तरेस प्रयाण:—

४६ नानासाहेब भाऊसाहेबाच्या बोलावण्यावरून त्याच्या मदतीस निघाला, कां तिकडील हलाखी ऐकून निघाला; व कधीं निघाला यासंबंधीं निश्चित कांहींच म्हणतां येत नाहीं. मार्गा शुा १४ स नानासाहेबाचा मुकाम राक्षसभुवनास असून त्यानें तेथून निजामअल्लीस आणण्याकरितां राघोबाची रवानगी केली व झांशीस असलेल्या बाबुराव कोनेरांकडे भाऊसाहेबाची चौकशी केली. या बाबुरावांच्या पत्रांत पुढील महत्वाचीं वाक्यें आढळतात. 'चिरंजीव राजश्री भाऊसाहेबाचें पत्र छ ५ रबिलाखर [कार्तिक शुा ६ ] पानपतच्या मुकामींचें आलें कीं, आपली व अबदालीची सन्निधता जाली. दो कोसाची तफावत राहिली आहे. रोज लहान लहान झुजे होतात. ऐशियास फौज मातबर समीपता जाली असतां खबर न यावयास कारण काय ? युद्ध जाहाले किंवा सलूख जाहाला काय मजकूर जाहाला ? अलीकडे वर्तमान तहकीक आले असिलें तर पत्रदर्शनी लिहिणें' [खं. ३ ले. २१० ]. यावरून कार्तिक शुा ६ नंतर खुद्द भाऊसाहेबाचें पत्र पेशव्यास आलें नाहीं. त्याच्या आदल्या दिवसाचें पत्र या भागांत आहे ( ले. ३९१ ). यानंतर नाना पुरंदऱ्यांचेंहि माघ शुा ९ पर्यंत पत्र नाहीं. तेव्हां कार्तिक शुा ६ नंतर खुद्द भाऊसाहेबाकडून पेशव्यास तिकडील कसलीच बातमी कळली नव्हती, असें निश्चयपूर्वक म्हणतां येईल. आणि या वेळेस भाऊला मदतीची मुळींच अपेक्षा नव्हती. कार्तिक वाा ३० ला बळवंतराव मेहेंदळयाची लढाई झाल्यावर मराठ्यांचे एकेक पाश तुटून ते असहाय होऊं लागले. रसद जसजशी संपुष्टांत येत चालली तसतशी मराठी लष्करांत महर्गता होऊन त्यावर उपासमारीचा प्रसंग येऊन ठेपला. मार्ग. व. ७ चें एक महत्त्वाचें नाना फडणविसाचें पत्र आज उपलब्ध आहे ( भा. व. ऐ. पत्रे यादी ले. १९ ). त्यांत

यानीं ( भाऊसाहेबानी ) तोफखान्याचा आराबा पसरून खंदक खणून पाणिपत गाव आपल्या पाठीशीं घालून खड्या फौजा तोफांचे मागे उभ्या याप्रमाणें बंदोबस्तीनें राहिले आहेत. बणगे गावाचे पुढें, फौजेचे मागे ठेविले आहेत. नित्य गोळागोळी होती. सभोंवत्या त्यांच्या ( आबदालीच्या ) फौजा आहेत '. ' दोन महिने यांची याची लढाई होते. अद्यापि लढावे हाच निश्चय उभयतां पक्षी जाला आहे. ईश्वर काय परिणाम लावील तो खरा. मनसबा भारी पडला आहे. पैसा नाहीं. महागाई फार. यामुळें लष्कर गलबललें आहे. " असा परिस्थितीचा दर्शक योग्य खुलासा आढळतो. तेव्हां हें किंवा असलीं इतर सरदारांचीं पत्रें पाहून भाऊची मागणी नसतांहि पेशवा त्याच्या मदतीस निघाला असावा असा तर्क वाहतो. स्वत: भाऊसाहेबानें पेशव्याकडे मदतीची याचना केली नसावी अगर केली असल्यास ती पेशव्यापर्यंत जाऊन पोंचली नाहीं असें मानणें भाग पडतें. कार्तिक शुा ८ च्या पत्रांत ' खासा स्वारीसमागमे नबाब निजामअल्लीखानसहवर्तमान नर्मदातीरास सत्वर येऊन पोहचणार तर बैल लौकर लिा प्रो खरीदी करणें. मजल दरमजल निजामअल्ली व जानोजी भोसले सेनासाहेबसुभा, पन्नास हजार फौजसुद्धां खासा स्वारी मार्गशीर्षांत येते. तुम्ही रा गोविंद बल्लाळ यांस व तमाम राजेरजवाडे यांस लेहून सारे जमा होऊन सामील होणे ' ( खं. ३ ले. २२७ ) अशी ताकीद आहे. तेव्हां मेहेंदळयाची लढाई होण्यापूर्वीच भाऊच्या मदतीस जाण्याची पेशव्यानें तरतूद चालविली होती असें स्पष्ट ठरतें. ले. ३९५ हें नानासाहेबानें नर्मदेहून पौष शुा १२ चें भाऊसाहेबास लिहिलेलें पत्र आहे. पानपतची शेवटची लढाई पौष शुा ८ बुधवारीं झाली, अर्थात् हें पत्र भाऊच्या हातीं पडलें नाहीं; याबद्दल शंका राहात नाहीं. पण त्यांतील ' वीस हजार फौजेनसी दर मजल माळव्यात आलो. फौज कोणे मार्गे आपणाकडे रवाना करावी ते जलद ल्याहावे. माघमासी पूर्वी लिहीत आलो त्या अन्वये कुमक पावावी हे ईश्वरा जवळ इच्छिता '. ' आपण आबदालीस कोंडून राखावे. सव फौज एक होतांच समक्षपातीसह याचे उतम प्रकारें पारपत्य करावे. ' हा मजकूर चिंतनीय आहे. निर्वाणीची लढाई, उपासमारीचा कडेलोट झाल्यानंतर दिल्याबद्दल भाऊसाहेबाच्या पदरीं मोठा दोष बांधण्याची सर्वत्र प्रवृत्ति दिसून येते; परंतु हें पत्र पाहून जर या पूर्वींचीं नानासाहेबाचीं

पत्रें भाऊसाहेबास पोहोंचलीं असतील तर शेवटची लढाई लांबविल्याच्या दोषांतून त्याची पूर्ण मुक्तता होते. उलट अबदालीचे पाश मराठ्यांच्या गळयास करकचून आवळले जात होते कीं, त्यांना माघापर्यंत पंधरा तीन वाराचाहि दम धरवला नाहीं. आतां, निजामअल्लीनें हिसका दिल्यामुळें भाऊसाहेबानें माघापर्यंत दम धरला असतां तरी त्याची मुक्तता नानासाहेबास करतां आली नसती हा प्रश्न स्वतंत्र आहे. पानपतच्या अनर्थाचें वर्णन ( ले. ३९७ मध्यें ) आहे; त्यांत नाविन्य असें कांहीं नाहीं.

४७ नानासाहेब पौष शुा १२ नर्मदातीरीं आले व तेथून त्यानीं चहूंकडे पत्रें पाठवून पानपतची कच्ची हकीकत कळवून घेण्याचा उद्योग चालविला. यापूर्वीच पानपत होऊन चुकलें होतें. पण त्याची माहिती त्यास नव्हती. निजामाशीं तोंड द्यावयाचा प्रसंग आलेला पाहून राघोबानें पेशव्यानें आशेर बऱ्हाणपूर या सुमारें राहावें व भाऊकडे व दादाकडे फौजेचा पुरवठा करावा असा सल्ला दिला. ‘ स्वामी लक्षा फौजेचे खावंद आणि दाहा हजार फौजेसी आबदालीजवळ जावे हे सलाह आमच्याने देवणार नाही. झासी आथवा ग्वालेर येथपर्यंत जावयास चिंता नाही. पुढे खासा न जावें. ’ हे राघोबाचें म्हणणें सयुक्तिक दिसतें. माघ शुा ६ पेशव्याचा मुक्काम भेलशाजवळ आहे. पानपत होऊन तब्बल एक महिना झाला होता तरी पेशव्यास युद्धाचें सविस्तर वृत्त कळलें नव्हतें. ‘ भाऊ साहेब व राव जनकोजी सिंदे कोण्हीकडे निघाले, कोणे रोखे आले, काये वर्तमान, ते तुम्हास कललें असेल तर सविस्तर लिहिणे ’ ( ले. ३९६ ). लढाई बिघडून सर्व वाताहत झाल्याचें बाजारी वर्तमान पेशव्यास नर्मदेवरच कळलें. तेव्हां त्यानें दोन लाख रुपये रोख, एक लाखाचें कापड बरोबर देऊन बाबूजी नाईक व सदाशिव रामचंद्र यांस पुढें पाठविलें होतें. परंतु, नाईक तडख न जातां खेचीचे वाटेंत जमीनदाराशीं किरकोळ कज्जा करीत राहिला. पण भेलशास पेशवे आल्यावर त्यांनीं ‘ फजीत करून लिहिले कीं, हे दिवस जमीनदाराशीं घासावयाचे नाहींत. सर्वांचे अन्याय गिळावे. येकदां भाऊचे दर्शन घ्यावे. तेव्हां नाईक सुरजेहून कूच करून गेले.’ यानंतर माघ वाा ४ च्या पत्रावरून पाहातां आतां पेशव्यास सर्व परिस्थितीची योग्य जाणीव झाली असल्याचें स्पष्ट दिसतें. वांचून आलेल्या लोकांच्या पोटापाण्याची तरतूद लावणें, भाऊसाहेबाचा शोध करणें, शेफारलेल्या

जमीनदारांस वठणीवर आणणें, आबदाली लढाईनंतर काय डाव खेळतो तें लक्षांत घेऊन त्यास शक्य तेथें विरोध करणें व विसकटलेली घडी पुन्हां बसविणें, हीं कामें नानासाहेबानें तातडीनें हातीं घेतलीं. त्याची तबीयत आजारीपणानें आधींच ढासळली होती. त्यांत हा जबर धक्का बसल्यामुळें तर तो खंगत चालला. ' घोड्यावर अर्धकोशहि बसवत नाहीं. ' इतक्या कनिष्ठ दर्जाला तबियत जाऊन पोंहोचली. सर्व वेग विचारें करून त्यानें आवरले पण भाऊसाहेबाचें दुःख कशानेंच परिहार होण्याजोगें नव्हतें ' भाऊवांचून दुनियादौलत व्यर्थ आहे. त्याचे हातचें पत्र पाहीन. तेव्हा माझे बायकोस मला जीव येईल. आतां तो वेडेपणें आहों. लेक अल्पायुषी होता. सूर्यमंडळ भेदून गेला. तें दुःख परमार्थ—शास्त्रपुराणें करून टाकिलें. परंतु, चिरंजीव भाऊवांचून दुनिया व्यर्थ आहे. ' ' भाऊवाचून सकळ व्यर्थ ' हे नानासाहेबाचे दुःखोद्गार कसल्याहि पाषाणहृदयास पाझर फोडतील. अशा स्थितींत नानासाहेबानें मोठ्या धैर्यानें सर्व कामें नेटानें सुरू ठेविलीं. भाऊसाहेब हयात असून ते आज अमक्या ठिकाणीं आले, उद्यां तमकीकडे गेले. अशा एकसारख्या बातम्या येत गेल्यामुळें बातमीच्या अनुरोधानें तपास सुरू झाला. परंतु त्यांतून कांहीं निष्पन्न झालें नाहीं.

४८ खेतीवाड्यांतील जमीदारांस नरम करून दोन महिन्यांच्या अवधींत पेशव्यानें आपल्या देखरेखी खालीं त्यांचीं दोन ठाणीं गोपाळराव पटवर्धनादिकांकडून घेवविलीं. गोहदाच्या राण्याचा बंदोबस्त आपल्या देखत व्हावा ही पेशव्याची मोठी इच्छा, परंतु तें जमलें नाहीं. तेव्हां ही कामगिरी विठलपंत विंचूरकर, मल्हारराव होळकर यांजवर सोपवणें भाग पडलें. पेशव्यानें चालू सालीं छावणी करावी, म्हणजे सर्व व्यवस्था लागून पूर्ववत् चालूं लागेल असें सर्वांचें म्हणणें पडलें. परंतु अबदाली दिल्लीपर्यंत आल्यावर एकाएकी देशीं निघून गेल्यामुळें पेशव्याच्या मुकामाचें कारणच उरलें नाहीं. शिवाय तबियतीच्या मानानें पेशव्यास उत्तरेस राहणें शक्यही नव्हतें. ' त्याणी (माधवसिंगानें) खेल काय काय केले ते दक्षणेत श्रावणापासून मजला ठाऊक आहेत. तुम्हास तो गुदरले.' या पेशव्याच्या कळकळून लिहिण्यावरून पानपत बिघडविण्यांत रजपूतांनीं बराच हातभार लाविला होता याबद्दल खात्री पटते. परंतु, मसलतीवर नजर देऊन होळकरादिकांनीं तूर्त

त्यांच्या वाटेस जाऊं नये अशी पेशव्याची इच्छा होती. आबदालीनें हल्लीं माधासिंगाकडे, करोड रुपये घेऊन हुजूर येणें असा सारखा तगादा लाविला. तेव्हां त्यानें ' आपण बुद्दीस यावे. मी येतो. सर्व रजपूत राजे मेलऊन. ' पण या वेळचें माधोसिंगाचें म्हणणें खरें असलें तरी या मसलतीला जरूर असें मनुष्यबळ व द्रव्यबळ यावेळीं पेशव्याजवळ नव्हतें. पानपतापायीं त्याचा सर्व खजिना खलास होऊन पन्नास लाखांवर कर्ज झालें होतें. पुण्यापासून दिल्लीपर्यंत एक रुपया कर्जाऊ मिळण्याची सोय नव्हती. करितां रजपुतास गरम नरम लिहून पानावर पान टाकणें भाग पडलें. नानासाहेबानें येतांना रुसलेल्या जानोजी भोसल्यांची समजूत घालून त्यांस त्यांच्या दहा हजार फौजेसह बरोबर आणलें होतें. पण, इकडे आल्यावर पुन्हां उभयतांत बेबनाव झालेला दिसतो. तेव्हां झांशीस नारो शंकरांस पाठवून तेथें असलेल्या बाबुराव कोनेरांस ' भोसल्याची बेबदी जाऊन काही कामावर पडतील ' म्हणून बोलावणें केलें. शेवटीं ' या देशी हवा अतीशय सर्द, माझे शरीर चिंता शोक औदासिन्य; तीविषे बहूत विवेक केला तरी बाधतात. बायको अती उदास, रोड, मौनी होऊन गेली ते पाहावत नाहीं,' या कारणानें नानासाहेब फाल्गून वद्य पक्षी उत्तरेतून पुण्यास यावयास निघाला. त्यापूर्वीं शपतपूर्वक मल्हारबांवर आमचा येख्तीयार; जो माझा तोच चिरंजीव दादाचा; कधीं संशय नाहीं. तुम्ही सुभेदाराची शफतपूर्वक निशा करून, अबदालीसी तह या वर्शी तो जसे म्हणेल तसे करणे. पुढे पेचपाच करणे. 'यख्तीयार सुभेदाराचा व लहान चाकर हर कोठें पाठविल्यास वर [मग] येख्तीयारात अंतर नाहीं, हे निशा तुमची आहेच. ' असें ठरविलें. नानासाहेब उज्जनीस पोहोंचल्यावर त्यास अबदाली निघून गेल्याची खबर पोहोंचली. त्यानंतर त्यानें पत्र लिहिलें त्यांत ' मल्हारबा इंदुरास राहातील व राहावें. सर्व हिंदुस्थानचा यखतीयार त्यावर आहे. शफतपूर्वक; ऐशी दोन पत्रे पाठविली. पावली न पावली हें न कळे. हें लिहून पूर्वीची व्यवस्था कायम केली. पण काय असेल तें असो; ही व्यवस्था त्याच वेळीं कित्येकांस आवडली नाहीं. नाना फडणीस फाल्गुन शुा १४ च्या आपल्या पत्रांत या व्यवस्थेसंबंधानें ' जें करणें तें सुभेदाराचे मल्हाररावाचे अनुमते [पेशवे] करतात यास्तव कठीण दिसतें. भगवत् इच्छा प्रमाण ( ख. ६ ले. ४१० ), असे दुःखोद्गार काढितो. बऱ्हाणपुरास गेल्यावर पेशव्यानें शिंदे, होळकर व पवार यांचे देशचे महाल

जप्त केले व होळकरांस जिव्हारी लागेलसें पत्र लिहिलें. महाल जप्तीचें कारण नीटसें लक्षांत येत नाहीं. होळकरांनीं पानपतावर कुचराई केली म्हणून ही जप्ती झाली अस म्हणतां येत नाहीं. कारण, एकट्या होळकरांचेच महाल जप्त होते तर तसें म्हणतां आलें असतें. परंतु या जप्तींत शिंदे पवारहि आहेत त्यांनीं तर कुचराई केली नव्हती ना? करितां या जप्तीचा पानपतशीं संबंध जोडतां येत नाहीं. याचें कारण कांहीं तरी निराळेंच असलें पाहिजे. नानासाहेबानें 'कठीण अक्षरांनीं' मल्हाररावाला पत्र लिहिलें हें जबाबदार माणसांस पटलें नाहीं. पानपतसंबंधीं पूर्ण माहीतगार जर कोणी असेल तर ते नाना पुरंदरे. नाना पुरंदरे व भाऊसाहेब यांचीं अकृत्रिम स्नेहदर्शक कित्येक पत्रें या भागांत आहेत. भाऊच्या प्रत्येक मसलतींत हे होते. अमूक एक गोष्ट यांला माहीत नव्हती असें नाहीं. तेव्हां अशा जबाबदार माणसाचे उद्गार विचारांत घेतल्यावांचून गत्यंतरच नाहीं. हें मल्हाररावांचें पत्र पुरंदऱ्यांच्या हातीं पडल्यावर त्यांनीं त्या पत्रासोबत गंगोबा तात्यांस जें पत्र लिहिलें तें आज आपणासमोर आहे. 'श्रीमंताची पत्रे राजश्री सुबेदारास व तुम्हांस आली; तेंच पत्रे पाठविलीं आहेत, त्यावरून सर्व कळेल. तुमचे पत्र आहे त्यांत मजकूर फार कठीण अक्षरें लिहिला; **समयें पाहून विचार ध्यानांत आणून लिहिला.** असो, खावंद थोर आहेत. परंतु सेवक लोकानी उचित अर्थ ध्यानात आणून प्रसंगानरूप वर्तावें. या पत्रांतील मजकूर सुभेदारास कळलियास चित्तांत बहूत श्रमी होतील. याकरितां तुम्ही, पत्रातील भाव लिहिल्या अन्वयें नच सांगणें. जे गोष्टीनें सुभेदार खटे न होत तें करावें. सुभेदाराचे मर्जीचा प्रकार तुम्ही जाणतच आहां. पत्रातील मजकूर कळलियास **सुभेदार खटे होऊन मोठे दुःखी होतील;** याकरिता नच सांगणें. याप्रमाणें आम्हास सुचले तें लिहिलें आहे. तुम्हीहि उचित तेंच कराल. सर्व मदार सुभेदारावर आहे. ते सर्वथा खटे नसावे. आम्ही श्रीमंताजवळ गेलियावर त्यासी बोलोन ये विषयींचा प्रकार सविस्तर त्यास उमजवूं; उपरांत तुम्हास लिहून पाठवूं. तोंपर्यंत त्यास हा मजकूर कळो न देणे' (ख.६ ले.५०२). गंगाधरपंतांच्या मुलांनीं–कृष्णरावांनीं–राघोबास या बाबतींत ठणठणीत लिहून होळकरांची बाजू जोरानें पुढें मांडिली आहे. 'हिंदुस्थानचा मदार सर्व सुभेदारावर आहे; हे आज्ञा पूर्वपासून सर्व कारभार राव कैलासवासी

यानीहि राा सुभेदाराचेच हाती घेतला. अलीकडेहि येणेप्रमाणेच चालत आले. परंतु अंवदां श्रीमंत सिरोजेहून माघारे फिरल्यावर खावंदानी पूर्व लोभात अंतर केले. चाकरानी सेवा करावयास अंतर केले नाहीं. जे लढाईत होते ते सर्व भेटलेच असतील. त्यानी वर्तमान निवेदन केले असेल. मोडल्या झुंजाची शिफारस कशास लिहावा ! शिंदे पवार पूर्वपासून चाकर साहेबकामावर. त्याच्या ह्या गती, अशा समयांत त्याची जाप्ति नसावी. सुभेदार यांजकडील महाल देशचे जप्त केले. म्हणून श्रीमंतांनीं येथे लिहिले होते. तेणेकरून यांचे चित्तास उदासीनता जाली. आजपावेतो सेवा केली त्याचें फळ हें ! पुढें केलिया कळतच आहे. ऐसे वारंवार बोलतात. आज्ञेप्रमाणें आम्हीहि त्यांचे शांतवन करीत असतों. ' खरी कुचराई असती तर त्याचें समर्थन इतक्या छातिठोकपणें कोणासच करितां आलें नसतें. विंचुरकरांनीं आपलें समर्थन इतक्या निर्भयतेनें केलें आहे कीं; तें पाहून त्यांच्या निर्दोषीपणाबद्दल कोणाचीहि खात्री पटावी. ' हे वाचून कशास आले ? त्यास हें प्रमाणच आहे. मरणाच्या खस्तीस कोण्ही चुकलें नाहीं. कारण आयुष्यापुढें इलाज नाहीं. जखम लागली तेथें खैर होऊन वांचून यावें हे ईश्वरी सत्ता. 'आयूरक्षति कर्माणि आयुरन्नं प्रयच्छति ' ऐसे आहे. परंतु आम्हीहि आपल्या जिवास खातच आहो. आम्हांसहि सर्व गोष्टी कळतच आहेत. परंतु मेहनत ( अगर ) गैरमेहनत सर्व एक ईश्वरी क्षोभानें वायां गेल्या. ' परंतु याबरोबर हहि एक लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, ' मोठे मोठे सरदार सर्व पळाले. खासा भाऊमात्र पनास रावतानशी लढत होते तावत्काल मी समीप होतों. पुढें गर्दी झाली. ज्याला जिकडे ईश्वरे वाट दिल्ही तिकडे तो गेला ' ( ले. ४१७ ), असें नाना फडणीस पहिल्यापासून म्हणत आहे. तेव्हां त्यानें मल्हाररावाकडे हिंदुस्थानची सर्व यख्त्यारी गेल्याबद्दल कष्टी व्हावें यांत आश्चर्य नाहीं. एकच गोष्ट पाहिलेल्या निरनिराळ्या व्यक्तींत मतभेद व्हावा, हें त्या कृत्याकडे पाहाण्याच्या दृष्टीभेदाचें लक्षण समजलें पाहिजे. तेव्हां पानपताहून वाचून आलेल्यांत जे उघड दोन पक्ष दिसतात त्याच्या मुळाशीं जाऊन त्याचें स्वरूप जगापुढें आणण्याची आवश्यकता वाटतें. पानपतावर भाऊसाहेबांच्या सल्लागारांत मतभेद होऊन तेथेंच दोन प्रमुख पक्ष निर्माण झाले असावेत, असा जबर संशय येतो. जनकोजी शिंदे, मल्हारराव होळकर, विंचुरकर

हा एक पक्ष व बलवंतराव मेहेंदळे, नाना फडणीस हा दुसरा पक्ष; अशी याची रचना दिसते. नाना पुरंदरे व महिपतराव चिटणीस यांचा ओढा शिंदे—होळकरांकडे होता, यांत शंका राहात नाहीं. या प्रमुखांमागें कित्येक दुम सीम प्रतीचे अनुयायी असले पाहिजेत. पानपत संपल्यानंतर नानासाहेबाच्या निधनामुळें पेशवे दरबारांत पुढें कित्येक वर्षें राज्यकारभार आपापल्या पक्षांच्या हातीं राहाण्याकरितां एकसारखी धडपड सुरूं होती. तींत हे पानपतावरचे पक्षच प्रमुख दिसतात. आतां, या पक्षाची उत्पत्ति पानपतापूर्वींपासूनहि असूं शकेल. परंतु तूर्त आपणास इतक्या खोलांत शिरण्याचें कारण नाहीं. या पक्षांपैकीं कोणत्या पक्षाची भाऊसाहेबावर छाप होती, याचा नीटसा खुलासा होत नाहीं. बलवंतराव पक्षावर भाऊसाहेबाचा पुढें पुढें लोभ कमी झालासा दिसतो [नाना फडणविसाचें आत्मचरित्र]. पानपतावर कोणी कुचराई केली, कोणी नाही, यांत जसा या पक्षांत मतभेद दिसतो; तसा भाऊसाहेबाच्या हयातीसंबंधानेंहि दिसतो. नाना फडणविसाचा भाऊसाहेबाच्या विपरीत झाल्याबद्दलच्या बातमीवर प्रथमपासून भरवसा आहे ( ले. ४१७ ). पण नाना पुरंदरे या बाबतींत बरेच दिवस साशंक दिसतात. ज्या सुजाच्या वकिलाच्या सांगण्यावरून नाना फडणविसाची भाऊसाहेबाचे विपरीत झाल्याबद्दलची खात्री पटली, त्या सुजाच्या काशिराज वकिलाचे व राजा अनुपगिराचे नाना पुरंदऱ्यांस भाऊसाहेबाच्या मृत्यूची खात्री पटविणारीं पत्रें आलीं असतां ( रा. खं. ६ ले. ४०७,४०८) पानपत झाल्यावर एक वर्षानें त्यांनीं जें टिपण केलें, त्यांत 'विश्वासराऊ पडले **भाऊसाहेबहि थाक नाहीं**. जनकोजी शिंदे येशवंतराऊ पवार इभ्रामखान पडले. बलवंतराऊ गणपतहि पडले. स्त्री सहगमन गेली. ( ले. ४२६ ) असें स्पष्ट लिहिलें. पुरंदऱ्यांस भाऊसाहेबाच्या मृत्यूबद्दल सशय होता हें खास.

४९ नानासाहेब परत फिरला तेव्हां त्यानी पुरंदऱ्यांस 'सौ पार्वतीबाई व तुम्ही फौजेनसी उजनीस येणे' म्हणून लिहिलें. परंतु हिंदुस्थानांत तूर्त हालूं नये. असें पुरंदऱ्यांच्या मनानें पक्कें घेतलें असल्यानें ते पेशव्याबरोबर जाण्यास आळमटळम करूं लागले. परंतु 'पत्रदर्शनीं लांब मजली करून ओंकारेश्वरास येणे. आठ दिवस तुमची वाट उजेनीस पाहिली. या उपर पत्रदर्शनीं [यावे] अनमान कराल तर शफत असे.'

सत्वर येणे. बहूत दिवस भेटावे हेंच इच्छा आहे. अति सत्वर येणें ' अशी पेशव्याची शफतपूर्वक आज्ञा झाल्यामुळें तेहि त्याजकडे यावयास निघाले. त्यांबरोबर नाना फडणीस होता. शेवटीं चैत्र वद्य ३० च्या सुमारास पुरंदरे पेशव्यास टोक्यास जाऊन मिळाले. पुढील मजकूर सर्वश्रुत असल्यानें हें बरेंच लांबलेलें प्रकरण येथेंच संपवूं.

यांत आलेल्या सर्वच प्रकरणांचा ऊहापोह करणें शक्य नाहीं. शिवाय, विवेचनाचें साधन पुढें आहे. त्याचा विचार, जरूर तो प्रसंग लिहीत असतां इतर इतिहासकारांस करावा लागेलच. तेव्हां श्रमविभागाच्या तत्वावर यांतील बाकीचे विषय इतर अभ्यासकांनीं उकलावेत अशी माझी त्यांस नम्र विनंति आहे. माझ्या मतें यांत पुढील विचारार्ह प्रसंग उद्भवतील ( १ ) अत्रे-पुरंदरे वाद, ( २ ) नानासाहेबांची शके १६८१ तील उत्तरेची स्वारी, ( ३ ) ले. १५६, १५७ चा उलगडा, ( ४ ) बाबूजी नाईक पेशवे, ( ५ ) पेशवे व आंग्रे, ( ६ ) शके १६७३ तील निजामावरील-स्वारी, ( ७ ) अमात्य, बाजिराव, नानासाहेब, भाऊसाहेब, माहादाजी अंबाजी, सखाराम बापू, राघोबा इत्यादिकांच्या पत्रांची निरनिराळ्या दृष्टीनें पहाणी, ( ८ ) प्रमुख व्यक्तींचे स्वभाव, ( ९ ) प्रचलित हकीकतींत कराव्या लागणाऱ्या योग्य दुरुस्त्या इत्यादि, इत्यादि.

**आभारप्रदर्शन:**—आठ दहा वर्षे शक्त्यनुसार निरनिराळ्या प्रकारांनीं माझी करमणूक करणारीं पत्रें भा. इ. सं. मंडळाच्या कृपेमुळेंच इतिहासप्रेमी वाचकांपुढें ठेवितां येत आहेत, याबद्दल मी मंडळाचा अत्यंत ऋणी आहें. मंडळाचे प्रमुख चालक रा. दत्तोपंत आपटे, श्री. आबासाहेब मुजूमदार, प्रो. पोतदार यांनीं निरनिराळ्या प्रकारें जी अमूल्य मदत केली तीबद्दल मी त्यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानतों. पुरंदरेदप्तर तपासीत असतां त्यांत साक्षात् भाग घेऊन योग्य सूचना करणारे कै. पांडोबा पटवर्धन ही कृती पहावयास हयात नाहींत याबद्दल फार वाईट वाटतें. पुस्तकप्रसिद्धीच्या कामीं मित्रवर्य रा. शंकरराव जोशी वाईकर यांनीं सर्वच बोजा उचललेला होता. दप्तरसंशोधन, प्रुफें तपासणें, पत्रांच्या रुजवाती घेणें वगैरे कामीं यांनीं मित्रप्रेमानें जी अमूल्य मदत केली त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहें. प्रस्तावना लिहीत असतां श्री. दत्तोपंत

आपटे यांचें सर्वतोपरी सहाय्य झालें आहे, हें येथें नमूद केल्यावांचून रहावत नाहीं. प्रस्तावनेच्या लेखी प्रतीचा कांहीं भाग, आपला अमूल्य वेळ खर्चून पाहून योग्य सूचना केल्याबद्दल प्रो. कुंभारे यांचा मी फार आभारी आहें. यांतील बहुतेक पत्रें खाजगी स्वरूपाचीं असल्यामुळें त्यांचे काल ठरवितांना काय त्रास पडला असेल याची, हीं कामें करणारांसच कल्पना होईल. तेव्हां रा. गोविंदराव सरदेसाई यांनीं शेंकडों इतस्ततः विखुरलेल्या कागदांचें संकलन करून मराठी रियासतदीचा अचाट परिश्रमाचा उद्योग जवळ जवळ तडीस लावल्यामुळेंच विनामित्तीच्या पत्रांच्या मित्या ठरविणें सोपें झालें. मला पत्रांच्या मित्या ठरवितांना रा. सरदेसायांच्या रियासतदीचा खरा उपयोग झाला, करितां रियासतकार रा. गोविंदराव सरदेसाई यांचे आभार मानण्यास संतोष वाटतो. या वृक्षाला ज्या मुळामार्फत खरें जीवन मिळालें त्याकडे दृष्टी जातांच कृतज्ञतेनें अंतःकरण भरून जातें. श्रीमंत रा. मल्हारराव पुरंदरे व श्री. रा. बापुसाहेब पुरंदरे बी. ए. यांनीं आपला अमूल्य संग्रह विश्वासपूर्वक व आपलेपणाचे भावनेनें हवालीं केला नसता तर कांहींच करितां आलें नसतें. तेव्हां या बाबतींत खरे उपकार त्यांचेच आहेत. श्रीमंतद्वयांचें अनुकरण इतर पुरंदरे मंडळी करितील तर पुरंदरेदफ्तर साधनग्रंथांत अग्रस्थान पटकावील यांत शंका नाहीं. श्री. मल्हारराव व बापूसाहेब पुरंदरे यांनीं कागद स्वाधीन करून ते प्रसिद्ध करण्याची परवानगी दिली म्हणूनच हा सुयोग जमून आला. तेव्हां उभयतां श्रीमंतांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानणें, हें मीं आपलें आद्य कर्तव्य समजतों. तसेंच श्रीमंत—द्वयांप्रमाणें इतर कित्येक सद्गृहस्थांनीं आपला अमूल्य संग्रह स्वाधीन करून तो छापण्यास परवानगी दिली त्यांचाहि मी फार फार आभारी आहें. शेवटीं ज्या दयाघन प्रभूचे कृपेनें मज पामराच्या हातून हें काम शेवटास गेलें ती प्रभुकृपा वर्धमान होऊन अशीच सेवा घेवो, अशी जगन्नियंत्याजवळ सप्रेम प्रार्थना करून तूर्त वाचकांची रजा घेतों.

पुणें
माघ शुद्ध १३ शके १८५० } कृष्णाजी वासुदेव पुरंदरे.

# पुरंदरे घराणें-वंशवेल



# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ११ | ४ | याचे देऊन | यार्चें द्रव्य रोकडे देऊन |
| १२ | १४ | केसो विस्वयाला | केसो विस्वनाथ आला |
| ७९ | १० | बाबेपंत | दादोपंत |
| ८१ | ६ | प्रातः तेथें | प्रातः कालीं तेथें |
| ९६ | ५ | परका विचारानें | पर कांहीं विचारानें |
| " | ११ | होतानी | बेतानी |
| १०० | ७ | चमेल उतरतील | चमेल उतर तीर |
| १०४ | २५ | बामशाहीवर | बादशाहीवर |
| ११४ | ६ | राजश्री बाबाजी | राजश्री बाबानी |
| ११८ | २६ | मलऊन ठीक करितो | मेलऊन ठीक करितो |
| १२२ | २७ | बोल [ ना ] हीं | बोलत [ ना ] हीं |
| १२४ | १६ | रामाजीस | रायाजीस |
| १२६ | १४ | गुजराबाई | गजराबाई |
| १२७ | १४ | जाले तरी तूत | जाले तरी तूर्त |
| १२८ | ६ | बाबा वैद्य रामाजी | बाबा वैद्य व रामाजी |
| " | १३ | गोपिकाबाईचे मर्जी | गोपिकाबाईचे मर्जींत |
| १२९ | २१ | माठवावयाच्या | पाठवावयाच्या |
| १३२ | २१ | घरीं नेऊन | घरीं जेऊन |
| १३७ | ५ | दुसरी बुदल | दुसरी बुंदी |
| १४२ | १९ | नाही तऱ्ही | नाहीं बोललेहि तऱ्ही |
| १४५ | १ | मनसूरआलीहि | मनसूरआलीसीहि |
| " | २६ | हा भाव | इतका भाव |
| १५१ | १२ | तो | सुखाचा अंश तो |
| १६१ | २ | प्रस्तुत | वर्तमान विशेष नाहीं प्रस्तुत |
| १६२ | ७ | पाठऊन विसोबा | पाठऊ तो तुम्ही पुणीयास माणूस घोडे पाठऊन |
| १७३ | १५ | कलला उत्तम केले | कलला पथके पाठविली याचा अर्थ लिहिला तो कलला |
| १८७ | २५ | पत्रानें बिघडलें | पत्रानें बिघडतें |

# भारत-इतिहास-संशोधक-मंडळ, पुणें.

स्वीयग्रंथमाला क्र. ३३

# पुरंदरे दफ्तर

## भाग पहिला.

ले. १ श्रीशंकर श. १६१४ फाल्गुन शु. ३
स. १६९३ फेब्रु. २७

श्री धमप्र । द्योतिताशेष व । र्णादाशरथेरिव ।
राजारामस्यमुद्रे । यं विश्ववंद्या । विराजते ।

( ६ ओळींचा वर्तुळाकार शिक्का )

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके १९ अंगिरानाम संवत्सरे फलगुन सुध त्रितीया इंदुवासरे क्षेत्रीये कुलावतंस श्रीराजाराम छेत्रपती याणी तुको त्रिमल पुरंधरे कुलकर्णी व जोतिसी मौजे सुपे-

| | | |
|---|---|---|
| | श्रीलक्ष्मि | खुर्द पाा सुपें यासि |
| श्रीराजाराम | नृहरीप्रीते | दिल्हे वृत्तीपत्र यैसे जे |
| नरपतिहर्षनिदान | मुद्रानीराजि | तुम्ही चंदीचे मुकामीं |
| मोरेश्वरसुतनीळकं | जन्मनः ॥ राजा | स्वामी सनिध येऊन |
| ठ मुख्यप्रधान | रामप्रतिनिधेः | विदित केलें कीं स्वामी |
| ( वर्तुळाकार शिक्का ) | प्रल्हादस्य | धर्मप्रभु आहेत कितेक |
| | विराजते | वृत्तीवंताचा उधार |
| | ( अष्टकोनी शिक्का ) | केला हे कीर्ती यैकोन |

वृत्तींच्या उदेशे सेवेसी आलों आहे तरी स्वामीनें कृपाळू होऊन नूतन वृती करून देविलिया स्वामीचें अन्न भक्षून सार्वकाल स्वामीस कल्याण चिंतून सुखरूप वृत्ती अनभवून असोन म्हणून श्रुत केलें त्यावरून मनास आणितां तुमच्या पुरातन वृत्तीनें योमक्षेम चालत नाही यैसें जाणून स्वामि तुम्हावरी

कृपाळू होऊन नूतन इनाम अजरामरामत करून दिल्हा असे जमीन विसा पांडाच्या बिघीयानें चावर ॥· निम चावर रास कुलबाब कुलकानु हलिपटी व पेस्तर पटी देखील इनाम दिधला असे सदरहू नीम चावर मौजे सुपे खुर्द पा सुपेपैकीं स्थल बाम्हणीक हे भूमी आपले स्वाधीन करून घेऊन तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादिक वंशपरंपरेनें अनुभवून सुखरूप असणें यास कोण्ही अन्यथा करील त्यास आपलाले स्वधर्मोची अण असे जाणिजे निदेश[1] समक्ष ( मर्या । देयंविरा । जते । सहा कोनी शिक्का )

साा रुजू

तेरिख १

रजब सुाा सलास तिसैन अलफ बार सुद

---

ले. २ श्री श. १६१४ फाल्गुन वा १४

इ. स. १६९३ मार्च २५

नकल

स्वस्ति श्रीराज्याभिषक शके १९ अंगिरा नाम संवत्सरे फालगूण बहुल चतुर्दसी मंदवासर क्षत्रिये कुळावतंस श्री राजाराम छत्रपती याणी ( सिका ) ( सिका ) दस्तगार व लेखक पाा सुपे यास आज्ञा केली ऐसी जे तुको त्रिंबक जोतिषी व कुलकर्णी मौजे सुपे खुर्द प्राा मजकूर याणी राजश्री धनाजी जाधवराऊ बराबर चंदीच्या मुकामी हुजूर येऊन विनती केली की मौज माारी आपणास कदीम इनाम रकम ०६ साहा रुके याची जमीन चालत होती सांप्रत स्वामीच्या राज्यात सदरहू जमीन इनाम चालत नाही तरी स्वामीनी कृपाळू होऊन आपले कदीम इनाम साहा रुकेचे रकमेची जमीन आपले दुमाला करावयाची आज्ञा केली पाहिजे म्हणोन विनती केली त्याजवरून स्वामीने हे आज्ञापत्र सादर केले असता तुम्ही हे जाणोन मौज माारी तुको त्रिंबक याच्या वतनास साहा रुक्याच्या रकमेची जमीन इनाम सालाबाद चालली आहे तरी हाली सदरहू प्रमाणे याचे स्वाध्धीन करून यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने सुरक्षित चालवणे या पत्राची प्रत लेहून घेऊन पत्र वतनदार मजकुराजवळ परतोन देणे जाणिजे निदेश समक्ष मोर्तब आष्टपैली साा रुजू

सुरु सुद बार

---

१ " निदेश समक्ष " हा मजकूर निराळ्या वळणाचा.

ले. ३ श्री श. १६२१ चैत्र शु. ४

इ. स. १६९९ मार्च २५

स्वस्तिश्री राज्याभिषेक शक २५ प्रमाथी नाम संवत्सर चैत्र शुध चतुर्थी मदवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजाराम छत्रपती यांणी

| | | |
|---|---|---|
| श्री | ~ ० | देशाधिकारी प्रात राजपुरी |
| राजारा | श्रीआई | यासी आज्ञा केली ऐसी जे |
| म भजनो | आदिपुरुष प्रस | सांप्रत स्वामी कर्नाटक |
| त्कंठ मोरेश्व | न्न॥ श्रीराजाराम | प्रांतीहून परतोन या प्रांते |
| र सुत नील | स्वामि कृपानिधि | आले या प्रसगे राजश्री राम- |
| कठ | परशराम त्र्यंबक | चंद्र पंडित अमात्य यासी |
| (बदामी शिका) | प्रतिनिधी(अष्टकोनी शिका) | त्या प्रांते पाठवावे यैसा |

विचार जाहाला याकारितां राजश्री शकराजीपंत सचीव यास हुजूर यावयाची आज्ञा करून राजश्री रामचद्र पंडित आमात्य त्या प्रातीचा मस्तीयार देऊन पाठविले आहेत तरी तुम्ही याचे आज्ञेत राहोन वर्तणूक करीत जाणें तुम्ही आमात्य पडित याचे सनदेखेरीज दुसरीयाची सनदपत्र काही न चालवणे जाणिजे लेखनालंकार ( मर्या देयं विरा जते )

रुजू सुरु सुद

पौ छ १४ जिलकाद

मुा सुधागड

---

ले. ४ श्री श. १६२१ जेष्ठ वा १०

इ. स. १६९९ जून १२

नकल श्री सोपानदेव

श्रीसकलगुणमडित अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्ये राजेश्री बालाजी विस्वनाथ सुभेदार व कारकून वर्तमान भावी मुा पुणे गोसावी याप्रती श्री शेकराच्यार पंडितराव आसिरवाद राज्याभिशेक शेके २५ प्रमाथीनाम सवछरे जेष्ठ बहुल देशमी इदुवासरे राजश्री सिधानद गोसावी यानी विदित केले की काा सासवडे येथे श्रीसोपानदेवाचे समाधी स्थल आहे त्यासी राजेश्री कैलासवासी छत्रपतीपासून येणेप्रमाणे चालत आले आहे बीाा तपसील

---

१ या पुढील मजकूर निराळ्या वळणाचा.

| | | |
|---|---|---|
| मसुरी जमीन देवा भोवताली थल भाडले पैकीं कास मण साडे च्यार मण देवास आहे८४॥ | निा जकात व बाजारपैकीं रोजिना मोहीन सालाबाद चालत आले आहे बी॥ | |
| | तेल नदादिपास दररोजीना वजन ००॥· | नवैद्यास दर रोजीना कैली आधोली भार ००॥· |

याप्रमाणें चालत आहे स्वामीची सनंद आसिली पाहिजे त्यास मनास आणिता श्रीचे स्थल परम जागृत थोर यास कैलासवासी छत्रपती स्वामीचे सनद आहे तेणेप्रमाणें साल दर साल तेणेप्रमाणे प्रतीवरसी पाववीत जाणे प्रती वरसी नवीन पत्राचा आक्षेप करीत न जाणे या पत्राची तालीक लेहून मुखेपत्र गोसावी याजवल परतोन दणे छ २३ जिल्हेज सुरसन मया व आलफ हा आसिरवाद मोरतब सुध

---

**ले. ५**

श्री

श. १६२१ कार्तिक शु. १०
इ. स. १६९९ आक्टो. २३

छ मा अनाम लखमोजी दलवीं पदात पंचसहश्री यासि रामचंद्र नीलकंठ सुहूर सन(कोयरी शिका अस्पष्ट) मया व आलफ हुजरचा सर सुभा राजश्री गणेश शंकर यांसि सागितला असे तरी तुम्ही आपल्या जमावानिसी मारानिल्हेजवल हाजीर होऊन यांचे आज्ञे प्रो स्वामी कार्य करीत जाणे छ ९ जमादिलोवल पाा हुजूर (अस्पष्ट कोयरी शिका)

---

**ले. ६**

श्री

श. १६२३ ज्येष्ठ व. १४
इ. स. १७०१ जून २४

छ मा आनाम देशमूख व मोकदम काा सासवड यांस जाधवराऊ सेनापती सुाा इसने मया व अलफ पुरंधरे व आत्रे यास कुलकर्णाचा गर्गशा लागला आहे त्यास गोतमुखें निवाडा करावा येविसी राजश्री सचीव पंतास लिहिले आहे ते गोत देऊन निवाडा करवितील तर तुम्ही हिला-हरकत न करणे बरहक निवाडा होऊ देणे जाणिजे छं२८ मोहरम मोर्तब सुद (विलसतु । लेखनाव । धि मुद्रा । ३ ओळींचा वर्तुळ शिका )

श्री ० राजाराम चरणी दृढ भाव सेनापति धनाजी जाधवराव (अष्टकोनी शिका)

---

१ या पुढील मजकूर निराळ्या वळणाचा.

ले. ७ श्री श. १६२३ ज्ये. व. १४
इ. स. १७०१ जून २४

राजश्री चिंतोपंत गोसावी यासी

छ आखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य —श्रोा जाधवराऊ सेनापती दंडवत उपर पत्र पाठविले ते पावले व शामजी आनंत याणी जबानी सांगितले त्यावरून कळों आले त्याप्रमाणें कागद पत्र दिल्हे आहेत व राजश्री पंताची भेटी जालियावर जे सांगणे ते सांगोन तुम्हा विशई अंतर पडणार नाही कळले पाहिजे छ २८ मोहरम हे विनंती

( ले. ६ प्रमाणें धनाजी जाधवांचा शिका व मोर्तब )

---

ले. ८ श्री श. १६२३ जेष्ठ व. १४
स. १७०१ जून २४

राजश्री शंकराजी पंडित सचीव स्वामी गोसावी यास

छ सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य —स्नेहंकित जयेसिंग जाधवराऊ सेनापती दंडवत विनंती उपर येथील कुषल जाणून स्वकीये लेखन आज्ञा केली पाहिजे विशेष पुरंधरे व आत्रे यांस सासवड-च्या कुलकर्णाचा गर्गशा लागला आहे त्याचेविसी पूर्वीं स्वामीस सांगितले आहे यैसीयास त्याचा निवाडा जाला पाहिजे याकरितां उभयेतांसही स्वामीनें गोत देऊन गोतमुखें बरहक निवाडा होये ते केलें पाहिजे वत-नाचा मामला आहे हक हिसाबी आसेल तेच केले पाहिजे छ[1] २८ मोहरम हे विनंती

( ले. ६ प्रमाणें धनाजी जाधवाचा शिका व मोर्तब )

ले. ९ श्री श. १६२३ ज्ये. व. १४
स. १७०१ जून २४

माा राघो आबाजी रखवाली हवाले सासवड यास जाधवराऊ सेना-पती सुाा इसने मया आलफ पुरंधरे व आत्रे यास सासवडच्या कुलकर्णीचे भांडण लागले आहे त्यास तुवा पुरंधऱ्यासी उगाच कथला करून चिठी

---

१ या पुढील मजकूर निराळ्या वळणाचा.

मसाले भलताच उपद्रव देतोस तरी त्यांस उपसर्ग द्यावया गरज काय या उपरी त्याचे वाटे न जाणे मागती बोभाट येऊ न देणे छ २८ मोहरम मोर्तब सुद (विलसतु । लेखनावधि । मुद्रा । गोल शिक्का)

---

ले. १० श्री श. १६२३ श्रा. शु.६
स. १७०१ जुलै २९

श्रीबावाजी । सुत रामस्य भा । ति मुद्रा शुभा । सदा ।
(या ४ ओळींचा गोल शिक्का)

अज सर सुभा प्रात पुणे ता मोकदम सेटीये माहाजन कसबे सासवड सुा सलास मया व अलफ कसबे मजकूरचा साल गुा हिसेब पाठवणे म्हणून तुम्हास येक दोन वेला आज्ञा केली असंता अद्याप हिसेब पाठविला नाही यावरून काये म्हणावे हाली देखत रोखा कसबे मजकुरचा साल गुा हिसेब घेऊन कुलकर्णी सर सुभा पाठवणे दिरंग न लावणे या कामास उबरजी ई ही लिा चाकर सर सुभा रुा १ येक रास देविला असे आदा करणे जाणिजे छ ४ रबिलोवल मोर्तब सुद (वर्तुलाकार)

---

ले. ११ श्री श.१६२३ श्रावण वाा ८
इ. स. १७०१ आगष्ट १६

छ मा अनाम देसमुख व मोकदम काा सासवड यासि जयसिग जाधवराऊ सेनापती सुा इसने मया आलफ अबाजी त्रिंबक व कासी विस्वनाथ पुरंधरे यामधे व भगवत कासी अत्रे यांमधे काा मजकूरचें कुलकर्ण व देसकुलकर्ण याचा कथळा अहे यैसीयास कथळा तुटोन निवाडा व्हावा म्हणऊनु तुम्हास राजश्री संकराजीपंत सचीव यांही पत्र दिल्हे आहे जे गोतमुखें उभयेतांचा निवाडा करणे यैसीयांस तुम्ही हकजवारीचे गोत मेलऊनू या उभयेतांस गोतांत आणून धर्मन्याय रास्ती कोण्हाची मुरवत न करितां हक हिसाबी उभयेताचा निवाडा करून कथला वारणे ये गोस्टीस विलब न लावणें छ २२ रबिलोवल मोर्तब सुद (३ ओळींचा वाटोळा शिक्का ले. ६ प्रो)

(श्री० लेखांक ६ प्रमाणें धनाजी जाधवाचा अष्टकोनी शिक्का)[1]

---

1 हा मजकूर निराळ्या वळणाचा आहे.

ले. १२ श. १६२३ श्रा. वा ८

इ. स. १७०१ आगष्ट १६

राजश्री बालाजी विस्वनाथ सर सुभेदार

कारकून प्रां पुणें गोसावी यांसि

छ अखंडित ळक्ष्मी आलंकृत राजमान्ये—श्रो जयसिंग जाधवराऊ सेनापती दंडवत सुा इसने मया आलफ कां सासवड येथीळ कुलकर्णी व देसकुळकर्णी याचा कथळा आहे अबाजी त्रिंबक व कासी विस्वनाथ पुरंधरे यामधे व भगवत कासी अत्रे यांमधे गरगशा आहे यैसीयांस राजश्री सकराजीपंत संचीव यांही तुम्हास कागद दिल्हा आहे कीं गोतमुखे उभयेतानी आपळा निवाडा करून घ्यावा तरी उभयेता गोतात जाऊनू निवाडा करून घेतील तुम्हींहि धर्मता कोण्हाची रयात न करितां उभयेताचा निवाडा बरहक करणे छं २२ रबिलोवल हे* विनती

( ले. ६ प्रमाणें शिका व मोर्तब ).

---

ले. १३ श्री श. १६२३ कार्ति. व १

इ. स. १७०१ नव. ५

राजश्री रामचंद्र पंडित आमात्यं स्वांमी गोसावी यासिं

छ श्रीमत सकल गुणालकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत—राजमान्य श्रेंहाकित जाधवराऊ सेनापती कृतानेक दंडवत विनंती उपरी येथील कुषल जाणून स्वकीये लिहीणे विशेष आबाजी त्र्यंबक व कासी विस्वनाथ पुरंधरे यामध्यें व भगवत कासी आत्रें या हरदोजणाचा कथला कसबे सासवडच्या कुलकर्णी व देसकुलकर्णी याचा कथला आहे येविषीं पूर्वी तुम्ही आमानत तो केलेच आहें यास सांप्रत हर दोजणाचा निवाडा गोतमुखे धर्मता होये तो विचार सत्वर केला पाहिजे येविषी आनमान केला न पाहिजे बहुत काये लिहिणे छं १५ जमादिलाखर *हे विनती (विलसतु । लेखना व । धिमुद्रा । वर्तुळाकारी )

---

१ या पुढील मजकूर निराळ्या वळणाचा. * अक्षर वेगळें.

ले. १४ श्री श. १६२४ श्रावण शु. ३
इ. १७०२ जुलै १६

° श्री उमाकांत । पदांभोजभजनाप्त । सुमुन्नतेः॥ बाळाजी । वीश्वनाथस्य मुद्रा । विजयते तरां । (या ५ ओळींचा गोल शिक्का)

अज स्वारी राजश्री बालाजी विस्वनाथ दि॥ राजश्री शेनापती ता॥ मोकदम व कुलकर्णी कसबे सासवड सु॥ सलास मया आलफ सोनोरी आबवडी व दिये गाव येथील रान तुमचे गावीची गुरे जाऊन चरतात यसीयास तेथील चारणीची खडणी जाली पाहिजे तर तुम्ही बहूत लौकर येणे दिरग न लावणे या कामास कानोजी भोई अ फ स ह त दि॥ लबे स्वारी राजश्री पंत आमात्य पाठविला आसे यास मसाला रुपये ४ च्यार रुपये रास देविले आसे आदा करणे छ १ राबिलवल ( मोर्तब सुद + )

( वाटोळा शिक्का. )

---

ले. १५ श्री श. १६२४ श्रा. शु. १५
इ. स. १७०२ जुलै २७

( ले. १४ प्रों बाळाजी विश्वनाथांचा गोल शिक्का. )

कौलनामे अज स्वारी राजश्री बालाजी विश्वनाथ दि॥ राजश्री सेनापती ताहा मोकद्दम व सेटीये माहाजन का॥ सासवड प्रांत पुणे सु॥ सलास मया आलफ कसबे मजकूरची गुरे मौजे सोंनोरी व मौजे आबोडी ता॥ करेपटार या दो गांवी चारिता याची वणचराईचे खडणीबदल तुम्हास आणून आज्ञा केली त्यास तुम्ही आर्ज केला की जिवन माफीक विल्हे केली पाहिजे यावरून जीवन माफिक हरदु गावींचे रान चारिता त्याची साल मा॥ वणीची खडणी रुपये १७५ पा ( व ) णे दोनिशे केले आसेत याचा वसूल दे ( ऊ ) नु हरदू गावी गुरे चारणे छ १२ रबिलोवल मोर्तब सुद

( वाटोळा शिक्का. )

---

ले. १६ श्री श. १६२४ श्रा. व. ५
( ले. १० प्रो गोल शिक्का. ) इ. स. १७०२ आग. १

अज सर सुभा प्रांत पुणें ताहा मोकादम व सेटीयें माहाजन कसबें साससड सु॥ सलास मया व अलफ जमा बा॥

यैवज तिजाई कसबे माार गुजारत संभाजी फाटक चाकर सर (सुभा) + + + + + रुपये३२५ येकून तीनसे पंचवीस रुपये रास जमा असेत हुजत सुद खर्च लिहिणें जाणिजे छ १७ रबिलोवल मोर्तब सुद ( गोल शिक्का. )

बार

---

ले. १७ श्री श. १६२४ श्राव. व. १०

( फा. शि. ) इ. स. १७०२ आगष्ट ७

ताा देशमूख व मोकदम काा सासवड सुाा सन हजार ११११२ मालूम दानद की खरिदीपैकीं आटा ८।।।५ पंचतीस सेर पोहचणे व नवार नग १५ व खादी २ व लाखूट १ यैसे पोहचले आसे जाणिजे तुम्ही आपली खातीरजमा राखोन आसणे लस्करचे कोन्ही येतील त्यास खिदाडून वाटे लावणे छ २३ रबिलोवल आटा सिताब पोहचावणे व खरिदीपैकी बाकी कोणे + वी काये राहिली हे लेहोन पाठवणे व चणे काही इकडे पोहचाव जाणिजे

---

ले. १८ श्री श. १६२४ भाद्र. शुाा ५

इ. स. १७०२ आगष्ट १७

( ले. १४ प्रो बाळाजीचा शिक्का. )

अज स्वारी राजश्री बालाजी विश्वनाथ दिाा राजश्री सेनापती ताा मोक( दम ) व सेटे माहाजन कसबे सासवड सु ( हूर स ) न सलास मया आळफ कसबे मजकूर + + गुरे भवताले गाव खराब आहेत + + + आंबोडी व दिये त्या गावीचे रान चारिता तेथील वणीची खडणी करणे म्हणून पेशजी सागितले परंतु निर्वाह केला नाही यैसीयास निर्वाह करावयास येणे त्यापैकी तूर्त रसद रुपये २०० आणविले आसेत बहूत लौकर पाठवणे पाा जाब घेण तेणेप्राा मुजरा होईल छ २ रबिलोवल या कामास लोका पाा आसेत यास मसाला रुपये १० दाहा देविले असेत आदा करणे मोर्तब सुद + ( वर्तुळाकार )

---

ले. १९  श्री  श. १६२४ भाद्र. शु. ११
इ. स. १७०२ आगष्ट २२

( ले. १४ प्रों बाळाजीचा वाटोळा शिक्का )

अजस्त्रारी राजश्री बालाजी विस्वनाथ दिा राजश्री सेनापती ताा मोकदम कसबे सासवड सुबा पुणें सुा सलास मया आलफ कसबे माा वणी च्यारर्णांचे पावणे दोनिशें रुपये करार केले त्यास तुम्ही तुकोजीकडे येकशे चालीस रुपये वसूल दिल्हा बाकी ३५ पचतीस राहिले ते देखत रोखा पाठवणे या कामास लोक पा आसेत यास मसाला रुपये

माहादर्जी गायकवाड चाकर स्त्रारी मजकूर रुपये २

पूजनाक हूल स्वारी दिा हुजूर पा य ता राजश्री सेनापती रुपये २

येणेप्रमाणें च्यार रुपये मसाला देविला आसे सदरहू देणे आदा करणे बाकी येकतीस रुपये रसद पाठवणे छ९ राबिलाखर मोर्तब । सुद । (वाटोळा)

---

ले. २०  श्री  श. १६२४ भाद्र. वाा ४ (?)
इ. स. १७०२ आगष्ट ३०

राजश्री कासीपंत व आबाजीपंत कुलकर्णी
कसबा सासवड गोसावी यांसि

श्नेहाकित जाधवराऊ सेनापती दडवत उपरी तुम्हाकडे काही नाजूक काम आहे याकरितां तुम्हास बोलाविले आहे तरी कागद देखतांच भेटीस येणे उजूर न करणें छ १७ रबिलखर विलसंती । लेखनाव । धिमुद्रा ।

( गोल शिक्का. )

---

ले. २१

श. १६२४ भाद्र. वाा ४
इ. स. १७०२ आगष्ट ३०

* राजश्री कासीबा व आबाजीपत यासी

सेवक बालाजी विश्वनाथ नमस्कार विनंती उपर तुमचे काही प्रयोजन आहे तर पावताच येऊन भेट घेऊन सवेच जाणे राजश्री सेना-

---

* सर्व पत्र बालाजी विश्वनाथ यांच्या हातचें. पत्राचे प्रारंभीं * अशी खूण असल्यास सबंध पत्र, पत्र पाठविणाऱ्याच्या हातचें समजावें.

पतीचा कागद पाठविला आसे जरूर काम आसे तर आधी येणे साराऊश कृस्ष्ण म्रुतीकेचे राजश्री सेनापतीस फार जरूर लागले आहे यास ये प्रसगी भगीरथ प्रेत्न करून पके ८२॥ आडीच मण कृस्ष्ण म्रुतीका मेळऊन देणे याचे

देऊन तुम्ही येकजण स्थलास जाऊन हर इलाजे घेऊन येणे येकजण पुढे येणे यामुले बहूत कार्य आनकूल आहे जिवावरच खेल करणे आजचे उद्यावर कार्यास न ये राा भिवाजीपंत ईश्वरें नेले याउपर मऱ्हाठा आज कूल (आनकूल?) रक्षिता तरच तुमचे राहाणे या मुलकात होऊन सर्वहि आनकूल होते भगीरथ प्रेत्न करून आडीच मण पके वजन आज उद्याचे दिवसात येई यैसे करणे बहुत काय लिहिणे हे विनती

---

ले. २२ श्रीशंकर

विनंति उपर येथील वर्तमान ताा छ १० जिल्हेज सुक्रवार परंतु(पर्यंत) सुखी असे यानंतर संताजी मावल्या याच्या लोकाबाा पत्र पाठविले ते पावळे आसेल त्याचे उतर लौकर पाठवणे खर्चास नाही तर लौकर पाठवणे व अत्रे काही वतनाचा प्रसंग जर न करीत तर आम्ही + रून निर्वाह करून घ्यावा की न घ्यावा हे उत्तर तााावार लिहिणे जर तुम्हास करणे नसेल तर तैसेच लिहिणे व गोमाजीपत वगैरे माघा प्रसंग तरबेतखाना जवल केला आसे निलोबास भिवाजीस + + + दिधल्या निमित्य की कोढाणीयाचे बाबे शकराजीपताकडे बकारपूर्वकाने पाठवून तरबेतखानाचे मारफतीने देणे यैसे पत्रे आणिली होती म्हणन दिधल्या तेसमई याणी प्रसंग केला त्याणी वतनाचे व गोमाजी वगैरे याचे कबूल केले की सजा पोहचाऊन परतु ते कोढाणयावर गेले आहेत खाले नाहीत निमित्य की शनवारी हजरत गडास पाहावयास जाणार ते समागमीच उतरतील लस्करात आलियाउपर प्रसंग होईल यैसे आहे तर गोमाजीपंताबाा लिहिले आहे त्याप्रमाणे सरजाम करणे आगाऊ भेटी घेऊन दाध करून यात जे चितास येईल ते कीजे जाले वर्तमान लिहितो आम्हाबाा खर्चास येक रुका दिल्हा नाही येथे आमचे काये चालते दाली वगैरे पाठविली खासगत कामास हैगै करिता आम्हास काय धणी आहां आम्ही ल्याहावे जे आज्ञा कराल ते करा दरकार यास दिल्हे तेहि मालूम तरबेतखानास केले आसे उतर व खर्चास लौकर पाठवणे वत-

गायकवाड यास राजपत्र पाठवणे की राजश्री—पंत प्रधान यास सामेल होणे म्हणून लिहिले यैसीयांस प्रस्तुत राजश्री——स्वामीस विनती करावी तरी भागानगर प्रांते जावयाची आज्ञा केली आणि या पत्रावरून खानदेशास जाणार यैसा आर्थ दिसोन येणार याकरितां विनती केली नाही स्वामीचे जाणे खानदेश प्रांते जालीयावरी राजश्री—स्वामीस विनंती करून राजपत्र घेणे ( पुढील एक ओळ फाटली ) राजश्री स्वामींनी आज्ञा केली आहे की स्वार (पा)चसे आद्याप तुम्हाकडील आले नाहीत तरी स्वार आणवणे म्हणून आज्ञा केली आहे तरी स्वार पाठविले पाहिजेत दरमाहेचा यैवज स्वामीनी नेमून दिल्हा परतु रुपया हातास येता दिसत नाही येथलि प्रसंग मागतेकराचा ल्याहावसा नाही राजश्री जोत्याजी केशरकर याणी च्यार हजार रुपये रोख देणे आगर आमच्या सनदा देणे म्हणून नित्य कटकट माडिली आहे यैवज द्यावयास नाही आणि कर्जहि मिलत नाहीं यैसा प्रसंग जाला आहे याकरितां स्वामींनी दर माहेचा यैवज नेमून दिल्हा त्यास ताकीद करून यैवज पावता केला पाहिजे राजश्री आंताजी मल्हार याची भेटी होईल त्यास सागोन रवानगी यैवजाची केली पाहिजे राजश्री कानोजी आंगरे सरखेल यांजकडील हा कालवरी रुपया येक आला नाहीं पुढेहि येता दिसत नाही त्याजकडे परभारी पत्रे व जोडा येक पाठविला पाहिजे सभाजी भोसले याजकडील लग्नपटीचा निकाल स्वामीनी करून घेतला आसिला तर (त्याचा) कागद आम्हाकडे पाठऊ (न) दिल्हा पाहिजे लाला भागीरथ याच्या यैवजाची आम्ही निशा केली आहे येविसी विनंती पत्र पूर्वी लेहून पाठविले आहे तरी त्याचा यैवज आम्हाकडे पाठविला पाहिजे वरकड स्वामीनी आपणाकडील कुषल वृत वरच्यावर लिहीत गेले पाहिजे जुनर प्रांतीचे तकलुबी महजर व सिके जामदारखान ( पुढील एक ओळ फाटली ) ले होते तरी आगत्य पाठऊन दिल्हे पाहिजे *बहुत काये लिहिणे कृपा केली पाहिजे हे विनंती

---

१ पत्र चिमाजी आपाचें बाजिरावास. यावरून बाजिरावाचें टोपण नाव 'बाबा' असल्याचें स्पष्ट ठरतें. *'बहूत' यापासूनचा मजकर चिमाजी आपाच्या हातचा असल्यानें पत्र कोणी कोणास लिहिलें हें ठरवितां आलें. बाजिराव रघुनाथाचें टोपण नांव 'बाबा साहेब' होतें हें निश्चित आहे. तेव्हां हाही पुरावा 'बाबा' नांवाची निश्चितिच सुचवितो.

ले. ७९ श्री श. १६४८ कार्तिक

इ. स. १७२६ नोहें.

पुरवणी तीर्थरूप राजश्री तात्या स्वामीचे सेवेसी

विनती उपरी स्वामीनी पत्र पाठविले तेथे आज्ञा केली की दरबारीचे वर्तमान लेहून पाठवणे त्यास स्वामी गेलीयावर येथून पाच सा पत्रे पाठविली ती स्वामीस पावली आसतील त्यावरून सविस्तर वर्तमान विदित होईल सांप्रत विशेष वर्तमान ल्याहवसे नाही राजश्री पंत प्रधान यांजकडील वर्तमान काहीच कलत नाही तरी स्वामीनी त्यांजकडे मुजरद जोडे पाठऊन वर्तमान लेहून पाठविले पाहिजे राजश्री नारबावा मंत्री तलेगांवास पावलीयाचे पत्र राजश्री जिवबा चिटनीवीस याचे गुरुवारी सध्याकाळी आले परंतु राजश्री बावाचे पत्र शनवारी त्रितीये प्रहर पावेतो आले नाहीं आलीयावर लेहून पाठऊन विशालगडाकडील मजकूर पहिले आहे त्याप्रमाणेच आहे त्याहून काही आदीक नाही परतु राजश्री आंताजी सिवदेव जमावानसी जेथे राहिला आहे तेथे दिवसदिवस पाणी उणे होते आणि जे लोक चाकरीस आहेत त्यास जागा मानत नाही म्हणून लोक बोलताती परंतु त्याजकडील बोलीं दरबारी आहे की राजकरण लागले आहे कार्य होईल म्हणून बोलताती निजामनमुलूक फर्दापूरचा घाटानजीक गेला आहे मळगावांस जाणार म्हणून बोली आहे म्हणून सुमंतानी लिहिले होते राजश्री सिदोजी निबालकर याची पत्रे आली होती की आम्ही राजश्री स्वामीच्या दर्शनास येतो म्हणून पत्रे आली होती विदित जाले पाहिजे सेवसी श्रुत होये विज्ञापना

---

ले. ८०

श. १६४९ माघ वा॥ ११

इ. स. १७२८ नाने. २५

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५४ प्लवंग संवत्सर मा + बहूल येकादसी गुरुवासरे क्षत्रीय कुलावतंस श्रीराजा शाहू छत्रपति स्वामी याणी राजमान्य राजश्री निलकंठ बलाल यांसि आज्ञा केली ऐसी जे निजामन मुलूख खिरडी पा॥ नेवासे येथें आला आहे हें सविस्तर वर्तमान चिरजीव राजश्री फतेसिंग भोसले यांस लिहीलें आहे त्यावरून कलेल जो विचार

---

१ अंबाजीपंत पुरंदरे.

कर्तव्य तो बहूत् सावधतेन करीत जाणें चंद्रसेन घोरपडे (?) त्या प्रांते आले आहेत त्याची व निजाम मुलूनमुलूक याची बातमी चौकस राखोन आपला आब राहे फौजेचा गाहा होये त्या राजी राहाणे विचारास अं(तर) न करणे *बहूत काय लिहीन.

---

**ले. ८१**

( प्रारंभाच्या कांहीं ओळी गेल्या आहेत )

+क्षेम ताा छ २६ सफर पावेतो मुकाम मोघड मेपत प्रांत भागानगर येथोस्थित असें विशेष साहेबाकडून राजश्री राऊ सरलस्कर याचे निशाण घेऊन राजश्री मबाजी मोहिते व राजश्री संताजी मोहिते व राजश्री विठोजी सिकरे ( सिरके १ ) या प्राते आले त्याच्या आमच्या भेटी जाहल्या आम्ही आपले फौजेनसी येऊन त्यासी सामील जाहलो हे तपसिले वर्तमान राजश्री राऊ सरलस्कर यासी लिहिले आहे तरी .........कृपालू होऊन सेवकाचा सरजाम राजश्री राऊ सेवेसी विनती करितील त्याप्रमाणें सरजामाच्या सनदा पाठविल्या म्हणजे राजश्री रार्यांच्या निशाणाजवल येकनिष्ठेने सेवा करून सेवकाचे उर्जीत करणार साहेब धणी आहेत सेवेसी श्रूत होये ( शिक्का अस्पष्ट लंब चौकोन )

---

**ले. ८२** श्री श. १६५३ चैत्र

इ. स. १७३१ एप्रील

राजमान्य राजश्री अमृतराव त्र्यंबक यांसि आज्ञा केली यैसी जे प्रधानपत व दाभाडे यांचे युध्यप्रसंगी दाभाडियांकडील घोंडी पाडाव जालीं त्यापैकी तुम्हीं घोडी दोन खरीद करीत आहा तरी घोडी सुखरूप खरीदी करणें काही चिंता न करणे* घेन बहूत काय लिहीन

---

**ले. ८३** श्री

सिहीगडी आमृतया देव आहे तेथे राजाराम संक्राजी नारायण होते तेव्हा भिवाजी कासी आत्रे व बापू भास्कर आत्रे भाऊपण्यांत भाडत

१ जाधव. * या पुढील मजकूर शाहू महाराजांच्या हातचा. + सर्व मजकूर त्र्यंबक सदाशिव ऊर्फ नाना पुरंधरे ( धाकटे ) यांच्या हातचा आहे.

गेले तेव्हा सासवडकर गाव सारे साक्षीस नेले तेव्हा आमृतयाच्या देवलात दोघास घातले कोण तुमचा खरा; तो हती धरून काढा तेव्हा गावकरी याणी त्या दोघासही टाकले आणि हरबा पुरंधरे यास हाती धरून देवलातुन काढले हा आमचा खरा म्हणाले दुसरे [१]नारायणाचे देवली सुपे सिरवल पुर्णे हे गोत मिलाले आणि मनसुबी केली तेव्हा नारायणाचे देवलातून गावकरी यानी गोमाजी विश्वनाथ चितो महादेव पुरधरे यासी देवलातून काढले खरे जहाले

---

ले. ८४ श्री

तिर्थरूप राजश्री तात्या स्वामी वडिलाचे सेवेसी

अपत्ये चितो तानदेव व राघो नारायेण व माहादाजी कोंडदेव साां नमस्कार विनंती येथील क्षेम ताा भाद्रपद सुध चतुर्दसी परियेत सुखरूप आसो यानंतर आपण आज्ञा केली होती राहुजी पाटील याचे पत्री लिहिले होते की चितोबास व राघोबा आपले पत्र देऊन सिहगडास पाठवणे त्यास त्यानी तो आपले पत्र दिल्हे नाही मग आम्हीच गडास गलो आवधियांच्या भेटी जाल्या साकल्य वर्तमान राा आपदेवभट यास सागितले त्यास त्यानी आर्धी तो झाडून पाडून गोष्टी सागितल्या त्यास त्यांच्या मते आम्ही वरकरणीचे बोलावयास आलो आसे झाडलियाने झडोन जातील म्हणौन बोलिले त्यावर आम्ही बारे धरून एकाती बैसऊन चार गोष्टी सांगितल्या मग तेही आमचे मायेत आले आणि तुम्हास त्यानी आपले स्वदस्तुरे बालबद पत्र लिहिले आहे तेच बजिनस पाठविले आहे त्यावरून कलो येईल याउपर गडास गेलियावर गोष्टी आढलोन आल्या परस्परे ग्रहस्तानी सागितल्या

विठोबा गोपाल भिकाजीचा बापू भास्कर श्रावणमासाॅ राा लेक राा सचीवपंताकडे गेला होता सेनापतीकडे व उमाबाईकडे गेले

---

१ हें शंकराचें स्थान पुरंदरच्या पायथ्याशीं मौजें पूर या गावीं आहे. हें देवालय पुणें प्रांतांत ठिकठिकाणीं आढळणाऱ्या यादवकालीन पूर्वींच्या देवालयांत सर्वांत मोठें असून तें भुलेश्वरचे समकालीन आहे. ह्या स्थानाचा पेशवाईतील पत्रव्यवहारांत वारंवार उल्लेख येतो. पुरंदरच्या वेढ्याच्या वेळीं याच ठिकाणीं जयसिंगाच्या सैन्याचा तळ होता.

पस्ट जाब दिल्हा की पूर्वी तुमच्या भोंडणास कृष्णाजी भास्कर याची भीड आमच्या पंतास होती याकरिता सर्व प्रकारे तुमचा प्रतिपक्ष केला याउपर आमचा भरवसा न धरणे आपल्या बले जे करणे आसेल ते करणे म्हणौन पस्ट सागितले आसे

रा आपांनी सांगितले आहे की तिमाजी पा याजकडील आपले मायेत आसो देणे निराळे न टाकणे तर त्यासही तुम्ही पत्र पाठविणे होते त्यास त्याणी महाराजास व सौभाग्यवतीबाईस पत्रे पा आहेत व प्रतिनिधीसही पत्रे पा आहेत तेंही सूचनेत तुम्ही आसणे गणपतरायानी रा सचीवपंतास व रा आपांस पत्र लिहिले की रा प्रधान पंताचे व आबाजीपंतांचे चित सुधी नाही तुम्ही जे करणे ते विचारून करणे

---

ले. ८५ श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री आंबाजीपंत स्वामी गोसावी यांसि

पोष्य आपदेवभट कृतानेक नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन केलें पाहिजे विशेष आपण मातुश्री बाईकडे येऊन आम्हां विशई कितेक वर्तमान विदित केलें की राजश्री आपदेवभ(ट) अत्रीयाची पाठी राखतात कसबे सासवडी सेत दिल्हे आहे व त्यास सिहगड स्थल देऊन त्याचा कैपक्ष करितात तरी त्यास सागोन अत्रीयाचा कैपक्ष न करीत ते गोष्टी केली पाहिजे म्हणून वारंवार येऊन वर्तमान विदित करीत आहेत त्यावरून मातुश्री आम्हास निशेध करून पत्रे लिहितात ऐसीयास अत्रे आमचे काय आहेत त्याचा कैपक्ष आम्ही केलियाने परिणाम काय होणार आहे आम्हीं अत्रियास सेत दिल्हे नाही अगर त्यास स्थळही दिल्हे नाही त्यावीण आम्हांस काय प्रयोजन पडिले आहे ऐसें असोन स्वामिनी वारंवार आम्हास निशयेत करवावा ऐसे नाही आम्हांस आपण वडील आहेत यापेक्षा अत्रे आम्हांस आधिकोतर आहेत ऐसे नाही अम्हीं पूर्वी सिरवलचे मुकामी स्वामीस येविशई सागणे ते सागितलेच होते परंतु आपल्यास कोण काय लिहिते यावरून आपल्या चितांत

उगाच विपर्यास वाढतो आम्हीं सागितले तो आर्थ चितांत राहिला नाही लोकांचे सागितल्यावरून चितांत विकल्प अणावा ऐसे नाही *तुम्ही आमचा उगाच लोकीक करावे हे आपणा योग्य नाही ये्विषी मातुश्री सखुबाईची व आमची भेटी जाली ते वेळेसही कित्तेक सागणे ते सागितले आसता मागती वि(प)र्यास येतो हे काही स्वामिस विहीत नाही बहुत काय लिहणे लोभ असो दीजे हे विनती

---

ले. ८६

श्री

श्रियासह चिरजीव राजमान्य राजश्री माहादोबास प्रती अंबाजी त्रिबक आसिर्वाद उपरी आम्ही ता। छ १७ जिलकाद परियेत कुशल आसो विशेष चिरजीव धोंडोबानें पत्र राजश्री गोद जोशी यासमागमे पाठविले ते छ मा।री प्रविष्ट जाले त्यामध्यें आत्रे याजकडील मजकूर लिहिला होता कीं भास्कर कृष्ण गावामध्यें आला आहे त्रिबक कासी मागून येणार भास्कर कृष्ण बोलतो कीं निमे देशपांडेपण करावयास आम्हांस राजश्री आबाजीपंत यानी सागितले आहे तरी ये गोष्टीची बोली पडली तर उतर काय द्यावें म्हणून लिहिले तरी गांवकरी आगर आत्रे बोलतील तर तुम्ही त्यास उतर देणें की राजश्री-स्वामींचे राजपत्र व राजश्री पंतप्रधान यांचे पत्र व राजश्री पंत सचीव यांचे पत्र व तीर्थरूप राजश्री तात्यांचे पत्र घेऊन येणे मग उतर सांगावयाचे ते सागोन म्हणून त्यांस उतर पुसतील तेव्हा सागणे अगोदर चर्चा न करणे ते गावांत येऊन राजकारण काये करिताती त्याचा शोध बरा घेणे चिरजीव त्रिवर्ग गांवांत आहेत त्यांजकडील वर्तमान लिहिणे आत्रियाचा शोध बरा चौकस करणे वरच्यावर वर्तमान लेहून पाठविणे फारसा + + + करणे हा अशिरवाद

---

ले. ८७

श्री

तिर्थरूप राजश्री तात्या व राजश्री बाबा वडिलांचे सेवेसी

अपत्ये खंडोबाने चरणावरी मस्तक ठेऊन सास्टांग नमस्कार विनंति येथील क्षेम ता। भाद्रपद सुध नवमी परीयेंत येथास्थित असे विशेष अत्रे व पुरंधरे तुम्हाकडे अले बारा बलुते व देशमूख आले राजश्री

* येथून पुढें अक्षर निराळें असोन मजकूर बालबोधींत आहे.

अपाजी हरी ताकीद करून पाठविले पाहिजे गोपाळ भिवाजी यांची बाई-को भानुमती अली अहे की साौ बाईसाहेबाकडे जाऊन पायांवरी डोई ठेऊन राजकारण करून अपले राखावें व भास्कर कृष्ण याणी जाऊन राजश्री फतेसिंग बावाकडे जाऊन त्याचा पायांवरी डोई ठेवावी त्याकडून साहित्य करावे पूर्वीं राजश्री कृष्णाजी भास्कर याणी वतन राखले अतां बापूनें व राधाईनें गोपाळपंताचे बायेकोने राखावे भानुमतीमधे बहूत बुंधी आहेत राजकारणी फार भानुमती जावयाकरिता ठेवले की तिणे बहूत खेल केले आतांही देखील चोपदार व इत्यादिक ग्रहस्तास सागोन दाहा पाच रुपये चोपदारास देऊन भानुमतीस जाऊ न देणे दादो सिवदेव पुरंधरे याची बहीण कचेश्वर भटाचे घरी आहे तीस जपणी भानुमतीस लावणे अंतपुरात प्रवेश भानुमतीचा न होये ऐसे करणे हा विचार त्यास दौघा चौघानी आमचे साहित्य करणार त्यानी सागितला आहे हा कागद वाचून फाडून टाकणे बहूत काये लिहिणे हे विनंति

---

ले. ८८ श्री

तीर्थस्वरूप राजश्री तात्या व राजश्री बाबा वडिलांचे सेवेसी

अपत्ये खंडबाने चरणावरी मस्तक ठेऊन सां नमस्कार विनति येथील कुशल जाणऊन ताा श्रावण सुध दशमी रविवासर परियेंत कुशल असों यानंतर शनिवारी प्रातःकाली राघो नारायण व माहादेव अले तेथील वर्तमान सांगितले ते कलो अले परंतु ते येथे अलियाउपरी वादी यास ऐसे जाल की पूर्वी दोही ज्याची दिल्ही तेच खावंद येथें अले त्याणी काय केले व हे सातारीयास जाऊन काये करून अले राजश्री चिंतो गिरमाजी हे एक दोन गोष्टी अमचे निसबतीने बोलिले होते म्हणऊन यांसि गोपाल भिवाजी म्हणतो की तुम्ही पुरंधरियाकडे होऊन आंम्हासी भांडता तर हे गोस्टीचा वेल पडेल तेव्हा समजोन घेऊ मग हे बालिले की तुमचा वेल पडेल तेव्हा आम्ही काही वतंदार नहो ते तुमच्या हाती सापडते ऐसे बोलिले बरे किरकोल गोस्टी असोत मुख्य गोष्ट की याणी दोही दिल्ही होती हे जबरीचे पाटील व देखे वलखे सोयेरे धायेरे पुण्याचे देशमूख देशपाडिये यासि शृत जाले आणि पुढे हे गोस्टी सेवटास गेली नाहीं हा आपमान आमचा दाखला अवघा जबरीचा जाला येणेकरून आम्हास

बहूत कष्ट वाटतात ते लिहितां पुरवत नाही ये गोस्टीची सूचना अनंत आला तेव्हां व आणखी हि कितेब माणसे अली त्याजबराबर सागोन पाठविली असती तरी आम्ही उभे राहिले असतो तुम्ही वडील तुमची अज्ञा नस्ता अम्ही उभे राहावें काम नासले तरी म्हणाल कीं पोरानी काम नासले अम्हास कळो दिल्हे नाही बर याउपर जे जाले ते बरच जाले ते गोष्टीस उपाये वडिलांचेच हाती आहे आतां गोस्टी विलंबावरी टाकून करावी तरी राजीक वारले मग आम्ही चौकडे चौघे पोट भरावयास जाऊ राजीक दाट जाले तर याचे प्रव्हाई पडो आपलेच जीव जतन केले पाहिजे तयाकरितां हे अस्यातच होता बरे आहे वेलही अताच बरा आहे पुढें ऐसाच असेल हा भरवसा न धरावा याकरितां सेवेसी लिहिले आहे जवळ आसतो तर जे बुधी सुचती ते बोलतो दुरून काये काये म्हणऊन ल्याहावे साराऊष गोस्ट तीर्थरूप बाबाही म्हातारे जाले तुम्हीही उभयेता म्हातारे जालेस यामधे हे गोस्टीचे येश घेतले पाहिजे ज्या देखतां इतका अपमान जाला त्या देखताच लिहिणे त्याचे मना जाले म्हणजे ते तोंडघसी पडोन अपणास येश आले पुढेही होईल परंतु इतके डौल दाखल्यास मिळणार नाही त्याजकडी येक दोन ग्रहस्त आहेत त्याच्या साहित्यास आहेत त्याच्याही डोलियाचे पारणे फिटतील तुमच्यामते ती आहेत कार्य परतु त्यानी समय साधून नेला वादी म्हणतात की हे कारकीर्द मारून नेली ऐसा प्रसंग जाला आहे पिपले कराची ककारपूर्वकाकडे पावणेचार थोरले ( १ ) जाले तुम्हास कळावे म्हणऊन लिहिले आहे जितके केले तितके उरले दोन महिनियावर न घालणे सत्वर याचे पारपत्य केले पाहिजे तुम्ही म्हणाल की राजश्री सचीव पंत येथें नाहींत तर तुमची आज्ञा होईल तर आम्ही तिकडे जाऊ तेही आमची गोष्टी तुमचे भिडेने आईकतील ऐसा त्यांचा रोख दिसोन आला राजश्री आबदेव भट येथे त्याची आमची भेटी जाली होती त्याची बोलीमधे आम्हास कळोन आलें की ते आमचे मायेत आहेत वारवार काये ल्याहावे गावचे वर्तमान सविस्तर दाहो(दो)सिवदेव जबानी सागता कळो येईल बहूत काये लिहिणे हे विनंति पत्राचे उतर पाठविले पाहिजे तेणेकरून समाधान होईल

---

ले. ८९ श्री श. १६४९ आश्विन शु. १०
इ. स. १७२७ सप्. १४

येजी(त) पत्र बतेरीख ९ माहे सफर सुहूर समान अशरीन मया अलफ बी हुजर हाजीर मज्यालस

(फारशी शिक्का. फारशी मजकूर) (फारशी शिक्का. फारशी मजकूर)

राजमुद्रा ( खाशाचें अक्षर = खा. अ. )

राजश्री मुद्ग
ल भट्ट बिन्न
मल्हार भट्ट
राज पुरोहि
त पंडित राय
( बालबोध खा. अ. )

राजश्री श्रीनीवास
परशुराम पडीत
प्रतिनिधी
( खा. अ. )

राजश्री बाजीराऊ
बलाल पडीत प्रधा
न
( खा. अ. )

+ ० ˘ +
श्री मुद्गल दया वा
स शाहुराज प्रसादजा
मुद्रा पडित रायस्य मु
द्गळस्य विराजते
( गोल शिक्का. )

० श्री ˘
श्री आई आदि पुरु
ष श्रीशाहु छत्रप
ति स्वामि कृपानिधि त
स्य श्रीनिवास परशु
राम प्रतिनिधि
( अष्टकोनी शिक्का. )

० श्री ˘
राजा शाहू नरप
ति हर्षनिधान बा
जीराव बलाळ
मुख्य प्रधा
न
( गोल शिक्का.
व शेवटचा न उलटा आहे.)

राजेश्री बालकृष्ण वा
सुदेव अमात्य ( खा. अ. )
मन्नविषूदन
सक्ते शाहूराज्ञःस
देक निष्ठस्य ॥ श्री वा
सुदेव सूनो (?)
( गोल शिक्का. )

राजश्री नारो शकर पं
डीत सचीव ( खा. अ. )
श्री
शंकराजी
नारायण
( बदामी शिक्का. )

राजश्री नारोराम
मंत्री ( खा. अ. )

श्री + + +
वतल भ्यना
रा रामस्य ना
म विराजतं
( गोल शिक्का. )

राजश्री आनंदराऊ रघु
नाथ पंडीत सुमंत

श्री राजा
शाहूछत्रप
ति स्वामि चरणि
तत्पर रघुनाथ
+ + + + + + + +
+ + + + +
रतर
( अष्टकोनी शिक्का. )

राजश्री कासीराऊ
अनंत न्यायाधीश

० श्री ⌣
अनाजी
+ + नाक
( गोल शिक्का. )

पंताजी सीवदेव
सा। सरकार

⌣ श्री ०
भार्गव चर-
णी तत्पर पंता
जी शिवदेव
नीरतर
( लांब गोल शिक्का. )

राजश्री खडेराऊ दाभाडे
सेनापती ( खा. अ. )

० श्री ⌣
राजा शाहू स्वा
मि छत्रपति खं
डेराव दाभाडे
सेनापति
( अष्टकोनी शिक्का. )

राजश्री सिदोजी राऊ निबा-
ळकर सर लसकर ( खा. अ. )

श्री मद्राजा + +
छत्रपति स्वामी
चरणी तत्पर सी
दोजीराव निबा
ळकर सर ल
स्कर निरतर
( चौकोनी शिक्का. )

राजश्री त्र्यबकराऊ दाभाडे
सेनाखासखेल ( खा. अ. )

राजश्री यादव गोपाल
दिमती खालसा

श्री राजा शा
हू छत्रपती चर
णी तत्पर खंडेराव
सुत त्रीबकराव दा
भाडे नीरतर
(अष्टकोनी शिक्का 'हु' मोडी आहे.)
खंडो बलाळ चिट(नि)वीस
(खा. अ. अत्यंत कापरें)

० श्री
राजा शाहू छत्र
पति चरणी तत्पर
फतेसीग भोसले
राजकुवर
(गोल शिक्का.)
राजश्री आपाजी हणमत
सुभेदार खालसा प्रा सातार

श्री ०
बाळाजी प्रभु पु
त्रस्य खडराजस्य धी
मतः॥ मुद्रा सर्व गुणो
पेता राजसन्मा
न वर्धिनी
(बदामी शिक्का.)

∴० श्री.
राजा शाहु चर
णी तत्पर आपा
जी हनुमत
+++
(गोल शिक्का.)

शामजी हरी नामजाद सुभा प्रा मावले

० श्री मत्स्वामि । शेवेशा ठाई । तत्पर शाम* । जी हरी
निर । तर । (अशा पांच ओळींचा बहुबुरजी शिक्का.)

राजश्री मानाजी केशरकर अजहत सर देशमुख

स्वतिश्री सुखदा । मुद्रा प्रतापोत्कर्ष । वर्द्धिनी सरदेश । मुखस्यैषा
शाहु । राजस्य राजते । (अशा पांच ओळींचा चौकोनी शिक्का.)

गोत वतनदार

राजश्री शाहूजी राजे भोसले
देशमुख पा वाई

भगवंत सामराज व गिरमाजी
झुगो देशपांडे पा वाई

श्री राज । श्री शाहुजी रा । जे भोसले देश । मुख प्रा वाई ।

 (अष्टकोनी ४ ओळींचा व नांगर असलेला)

राजश्री शाहुजीराजे भासले
देशमुख पा कऱ्हाड

पिलाजी गोविंदराऊ देस-
पांडे पा कराड

० राजश्री । शाहुजि राजे । भोसले देशमुख । प्रा कऱ्हाड ।



(अशा चार ओळींचा व नांगर चिन्ह असलेला अष्टकोनी शिक्का.)

देसमुख प्रा सातारा

वाजोजी वलद सताजी घोरपडे देसमूख

येसजी बीन रा मोजी गाढीवे देसमूख

बापुजी वेंकटेश दे- शपांडे प्रा सातारा

(फारसी चौकोनी शिक्का. )

राजश्री मालजी नरसिंगराऊ व अडबोजी नाईक सितोलें देशमुख प्रा पुणे

होनप देशपाडी- ये प्रा पुणें

अडद्दोजि



माळजि

( गोल शिका. )

गोवींद ना व सीतोळे दे



समुख प्रा पुणे

( अष्टकोनी शिका. )

राजश्री केदारजी येशवंतराव निगडे देसमुख प्रा सिरवल

यादो गंगाधर देस- कुलकर्णी प्रा सिरवल

श्रीमळ । रि सुत केदा । र देसमुख पा । सीरवळ ।



( नांगरासह ५ ओळींचा गोल शिका. )

माहादाजी वलद संभाजी कांटे देशमुख प्रा सुपें बारामती

राघो बाबुराव देशपां- डीये प्रा सुपें बारामती

श्री ० । माहादाजी । काटे देसमुख । प्रा सुपें



[ या ५ ओळींचा नांगरासह गोल शिका. ]

बाजी बीन मालोजी कोडे दसमूख तो खेडेबारे

पिराजी बीन नागोजी कोडे देसमूख तो खेडेबारे

देसपाडे नऱ्हेकर तो खेडेबारे रुद्राजी सखाजी व पाडरंग खडेराऊ देसपाडे

श्री
बोपजी ना
ईक बीन ह
नजी नाईक
( नांगराचें चित्र. )
( अष्टकोनी शिक्का
इ व ह मोडी आहे )

श्री
नगोजी बी
न कानजी
देसमु +
( नांगराचें चित्र )
( गोल शिक्का. )

कसबे सासवड

नारायेणजी बिन मावजी व बजाजी बीन लखमोजी देसमूख पा मार

श्री
ना + क ज
ग थाप

गोदजी बिन कृष्णाजी देसमुख १
सुभानजी बिन मावजी नाईक १
सुलतनजी बिन रामजी देस मुख १
बहीर माळी मेहत्रा बिन नाव माली का मार नि खुरपे.
सताजी सेटे
नाईकजी माहाजन
( निशाणी तराजू )

शाहाजी बिन कान्होजी तेली मेहत्रा का मार नि पाहार

याबोजी बिन मोराजी सोनार का मा नि साडस

खडोजी बिन माहादजी सुतार व लोहार खडोजी बीन सकोजी सुतार का मार नि वाकस

राहुजी बिन मालजी पाटील मोकदम का मार
कृष्णाजी बिन रायाजी पाटील १

मानाजी बिन सोमाजी पाटील १
रभाजी बिन +(या)दजी पाटील १
सिवजी बिन यमाजी पा जगथाप १
जावजी बिन बहिरजी जगथाप

बहिरजी बिन तुकोजी साली मेहेत्रा का मार नि धोटे

खडोजी बिन गणोजी बगाडा सिपी मेहत्रा का मार नि कातर

सुभानजी बिन सीत गावडा का मार नि कुगडी ( ड )

बालोजी बीन मोराजी परीट का मार नि बडवना

मोराजी बिन कान्होजी कुभार का मार नि गुडा

निवाजी बिन रखम माहाला निा आरसा

येमाजी बिन र वा (?) जी गुरव वहीर व कर व बहिरजी बिन भिकाजी गुरव वटेस्वरकर निा जेगट

केरनाक बिन गोननाक माहार महेत्रा व आबा बिन काननाक व दावनाक बिन नागनाक व सतनाक बिन मोतनाक माहार का मा निा इला दोर

सेक महमद वलद हबी महमद मुलाणा का मार निा

राणोजी बिन हर मेहत्रा चाभार का मार निा इगा

सोननाक नाईकवाडी बिन खड-नाक पा मार निा काठी

निबा बिन गोदनाक माग निा मागभाली

गांवगणा का मजकूर

मोकदम मौजे बेलसर कर्याती मजकूर

लखमोजी बीन गोदजी गरूड        तान्हाजी बीन माउजी जगथाप



बीा देवराव नारायण बेलसरे जोसी व कुळकर्णी मौजे मजकूर

सटवोजी बीन वाघोजी कामथे पा मोकदम मौजे कलद का मार



विनाजी नरसिह कुलकर्णी मौजे खलद

भिकाजी बीन धारोजी पा काकडे मोकदम व तुकोजी बीन सताजी पा काटे मो मौजे कोलोली का मार



जगनाथ मुकुंद + गा जोसी कुलकर्णी मौजे मार

मोकदम मौजे दिये

———— ————

————झेडे ————झेडे



पिलाजी बिन चागोजी जाधव सेटे मौजे मार        बीा निबाजी बावाजी पानसी जोतीसी कुल-कर्णी मौजे मार

मोकदम मौजे कोढीत रघोजी बिन होनाजी बडधे व येसाजी बिन बाजी जरंडे



बीा जगंनाथ शामराज अत्रे जोसी कुलकर्णी मौजे मार

या विद्यमानें स्वस्ति श्री शालिवाहन शके १६४९ प्लवंग नाम संवत्सरे अश्वीन शुध दशमी गुरुवासर त दिनी राजश्री चिंतो तानदेव व मलार तुकदेऊ व खंडो गोमाजी व रामचंद्र नारायेण व नाग(गे)शभट बिन यादवभट व गोविंद भट बिन सिवभट पुरंदरे कुलकर्णी व द(दे)श कुलकर्णी कर्यात सासवड यांसि भिवाजी कासी व भास्कर कृष्ण व भगवंत कासी व त्रिंबक कासी व मलार भगवंत व माहादाजी गोपाळ व जगंनाथ गोपाल अत्रे याणी ल(ले)हून दिल्हे यजीज पत्र ऐसें जे तुम्हा आम्हां मधें देशकुलकर्णाचा व गांवकुलकर्णाचा कथला होऊन हरदू जण हुजूर माहाराज राजश्री छत्रपती स्वामीचे सेविसी किले सातारियाचे मुकामी येऊनू आपलाली हकीकत विदित केली त्यावरून हुजूरची आज्ञा जाली कीं जैसी हकीकत विदित केली त्या प्रो तकरीरा देणे त्यावरून तुम्ही आम्ही तकरीरा लेहून दिल्हया मग तुम्हा आम्हास आज्ञा केली की ज्या तकरीरा लेहून दिल्ह्या त्या कोण्हाचें तोंडे खऱ्या करून देतां त्यास आपण आर्ज केला की कसबे मजकूरचे गोत व देशमूख मोकदम व समाकुल पांढरी हे सांगतील त्यास राजी असों म्हणून अर्ज केला व राजीनामे लेहून दिल्हे त्यावरून कसबे मजकुरचे गोत देशमूख मोकदम समाकूल पांढर यांस सेटे माहाजन खुम व बारा बलुते यांस हाजीर बोलावून आणून त्याच्या माथा बेलभंडार घालून साक्ष पुसिली पुरंदरे व अत्रे हे उभयता कसबे माचे कुलकर्ण व कर्यातीचे देशकुलकर्ण येथील वतनानिमित्य भांडताती त्यामधें कदीम वतनदार कोण आहे तो सांगणें म्हणून आज्ञा केली त्यावरून देशमूख मोकदम व समाकूल पांढर यानी साक्षी दिल्ही कीं पुरंदरे कदीम वतनदार खरे परंतु त्यांस लिहितां येत नव्हतें याकरितां माऊजी पाटील व रामजी नाईक पाटील यानी त्यास सांगितले की तुला लिहितां येत नाहीं पांढरीचे कामकाज चालिले पाहिजे तरी येक मुतालीक लिहिणार शाहाणा पाहोन ठेवणें म्हणून सांगितलें त्यावरून पुरंदरे यानी त्यावरून अत्रे गुमास्ते ठेविले त्यापासून दोन पिढ्या मुतालीकपणें वर्तले अलीकडे पुरंधरे यासीं कजिया करू लागले परतु पुरंदरे वतनदार खरे अत्र्यास त्यांच्या वतनासीं समंध नाही म्हणून साक्ष दिल्ही सदरहू साक्षीवरून तुम्ही खरे जालेस कर्यात मजकूरचे देसकुलकर्ण व कसबे मजकूरचे कलकर्ण तुमचे वतन तुम्हीं आपले वंशपरंपरेनें अनुभवणें आम्ही देस-

मूख व मोकदम व समाकूल पाढरी याच्या मुखे खोटे जालों तुमच्या वतनासीं आपणास समंध नाही तुम्हासी अगर तुमचे वंशपरंपरेसीं आपण अगर आपले वंशपरंपरा जो कोण्ही कथला कुसूर करील त्यास गोहत्येचे व पंचमाहापातकाचे दोश असत हें येजीज पत्र लिहून दिल्हें सही येकून वली सुमार ७५ पंचाहातर. त्यास ता। श्री नाम्याच्या वली ३ तीन व मजकुराच्या वली ७२ बाहातर येकून पंच्याहातर छ ९ सफर

बी।। माहादाजी गोपाल अत्रे

---

ले. ९०

श्रीजयेती

श्रीमंत राजश्री तात्या स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक रघुनाथ[1] यादव दि।। लेखक चिटनिविसी साष्टांग दंडवत प्रणांम विनंति उपरी येथील कुशल स्वामीचे कृपावलोकने येथास्थित असे विशेषं स्वामींचे आज्ञेप्रमाणे चाकरी केली आहे आम्ही स्वामीचे कुटूंबातील सर्व प्रकारे साभाल करावया स्वामी समर्थ आहेत प्रसंगी दया करावी वरकंड विनंति राजश्री बाळाजीपंत बावा पासी केली आहे सेवसी निवेदन करिता श्रुत होईल सेवेसी विशेष काय लिहू कृपा वर्धमान करावी ह विनंति

---

ले. ९१

श्री

श्रीमत् राजश्री तात्या स्वामीचे सेवेसी

अपत्य समान बाबूरायें साष्टांग दंडवत प्रणाम विनंति उपरी येथील कुशल स्वामीचे आशिर्वाद असे विशेष कागद सिध करून पाठविले आहेत सुरक्षित पावलियाचे वृत ल्याहावयासी आज्ञा केली पाहिजे वरकड रा बालाजीपंत सांगता कलो येईल बहूत काय लिहिणें हे विनाति

श्रीमत राजश्री दादोबा ( मल्हार तुकदेव ) स्वामीस दंडवत प्रणाम विनंति उपरी पत्रें सिध करून पाठविली आहेत निरतर कृपा लोभ असों बावा चिरंजीव अमृतराव यास पत्र लिहिलें आहे त्याकडे पाठविले पाहिजे बहूत काय लिहीणें हे विनंति अपत्ये सखोबानें साष्टांग दंडवत विनाति दया वर्धविली पाहिजे हे विनाति

---

१ चित्रगुप्ती व पानपतचे बखरींचा कर्ता.

ले. ९२

श्री

श्रीमंत तीर्थस्वरूप राजश्री तात्या स्वामीचे सेवेसी

अपत्यें सखाजी प्रभू साष्टांग दंडवत विनति उपर येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत गेले पाहिजे स्वामीचे आज्ञेप्रमाणें पत्रें करून दिल्ही आहेत येविसींचे सविस्तर राजश्री बालाजी विसाजी सांगतां विदीत होईल आम्ही पदरीचे आहो सांभाल करणार आपण वडील आहेत कृपा वर्धविली पाहिजे हे विनंति

---

ले. ९३

श. १६४९ कार्ति. वा १२

( कांहीं फारसी मजकूर )

इ. स. १७२७ आक्टो. ३०

बायेस तहरीर हंसी (तू ?) र आंकी वाके ब तारीख २५ माहे रावल सन ९ जलूसवाला मुताबकी सन ११३७ फसली नायेब शाहमत पनाह कुंवर बाहादूर अजठाणे पा। आंकोंले सा। संगमनेर सुबे खुजस्ते बुनयाद येथून देहाये तपे पठार पा। कोंतूल सा। जुनर माहाल जागीर सा। आली येथे जात होते सबब कीं पेशजी खंडोजी दाभाडे वगैरे नासरदार संगमनेरावर येऊन उतरले ते वख्ती दरमियान राह देहाये तपे मा।र ताख्त ताजान करून बंद व मवेसी रयेतीची धरून तमाम लूट करून घेऊन गेले आंजी सबब ज्यायाये देहाये मा।र तफर्का व परागंदा जाली आहे त्यांची तसले करून मकानावर आणून आबाद करावया बद्दल जात होते तो येक बायेक मौजे वांसेरें पा। आंकोले येथील घाटीने कालो भोंसला व राणोजी भोयेटा वगैरे नासरदार पांच हजार स्वार सातारियाकडून मौजे थूगांव बु।। पा। मा।र कसबाहून येक कोस मुफासला आहे तेथे येऊन उतरले नायेब मा।रासी व नासरदाराचे फौजेंसी निम कोसाचा तफावत होता मुफसब मा।रानी तीन च्यारसे स्वार नायेब मा।राच्या मुकाबिलीयावर पाठविले च्यार घडी लडाई जाली तीन घोडी मकहुराची गोलीयानी जखमी जाली बा येकबाल सरकार आली मुफसदास तंबी करार वाके पोहचाऊन कूल स्वारांचा जमाव होता त्यामधे नेऊन घातले त्यावरी कूल फौज सिवारामधें व देहातमधे आवारा होऊन निस्प सिवार कसबे मा।र व मौजे थूगौबु।। वगैरे देहात बमोजीब

ता जेल येथील जोरी व बाजरी खलवाडीमधें जमा जाली होती ते व सिवारामधे उभी होती ते कूल कापून नेली व रबी जुजकिस्त फार जाली होती त्याची पायेमाली केली व मवेसी गुरे व घोडी मोकदमाची व जेवर वगैरे मता लूट केली कितेक गांवचे मोकदम व मुजारी बंद धरून खानदेशाकडे घेऊन गेले दोन रोज मौजे भोजापूर व देवठाणच्या सिवारामधे मुकाम केला होता रयेतीवर तादी बहूत केली महसूल खरीफ व रबी कूली तलफ केला आजी सबब परमाल वाजीब सरकार नुकसान तमाम जाले यास जे कोन्ही इतला राखत आसतील त्यानी मोहर गोही महजरावर करणें देहे बी ता १५ देहे

कसबे मार १, मौजे परखतनुर १, मौजे थुगौ १, मौजे वासेरे १, मौजे थूगौ खुर्द १, मौजे ताभोल १, मौजे कुंबे + + १, मौजे कलस खुर्द १, मौजे देवठाण १, मौजे वीरगौ १, मौजे भोजापूर १, मौजे दापूर १, मौजे पिपलगौ निा १, मौजे हिवरगौ १, मौजे चास १, लग ०

तेरीख २७ माहे मार सन इले

( मराठी मजकुराच्या प्रारंभीं उजव्या हाताकडील चार बोटें रुंदीच्या समासांत पुढें दिलेला मजकूर व शिक्के आहेत. )

शाहिदी देसमुखानी व देसपांडियानी पा मजकूर

सयाजी देसमूख
( फा. शि. )

त्रिबकजी देसमूख
'त्रिंबकजी
( नां. चि. )
देसमुख '(गोल शि.)

+रोजी देसमूख
( म. शि. )

सदासी + + +
+ माजी देसमूख
( म. शि. )

जनार्दन देसपाडिये
गोदजी देसमुख
( गोल सि. )
त्रिंबक + + +

निळोजी + + +
कृष्णाजी वा धारोजी
देसमुख
धारोजी
( नां. चि. )
देसमुष ( गोल )

---

ले. ९४ श्री श. १६५० वैशाख शु. ५
इ. स. १७२८ मे ३

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री अंबाजीपंत पुरंधरे देशकुलकरणी व कुलकरणी व जोशी कसबे सासवड गोसावि यासि

आश्रित कृष्णंभट[1] व अनंतभट व भिकंभट व बहिरंभट कर्वे कृतानेक आशीर्वाद शके १६५० कीलक नाम संवत्सरे वैशाख शुध पंचमी राजश्री पंत प्रधान हे आपले येजमान व अनखी आपये येजमान हे तुमचे दाहा गावि कार्य प्रयोजन करितील त्यास तुमचे ज्योतिषाची दक्षणा व मान असेल तो तुमचा तुम्हास देउ याशि अतर करणार ना [ ही ] गाव येणेप्रमाणें ताा

| | |
|---|---|
| १ कसबे सासवड | १ मोा आबवडी |
| १ मोा सुपेखुर्द | १ मोा पोखर |
| १ मोा पिंपळे | १ मोा पूर |
| १ मोा पानवडी | १ पेठ पुरंधर |
| १ मोा पागारे | १ किले पुरंधर व वज्रगड |
| ५ | ५ |

येकू[ण] दाहा गावचे ज्योतिसपणाचे हक असेल ते देऊ श्रा श्रावण शके १६४९ अलाकडे काये तुमचे प्रयोजन जाले असेल ते आपण सासवडास जाऊ ते समई ज्योतिषीपणाचे असल ते वारून देऊ तुमचे सदरहू गावचे जोतिष पुरातन आहे त्याचे ज्योतिषपणाचे जे हक उतपन असेल ते तुम्ही घेत जाणे त्यास आपण व भाऊबंद कटकट करणार नाही सद(र)हू दाहा गावाचा सिवारात आपंला येजमानानी कार्य प्रयोजन जाले तर तुमजे जोतिषपणाचे सर्व हक्क उतपंन्न होईल ते तुमचे तुम्ही घेत जाणे आ(म्ही) कटकट करणार नाही दस्तुर वामनभट करवे बहुत काय लिहिणे हे आसीर्वाद यासी आपण व आपले वंशिचा कोणी अनमान करील तर आपले आधीची आण असे[2]

साक्ष

बापूजी गणेश बागूल वर्तक का मुरूडकर सुभा दाभोल

नारो मोरदेऊ जोसी कुलकर्णी मौजे वडगाऊ पाा सिरवल

---

१ पेशव्यांचे उपाध्ये. २ निंमा मजकूर बालबोध व निमा मोडी असा लिहिलेला आहे.

ले. ९५ श्री श. १६५० वैशा. शु. ५
तालीक इ. स. १७२८ एप्रील ३

तीर्थरूप राजश्री अंबाजीपंत तात्या वडिलाचे सेवेसी

अपत्ये मल्हार तुकदेव सा॥ नमस्कार विनंती वतनाचे कामानिमित्य ऐवज खर्च जाहाला त्याविसी वेदमूर्ती राजश्री कचेश्वरभट याजबराबर सागोन पाठविले तरी वृतीचा सर्व कारभार वडिलीच केला आहे आणि अह्मास ऐवजचे पुसतात त्यास आम्ही वाटणीचा ऐवज देउ तेव्हा वाटा घेऊ शके १६५० कीलक नाम संवछरे वैशाख शुध पचमी हे विज्ञापना

---

ले. ९६ श्री

( सदर्हू याद बजाबाचे वेळची असावी )

आत्रे येणेप्रमाणे मेले

बावाजी गोविद बारामतीस मेला १

भिवाजी कासी उबरजस मेला

( कोरी जागा )

विठल गोपाल पुणियात मेला

मुलुकगिरत मेले

१ बालाजी बावाजी.

१ बहिरो बलाल भगवत कासीचा लेक दिल्हा होता तो

( कोरी जागा )

१ बापूजी गोपाल

३

भगवत कासी व मल्हार भगवत फुरसगीस मेले १

मोरो रामचंद्र १

२

सिवापुरी

१ त्रिबक कासी

१ गोपाल भिवाजी

१ रामाजी त्रिबक

३

१ माहादाजी गोपाल

४

१ सासवडात मेले गुमास्तगीर करता

१ रामाजी त्रिबक

१ दतो भास्कर

२

( खोडलें आहे. )

सिरवलात मेले

१ कृष्णाजी भास्कर
१ भास्कर कृष्ण
२
बाजी सिवदेव मावलात डोणजे

सद्रहू सासवडात मरताना एक रामाजी त्रिंबक त्याचे पलीकडे एक दुसरा पुरुष गुमास्तगिरी करी होते तव्हां मेले पाढरीवर त्याचा काल जाहाला या खेरीज दतो भास्कर गोसावी याप्रो होता आमचा आमल जाहलीयावर तो येथे वस्त करून प्रो होता मग पुढे त्याचा काल जाहाला यामागेही कजिये आमल जाहली या पूर्वी कजिये व वतनही पुरंधरे याणी आनभवले परतु कोन्हाचा काल जाहला नाही[1]

---

**ले. ९७**

छ २७ सफर

पुा तीर्थरूप राजश्री बाबा स्वामीचे सेवेसी विनती उपरी रा सिदोजी राऊत याजबराबर स्वामीनी पत्रे पाठविली ती पावली बांडे याचा मजकूर लिहिला तो कलला राजश्री नारबास[2] स्वामीचे पत्र होते ते नेऊन दिल्हे व जे बोलणे तेहि त्याचेथे जाऊन बोललो त्यानी सागितले की राजश्री सेनापतीस सागतो बांडे यास पद्री घेऊ देत नाही यैसे निछयेरूप सागितले रा नरसीपंत सेनापतीकडील तेहि सागतात की सेनापती त्यास काही पद्री घेत नाहीत सेनापती म्हणतात की त्यासी काही आपली बोली नाही ते काही आपणाकडे आणावयाचा त्यास आश्रा दिल्हा नाही यैसे म्हणतात तर स्वामीनी बांडे याकडे पत्रे पाठऊन विचारेच आपल्यासी बोलाऊन आणावे जुंझाच्या समयास आले नाहीत याकरिता त्याच्या मनात विपर्यास आला असेल तर स्वामीनी त्यास समाधानाची पत्रे पाठऊन आपल्यापासी आणावे ये गोस्टीस अंतर न करावे बहुत काये लिहीणे कृपा केली पाहिजे हे विनंती

---

१ यावरून 'अन्यांच्या विरुद्ध निकाल झाल्यानंतर त्यापैकीं काहींनीं पुरंदऱ्यांच्या दारांत जिभा हासडून प्राण दिले' या आख्याइकेस बळकटी येते.
२ नारो राम मंत्री ?

ले. ९८ श्री शके १६५४ वैशाख (?)
इ. स. १७३२ मे

राजश्री काका स्वामीचे ...वेसी ......... लिहिले आहेत...... पत्रे बजिनस आपणाकडे येतील ते वृत साकल्य निवेदन होईल याजउपर स्थापना करणार वडील आहेत वर चला [कड] आर्थ घरचा (दर)बारचा सर्व विदित आहे राजश्री मानाजी बावा आगरे यासी येक राजपत्र व राजश्री फतेसिग बावाचे पत्र व आपले येक पत्र व आणखी ज्याचे पत्राने कार्ये होये ऐसा प्रसंग चितात योजून साहित्य पत्रे पाठविली पाहिजेत व येक दोन वस्त्रे थोडकीयात + + + सेले व येक व मातुश्री कारणे येखादे वस्त्र उच देखील चोली ऐसी पाठविली पाहिजे व याचा रिज आस्वावर आहे तर सजूकाच्या जोड्या २ मेलऊन पाठवणे आपले वर्तमान वेदमूर्ती राजश्री बाबू जोसी याणी सागितले त्याजवरून बहूत संतोशी जाले त्याणी पत्र आपणास लिहिले आहे त्याजवरून विदित होईल लस्करचे वर्तमान साप्रत कलत नाही तर लिहिले पाहिजे व नाखबा पलवकर याचे लेक महंमदजी वगैरे सावकार जजिरे कुलाबियास चेऊलचे बंदरचे मामुरी करिता आले होते त्याची आमची भेटी जाली आपलेकडील वर्तमान त्यास कलले त्याजवरून ते बहूतसे खुशाहाल जाले याणी उतर केले की आम्ही त्याचे पदरी आहेत चाकरीस चुकणार नाही आमचे स्वयातीचे चालीस-पनास घर येक दिवस येऊन बंदर मामूर करून त्यास राजश्री मानाजी आगरे याचाही हेत मामुरीचा फारसा आहे परंतु इग्रेज येथे आहे त्याचा आड आणखी आहे याचा परिणाम काय होऊन येईल तो पाहावा याज-करिता सावकाराचा निसदेह होत नाही तेही या दो चौ महिनियात होईल ते पाहावे बहूत काये लिहिणे कृपा लोभ आसों दीजे हे विनति

हे पत्र आगोधर लिहीले होते त्या + वैशाख वद्य सष्टी गुरुवारी रवाना केली आहेत इगरेस येथे होता त्याचे चितात विपरीत ( भाव ) येऊन रेवदंडा जातो म्हणून हमेश जा होता...... तेथून तारवात बसोन उदेरी(स)......येक होऊन गुजब लावावा ऐसा विचार आहे......वर्त-मान लेहून पाठऊ हे विनति

---

ले. ९९ श्रीराम श. १६५४ मार्गशीर्ष वा ७
इ. स. १७३२ नोव्हेंबर २७

॥ छ मा आनाम देशमूख व देशकुलकर्णी ता खेडेबारे यांस नारो शंकर सचीव सुहूर संन सलास सलासैन मया अलफ तुम्ही विनती पत्रे पाठविले ते प्रविष्ठ होऊन लिहिले वर्तमान विदित जाले दु माहालचा
श्री आमल सततरीक केला म्हणून रा भगवंतराव सोमवंशी हवा-
शकराजी लदार किले सिंहीगड याणी किलीयास धरून नेले आहे वसूल
नारायण माहालातील बद जाला याची काये आज्ञा ते केली पाहिजे
( बदामी ह्मणून लिहिले ऐसीयास माहाली अमल आजी ता किलीयाके
शिक्का ) (कडे) चालिला ऐसे नाही राजश्री आनंदराऊ तेथें होते त्याणी किलाचे विद्यमानें कारभार केला त्यांस हुजूर ठेविले आणि त्याचे पुत्र रा मलार आनंदराऊ यास सागितला होता तो दूर करून राज(श्री) गोविद अपाजी यास हुजूरून पाठविले त्यास· रा हवालदारानी दंगा करून कार्तिक मासाचा हप्ता देखील तटला आहे याकरिता याचे पारपत्य करणे ते हुजूरून केले जाईल तुम्ही गडचे आज्ञेने माहालाचा + + + येकदर न करणे छ १९ जमादिलाखर पा हुजूर सुरु सुद

---

ले. १०० *श्रीशंकर श. १६५५ चैत्र शुा ३
इ. स. १७३३ मार्च ७

मुकद खडो रा ८
श्रीमंत माहाराज राजश्री छत्रपती स्वामीचे शेवेसी

विनंति सेवक हरी मोरेश्वर राजाज्ञा कृतानेक विज्ञापना ता छ १ माहे सवाल मुा नजीक माहाड माहाराजांच्या कृपावलोकने करून सेवकाचे व फौजेचे वर्तमान येथास्थित असे विज्ञापना भिवजी लोढे व अंबाजी सेटगा व माहादजी पवार व बहीरजी सकपाल हुजरे याबरोबर माहाराजानी आज्ञापत्रे सादर केलीं ती पावलीं सिरसा वंदून सनाथ जाहालो पत्रीं आज्ञा कीं माहाडच्या ठाणीयांत रा केदारजी केसरकर व आपाजी सोमवंसी व निबाजी सोमवंशी व सुभानजी गोले व बालकोजीराव दरेकर यांस राहावयाची आज्ञा केली त्यांस ठेऊन फौजेसहवर्तमान जाऊन बाण-

* शंकर शब्द बालबोध आहे.

कोट सत्वर घेणे म्हणून आज्ञा केली त्यास आज्ञेप्रमाणें कूच करून जातो माहाराजांच्या पुण्यप्रतापें करून होणें तें होईल राजश्री संभाजी आंगरे जमावसुधा जलमार्गे बाणकोट घ्यावयाच्या उदेशे आले आहेत आम्ही जाऊन पोहोचल्या अगोधर त्याणी थल हस्तगत केले तर उतमच आहे आम्ही हुकुमाप्रमाणें सत्वर जातों आम्ही जाऊ तोंपर्यंत त्यांणी स्थल घेतले नसले तर आम्ही हस्तगत करितों स्वामीच्या प्रतापें फौज गेल्यानें तर बाणकोट बहूत दिवस टिकाव धरील ऐसे नाही दों तीं रोजांतच हस्तगत होईल तेथे आपणाकडील लोक ठेवणे म्हणून आज्ञा केली त्यास तो जागा खाडीचे सेवटी समुद्रासमीप आहे याकरितां तेथें जमावाची भरती बरी असावी व बेहबुदी बहूत सावधपणें पाहिजे आणि तो जागा जोरावारीने रक्षावा ऐसा आहे तर तेथे जमाव कोण ठेवावा ते आज्ञा केली पाहिजे हजार दीड हजार माणूस तेथें पाहिजे तर माहाराजानी नेमणूक करून जमाव सत्वर पाठविला पाहिजे स्थल हस्तगत जाहाल्यानंतर फौज फार दिवस तेथे राहातां नये यास्तव येविसी जे आज्ञा कर्तव्य ते सत्वर करणार माहाराज धणी आहेत बाणकोटात ठेवायास माहाराज लोक पाठवितील त्यांमध्यें बरा आगेजणीचा सरदार पाठवावा सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

ले. १०१ श्री श. १६५५ जेष्ठ वा। ९
इ. स. १७३३ मे २६

पु॥ राजश्री अंबाजीपत स्वामी गोसावी यासि

[1]विनंती उपरी तुम्हांस पत्रे लिहिली आहेत ते कुल राजश्री स्वामीस वाचून दाखऊन उतरे टाकोटाक चहू रोजात येतसी पाठवणे येथून जोडा जासुदाचा रवाना केला आहे हा थकेल तरी तुम्ही तेथें जासूद चालक रात्रीचा दिवस करून येतसे पाठवणे *लोभ आसो देणे हे विनती

छ २२ जिल्हेज[2]

---

१ पत्र बाजिरावाचें. * अक्षर वेगळें. २ ले. १०१ ते १०६ अखेरच्या पत्राच्या मित्या पैवस्तीच्या आहेत म्हणून त्या एकच येतात. वस्तुतः हीं पत्रें निरनिराळ्या दिवशीं लिहिलेलीं आहेत.

ले. १०२ श्री जेष्ठ वा। ९ श. १६५५
२६ मे १७३३ स.

पुरवणी रा आबाजीपंत स्वामी गो विनंति उपरी प्रतिनिधी रवाना केले ते माहाडास येऊन छावणी करणार म्हणून लिहिले तरी माहाडी छावणीचे प्रयोजन काये तेथे काही उपयोग नाही आजणवेळीस जाऊन मोर्चे देऊन तिला बंद केलीयाने याचे हातपाये बंद होतील हबसी शत्रू काही सामान्य नव्हे पहिले येक जजिरा होता त्याजवर मोहिमा कैशा होत होत्या त्या कलल्याच आहेत परंतु तो हारीस आला नाही दम धरून राहिला मागती इतके राज्य सोडविले आता माहाराजाचे पुण्य समर्थ यास्तव इतके कार्य घडले आहे परतु आगदी निर्मूलच करावे तेव्हा मेहनत फारसी पाहिजे चहूकडे बंद करावा आरमाराने राखावा पैकाही मबलग खर्च लागेल व लोकही कनिष्ट पक्षे पधरा हजार माणूस पाहिजे पाच सात हजार बदुख पाच सात हजार माणूस यैसे पाहिजे इतके बंद करावा कोठे बाहेर त्याचा रीघ न जाला म्हणजे वर्षा दो ती कार्य जाजिरीयाचे होईल आत सामान म्हणावे तरी दाहा वर्षाचे आहे परंतु चहूकडून बद होईल आरमाराने त्याचे गलबत कोठे बाहेर न फिरे यैसे होईल तेव्हा कार्य होणे ते होईल विचाराचे वाटेने तो यैसे आम्हास सुचते मग खावद्राचे कपाल थोर आहे आतच काही विघ्न होऊन कार्य जाले तरी न कले ते गोष्ट आकलेखेरीज आहे परंतु याचे दोन हात जबरदस्त आहेत येक येक आजणवेल व येक उदेरी त्यास प्रतिनिधी आजणवेली जातील तरी उतम आहे उदेरीस सरखेल खटपट करितील ते दोनी स्थले हातास आलीयावर याची हिमत कम होईल व अस्राही तुटेल रायेगड यावासा आहे तो न आला तरी तेथेही दीड हजार दोन हजार पर्यंत माणूस ठेऊन बंद करणे लागेल या मसलतीचे वर्तमान ये रीतीचे आहे सविस्तर तुम्हास कलावे म्हणून लिहिले आसे लोभ आसो देणे हे विनंति

छ २२ जिल्हेज

ले. १०३ श्री श. १६५५ जेष्ट वा। ९
इ. स. १७३३ मे २६

पुा राजश्री अंबाजीपंत स्वामी गो

विनंति उपरी राजश्री—स्वामीनी खर्चास रुा ३०००० तीस हजार पाठविले ते पुण्यास आले म्हणून लिहिले त्यास रुपये आद्यापि येथें आले नाहीत व पुणीयांस दाखल जाल्याचे पत्रही आलें नाही येतील तेव्हा आणऊ परतु इतक्यानेच खर्च चालतो ऐसे नाही पैका पाणीयासारिखा वेचावया पाहिजे ज्यास वरवाटे तीन द्यावे त्यास या प्रसंगामुळे पाच द्यावे लागतात हा विचार तुम्हास न कलेसा नाही राजश्री स्वामीसही विदीतच आहे खर्चाचा विचार पोख्ता व्हावा लागतो याउपरी जे खर्चास पाठवणे ते माहाडचे वाटेनें पाठवीत जाणें पुण्याकडून लांब पडते याबद्दल इकडूनच पाठवीत जाणें आजीतागा आम्हास अनकूल पडले तितका खर्च केला याजउपरी आमचे वस्तू खर्च कैसा करवतो बेमबलगा खर्च पाहिजे त्यास कार्यही धण्याचे साधले राज्य धण्याचे आहे खर्च लागेल तो धण्यानीच केला पाहिजे हे सविस्तर कलावे म्हणून लिहिले असे आम्हास कर्ज घेऊन मनसुबा होत नाहीं धणी खर्चास पुरवितील तरी मेहनत करून जिवाकडे न पाहता धण्याचे काम होईल ते करून यामागेंही कर्ज जालें ते धणीच उगऊन देईल सुटलें राज्य तेंही धण्याचेंच आहे आम्हापासून चाकरीस कोताई होणार नाहीं लोभ आसो दीजे हे विनाति

---

ले. १०४ श्री श. १६६५ जेष्ट वा। ९
इ. स. १७३३ मे २६

पुरवणी रा आबाजीपंत स्वामी गो[1]

विनंती उपरी रा सेखोजी आगरे सरखेल येथें आले पधरा सोला दिवस होते राजपुरी खोकरी कौल दिल्हा आसतां लुटिली आधर्वयू मात्र ते जाले सारे लस्करच मग लुटीस लागले त्यास जे सापडले ते कुलाबियास रवाना केले आरमारचे आम्हाकडील लोकास न कले यास्तव त्याचे हवाली केले त्यांत पाच गुराबा व काही गलबते यैसी कुलाबियास रवाना केली कोली सफरी ताडेल गोलंदाज सारे तेथेच नेले त्यास येथे

[1] पत्र बाजिरावांचें.

राहावयाचा बहुतसा आग्रह बावानीं व जिऊबाने आम्ही केला परतु त्याचे घरची व कुलाबियाची बदोबस्ती नाही यास्तव त्यास जरूर जाणे जाले यास्तव त्यास निरोप दिल्हा सात आठसे माणूस मानाजी आगरे येथे ठेविले रघुनाथजी जयेगडास आले आहेत त्यास येथे येणे म्हणून पत्रें त्याणी पाठविली आहेत बारापधरा दिवसात येतील सरखेल काली गेले गडापैकी येक बाणकोट त्याकडे आहे मडणगडास मोर्चे त्याकडील बकाजी माहाडीक जाऊन लाविले आहेत आपण खासा लोक जमा करून उंदेरीस लागावे यैसे मान्य केले आहे केवल हुकुमी कारभार नव्हे रस तोडावा तोही फटकाल यास्तव भरलीच गोष्ट राखून रस सपादून जाले तेथवर केले करीतच आहो यैसे वर्तमान त्याकडील आहे कलावे म्हणून लिहिले असे लोभ आसो दीजे हे विनती

छ २२ जिल्हेज

---

ले. १०५ श्री श. १६५५ जेष्ठ वा ९
इ. स. १७३३ मे २६

*पुरवणी राजश्री आबाजीपंत स्वामी गोसावी

विनंति उपरि राजश्री—स्वामी तेथून लोक व खर्चास वरचेवरी पाठवितात आपण उतावली न करावी म्हणोन विशदें लिहिलें ऐशियास राजश्री——ची आज्ञा ते प्रमाण राज्याभिवृद्धी करणे जीवाभ्य मेहनत करावी उचित आहे परंतु मावले हशम लोक समागमे होते त्यापैकीं कांहीं उठोन गेले काही गड किल्यास गुंतले राहातां दोन अडीच हजार माणूस राहिलें सरखेल देखील तीन हजार होतील त्यास जागा अफाट दर चौकीस दोनसे नाक्याची जागा तेथें च्यार पाच सें माणूस पाहिजे त्या(स) दांडियास दीडसें माणसांची चौकी होती हबसीयाचें पंचवीस माणूस आलें त्याणीं तोडातोड केली पांच माणूस ठार पडले पंचविसांपुढें दीडशानी धीर धरला नाहीं आधीं लोकाची भरती नाहीं त्याहीमधे लोकांची हिमत या प्रकारीची फौज ठेवावी तरी घोडियास हवा पडत नाहीं निरोप द्यावा तरी भरड पडेत या प्रकारीचा प्रसंग आम्हीं तो राजश्री—चे आज्ञेवरून व राजश्री नारबावा व तुम्ही लिहिलें त्यावरून दम धरून राहिलों आहो परंतु लोक वरचेवरी येऊन कुमक पोहचते तरी ह्या लोकास धीर पुरतो

नाही तरी आव पडत नाही तुम्ही म्हणाल की लोक जमा करून वरचेवरी पाठवितों त्यास लोक जमा व्हावयास दिवसगत लागेल येथे तो कुमक यावयास दिरग लागलियाने धीर पुरत नाही याकरितां पत्र पावेल तेच क्षणीं राजश्री............स्वामीजवल लोक हशम चाकर आहे ते पाठविले पाहिजे आम्ही निदान करून राहिलो आहो लस्कर राहिल्याने बुडते तुम्हाकडील भरती ये तोपर्यंत आठ दिवस दम धरून लस्कर राहाविले आहे तरी पत्रदर्शनी हशम व बारगीर व बरकंदाज त्वरेने पाठवावे विलंब लाविलियाने आम्हावरी शब्द नाहीं कोण समय कैसा येईल हे कलत नाहीं पाऊस फार लागला अंधारी रात्र आहे आम्हीं तो जीवाभ्य श्रम करावयास चुकत नाहीं कलले पाहिजे लस्करचा मामला तरी जैसे विशालगडी पातशाहाची हगवणी जाली तैसा विचार होईल लोभ असो दीजे हे विनंती

छ २२ जिल्हेज शनवार संध्याकाल

---

ले. १०६ श्री श. १६५५ जेष्ठ वा १०
इ. स. १७३३ मे २७

पुरवणी राजश्री अंबाजीपंत स्वामी गोो

विनंति *उपरि खानजादा बाहेर आहे त्याचा मतलब जे राजश्री थोर आहेत आपणहि येका अमीराचा लेक आहे आपली स्थापना आपल्या जागियावरी केलियाने दिगांती कीर्ति होईल तुमचा स्थापित होईन पुढे कितेक कामकाजास येईन आणि आपण एथे काईम जाल्यावरी चहू महिन्यांनी रायेगड तुम्हास देईन ऐसें बोलतो जंजिरेयात हबसी सिद्दी संबूल व सिद्दी अंबर आहेत त्यांचा मतलब रायेगड न द्यावा किले आरमार घेतले ते द्यावे तेव्हां खासा [ स्वारी ] जंजीरियात घेऊन ऐसें ते म्हणतात ऐसिया राजश्री—नी खर्चाची व लोकाची बेहबुदी करून मनसुबा सिधीस पावावा हें उतमच आहे हे न व्हे तेव्हा निदानास खानजाद्यास जंजिरियात बैसवून किले आरमार त्याचे स्वाधीन करावे तो कायेम जौलियावरी रायेगड बोलीप्रमाणें देईल आहे विचार तो तुम्हास ल्याहावा यास्तव लिा असे खानजादा म्हणतो जे एक जंजिरा पहिला होता त्याज-

* सबंध पत्र बाजीरावाच्या हातचें.

वरी इतकें; राज्य सोडविले आतां तो च्यार जंजिरे आहेत याकरितां आपली स्थापना करावी येश संपादावें यांतच भूषण आहे ऐशियास कनिष्ठ पक्षे ही गोष्टी आहे आपला करून ठेवावा जजिरीयातील हबसियासी रायेगडचा मजकूर करावा तरी ते मान्य करून यास आत घेत नाहीत याची स्थापना करावी याचा अमला फैला जालियावर मग हा रायेगड देईन म्हणतो इमानावर मात्र गोष्ट आहे होणे जाणे ईश्वराआधीन आहे हा मूळ बोलीच गुंततो बरा शाहाणाचा दिसतो बोलीप्रमाणे निर्वाह करीलसे दिसते जंजेरियास साह्य फिरगी इग्रेज कदाचित होतील सुरतेस याचा हबसी आहेत ते तो याची कुमक करीलच यैसे पुढील पे स के स आहे हा मजकूर काही भिऊन लिहिला नाही आहे वर्तमान ते लिहिले असे हाहि विचार कानावर घालणे जर आपल्यास पैकियाचे व लोकाचे नेट होईल परिणाम लगेल तरी मग हे गोष्टी कार्याची नाहीच जर आपल्यास न होई तरी मग हे कनिष्ट पक्षाची गोष्ट आहे गड घेतले तेच राखून मुलूख साधला तो राखून राहील म्हटले तरी होणे नाही हे गड काही कामाचे नाहीत विना पाची स्थळे हस्तगत जालियाखेरीज हे काही राखवणार नाहीत अखैर किलेहि जातील मावलेहि मारितील आपलेच राखता मुस्कील ऐसे दिसते एथेच जबरदस्ती पोहचऊन राखिलियाने राहातील नाहीतरी यैसे आहे असो लोभ असो दीजे हे विनंति

छ २३ जिल्हेज

---

ले. १०७ श्री श. १६५५ अ. आषाढ शु. ७
इ. स. १७३३ जून ७

श्रीयासह चिरंजीव राजमान्य राजश्री दादास अंबाजी त्रिबक आसीर्वाद उपरी आम्ही ताा छ ५ मोहरम मुकाम पाचवड माची किले रायेगड सुखरूप असो विशेष आम्ही मजल दरमजल येथें अलो तो राजपुरीहून राजश्री येसाजी गायेकवाड आले त्याणी वर्तमान सागितले की तेथील सर्व कामकाजे सेखजीचे स्वाधीन आहे त्याणी मनावर धरल्याने अवलंबिले कार्य सिधीस जाते यैसे आहे परंतु ते आपल्या मनात दिलगीर फारसे आहेत की माहाराज राजश्री—स्वामीचे अज्ञापत्र येकहि अद्याप समाधानपूर्वक आपल्यास अले नाहीं यैसे कितेक प्रकारें श्रमी आहेत त्यावरून

राजश्री फतेसिगबावा याणी व राजश्री पंतप्रधान याणी येसाजी गायेकवाड यासी त्याकडे पाठऊन सागितले की माहा [रा] ज तुमचे स्मरण वारंवार करितात व तुम्हावर फारसे कृपालू आहेत ऐसे कितेक प्रकारें समाधान करून सागितले त्यावरून ते समाधान पाऊन माहाराजाचे सेवेसी विनती पत्र पाठविले व कितेक वचनप्रमाणें करून सेवेचे उमेदवारीच्या गोस्टी सागितल्या यैसीयासी तुम्ही राजश्री स्वामीस विनती करून सेखजीस समाधान पत्र यैसे की कितेक वर्तमान राजश्री येसाजी गायेकवाड अले त्याणी सागितले त्यावरून स्वामी तुम्हावर बहूत संतोषी जाले तेथील कार्य-भागाची सर्व इमारत तुम्हावर आहे उभयेता तुमच्या भरवसीयावर तेथे आहेत तुम्ही कार्य कराल हा भरवसा पूर्ण स्वामीस अहे यैसे कितेक प्रकारे समाधान करून पत्र व माहाराज राजश्री स्वामीच्या चितास अले तरी सेखजीस वस्त्रे उतम उच यैसे अर्ज करून येत ते करणे व पुढेही राजश्री बावास व राजश्री प्रधानपंतास अज्ञापत्रे जातील त्याबराबर त्यासाहि अज्ञापत्र पाठवावे यैसा अर्ज करणे राजेश्री येसाजी गायेकवाड याणी तेथील मन-सब्यानरुप वर्तमान सागितले त्यावरून हे पत्र तुम्हास लिहिले असे तरी लिहिल्याप्रमाणे अर्ज करून पत्रे वस्त्रे येत ते करणे अम्ही राजश्री प्रति-निधी यासी राजपुरीस जावयाविसी सागितले परंतु ते उग्याच धातूपोषणे गोस्टी सागतात की जाऊ परंतु त्याच्या चितात जावयाचे येत नाही माहाराज राजश्री स्वामीच्या चितात असिले की त्या उभयेताकडे याणी जावे तरी कोणी मातबर माणूस व समाधा[न] पूर्वक पत्रे यैसी पाठऊन हे राजपुरीस जात ते करणे हा आसिर्वाद[1]

---

ले. १०८ श्री शके १६५५ मार्गशीर्ष शुा ३
इ. स. १७३३ नोहेंबर २८

श्रीमंत राजश्री पत प्रधान स्वामीचे सेवेसी

सेवक समस्त न्याती चितपावन व प्रभू सणवाई रामक्षेत्र व रामाजी दामोदर सा नमस्कार विनती विज्ञापना आजिनवेल गोवलकोट स्वामीने घ्यावा त्यास खच ( र्च ) लागेल त्यास समस्त न्याथीमधे लक्ष रुपये

---

१ सबंद पत्र माहादाजी अंबाजीच्या हातचें असून 'हा आसीर्वाद' एवढा मजकूर मात्र अंबाजीपंताच्या हातचा आहे.

श्वामीस करून देऊ यास खावद आपण असो छ १ रजब हे प्रमाथी नाम सवछरे १६५५ हे विज्ञापना खावद स्वामी आहेत आज्ञेप्रमाणे वर्तणूक करून आसामी त्रीवर्ग वेगळे करून देऊन हे विज्ञापना

---

ले. १०९ श्री शके १६५५ माघ वाा ३०
इ. स. १७३४ फेब्रु. २२

अपत्ये बाबूराव[1] साां नमस्कार विनति येथील वर्तमान ताा अमावाशा ( माघ ) शुक्रवार परयेत येथास्थित आसे विशश आलीकडे बहुत दिवस जाले आपणाकडील कागद पत्र येऊन वर्तमान कलत नाहीं तर साकल्य लिहिले पाहिजे लक्ष्मीस त्रिबकास पाठविले हे काहीच लिहिले नाहीं ते लिहिणे काली रामाजीपंतासमागमे फौज देऊन आजनवेलीस रवाना केले बाा हजार स्वार व सातशे मावले दिल्हे आपल्यास कलावे म्हणून लिहिले असे खडेसरी घोडी कोकणात पाठविली नाही येथें ठेविली निरोप मागोन कोल्हापुरास जाऊन दिल्हा तरी घोडी हीच पाहिजे न जाला निरोप तरी घोडी वडिलाकडे पाठऊन येथे घोडीस पोटास गवत मिलत नाही मल्हारजी जगदलियाकडील ऐवज वरचेवरी आणून दाणे व हरभरे घेणे धान्याचा संग्रह आसो द्यावा आत्फागिरीची दाडी व बसनातील कपकलस व चिपली ऐसे कोणी येईल त्या बाा पाठवणे बहूत काये लिहिणे लोभ आसो दीजे हे विनति सुभेदारीस तुम्हास ऐवज दिल्हा की नाहीं हे लिहिणे हे विाा वहीनीस बरे वाटत नाहीं म्हणून वर्तमान ऐकिले परंतु आपण काहीच लिहिले नाही ते वृत लिहिणे हे विनति

सेवक दादो मोरेश्वर साां नमस्कार विंनति कृपालोभ असो दीजे हे विनंति

सौभाग्यादिसंपन्न मातुश्री उमयता बाईस साां नमस्कार लोभ आसो देणें हे विनति

---

ले. ११० श्री शके १६५५ फाल्गुन शुाा ११
इ. स. १७३४ मार्च ४

छ मा अनाम देशमूख मोकदम व देशपाडे काा सासवड यांसि

---

१ बाबूराव शामराव अत्रे, फतेसिंग भोसल्याचे ‘ शिकेनीस ’

बाजिराऊ बलाल प्रधान सुा आर्बा सलासीन मया अलफ का मजकुरी पैकी वजन करणें

( ले. ७३ प्रमाणें थोरल्या बाजीरावांचा शिक्का. )

| | |
|---|---|
| वजनी तेलीयांची<br>मापे अलमगिरी आ<br>ठा टकियाची पांच-<br>सेरी करून तेल पेड<br>विकवणे | मालियाचे वजन<br>आठी टकीयाचे<br>करून देणे<br>वाणियास आल-<br>मगिरी च्यार टके<br>सेर पका याप्रो<br>वजने बाधोन देणे |

सदरहू प्रो वजनाची आज्ञा केली आहे तरी तुहीं खुमाची वजने करून देणें याचप्रो मौजे बेलसर का मजकूर येथील हि वजने करून देवणे जाणिजे छ ९ सवाल आज्ञाप्रमाण[१] ( लेखन सीमा )

---

ले. १११ श्री श. १६५६ पौष शुा

इ. स. १७३४ दिजेंबर

राजमान्य राजश्री बाजिराव पंडित प्रधान यांसि

आज्ञा केली ऐसी जे तुम्हीं विनंती पत्र पाठविलें ते प्रविष्ट जालें लिहिला अभिप्राये कलों आला रायगडचे पत्र पाठविलें त्यावरून वर्तमान विदित जाले आपली फौज खालें उतरली हुजरातची फौज उतरावी म्हणोन लिहिलें तरी हुजरात व पंवार छ १० शाबानी पोलादपुरास दाखल जाले पुढें गेलेच असती(ल) तुम्हीं आपले फौजेस ताकीद करून यांस व त्यांस येकत्र करून गनिमास नतिजा देवणें स्वामीनी सर्व प्रकारें भरोसा तुमचाच मानिला असे वरचेवरी लोकांचे व वरकड साहित्य करणें वर्तमान दिन प्रति[दि]नें लिहिणें दाणा गला लस्करास पोहचला पाहिजे त्यास या घांटे जावें तरी मार्गी माहाडाकरिता इकडून वाणी बकालांस जावणार नाही यास्तव तम्हीं पुणें वगैरे जागांचे वाणी यास ताकीद करून वरचेवरी दाणा गला लस्करास पोहचे ते करणें लस्कराची अवाल गल्यामुले

१ 'आज्ञा प्रमाण' निराळे वळणाचें पण ते बाजिराव बल्लाळाचे हातचें नव्हे, यावरून 'आज्ञा प्रमाण' हें म्हणणें खाशाचें नसतें असें वाटतें.

न व्हे तें करणें गला तुम्हाकडूनच पावेल दुसरा इलाज नाही म्हणोन लिहिलें असे वरकड राजश्री अमृतराऊ लिहितील त्यावरून कलेल सुज्ञ[1] आसा

---

ले. ११२ श्री शं[2]. १६५६ पौष शु. २

इ. स. १७३४ दिजं. १६

[3]विनंति उपरी वेठे गडकरी रवाना केले आहेत तुम्हापासी पावलेच असतील सरखेलीकडे यैवजाबदल मुजरत माणसे पाठविली असेत रा संभाजी जाधवासहि यैवजाबदल ताकीद केली असे रा मल्हारपंतास ताकीद केली असे पैका लौकरच येईल त्रिबकराया कडीलहि यैवज लवकरच येईल येसवंतराव भोसल्याकडील बाबेपंत येथे आला त्याकडे रुपये २४००० चोवीस हजार खरे करून त्याचे पत्र चिरजीव नानाचे नावे लेहून घेतले आणि फलटणास सिका करून आणवायास पाठविले आहे सिका होऊन येताच तुम्हाकडे पाठवितो रा फतेसिगबावाच्या दुईच्या गावाविसी लिहिले त्यास त्याचे उतर व ताकीदपत्रें मागून पाठऊन देऊ मल्हारराऊ जगथापाचा मनारोखा पाठविला तो पावला रा प्रतिनिधींनी दरबारी प्रसंग केला ते वर्तमान लिहिले ते कलले रा पिलाजी जाधव यास बरे वाटत नव्हते खरे परतु आरोग्यता जाली असे हे विनति मौजे हिगणी ताा पाटस येथील ताकीदरोखा आनदराऊ भास्करकडे पाठविला आहे कलले पाहिजे हे विनति

छ १ साबान मगलवार

---

ले. ११३ श्री श. १६५६ पौष वाा ९

इ. स. १७३५ जाने. ६

[4]पुा. राजश्री अंबाजीपंत स्वामी गोसावी यासि

विनंति उपरी दतोबा नाईक रत्नपारखी याचे मुदल रुपये २००० दोन हजार देणे आहे व याखेरीज पेसजीचे व्याजाबाबत पंचवीससे सबा एकाहतर खेरीज व्याजी आहेत त्यास आधी तो त्यानी मुदल रुपये

---

१ 'सुज्ञ आसा' हें शाहूच्या हातचें. २ ही मिती पैवस्तीची आहे.
३ पत्र चिमाजी आपाचें हातचें. ४ पत्र बाजिरावाचें हातचें.

आमास सोडून फारखती द्यावी त्यास उचित आहे पूर्वी त्याच्या कार्यास आम्ही अंतर केले नाही आज त्यानी आमास अगदी रुपये सोडून आमास रिणापासून मुग्त (मुक्त) करावे हे उचित आहे तुम्हीं त्यास बोलाऊन आणून फारखती लेहून घेणे कदांचित न आइकेतचसे जाले तर मुदल रुपये मात्र दोन हजार देऊन खेरीज व्याजी पचवीससे सवा एकाहातर देणे आहे ते सोडून फारखती घेणे जर हेहि गोष्ट न आइके तेव्हा दोन हजार देखील काहीच न देणे दोन हजार काढून आपल्यापासी ठेवणे आणि दतावा नाइकास पुण्यास पाठवणे आम्ही आपले हाते त्याचे लिगाड वारून फारखती घेऊन तुम्ही दोन हजार त्याचा यैवज काढून ठेवणे जर आम्ही लिहिल्याप्रमाणे त्याने भिडेने आइकले तर लिगाड वारून टाकणे दतावा नाइकास एक प[त्र] लेहून पाठविले आहे हे त्यास देणे व तुमचे नावे एक पत्र त्यास दाखवावयास कार्यास येई यैसे लेहून पाठविले आहे तेहि त्यास दाखवणे आणि भिडेस घालून कार्य करणे हे विनंति

राजश्री दतावा नाईक रत्नपारखीसी पत्र लिहिले आहे हे त्यास दाखऊन मागती पत्र आपणाजवली मागोन घेणे हे विनंति

छ २२ साबान

---

ले. ११४

श्री

श्रियासह चिरजीव राजमान्य राजश्री माहादोबास प्रती अंबाजी त्रिंबक आसिर्वाद उपरी येथील कुशल ताा छ ६ जमादिलाखर परियेत येथास्थित जाणून तुम्ही आपले वर्तमान लिहिणे राजश्री सर[ल]स्कर येथे अले आहेत याकरिता राजश्री अनंदराऊ रघुनाथ याणी तुम्हास पत्र लिहिले आहे की सातारियास येणे तर तुम्ही येथे येणे दिवाणहि येथे अले आहेत कलले पाहिजे राजश्री सिवाजीपंत मुखवचने सागतील त्यावरून कलो येईल * लोकर येणे रा सिवाजीपतास सनद देऊन रवाना करणे हा आसिर्वाद

---

ले. ११५

श्री

* चिरंजव राजश्री दादोबा[१] यासी चिमणाजी बलाल आसिर्वाद उपरी रा अंबाजीपंत तात्या यास तुम्ही येक दिवस तजविजेने अटकाव

---

१ मल्हार तुकदेव पुरंदरे.

होये ते करून येक दिवस राहावणे तो आम्ही आज रात्री निघोन प्रातः-कालीं तेथे येतो तुम्ही कलेल ते रीतीने समजाऊन आम्ही येऊ तोंवर पुढें जाऊ न देणे आम्ही निछयरूप येतो कलले पाहिजे आसीर्वाद पत्राचे उतर पाठवणें हा आसीर्वाद तात्यास कागद लिहून तुम्हापासी पाठविला आहे तुमच्या विचारे दिल्याने कार्याचा असला तर देणे नाहीतर आह्मास तो राया[1]नी तेथे यावयाची आज्ञा केलीच आहे रात्री निघोन प्रातः तेथे येतो हे आसीर्वाद

---

ले. ११६ श्री

*विनती उपरी चिठी पाठविली ते पावली अर्थ हतीचा कलला त्यास त्याचे उतर पिलाजी जाधव याचे पत्री लिहिले आहे त्यावरून कलो येईल यांत तुमचे उभयताचे विचार येईल त्यास आम्ही रजावद आसो आम्हीहि येका दो दिवसानी येतो लोभ आसो दीजे हे विनती

---

ले. ११७ श्री रा[2]मचद्र

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
अंबाजीपंत स्वामी गोसावी यासी

पो[2]नारो शंकर कृतानेक नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लेखन केले पाहिजे विशेष तुम्ही मसलतेहून सप्त-रुसीस आलेस हे वर्तमान परस्पर कलों आले परतु पत्रीं कांहींच लिहिले नाही तरी ही गोष्ट उचित नव्हे राजश्री पंत प्रधान यांस पत्र लिहिले आहे त्यावरून तुम्हासहि कलेल तरी सविस्तर वर्तमान लेहून पाठविलें पाहिजे मातुश्रीबाई तेथे आहेत त्याची व तुमची भेटी जालीच असेल बहुत काये लिहिणे लोभ आसो दीजे हे विनंति

---

१ राया= बाजिराव सा. * ही चिठी बाजीराव बल्लाळाच्या हातची आबाजीपंत पुरंदरे यांस. २ हा शब्द, निराळ्या वळणाचा असून सचिवांचें हें दैवत आहे, तेव्हां नारो शंकरांचें हातचा असावा.

ले. ११८

श्री

वेदमूर्ति राजश्री रघुनाथभट ठकार व मल्हार जोसी
वास्तव्य सासवड स्वामी गोसावी यासि

पोष्य बाजिराव बलाल प्रधान नमस्कार विनंती येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणे विशेष राजश्री अंबाजीपंत येही साताराहून कृष्णाबराबरी पत्र पाठविले तेथे लिहिले की तुम्ही सासवडास गेलियावरी वेदमूर्ती रघुनाथभट ठकार मल्हार जोसी या उभयतास बोलाऊन आणून याजपासि अनुष्ठानाचे वर्तमान खरे किंवा लटिके यैसे मनास आणणे म्हणून लिहिलें यैसियासि आम्ही सातारा असता या वर्तमानाविशई कोणाचे पत्र किंवा कोणाचा निरोप आला नाही आमचे अदृष्ट सबल आहे व तुह्मासारिखे ब्राह्मणाचा आसीर्वाद आमचे मस्तकी निरंतर असता ये गोष्टीचे कल्पनेचा उद्भवहि चितात येत नाही तरी तुम्ही आपले समाधान असो देणे कोणेविशई चितात संशय न धरणे कृपा असो दिली पाहिजे *लोभ आसो दीजे हे विनंती

---

ले. ११९

श्रियासह चिरंजीव राजमान्य राजश्री धोंडोबा यासी मल्हार तुकदेऊ कृतानेक आसीर्वाद उपरी येथील कुशल ता। छ १३ माहे सवाल परियेत कुशल असो विशेष पुण्याचे मोकामीहून तुम्ही पूर्वी पत्र पाठविले तेथें लिहिले होते की श्रीमत राजश्री पंतप्रधान याजला कर्ज आहे त्याची वाटणी लोकावरी घातली आहे त्यास आम्हाकडेहि पूर्वी ज्याप्रमाणे दिल्ही आहे त्याप्रमाणें द्यावी लागते पूर्वी श्रीरंगपटणचे श्वारीहून आले ते समई कर्ज लोकावरी घातले तेव्हा आम्हाकडे यैवज आला तीर्थरूप राजश्री तात्या यानी आपले यैवजी दाहा हजार रुपये दिल्हे अणी आमच्या बा। मु।चे यैवजी खासगत अडीच हजार आले येकूण साडेबारा हजार रुपये दिल्हे होते त्याप्रमाणे हालीहि कर्जास यैवज द्यावा लागतो म्हणून लिहिले त्यास आम्ही लि। होतें कीं प्रस्तुत यैवज नाहीं पुण्यांत हवाला हर कोण्हाचा घेणें अखेर साली यैवज देऊ त्यास तुम्ही काय केले हे कळले नाहीं यैवज कोठें नव्हता त्यांस तुम्ही दिल्हा किंवा न दिल्हा याची वाट काये केली हे तपशीलवार लेहून सत्वर पाठऊन देणें हा आसीर्वाद

---

ले. १२०

श. १६२६ ज्येष्ठ व. ३०
इ. स. १७०४ जून २१

————————————आबाजी त्रिंबक व कासी विस्वनाथ

———शंकराजी नारायण + + + सन खमस मया अलफ + + + राजश्री रामचंद्र पंडित + + + अडीच हजार रुपये घेतले व राजश्री—स्वामीनी पंधरासे रुपये गुन्हेगारी घेतली यो रुपये ४००० च्यार हजार रुपये यैवज तुम्ही दिवाणात दिल्हा त्याचा सावोत्रा रुपये २४० दोनसे च्यालीस रुपये जाले तो यैवज हुजूर पाठवून देणे या कामास लोक ( पाठविले ) त्यास मसाला रुो खंडोजी गुळवे तु++गंगाराम जासूद रुो १० कलेदार रुो १० सुभानजी घुला सुभा गुणाजी सिंदे रुो १०, येकूण ३० रुपये रास देणे छ २८ सफर पाा हुजूर पत्रा । वधिरयं । भाती । ( या ३ ओळींचा गोल शिक्का. )

सुरु सुद बार *

———

ले. १२१

श. १६२९ फाा व. ३०
श्री इ. स. १७०८ मार्च ११

राजमान्य राजश्री आबाजी त्रिबक व कासी विस्वनाथ पुरंधरे यास नारो शंकर सचीव सुा समान मया अलफ सासवड येथील कुलकर्णाचा + + कथला करून अगदी लिहिणे + + सालास दोन महिने उरले अखेर + + + होणे अद्याप कसबाची खडणी जाली नाही तुमचा कथला काही हुजूर आलियावर खेरीज सदरहू निर्वाह होणार + करिता सालमजकूरी अत्रे याकडे + + + + आहे तसेच असो देणे कथला न करणे खंडणीकारणे गावकरी हुजूर येतील त्याबाा तुम्ही हुजूर येणे येथे निर्वाह करणे तो केला जाईल गावात कथला एकंदर न करणे फिरोन बोभाट येऊ न देणे छ २८ जिल्हेज पाा हुजूर पत्रा वधिरयं भाति ( गोल शिक्का )

सुरुसुद पो छ २ मोहरम

———

* अक्षर वेगळें.

ले. १२२

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य
राजश्री हे + + नामक गोसावी यासि

सेवक शंकराजी नारायेण नमस्कार येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते प्रविष्ट होऊन वर्तमान कलो आले राजश्री बकारपूर्वक यास आणाविले म्हणून कित्येक विशे + + करून लिहिले यैसीयास ++ + + + आम्ही बोलोन निर्वाह केला आहे त्यास अंतराय करावया + क अर्थ नाहीं ये + + चा फड लस्करात + + ता येत नाहीं येका दोहा रोजानी रा पंताजीपंत यासि आज्ञा देऊन ते बाधाटीस जातील ते या प्रांते ठेविलेच + + त गकारपूर्वक यासहि आपणापासी आ+ ती ये गोस्टीचा प्रसंग चालून निर्वाह करितील तुम्ही संदेह मनात आणावा ये + + जो निश्चय जाला तो तुला वारंवार + + + तुलां दुसरा अर्थ अंतःकरणात न धरावा कितेक वृत रा पंताजीपंत याणी लिहिले आहे त्यावरून कलो येईल बहूत[1] काये लिा लोभ असो दीजे नि + + ह गोस्थी असता वारंवार संदेह अंतःकरणांत आणून लिहिता यावरून अपूर्व दिसोन येते कित्येक वृत चिरंजीव रा पंताजीपंत यानी लिा आहे त्यावरून कलो येईल हे बिनती

---

ले. १२३

श्री — श. १६५७ आश्विन शु. ९
नकल — स. १७३५ सप्टंबर १४

माा जानेखान हवालदार दिा राजश्री राणोजी सिंदे यांसी बाजीराव बलाल प्रधान सुाा सीत सलासीन मया अलफ हरगुडे पागारी यांचे रानांत तुम्ही पागा चारणीस आणिली आहे त्यास मौजे पानवडे येथे राजश्री महादाजी अंबाजी यांचे कुरण आहे त्यास काडीचा उपसर्ग न देणे जरी कुरणास उपसर्ग दिल्हा तरी मुलाहिजा होणार नाहीं दुसरा कोण्ही उपसर्ग देईल त्यास तुम्ही ताकीद करणे जाणिजे छ ७ जमादिलवल पाा हुजूर

---

1 येथून अक्षर शंकराजी नारायण यांच्या हातचें आहे.

ले. १२४

श्री

राजश्रीया विराजीत राजमान्य राजश्री
महादाजीपंत स्वाा गोसावी यासी

पो बालाजी बाजिराव नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहिणे विशेष जेजुरीस मल्हारबाचे लेकानी कलागत केली ते समई याजकडील येक दोघे जाया जाहाले हे वर्तमान त्याणी मल्हारबास लिहिले मल्हारबा सावध नव्हते यास्तव ते समई घोडियावर बसून पाटलाचे पारपत्यास चालले हे वर्तमान दोहो प्रहरा रात्री कलले ते समई आम्ही घोडियावर बसून धावलो वाडीचे घाटापासी गाठ पडली मग कैफ उतरला होता काही न बोलता माघारे उज्याडायास घरास काल सकाली आलो इतके वर्तमान जाहाले बहूत काये लिहिणे हे विनंती

---

ले. १२५

श्री

चिरंजीव राजश्री माहादाजी अबाजी यांसि बाजिराऊ बलाल आसीर्वाद उपरी तुमचे प्रयोजन आहे तरी पत्रदर्शनी स्वार होऊन येणे आधी स्वार होणे मग पत्र वाचणे लौकर येणे हे आसीर्वाद

---

ले. १२६

श्री

चिरंजीव राजश्री माहादाजी अंबाजी यांसि बाजिराऊ बलाल आसिर्वाद उपरी हती पाठविला तो पावला हे आसीर्वाद

---

ले. १२७

श्री

चिरजीव राजमान्य राजश्री माहादाजीपंत यासी प्रती बाजिराऊ बलाल प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष सिमगेयाकारणे तुम्हास बोलाविले त्यास पूर्णिमेस यावयासी फावणार नाही तरी प्रतिपदेस तरी अगत्य येणे हे आसीर्वाद

---

१ पुणें–सासवड रस्त्यावरील हल्लीं ज्यास दिव्याचा घाट म्हणतात तो. या घाटाच्या तोंडाशी जाधवाची वाडी आहे. येथें पिलाजी जाधवाची लढाऊ गढी आहे.

ले. १२८ श्री

*राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
माहादोबा स्वांमी गोसावी यासी

पोष्ये बालाजी बाजिराऊ कृतानेक नमस्कार विनती येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष काही आरोग्य तीर्थरूपास जाहाले आहे सर्व रोग दूर करणार ईश्वर समर्थ आहे आपलेहि वर्तमान लिहिणे हे विनती

---

ले. १२९ श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री माहादाजीपंत
स्वामी गोसावी यांसि

पोष्ये बालाजी बाजिराऊ नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष तुम्ही पत्र संतू बराबर पत्र पाठविले ते आज दोन प्रहरास प्रविष्ट जाहाले लिहिले अभिप्राये श्रूत जाहाले तीर्थरूप राजश्री राऊ उद्या अथवा परवा येतील तीर्थरूपास काही बरे वाटते परंतु श्रम गेला नाही इस्वरइछेन जे होणे ते होईल बहूत काय लिहिणे हे विनती हेच सखारामास नमस्कार चिरंजीव धोंडोबास आसीर्वाद

---

ले. १३० श्री श. १६५८ आषाढ शु. १२
इ. स. १७३६ जुलै ८

श्रियासह चिरजीव राजमान्य राजश्री माहादोबास प्रती मल्हार तुकदेव कृतानेक असीर्वाद उपरी आम्ही ता छ ११ रबिलोवल परियेत कुषल आसो विशेष तुम्ही बाबाजी चाकर यासमागमे पत्र पाठविले ते प्रविष्ट जाले बालू ब्राम्हण यांस पाठऊन देणे म्हणून लिहिले त्यावरून पाठविला आसे वरकड वर्तमान तर राजश्री चिटकोवा यास आषाढ सुध द्वादशी गुरुवारी त्रितीये प्रहरी राजश्री स्वामींनी सुरनिविसीची वस्त्रे दिल्ही मुतालकी बहूत ग्रहस्त मागत होते परंतु ते समई कोण्हास सांगितली नाही याउपरी पुढे कारभार होईल तो तुम्हास लेहून पाठऊन राजश्री स्वामींनी तुमचे वेथेची भावना विचारि[ली] कधी येतील म्हणून पुसिले त्यावर आम्ही उतर दिल्हे की माहाराजाचे कृपेकरून ज्वर हीव

राहिला शक्त आद्याप आली नाही शक्त आलियावर माहाराजाच्या दर्शी-नास येतील त्यावर राजश्री स्वामी बोलिले की श्रावणमासी येतील कलले पाहिजे सौवती ठकू सासवडास आद्याप आणिली नाही म्हणून विठोबाने सागितले त्यास माहिरी बहूत दिवस राहावे हे गोष्टी उतम नव्हे तेथ राहि-लियाने खोकला लागतो हे तुम्हास कलतच आहे तरी मूल पाठवून घेऊन येणे फणसाचे बीज सुमार ७० सतर पाठविल्या आहेत त्यापैकी देणे बीा

शंकरभट गर्वां— वदे सुमार १० राजेवाडीस पाठवणे सुमार २०

येकून तीस देणे बाकी चालीस राहातील त्यांचे रोप सासवडी घालवणे तुम्ही वोषध घेऊन आपली वेथा बरी करून घेणे बहूत काये लिहिणे हा आसीर्वाद

पौ छ १२ रबिलावल

---

ले. १३१ श्री श. १६६१ वैशाख–जेष्ठ
इ. स. १७३९ एप्रील–मे

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
माहादाजीपंत स्वामी गोसावी यासी

पोष्ये बालाजी बाजिराव नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहिणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावोन वर्त-मान कलले फिरंगी याचे वर्तमान लिहिले तरी त्याचे घाव डाव तुम्ही जाणतच आहा तेथे आम्ही कोणता विचार ल्याहावा तीर्थरूप राजश्री आपास मातुश्रीबाईनी लिहिले आहे त्यावरून कलेल गोपालाचे पत्र पाठ-विले असे बहूत काये लिहिणे हे विनती मारनिलेचे पत्र मागाहून शाहाण्या माणसाबराबर पाठवितो बहूत काये लिहिणे हे विनती

---

ले. १३२ श्री शके १६६१ भाद्रपद
इ. स. १७३९ सपटंबर

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री माहादाजीपंत
स्वामी गोसावी यांसि

पोष्ये बालाजी बाजिराव नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष नागोजीबराबर पत्र पाठविले ते पावले

काही अटकाव जाहाला यास्तव दशमीस पक्ष करून सेवेसी येतो म्हणून लिहिले त्यास ऐसा गुता कोणता जाहाला तो लिहिणे वाईगी पाठविली ती पावली येकदाच इतकी कशास पाठविली दोहो चहू दिवसा आड थोडीसी पाठवीत जाणे कारभाराचा मजकूर लिहिला म्हटले तर काही ल्याहावया-जोगा कारभार होत नाही जाबसाल कागदीपत्री मात्र होतात वरकड फौजेचा कारभार अथवा मामल्याचा कारभार काही होत नाही रामचद्र-बावा जेव्हा बोलावितात तेव्हा मात्र येत असतात बाबूजी नाइकाचा कार-भार ठीक जाहाला नाही व सरदाराचाही काये काये मजकूर तो अद्याप फुटला नाही बहूत काये लिहिणे हे विनती

---

ले. १३३ श्री १६६१ कार्तिक-मार्गशीर्ष
१७३९ नोव्हेंबर-दिर्जेबर

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
माहादाजीपंत स्वा गोसावी **यांसि**

पो बालाजी बाजिराव नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले तेथे लिहिले की स्मरण करून पत्र पाठविले त्याजवरून जेजुरीहून वियोग जाहाला त्या ता जे दुख जाहाले होते त्याचे निवारण जाहाले नादुरास जाणे जाहाले होते तेथील अर्थ तीर्थरूपाचे मनात कसा आला आम्ही तेथे याव-याविसी तीर्थरूपाचे मर्जीची अगत्य विवंचना करून लिहिणे म्हणून लिहिले त्यास तुमच स्मरण न व्हावे ऐसा तो श्रीगतीने हा काल पावेतो रुणाबंध नाही मग ईश्वरी गत विचित्र आहे असे परस्परे मन साक्ष असता ऐसे ल्याहावयास कारण काये वियोगजनित दुख तो आहेच नादुरचा मज-कूर तरी तेथे जाऊन तुमचा बाग तीर्थरूपानी पाहिला घोडी चरावयास गेली होती ती आ(ण)ऊन पाहिली आम्हास ठाऊक होती त्याची नावे सागून दाखविली कोयाळेचे सिगीची तारीफ फार केली वरकडही येक दोन सिग्या बऱ्याच आहेत ऐसे म्हणाले सेताचा मजकूर काही जाहाला नाही तुमचे मालियास आज्ञा केली की कोवली भाजी मुले सेगा घेऊन येणे त्याणेहि आणून दिल्हे येथे यावयाची मर्जी काही दिसली नाही दोघातिघा सरदारास बोलाऊ पाठविले आहे कारभारास प्रारंभ जाहालिया-

नंतर स्मरण करितील वरकड तुम्हाविसी आम्हासी चर्चा करावी अथवा आम्हाविसी तुम्हासी करावी हा तो अर्थ कललाच आहे मोठा पगडा वासदेव जोसी याचा आहे काल प्रातःकाली उठोन थेवरास जाऊन लोणीस जेऊन माघारे आलो रायाची घोडी फेरून पाहिली आपाचे मते मथुरा कंठमाल आपण घ्यावी ऐसे दिसते आम्हासी बोलले नाहीत चिमणगिरीसी बोलले सिद्बास पुसून मग घ्यावी ऐसे आहे मतवाली लाहान व येखादे वेलेस कलेबाजी करिते मथुरा तो सर्वा गोष्टीने चागलीच आहे असा घोडियाचा मजकूर काये जसे त्याचे मर्जीस येईल त्याप्रा करू मोहनी चागली घोडी जाहाली आहे आज शनवारी सकाली इंग्रजाची भेट जाहाली कुशल प्रश्न मात्र जाहाले बोली पुढे होणे तेव्हा होईल बाबूजी नाईक रुसवाच दाखऊन येतात जातात आज वासदेव जोसी आम्हासी उगेच सहजावारी बोलले की तुम्ही दिवसास निद्रा करू नका शरीर भारी होते आम्ही उतम न निजू असे बहुमानार्थ बोललो याचा अशय बहुधा की बायकोस दिवसाचे न बोलवावे ऐसा दिसतो मस्तानी येथून गेली मोठा संदेह आम्हाविसी होता तो वारला असताही गतवर्षी सारखी निखालसता दिसत नाही न कले काये मनात गुमर आहे आम्ही किमपी दाखवीत नाही हे विनती

---

ले. १३४ श्री १६६१ कार्तिक–मार्गशीर्ष
१७३९ नोव्हेंबर–दिसेंबर

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री माहादाजीपंत
स्वा। गोसावी यांसि

पो बालाजी बाजीराव नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहिणे विशेष रविवारी पत्र पाठविले ते रविवारी आता संध्याकाली पावले लिहिले की तपशील लिहिता तपसीलच आहे धैर्य धरावे तदनरूपच स्वामी करतील पुढेहि दिनचर्येचे वर्तमान ल्याहावया योग्य असेल ते ल्याहावे म्हणून लिहिले ऐसीयास आज सकालपासून कृपेकरूनच भाषण करतात विचारे पाहाता संशयाची जागा उरली आहे ऐसे नाहीं पुढे दिसेल ते लिहून पाठऊ वर्तमान ल्याहावया योग्य असेल ते ल्याहावे ऐसी व्यवस्था करून ल्याहावे ऐसा रुणानबंधच नाही आजचे दिनचर्येचे वृत तर प्रातःकाली आम्ही व आपा घोडियावर बसून सिवराम-

भट चित्राव याचे दर्शनास गेलो देवलापासी बसलो होतो तेव्हा तीर्थरूपानी वर्तमान सागितले की नारायेणजीसी कितेक जितके मनात रागाचे पर्याय आहेत तितके बोलतो शेवटी सागितले की तुम्ही नाइकासी न बोलणे नाना आम्ही बसून विचार करून सागू ते बोलणे ते बरे म्हणून घरास जाऊन घरगतीने ह्याच गोष्टी नाईकासी बोलून काईल केले तेव्हा त्याणी त्या गोष्टी मनात आणून निकाल काढला की गोविंदपंताचे तो हवाला सहसा न करावी दुसरा चितास येईल तो कमाविसदार करून त्यास सागावी जुनी तो त्याजकडे आहेच तेणेप्रा तीर्थरूपानी मान्य केले पुढे ठहरेल ते लिहून पाठऊ यात गोविंदपंताचा मात्र बच्याव नाही परतु केवल त्याचेच आईकिले ऐसे जाहाले नाहीं इतके वर्तमान जाहाल्याउपर घरास आलो हबश्याकडील हिशेबी कलमे दुतर्फाचे तंटामुले राहिली होती त्याविसी दोन घटका बोलणें जाहाले श्नान केल्यानंतर सुभेदार आले भोजन केले भोजनोतर बसलो रिकामे स्वारीतील वर्तमान त्याणी सागितले वरकड काही बोलणे जाहाले नाही निरोप घेऊन नादेडास गेले उद्या येतो ऐसे बोलले तदोतर निद्रा जाहाली तिसरा प्रहर वेकटरायानी मनसबा सातारा लिहिला होता तो ऊ ट कून विस्तारे गोविंदपंत बोलले त्यात सिधात की कु ला रु ली ठेऊन तह करणे तर अगत्यास करावा उतम तो न करावा बहूत खर्च न होता मातबर कामे होतात इतका सारांश इग्रेजाचे बोलणे जाहाले नाहीं सध्याकाली रामचद्रजी व राणबा आले दर्शन मात्र जाहाले येका दोहो दिवसात मल्हारबाहि येतील आवजी कवडे आल्याउपर मामले–गिमले विल्हे लागणे ते लागतील येणेप्रो काल रविवारी वर्तमान जाहाले तुमच्या का(बा?)यका आल्या की नाहीं काय स्वकीय वर्तमान ते लिहून पाठवणे रवाना सोमवार प्रात:काल बहूत काये लिहिणे हे विनती केशर दोन तोले पाठऊन देणे हे विनती

---

ले. १२५ श्री १६६१ कार्ति– मार्गशीर्ष
१७३९ नोहेंबर–दिजेंबर

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
माहादोबा स्वामी गोसावी यांसि

पो बालाजी बाजीराव नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहिणे विशेष कालच्या दिवसा राणबाचे घरास

गेला होता बाबूजी नाइकाचा मजकूर पुसिला रामचद्रबावानी सागितले की प्रसंगोपात पाच सात त्यापासून घ्यावे आणि सर्व मामला हवाली करावा त्याप्रो भोजनोतर आबाजी नाइकासी बोललो की बाबाला लाख रुपये देणे तुम्हा वेगल इतका पैसा कोणास देवत नाही यास्तव सर्व मदार तुमचे ऐवजावर आहे त्यानी उतर केले की विचार करून सागतो अतःपर मामला द्या म्हणजे जे मिलतील ते देऊ ऐसे म्हणतीलसे दिसते तुम्हास कलावे म्हणून लिहिले असे इग्रेजाचा मजकूर परवा दृष्टीस पडला की दोन परगणे द्यावे निदान दीड द्यावा ऐसे दिसते वेकटरायाचे सागण्यावरून आपाचे मनात आले आहे की येक परगणा घेऊन तह केला तर करावा नाही तर न करावा ऐसे मनात आणिलें आहे रामचंद्रजी वगैरे कारभारी याचे मते तो हर तजविजेनें तह करावा मग चितास येईल तेव्हा गोवे घ्यावे गोवे घ्यावयास कुकुरुली(?) लागत नाही ऐसे आहे होईल ते लिहून मल्हारबा आले नाहीत मामले विल्हे लावावयाचा कारभार आवबा आल्यावर होईल अद्याप काही नाही हे विनंती रा बुधवार प्रातःकालाच्या दोन घटिका दिवस हे विनंती

---

ले. १३६ श्री श. १६६१ कार्तिक मार्ग.
इ. स. १७३९ नोहेंबर दिसे.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
माहादाजीपंत स्वामी गोसावी यासि

पो बालाजी बाजीराव नमस्कार विनति येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहिणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले केशर पाठविले ते पावले वाईगीहि पावली साधल विशेष मजकूर लिहजेसा नाहीं तुम्हीहि येणें काल आपा म्हणाले की माहादोबा का आले नाहींत कधीं येणार तुम्हास कलावे म्हणून लिहिले असे हे विनती पो छ १२ रजब

---

ले. १३७ श्री श. १६६१ चैत्र व. ११
स. १७३९ एप्रील २२

१ तहनामा श्रीमंत राजश्री बाजीराव पंडित प्रधान यामध्यें बनाव बेहुजुर राजश्री वेंकटराव व राजश्री दादाजीराव राजश्री——राव प्रधान

यांचे सरदार व अंतान कार्नेर दे अलकाइव व जुजे पेद्र यमाऊस यख्तयार फिरंगी अमल जंजिरे गोवा तेरीख २४ मोहरम सुहुर सन तिसां सलासीन मयां व अलफ ० श्री ˘ । श्री व्यकटेश— । तास
——। न मुद्रा व्यकटराव । स्य जयते— । मुद्रिका ।
( या सहा ओळींचा लांबट गोल शिक्का. )

१ तपे साष्ट व बारदेस फिरंगियाचा तेथील कोटे व फलफुट (फिरं)गियांनी भोगावें यास्तव मुलुकामधील फौज उठवावी म्ह(ण)जे गावगन्ना जो दिवाण म्हासुल वसूल देत आहेत त्यापैकी दर सदे ४० चालिस राजश्री ——राऊ प्रधान यासी ( द्यावी ) क(लम१) -

१ साष्ट व बारदेश लस्कर पाइमालीखाले खराबी जाला मुलुकनीं बद्दल फिरंगी कौल देती(ल) तेणेप्रमाणे राजश्री—राऊ प्र(धाना)ही व अमलदाराहीं चालवावें. कलम येक

१ खोर जुवें व पनले दान ही गाव भोसले यास द्यावे व हसुरफी दर सालीना फिरंगियांस द्यावें यैसा करार सी ( ) मुदतीमध्ये केला होता त्या असुरफी मना म्हणून फी(रोन) कागद घ्यावा. कलम येक

१ फोडे मुलुकामध्यें राजश्री—राऊप्रधान यांचा अम ( ल चालि ) ला आहे तेथें गोवें प्रातांतील उदमी साहुकार लोक जा( तील ) येतील त्यांस व वितविशये उदमीं जिनस आणितील त्यास उपद्रव होऊं नये सालाबादप्रमाणें जकात घ्यावी मार्गानें जो जिनस येईल जाईल त्यास सालाबाद प्रमाणें चा(लवावें) जाजती जलल होऊं नये कलम येक

१ राजश्री—राऊ प्रधान यां दिमतीचा जो मुलुक असेल ( ) फिरंगीयांतर्फेनें उपसर्ग होऊं नये व फिरंगी यांच्या (मुलु)कास राजश्री ——राऊ प्रधान यांकडून उपसर्ग लागो ( नये ) कलम येक

६

येणेप्रमाणें सहा कलमें श्रीमंत राजश्री राव———प्रधान याचा व फिरंगियाचा तह जाहला याप्रमाणें दुतर्फा चालवावें जाणिजे छ मजकूर सेखन । सीमा । ( गोल शि. )

---

१ हें पत्र कै. इ. सं. पांडुरंगपंत पटवर्धन यांच्या संग्रहांतील आहे.

ले. १३८ श्री श. १६६१ माघ व. ६
इ. स. १७४० फेब्रु. ७

आसीर्वाद उपर नासरजंग याचा विचार शाहागडाकडे जावे तिकडे सुलतानजीस सामील करून घ्यावे यैसे आहे परंतु शाहागडास जावयास आठ रोज लागतील तो येखादे दिवसी सलाबत मानमार्ग पाहून बसवीत आहो गंगातीरास जाऊन गंगातीरानेंच चालावे यैसा त्याचा अर्थ आहे माहाराज राजश्री——स्वामीपासी कोणी त्याची आवाईची खबर लागेल त्यावरून काही विचार चितात येईल तर याचेविसीची कालजी माहाराजानी चितात आणावी यैसे नाही माहाराजाचे सेवक आहो त्यास वाव खाऊ देतो यैसे नाही रा फतिसिगबावा व रा रघूजी भोसले यास येथून पत्रे पाठविली असेत माहाराजहि आज्ञापत्रे परभारे पाठवितील तर उतमच आहे नाहीतर खावंदाचे पुण्ये सेवटास लावणे तैसे लागेल छ १९ जिलकाद गुरुवार प्रातःकाल प्रहर दिवस हे आसीर्वाद पैठण जालनापूरचे कापड लक्ष्मणरायानी रवाना केले ते पावले की नाही लिहून पाठवणे हे आसीर्वाद

---

ले. १३९ श्री श. १६६१ माघ व. ६
इ. स. १७४० फेब्र. ७

आशीर्वाद उपर आम्ही शहरचे पूर्वेस उतरेस राहिलो होतो नासरजंग परवा मंगलवारी शहरचे व डोगराचे मधून शहर डावे टाकून पाहाडसिगपूर यावरून तिसगावाजवल येऊन राहिला होता काल बुधवारी तेथून कूच करून खराडी प्रा वालूज येथून दोन कोस पूर्वभागी येऊन राहिला आम्हीहि कूच करून पाठीवर बाजूने चहूकडे चालून आलो संध्याकाली मुकाम जाला शहरापासून हा जागा पाच कोस आहे आम्ही आद कोसाचे अंतरे राहिलो आहो मल्हारबा राणबा डावे बाजूस सुभेदार तोडावर राहिले आहेत आज बुधवारी कूच करील न करी पाहावे शेहरासजीरा वैरणीमुळें त्यास वैरणीचे उपास घोड्यास पडले यास्तव शालू कापून चारावे या विचारे शहर सोडून आला आहे आश्रा सोडून आला हे गोस्ट आमच्याहि कार्याची यास्तव काल झिटपिट केली नाही आजपासून हमेशा जवल चहूकडून चालोन जेथे जराभर मराठे तोड काढतील तेथे

रेच मोडून आत घालू म्हणजे येखादे समई अवसान खता होईल तैसेच अडचण खल्या ओढे लागतील तेथे तोफखाना तोफा चालावयास त्यास अडचण पडेल तैसेच ढासणे करोलापासून धरऊन ढिगात मार देत जाऊ ढिगात मार दुरुस्त बसेल याप्रमाणे साऱ्या दिसात तीन कोस च्यार कोस फार तर चालेल येखादे दिसी रान खलपाचे लागले म्हणजे जरबेत येईल माहाराजाचे पुण्यप्रतापे जरबेत आणितच आहो राजश्री स्वामी वर्तमान विच्यारतील विदीत करणे साऱ्या फौजा कुमकेस पाठवितील तर सा सुभे दक्षण मोकली व्हावी यैसा समय आहे हे आसीर्वाद रा छ १९ जिलकाद गुरुवार प्रातःकाल

---

ले. १४० श्री दत्तात्रेय

राजश्री प्रधानाकडल जाब माहाराजास विनंती केली

गाईचा जाबसाल प्रधानाचे तरफेचा ऐसा केला कीं कांहीं गाई बांड्यास दिल्ह्या बाकी शंभर आपले हवाला करूं केल्या त्या जेजुरीपासी कुरणा[त] ठेविल्या होत्या त्या बरगामुळें मेल्या हली देशात मिळत नाही काही की आणाव्या त्यास कोठे तऱ्ही मेलऊन आणून मरजी आसलियां दिल्ह्या जातील

त्याउतर आज्ञा जाली कीं आमच्या जिवंतच आहेत मेलऊन आज्ञास आणून द्याव्या हे उचीत

आम्हा पूर्वी गाईचा मजकूर महिपतरासी रागे रागे केला होता शमन केला १

विनती केली की या साली पुण्यांत आसावें कदाचित नासरजंगाचा मजकुराचा जाब जसा तो आपणासी वर्तेल तैसे आम्ही वर्तूं आम्ही आपले तरफेने बिगाड न करूं १

लग्नाचे मजकुराचा जाब साहेब सर्वांस वडल साहेबी लग्ने करावी आम्ही सेवक सेवेसी हाजीर आसों १

दिडा लक्षा मजकूर औसा केला कीं मुबादला गल्यावरी हात ठेवल्याप्रमाणें द्यावा रुा देऊ याचे उतर जालें रुा आमचे न तटावे जेथे आसू तेथून पत्रे लिहीत लिहीत जाऊन उतर दिल्हे की उतम १

दोनही पागांचे चालवायास आतर न होईल विनती केली उतर जाले उतम १

माहाराजाचे चितांत कीं आम्हा

गाचा सुलह जाला तरी पुढे जिकडे जाणें तिकडे जाऊ जे समईं जेथें माहाराजाचे पत्र येईल तेथे हजीर आसों आज्ञा केली उतम

रघोजीबावानी येक साल हैराण करून पैका दिल्हा त्याची तारीफ माहाराज करतात आम्ही पैका देऊन चऊ वरसाचे हवाले घेऊन मुजरा नाहीं हवाल्यांस हफ्ते लाऊन सालाचे सालात द्यावे ज्याचा त्यास पैका पैका वेले सालाचे सालांत आज्ञा केली की साले लाऊन वराता देणे आम्हास आज्ञा केली त्यावरी बोलले रघोजी बावानी आम्हास हैराण केले आपला ग्रहभंग होयास मूल रघोजी बावा जाले बरें रुणानुबंध प्रमाण तिघातून येकाने हुजूर राहावें आमची वासना हेच आहे तरी आमचा विचार तरी आम्ही पुर्ते येकातांला शामील नाहीं किंवा लोकातात चाकरी करितों माहाराजाचे मर्जीप्रमाणें वर्तणूक केली जाईल उतर दिल्हे कीं त्या घराइतका श्नेह आमचा कोणाचा आहे आतां चौघातून येकजणें राहयास चिंता काये राहिली यावरी खिलवंतात बाहेर तेच आहेत दुसरा कोण आहे

येणेंप्रमाणें जाब करून सेवेसी आलों आपण येवतेश्वरास गेले म्हणून चिरंजीव सेवेसी पाठविले आसेत जवाब बहूत मर्जी खूश राखून घेतले विस्तारें चिरजीव विनंती करतील आमचा सकल्प माहाराज सातारियास जातील तेव्हां यावें यास्तव न अलों

---

ले. १४१ श्री श. १६६२
इ. स. १७४०

*राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री माहादाजीपंत स्वामी गोसावी यांसि

पोष्य बालाजी बाजीराव कृतानेक नमस्कार विनती उपरी येथील कुशल ता। दशमी प्रातःकालपर्यंत जाणून स्वकीये आगमनार्थ लेखन केलें पाहिजे विशेष हा कालपर्यंत तीन पत्रे पाठविली व तीर्थरूपाचीहि हेच मर्जी आहे जे तुम्ही गेला होता तेहि काही कोट घ्यावयास गेला नव्हता

येकदा माथ्यावर जावे बाहेर आले तरी त्याजवर मेहनत करावी कोटा-पासी न जावे येक रात्र राहावे दुसरे दिवसी यावे ऐसाच सिधात सर्वांचे विचारे करून तुम्हास जावयाची आज्ञा केली असो तुम्हाकडील पायच्यानी कोटापासी अडकिविले अडकलेस मेहनत केली अणखी च्यार दीस राहिला मेहनत केली परका विचाराने काम कारागार होतेंसे दिसत नाही ऐसे असोन ज्ञानलवदुर्विदग्धाचे विचारे हला ( हक ? ) करावी तो विचार चितात आणून तेथे राहावे व इरे चितात आणावी हे गोष्ट आह्मा दक्षणी लोकास युक्त नाही तुमचे विचारे तो हला न करावी हे आहे परंतु अल्पबुधी समागमे करून किमणी(पी) येलगाराचा विचार न करावा सिक्षा लिहिली असे तुम्ही तो सर्व मानमार्ग जाणता परतु आम्हा लोकी सुचितार्थाचा लेखन करावे येलगाराने काम होतानी तोफा जोडून राखाव-याचे सामर्थ्य नाही दिवसे दीस तो बळावतो व आपण उणे होतो व उपास ऐसा प्रसंग असता किमणी (पी) तेथे मर्दानकीचे काम नाही हे सर्व तुम्ही जाणतच आहा परतु आम्हासहि कळते म्हणून ल्याहावे कृपा केली पाहिजे हे विनती

---

ले. १४२ श्री

विनती उपरी तीर्थरूपाची मर्जी ऐसी आहे जे जेणेप्रमाणे तुम्ही भिडलां आहा तेणे प्रमाणें रात्रीस राहावे पुढे जैसी आज्ञा करणे तैसी केली जाईल आज रात्रीस खबरदारीने तेथेच राहावे ऐसा विचार येथील आहे हे विंनंती आमचे विचारे ऐसे आहे जे मानमार्ग पाहिल्यास तेणेप्रमाणे वर्त-णूक केल्यास बोल लागणार नाही येथील विचारावर नव जाणे उतम तिघाचे विचारे दिसेल ते करणे हे विनती

---

ले. १४३ श्री

आसीर्वाद[1] उपरी तुम्ही पत्र लिहिले ते पावले लिहिला अर्थ अवगत जाहाला गनीम भारी व मोर्चे बसत नाही पाण्याचे साहित्य नाही ऐसा अर्थ लिहिला तो विदित जाहाला यथार्थच आहे अत:पर तुम्ही उठून येणे मेढ्या पावेतो गेला हेच फार जाहाले बदरावर उतरू देतील न देतील हाच भ्रम होता परंतु तुम्ही जेथ पावेतो इलाज होता तेथपावेतो लागला अत:पर येणे हे आसीर्वाद

---

१ पत्र नानासाहेबांच्या हातचें.

ले. १४४ श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री माहादाजी—
पत स्वामी गोसावी यासी

पोष्ये बालाजी बाजीराव नमस्कार विनंती येथील वर्तमान ता। प्रहर दिवसपर्यंत येथास्थित असे विशेष आपण माणकोपंताबराबर पत्र पाठविले ते पावोन वर्तमान अवगत जाहाले व तीर्थरूपासहि विदित केले त्याचीहि मर्जी हेच आहे जे गनीम बलावत चालला व आपले सामान तोफा राखावया योग्य नाही म्हणून लिहिले ऐसियास हे गोष्ट यथार्थच आहे तुम्हास तीर्थरूपानी यावयाविसी पत्र पाठविले आहे ते पावलेच असेल अत:पर हला केल्यास हस्तगत होत नाही हलेचा आब राखून तरी यावे हाला न करावी हेच मर्जी स्वामीची आहे आता तेथे राहू नये किमपि कार्य होत नाही येथीलहि यावे हेच मर्जी आहे अतःपर स्वामीचे आज्ञेची वाट न पाहाता सत्वर यावे दर्शनांती येथील विचार कलेल कृपा केली पाहिजे हे विनती

---

ले. १४५ श्रीगणेशायन्मा: शके १६६२
इ. स. १७४०

राजमान्य या विराजित राजश्री जगं[ना]थ शामराज कुलकर्णी मौजे कोंढीत करयात सासवड यांस हरी सिंदे वलद राजश्री राघोपंत गुा देशमूख सरकार आशेर सन हजार ११५० कारणे आपली बायेको सालपियाहून पलोन बेफंदी करून तुम्हासमागमे मौजे मजकुरास अली मग आम्ही तिच्या शुधीस पुणियास अलो तिजला माघारे न्यावयास लागलो परंतु ते राजी होईना मग पंचात न्यायेमधेस्त राजश्री पाडावा नाईक वाडेकर व सभाजी मल्हार ढेकणे पडोन करार किमत रुाये ७५ पाऊणसे केले ते आपण घेतले तुम्हासी काही दावादंड राहिले नाही आम्ही राजी होऊन सदरहू पैका घेतला मातुश्री जीउबाईसीहि कांही दावाधका राहिला नाही आपले कोन्ही भाऊबंद व आई व सासरा हरीपंत

ले. १४२ ते १४४ अखेरचीं पत्रें कोणत्या मोहिमेसंबंधींचीं आहेत याचा निर्णय होत नाहीं. नासरजंगावरील स्वारी संपऊन चिमाजी आपा व नानासाहेब अंग्रेबंधूंचा तंटा तोडण्यास कोकणांत गेले, त्यावेळचीं हीं पत्रें असावींत असें वाटल्यावरून तीं येथें दिलीं आहेत.

तगादा कर[णार] नाहीं त्यास माझा मी समजावीन हे खरदीखत लिहिले सही बिा सभाजी मल्हार

साक्ष

धनजी जाधव १
राजी सितोले मौजे पाटस १
पाडाबा नाईक वाडेकर १
भवानी बाबूराऊ मौजे पिपलगावकर दिा कालोजी सोमवसी

---

ले. १४६ श्री

छ २७ सफर

*तीर्थरूप राजश्री बाबा स्वामीचे सेवेसी

अपत्ये चिमाजीने कृतानेक साष्टांग नमस्कार विनती उपरी येथील क्षेम ताा छ १८ सफर स्वामीचे आसीर्वादे सुखरूप असो विशेष चितपावन कऱ्हाडे ब्राम्हण यासी देवरुखे यानी आपले घरीं जेवावे म्हणून कथला केला ते सविस्तर वर्तमान स्वामी येथें होते ते समईचे स्वामीस ठावकेच आहे स्वामी येथून गेल्यावरहि फिरोन देवरुखे याची मनसुबी येथें राजश्री स्वामीपासी आली होती राजश्री स्वामीनी मनसुबी करावी ते न केली आणि शामलास कागद लेहून दिल्हा की पहिल्यापासून जे चालत आले असेल त्याप्रमाणेच चालवणे यैसे पत्र देऊन कोकणात पाठविले त्यावर चितपावन व कऱ्हाटक ब्राम्हण यानी स्थलास्थलास ब्राम्हण पाठऊन स्थलोस्थलाची शामलास पत्रे आणिली की देवरुखे याच्या घरी भोजन करू नये यैसी पत्रे आणली त्यावरून शामलाच्याहि मनात मनसुबी येऊन गेली परंतु देवरुखे यानी औरंगाबादेस यादव भट कोराने आहेत त्याचे मात्र पत्र शामलास आणिले की देवरुखे याच्या घरी भोजन केल्यास दोष नाही यैसे पत्र दिल्हे ते ते तहकीक करावयासी शामलाने आपली माणसे बाा देऊन दोघे ब्राम्हण चितपावन व कऱ्हाडे दोघे जण व देवरुखे पाचजण देऊन तेथे पाठविले आहेत आणि चित्तपावनास शामलाने सागितले की तुम्ही औरगाबादेस जाऊन यादव भटाने पत्र दिल्हे आहे ते लटके करून त्याचे दुसरे पत्र आणणे म्हणिजे कजिया फारिक जाला याकरिता चित्तपावन व कऱ्हाटक यातील दोघ तिघ ब्राम्हण सारे

ज्ञातीने मिळून पाठविले आहेत हे सविस्तर वर्तमान सागतील व कागदपत्र जे याजपासी आहेत तेहि दाखवितील तो सविस्तर अर्थ चितात आणून या ब्राम्हणास ज्याप्रमाणे कागद्पत्र पाहिजेत त्याप्रमाणे करून देविले पाहिजेत सारांश ज्ञातीचा धंदा आहे स्वामीनी येविसी मन घालून कार्य करून दिल्हे पाहिजे चित्तपावन दोघे ब्राम्हण स्वामीकडे आले आहेत हे सर्व ज्ञात आपल्यापासी आली यैसे चितात आणून कार्य करून दिल्हे पाहिजे नवाब निज्यामनमुलुक याचाहि कागद् पत्र या मनसुबीचा स्वामीचे विचारे होईल तैसा करून दिल्हे पाहिजे बहुत काये लिहिणे कृपा केली पाहिजे हे विनंती

---

ले. १४७ श्री श. १६६२ आषाढ वा। २
इ. स. १७४० जून ३०

श्रियासह चिरंजीव राजमान्य राजश्री धोंडोबास प्रती माहादाजी आंबाजी आसीर्वाद् उपरी आम्ही ता। छ १६ रबिलाखर परियेत कुषल आसो विशेष राजश्री स्वामीनी आषाढ सुध द्वादसी बुधवारी श्रीमत राजश्री नाना स्वामीस पेशवाईची वस्त्रे दिल्ही उतम प्रकारे बुहुमान केला हे वर्तमान पूर्वीच तुम्हास कळले आसेल साप्रतहि लिहिले असे याउपरी पूर्वी तुम्हास व राघो निबाजी यांस ( अपूर्ण ) पौ। छ १८ रबिलाखर

---

ले. १४८ श्री श. १६६३ मार्ग. वा। ५
इ. स. १७४१ दिजं. १६

*श्रियासह चिरजीव राजश्री धोंडोबा व नाना यासि माहादाजी अंबाजी असीर्वाद् उपरी येथील वर्तमान ता। छ १८ सवाल मुकाम येद्लाबाद् येथास्थित असे विशेष आम्ही व समस्त मंडळी सुखरूप असो तुम्ही आपणाकडील कुशल वृत लेहून पत्र पुणियासि राजश्री रामाजी मल्हार चिटनीस याजपासी पावीत जाणे ते आम्हाकडे पाठवितील तर सविस्तर वर्तमान लेहून पाठवणे श्रीमंत अपास कैलासवास जाहाला

---

१ सबंद् पत्र चिमाजी आपाच्या हातचें द्वित्त 'त्त' व एकेरी 'त' लेखक सारखाच काढीत असल्यानें 'चित्तपावन' कां 'चितपावन' याचा निर्णय या पत्रावरून होऊं शकत नाहीं. बाकी मोडींतल्या ऐ. पत्रव्यवहारांत कोठेंच द्वित्त अक्षर नसतें.

यामुळे कितेक चोरचरिट अवाडाव करितील यास्तव सावध राहाणे बहूत काये लिहिणे लोभ असो दीजे हे असिर्वाद पौ छ २८ सवाल

---

ले. १४९ श्री श. १६६३ जेष्ठ शु. १२
इ. स. १७४१ मे १७

*श्रियासह चिरजीव राजश्री धोंडोबा यांसि माहादाजी अंबाजी आसीर्वाद उपरी येथील वर्तमान ताा छ १२ रबिलवल मुकाम ढवलपूर चमेल उतरतील येथास्थित असे विशेष तुम्ही पत्रे पाठविली ती पावोन वर्तमान सविस्तर कळले इकडील वर्तमान तर गतवर्षी अतरवेदीत फौजा जाऊन मुलूक खराब केला होता त्याप्रमाणे अवदाहि फौजा येऊन मुलूक लुटितील याकरिता पातशहानी कूल लाहान मोठे अमीर सवाई जयेसिग यासी सामील करून सवाईजीस रवाना केलें मातबर जमावानसी आगरियासी आले प्रयागचा सुभा अमीरखान व अयोधेचा सुभा मनसूर आलीखान यासीहि पातशाही हुकूम गेले की सवाईजीस सामील होऊन गनीम अतरवेदीत न ये ते करणे म्हणून हुकूम केला त्यावरून तेहि फौजा जमा करून सवाईजीस सामील व्हावया करिता गंगेस नावाचा पूल बाधोन येणार हे वर्तमान श्रीमंतास कळताच राजश्री मल्हारजी होलकर व राजश्री राणोजी सिंदे यासी बोलाविले तेहि आले अमीरखान व मनसूर आलीखान सवाईजीस सामील व्हावयासी येतात त्यासी पायेबंद द्यावा हा विचार करून राजश्री अवजी कवडे व गोविंद हरी यासी व आणीकहि कितेक पथकास येमुनेच्या दक्षण तीरे प्रयाग पर्येत पाठविले हे फौज तिकडे गेली हे जाणोन मनसूर आलीखान भागीरथी पलीकडेच राहिले व अमीरखानहि सलाबतखान भागीरथी तीरी नावाचा पूल बाधोन राहिले हा विच्यार सवाईजी[नी] पाहिला आणि मनसबा केला की प्रयागचा सुभा व अयोधेचा सुभा हे काही सामील होत नाहीत आपणच कलह करावा तरी काही पुरी पडणार नाही हा विचार ध्यानात अणून सलूखाचा पेगाम करून आपामल यासी पाठविले व भेटीचा पेगाम लाविला त्यावरून बुलगियात राजश्री पिलाजी जाधवराऊ यासी ठेऊन राणोजी सिंदे मलारजी होलकर व पवार हे समागमे घेऊन मुकाम मजकुरास आले सवाईजीहि अगरीयाहून कूच करून येथे आले छ ७ रावळी सवाईजी आपल्या लस्कराबाहेर

आले श्रीमंतहि लस्कराबाहेर निघोन भेटी जाहाल्या त्यावर श्रीमत सवाई-जीच्या डेरीयासी गेले होते व श्रीमंताच्या डेरीयासीहि दुसरे दिवसी सवाई-जींहि आले होते साराउष श्रीमंताच्या दैवास उपमा दुसरी आहे येसे नाही येविसीचा विस्तार कोठवर ल्याहावा सविस्तर भेटीनंतर कलेल वरकड वर्तमान तर समस्त मडली सुखरूप आहेत दुर्गोजीबावा व गंगाजी सटवोजी व आपाजी चिमाजी पाटील सुखरूप आहेत तीर्थरूप राजश्री अन्या व भाऊ व चिरंजीव बाबाजी व सखोबाचा लेक बापू सरनाईक व नरहर जिवाजी व निंबाजीपंत सखारामपंत बोकील व आपाजी देसमूख व यादवराऊ व नारोबा गपचूप वगैरे समस्त मडली सुखी आहे सिवजी पाटील याचे पुत्र संताजी पाटील यासी गुडघियाजवल गोली रवेच्या गावची लागली आहे जखम थोडी आहे जीवभये नाही वरकड समस्त सुखरूप आहेत जानो निबाजी सुखी आहे बहूत काय लिहिणे लोभ असो दीजे हे आसीर्वाद

पौ छ १५ राख(र)यकमास तीन दिवसी कागद दाखल जाला

---

ले. १५० श्री श. १६६४ माघ वा। ४
इ. स. १७४३ फेब्रु. १

*श्रियासह चिरजीव राजमान्य राजश्री धोंडोबा यासि

माहादाजी अंबाजी आसीर्वाद उपरी येथील वर्तमान ता। छ १६ जिल्हेज मुका(म) प्रयाग श्रीगंगादक्षण तीर येथास्थित असे विशेष इकडील वर्तमान तरी श्रीमत ग्वालेर प्रांते आले तेथील बदोबस्त करणे तो करून पटणे प्रांते जावे या उदेशे बुंधेलखडात आले पुढे पटणे प्राते न जाता प्रयाग कासी ही क्षेत्रे जवल जाणोन मजल दर मजल मुकाम मजकुरास आले येथे त्रिवेणी संगमी श्नाने जाहाली तीर्थविधादिक सकल तीर्थविध उतम रीतीने जाहाला प्रयागचा सुभाहि बहुत बाजीद नावा दिल्ह्या बहूत लोक नावात बसून प्रयाग किल्यावजळ श्नाने करून प्रयागवडाचे दर्शन करून आले साराउश पाऊण लाख फौजेनसी जाऊन प्रयाग श्नान करणे हे कर्म या पूर्वींहि जाहाले नाही व पुढेहि होणे दुरोपस्त श्रीमंताचे अपार पुण्य तत्प्रभावे-करून सर्वांस गंगात्रिवेणी श्नान जाहाले या पुण्याच्या अपार रासी जाहा-ल्या पूर्वींचेहि पुण्य फार आणि हेहि विशेष जाहाले असो येविसीचा

विस्तार काये लिहिणे ईस्वरी कर्तुत्व विचित्र आहे वरकड प्रस्तुत्व लिही-जेसे नाही पुढे होईल ते लेहून पाठऊ तुम्ही सदैव आपणाकडील सविस्तर लिहित जाणे वरकड या पत्रापूर्वी पत्र लिहिले आहे त्याप्रमाणे कामकाजे किरकोल करणे बहूत शहाणपणे घरचा बदोबस्त करणे व श्रीमत राजश्री भाऊ याचेहि सेवन करणे वरकड ल्याहावेसे नाही जे लिहिणे ते लिहिलेच आहे बहूत काये लिहिणे लोभ असो दीजे हे असीर्वाद

पौ छ २९ मोहरम

---

ले. १५१ श्री

*चिरजीव राजश्री नानास माहादाजी अंबाजी आसीर्वाद उपरी तुम्हास लष्करास न्यावे हे आमचे पूर्ण मानस होते परंतु तीर्थरूपाची पत्रे दोनतीन अली व तीर्थरूपानी श्रीमत राजश्री नानास व राजश्री पिलाजी जाधवराऊ यासीहि लिहिले आहे यास्तव तुम्ही अवदाचे च्यार महिने घरीच राहाणे अगोटीपासून तुम्हास श्रीमंतापासी ठेऊ पुढे लस्करातहि नेऊ तर आता वडिलाचे सिवाये वर्तणूक करावी हे उचित नाहीं तरी दुसरा विचार चितात न अणिता घरी राहावयाचेच करणे येथे तुम्ही अमचे न अईका तर लस्करात श्रीमत व सुभेदार तुम्हास सागतील तेव्हा तऱ्ही यैकून माघारे जावे लागेल यैसे सर्वथैव न करणे तुमच्या विचारे जाहाले तरी सातारियासी जाणे नाहींतर आम्ही येऊ तो सासवडीच राहाणे परंतु अवदा नवा कारभार आहे व मोगलाचा कलह आहे वडिलानीहि मोडा घातला आहे यास्तव अगत्य माघारे जावयाचा विचार करणे बहूत काये लिहिणे लोभ असो दीजे हे आसिर्वाद'

पत्र पेसजी आले परतु हाली हातास आले छ १४ सवाल

---

ले. १५२ श्री श. १६६५ वैशा. शु. ६
इ. स. १७४३ एप्री. १८

चिरजीव राजमान्य राजश्री धोंडोबा यासी सदासिव चिमणाजी आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करीत जाणे विशे(ष) *राजश्री पिलाजी जाधवराऊ याचे फालगून वद्य प्रतिपदेचे

गयेचे मुकामीचे छ १ रबिलोवली प्रतिपदेस आले त्याची नकल पाठविली आहे त्याजवरून कलेल सुभेदाराचे कासिदानी जबानी वर्तमान सांगितले की गयेपलीकडे चालीस कोसावर राजश्री रघोजी भोसले याचे लस्कर होते तेथून मशारनिले सडे स्वारीने गयेस येऊन भेटले च्यार दिवस गयेत होते उपरांतिक कूच करून गेले परंतु मनसुबा काये जाहाला तो कलत नाही म्हणून कासीद जबानी सागत होते तुम्हास कलावे यास्तव लिहिले असे राजश्री रामचंद्र हरी व वरकड सरदार देखील राजश्री अंताजी सिवदेव करकमास लागले होते त्याणी निकडीने मोर्चे चालऊन गावासमीप नेले सुरग चालवावे तो जिवाजी पाढरे घाबरे होऊन बोलीचाली लाविली पोकल बोल्या उदडच घातल्या होत्या त्या मशारनिले कबूल केल्या नाहीत मग आम्हास येक गाव रहावयास देणे त्याजवरून मौजे कुरोली ता। करकब हा गाव त्यास रहावयास दिल्हा तेथे ते चैत्र वद्य इदूवारी गेले इदूवारी करकम फते जाहाले तदोतर छ २७ सफरी सर्वांनी कूच करून पढरपुरानजीक गेले दुसरे दिवसी कासेगावावर साऱ्या फौजा ज़ु ( दु ऊ ) नी बाजू सड्या फौजा पुढे मागे बुणगे याप्रमाणे गेले त्यास राजश्री बहीरजी पाढरे यानी गावाबाहेर येऊन गोसावी याचे मठ होते त्यात प्यादे घालून चोकी बदी केली त्याचवर फौजानी चल दिल्हा तेथे आग बरीसी झडली त्यामुले साऱ्या पथकातील दाहा बारा घोडी ठार जाहाली व हशम व लस्कर देखील जखमी ठार बहूत जाहाले याचे वर्तमान राजश्री नारायेण व्यंकटराव यानी लिहिले त्या पत्राची नकल पाठविली आहे त्याजवरून कलेल कासेगावात पाणी नाही दो चौ रोजात कार्य होईल म्हणून रामचंद्र हरी यानी लिहिले आहे तुम्हास कलावे म्हणून लिहिले असे रेवदडीयाकडील मजकूर तर छ २७ सफरी राजश्री मानाजी आगरे हाटीवे ता। नागावे येथे आले राजश्री रामाजी माहादेव व मोराजी सिदे जमावानसी तेथें गेले तेहि पुढे आले त्याच्या याच्या भेटी जाहाल्या परस्पर सौरष्य उतम जाहाले मसीदीचा साठ हात होता तो त्याणी ढासलून दिल्हा गडगा कोठे दोन हात कोठे तीन हात च्यार हात होतो तोहि ढासलावयाचा करार शफतपूर्वक केला ढासलून देतील तुम्हास कलावे म्हणून लिहिले असे रा। छ ४ रबिलोवल बहूत काये लिहिणे लोभ असो दीजे हे आसिर्वाद पत्रे लिहून तयार केले तो राजश्री रामचद्र हरी

याचे पत्र कासेगाव घेतलीयाचे पत्र वैशाख शुध ३ शुक्रवारीचे आज आले सभाजी सिदे यानी बरीसी शर्त केली मशारनिलेकडील घोडे माणूस जाया जखमी ठार फार जाहाले वरकडहि लस्करची घोडी माणूस जाया जाहाली याची यादी पाठविली आहे त्याजवरून कलेल नारायेण व्यकटराव याच्या पत्राची नकल पाठविली म्हणून लिहिले होते परंतु कासेगाव घेतलियाचे वर्तमान आले याकरिता नकला पाठविलीयाचे सारश काये आहे बहीरजी पाढरे याणी कौल घेऊन जमावासहीत निघोन मगलवेढीयास गेला पुढे सा-या फौजा सागोलियावर जाणार तुम्हास कलावे याजकरिता लिहिले असे हे आसीर्वाद

---

ले. १५३ श्री शके १६६५
इ. स. १७४३

राजश्री बालाजी बाजिराऊ व राजश्री सदाशिव चिमणाजी
उपनाव भट निंमे मो(कदम) मौजे ग राडे ता करेपठार
प्रा पुणे गो

छ आखडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य श्री सटवोजी पा जग-(दळे) + + + रामराम सुा आर्बा आर्बैं मया अलफ तुम्हांस निमे मोकदमीचे वतन आपण आपले खुष रजाइंदीने विकत दिल्हे त्याचे रुो १२०० बारासे करार केले ते आपण साताराचे मुकामी भरून पावलो

---

ले. १५४ श्री श. १६६५ फाल. वा १२
इ. स. १७४४ फेब्रु. २९

चिरजीव राजमान्य राजश्री धोंडोबा यासी सदाशिव चिमणाजी आसीर्वाद उपरी येथील कुशल ता छ २५ मोहरम जाणून स्वकीये कुशल लेखन करीत जाणे विशेष काल दोन प्रहरा दिलीहून राजश्रीकडून वकील इछाराम आहे त्याचे पत्रे तेविसावे रोजी येथे आले त्यात खुलासा हाच की नादरसहाने रुमच्या बामशाहीवर चढाई केली त्यास नादरशहास मारून काढिले फिरून नादरशाहा आपली फौजबदी करीत आहे व तोहमास कुलीखान खंदारच्या मुलकात आहे त्यासहि नादरशहाचे पत्र आले आहे की येणे व रुमातहि फौजबदी होत आहे हे येक वर्तमान लिहिले

व दुसरे लिहिले आहे की मनसूर आलीखान व अमीरखानहि दिलीस आले त्यास साप्रत माहादे[व] भटानी सवाईजी मेलियावर त्याची वकिली आपणाकडे करून घेतली आहे पहिला कृपाराम होता त्यास जैसिगनगरात ठेविले माहादेव भट मनसूर आलीखान याच्या दरबारी गेले त्यास बराबर सवाईकडील जमातदार व प्यादे होते त्यास त्याची याची हकाविसी बोली जाहाली त्यास महादेव भटानी सिवी दिल्ही आणि आपले लोकास बोलले की धरा त्यावरून त्याची याची लटापटी जाहाली माहादे[व] भटास जखमा लागल्या त्याच्या पुत्रासहि जखम लागली संध्याकाली घरास गेले मध्यरात्री मृत्यु पावले पुत्र मात्र वाचले मोठी गोष्ट वाईट जाहाली पत्रे आली ती तीर्थरूपाकडे रवाना केली बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद पौ छ २५ मोहरम

---

ले. १५५ श्री श. १६६७ जेष्ठ वा २
इ. स. १७४५ जून ५

पुा तीर्थरूप राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी

विनति उपरी कर्नाटक प्रातीचे मनसबीयाचे वर्तमान तर राजश्री देवराव व गोविदराव चिटनीस व बालभट वैद्य ऐसे राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा याजकडील मध्यस्त यानी राजश्री स्वामीपासी बोली घातली व सन इसने व सन सलास येकून दुसाला चदावर देखील कर्नाटक प्रातीचे येकोणीस लक्ष रुपये त्यापैकी चंदावर देखील संस्थाने पधरा लक्ष व चदावरचे च्यार लक्ष येकून येकोणीस लक्ष रुपये घेऊन चदावर देखील कर्नाटक रघोजी भोसले याचे स्वाधीन करावे येकूणीस लक्षाची निसा करून द्यावी ऐसी बोली राजश्री स्वामीसी केली आणि कोनेरपंतास सागितले कोनेरपताचे विचारे दोन लक्ष रुपये सदरहूपैकी सावकारी निसा करून द्यावी बाकी ऐवजाचा कागद रघूजीबावाचे नावे लेहून द्यावा याप्रमाणे निसा करावी ऐसे होते रघोजीबावाकडे सदरहू प्रो करनाटक जाते ऐसे राजश्री फतेसिगबावानी जाणून राजश्री रामाजीपंतास स्वामीकडे बोलावयासी पाठविले रघोजीबावा एकोणीस लक्ष रुपये देतो आपले स्वाधीन करावे ऐसे म्हणतात तरी आपण वीस लक्ष रुपये आपले स्वाधीन करावे हे वर्तमान रघोजीबावाकडील मध्यस्तात म्हणताच त्यानी स्वामी नि स खो

ऊ न दिल्हे की वीस लक्ष रुपये फतेसिगबावा देतात तर उत्तम आहे सावकारी निसा विसा लक्षांची करून द्यावी ऐसे खोऊन दिधले कान्हेरपंत येकूणीसां लक्षाची सावकारी निशा करीत होते तरी फतेसिगबावापासून सावकारी निशा आवघे ऐवजाची करून घ्यावी ऐसे खोविल्यावरी राजश्रीनी त्यांसी सदरहूप्रमाणे आज्ञा केली तेव्हा दोन लक्षांची मात्र सावकारी निशेचि राजश्री कृष्णाजी नाईक यांची चिठी करार केली बाकी अठरा लक्षांस सावकारी निशा नव्हेसी जाहाली मग राजश्री स्वामी बोलिले उभयतांच्या बोल्या येकीकडे असों देणे फतेसिगबावा रघोजीबावा येसाजी भोसलें यां त्रिवर्गांची फौज व हुजूरचे खासगीचे वाटियांस हुजूरची फौज ऐशा च्यारी फौजा जातील यथाविभागें जो येईल ऐवज तो वाटून घेतील ऐसे बोलिले परंतु सिधांतास काही गेले नाही सिधांत होईल ते खरें जाहाले वर्तमान स्वामीस कळावें यास्तव लिहिले ऐसे विदीत जाहाले पाहिजे हे विज्ञापना

पौ छ १५ जावल

---

ले. १५६ श्री श. १६६७ वैशाख पूर्वी
इ. स. १७४५ च्या पूर्वी

*आसीर्वाद उपरी प्रस्तुत दिलीहून च्यार पाच रोज जाले पत्रे आली त्यात वर्तमान तरी पातशाहाची मर्जी रागरंग दारूप्यादीयावर आहे खोजे जाविदखान म्हणून पेश आहे बाच्याला बा जि वाला याप्रो आहे सादातखानहि खुशामतीत आहे त्याचे बक्षिगिस सारे तलब पावत नाहीं हे कार्याचे नाही म्हणून रडतात वजीर मेले त्याचे पुत्र फार खुशामतीत आहेत त्यावर कृपा आहे सोला महिनीयाचा हक जवलील शागीर्द पेशा वगैरे याचा राहिला त्याचा वजिरानी आर्ज केला जावीदखान खोजीयाने न द्यावा म्हणून बोलला वजीर खटे जाले घरास गेले जावीदखान आपले घरास जाते समई तमाम शागीर्दपेशा मिलोन हाणमार त्यास करून तलबेसाठीं बसविले मग दाहा महिनीयाचा हक देविला वजिरांची गोष्ट पसंद पडत नाही वजीर बोलले कीं मला निरोप द्या त्यावरून आपण देखील डेरेदाखल बाहेर जाले तमाम आमीर बाहेर निघाले आगरे आकराबाद व बगस याचा बदोबस्त करावा असा मजकूर आहे पुढे कसा मनसुबा करितील पाहावे आगरे आकबराबाद दोनी सुभे बकसीकडे आहेत प्रयागाचा

सुभा मनसूरआलीखान वजीर याकडे आहे मनसुरआलीखानाची दाहा हजार फौज आहे वरकडहि दाहा पाच आहे तोफखाना व फौजाची तयारी होत आहेत बापूजी माहादेवानी लिहिले आहे प्रस्तुत बाहेर निघाले म्हणजे चहूकडे वजन पडेल तमाम हिंदुस्थानचे राजे वगैरे राजकारण करतील या दिसी रामचंद्रबावानी हुजूर यावे मागे पातशाहा बोलावीतच होते व आपणहि लौकर मालवे प्राती यावे याप्रो लिहिले आहे राणबा[1] उजेनीसच आहेत मल्हारबा पुष्करास आभेसिगाची भेट घेऊन ठाणीयाचे कामकाजात आहेत थोडेच दिसात उरकून कोटे प्राते येण याप्रो वतमान आहे तुम्हास कलावे म्हणून लिहिले आहे हे आसीर्वाद

---

ले. १५७ श्रीशकर श. १६६७ वैशाख पूर्वी

इ. स. १७४५ च्या एप्रील पूर्वी

विज्ञापना यैसी जे स्वामीची आज्ञा घेऊन स्वार जालों ते गहूखेडी नजीक कोटे येथे लस्करात पावलों येथील वर्तमान सविस्तर मनास आणिलें तों ऐसा आर्थ येथील पाहिला रैंकारनामक[3] याचा व यांचा विपर्यासभाव येकचित नाही आम्ही लस्करास गेलो त्याचे आधले दिवसी यांच्या परगणीयाचें गाव त्याचे फौजनें वीस पचवीस मारलें मगुरणीकर रयेंत याजपासी आली त्याजवरून याचा त्याचा हर्शामर्ष फार जाला मग त्यानीच येऊन शातवन केलें त्याजवरून हे आपल्या जागां फार श्रमी होते आम्ही इतकियात पोहचलों भेटी होताच श्रमा होऊन तांडव केलें आपले सविस्तर वर्तमान (आ)म्हास स्वामीकडे रवाना केलियापासून सागितले तो मजकूर सकलीत पत्री लेखन करावा लागला स्वामीनीहि अज्ञा केली होती कीं सविस्तर मजकूर लिहिणें ऐसीयासी हे[4] सामरकडे राजे अभेसिंग बखतासिंग यांचा सलूख करून जाठाकडे गेलें समीप गेलिया नंतर त्याने दबा खाऊन परम दीनतां ग्लाती ( नी ? ) करुन याजकडे वकील पाठविला त्याने दाहा लाखाचा पैगाम केला यानी फारच दबाव घातला तो इतकीयांत त्यानी दतीयास मोरचे लाविले होते दतीयावलीयानी

---

१ राणोजी शिंदे १९ जुलई इ १७४५ ला वारला ( रि. वि. भा. २ पृ. ६२ ) तेव्हां हें पत्र तत्पूर्वीचें ठरतें. २ पत्र भाऊसाहेबांचें धोंडोबा आपास. ३ राणोजी शिंदे कां रामचंद्रबाबा ? ४ मल्हारराव होळकर

फार सलाबत घातली काम रेटेनासे जालें त्यानी येऊन फौजेस मोरच लाविलें होतें दोन तीन पत्रें यांजकडे पाठविली कीं तुम्ही येणें यानी साफ उतर पाठविले की तूर्त याव[या]सी बनत नाही तेव्हां मग राजश्री रामबाऊ मुनसी पाठविलें सागोन पा की द्रोपदीच्या धावणीयासी श्रीकृष्ण पावला ऐसे जाणून येणे तेव्हां यानी मनात विचार केला की ईश्वर-सिंगावरी फिरते समई ते म्हणत होते कीं तुम्ही जातां परतु संकटांत पडाल तेव्हा आम्हास यावे लागेल ऐसे न करणे ते संकट आपल्यास श्रीने पाडिले नाही त्यासच्च पाडिले दुसरे खावदाचे काम बुडते बदनक्ष होतो ऐसे जाणून जाटाचा मजकूर तैसाच ठेऊन दतीयासी आले मोरच्यास जागा पाहाव-यासी गेलें तों बांवा सलाबत खाऊन गोस्टी सांगो लागले काम तर भारी नाही हालेने घ्यावे ऐसा विच्यार यानी केला इतकीत गावाने दबा खाऊन सलूखाचा पैगाम केला ते बाजीद देखून विच्यार केला की येसमई काम भारीपणे करावें किला व मुलूक वाटून घेतले ते वर्तमान सविस्तर पूर्वी कललेच आहे मग कूच करून जाठाकडे जावयाचा सिधात केला तों इत-रानी आक्षप केला की चमेल उतरलीयाने दिलीकडील सलूख कैसा राहील हा विचार मनास आणून कर्तव्ये ते करावें इतकीयांत वजिराची पत्रे राजश्री सुभेदा(रा)स आली की जाठाच्या लिावरून कळो आले कीं तुम्ही चमेल उतरोन मुलकांत उपसर्ग करणार हे तुमच्या श्नेहापासून दूर आहे त्याचे उतर यानी दिल्हे कीं हे गोष्टी येथार्थ परंतु आम्ही जैपुराकडे होतो तेव्हा आपण जाठास मना केले की ईस्वरसिगास सामेल न होणे ते मान्ये न कर्ता सामील होऊन आम्हासी युध प्रसंग केला त्यामुळें आम्ही बे-मुबलग तह खर्चाखाले आलो तुमच्या हुकुमास मानिले नाहीं म्हणून पार-पत्य करणें जरूर व तुमचे लोक तां ग्वौलेर प्रांती फौजदारीस येत होते ते लुटले ऐसे जाले तेव्हा पाछाइ बंदेपण कोठून राहिले आणि आपण त्याज-विसी ल्याहवेसे काये आहे ऐसी पत्रें लिा मागती त्यानी त्यानी उतर पाठविले की ढवलपूर व वाडी चमेलपार आहे तेथे आमचे तांने आमदखान व मााखान वगैरे जमातदार राहातात त्यास कोणेविसी आजार न पोहचे व पााछाई आदब राखून करणे ते कराल यैसे वजिराने लिा व बक्षीने पूर्वी जाठाच्या पारपत्याचा मजकुराचे राजकारण लिा होतें ऐसे वजीर बक्षीचे

---

* रामचंद्रबाबा.

मानस जाणून जाठाचे पारपत्य करारवावे करावे ऐसे मनांत आणून यानी ती पत्रें बावास दाखविली मग ते व हे मिलोन विच्यार केला कीं दिलीचा संदेहे मानावा तरी ते याप्रकारें लिहितात मग कूच करून चमेल पार जाले तो जाठाकडील वकील व आपले लोक राजश्री बापूजीपत व दामोदरपंत ऐसे आले बहूत बाजीद जाले रद्‍बल निकडीने केली मग तेथील फैसला केला मनसूर आलीखान याजकडील वकील व पत्रे व त्याचे सद्‍र्भ घेऊन आपले वकील घेऊन आले कीं तुमचा आमचा स्नेहें बहुता दिवसाचा आहे आमचा व दुराणीयाचा हर्शामर्ष लागला आहे सार्वभौमाची माया आम्हावरी आहे ये प्रसंगीं साहेता सर्वप्रारे करणे उचीत आहे कार्ये जालीयानंतर सर्वस्वें आम्ही तुमचे आहों जे तुमचे कार्ये आहे त्यास आतर सर्वथा होणार नाहीं ऐसे कितेक स्नेहचे जाबसाल निकडीने सागोन पाठविले या प्रकारेच बावासहि पत्रे लिा मग उभयेतानी मिळोन दृढ विच्यार करून जाबसाल लिा व बेलभडार श्रीमंताचा म्हणून दिल्हा कीं तुमचे रफीक आपण आहों मतलबाची याद् बावानी ऐसी लेहून दिल्ही कीं वकिलाच्यानें वजिरापासी न बोलवे तेव्हां सार्वभौमासी तो कोठून बोलल यानी बावास सागावयाचे ते सागि[त] ले परतु त्याचे मरजीस न ये मग ये गोस्टीने राजकारण तुटते ऐसे समजोन यानी आपल्या वकिलास व त्याजकडील वकिलास सागितले कीं यादीवरी न जाणे जेणप्रा वजिराचा आपला राजकारणाचा संदर्भ राहे ऐसे यादी वेगळ कितेक साध्ये होये ऐसा विच्यार त्यास सागोन पाठविलें व जाठाच्या पारपत्याच्या राजकारणास बक्षीकडील सता कुलीखान आले ते म्हणू लागले कीं दोन महिने राहून पुरते पारपत्य करावें त्यास तों आल्या पूर्वीच काम जाठाचें विल्हे लागले होते वचनास आंतर कैसे करावें ऐसे त्यास सागोन रवाना केले पुढें पारपत्य केले जाईल तिकडीलहि राजकारण राखिले आहे तेथून कूच करून नरवर पर्येत आले तों दिलीहून वजिराची पत्रे आलीं कीं नासरजंग दिलीस येतो ऐसे वर्तमान आहे तरी तुम्ही छावणी करणें यानी उतर केले की तो जोपर्येत या मुलकात ये तोपर्येत आम्ही देशास जात नाही रेवापार जालीयाने आमचे त्याचे युधे प्रसंग होईल आपण आपले समाधान आसो द्यावे आम्ही त्याच्या तोडावरीच आहों ऐसे लिा आहे तों इतकियांत बातमी आली की नासरजंग हाड्याचा

मार्गे सोडून अकबरपूरच्या मार्गे रेवापार होऊन ईश्वरसिंग व माहाराव यांच्या विच्यारें दिलीस जाणार अैसे वर्तमान अले मग हे तेथून हाडीयाचा मार्ग सोडून हाडोती प्रांती अले तेव्हा यानी विच्यार केला की पुढे होऊन युध्ये करावे आपल्या मुलकातून त्यास जाऊ देऊ नये तेव्हां बावाकडे सागोन पाठविलें ते बोलिले की ते रजपूत नव्होत हा नासरजंग आहे हे गोस्टी कार्याची नाही ऐसे बोलिले मग यानी साफ बावास सागोन पाा कीं तुम्ही याल तर या आम्ही तरी जातों मग कूच करून गहूखेडीवरी मुकाम केला तेहि आले उभयेता रजपुतानी नासरजगास सागोन पाठविले होतें की गनिमाच्या फौजासी गाठ पडली नाही तों मुकूदबारीने येणे तुम्ही आम्ही येकत्र जालीयावरी चिंता नाही ते वर्तमान याजला कललेच होते मग हेच मुकूदबारीचे सुमारें गेलें नास(र)जगाची बातमी होती मागती त्याजला उभयेता रजपुतानी सागोन पाठविले की गनीम समीप आले याउपरी तुमची आमची गाठ पडो देत नाहीत मग नासरजगाने विच्यार मनास आणून माघारे कूच करून औरंगाबादेस गेला मग हे मजल दर मजल इंदुरास आले ते उजनीस गेले मनसू(र) अलीखान याजकडील राजकारण केलें आम्ही स्वामीसी विनती केली होती की वजिराचा व रा सुभेदाराचा भायेचारा आहे स्वामी बोलिलें कीं राजकारण करावें आम्ही पुणीयाहून याजला पत्र लिाा आपणहि पत्र लिाा आमच्या पत्रावरी घालून लिाा त्यास आमच्या पत्रावरून यानी त्यासी वचनप्रमाण केले आहे श्रीमंत[1] स्वामीची भेटी जाली म्हणजे वजि-राचे कागद पत्र अणून त्याच्या कार्यास प्रवर्तावे ऐसा सिधात केला आहे आम्हाहि येथे अलियानंतर सांगितले की मनसू आलीखानाकडील राजका-रण राखावें हालीहि मागती दिलीस पत्रें पाविली आहेत उतरे येतील राजश्री मल्हाराऊ याचा अशये ऐसा पाहिला की खावदाचे भेटीस जावें आणि साफ विंनंती करावी की या उपरी आमचें त्याचें बनत नाही मजला जे चाकरी सागणे ते सांगावी स्वामी स्वारीस चाले म्हणिजे चाकरी सागाल ते करीन दुसरा आर्थ जाणत नाहीं त्यासी बहूत येत्न केले कीं याचे आपले येकदील व्हावें येविसी बेलभंडार व्हावे परतु यानी ते गोष्टी मनास आणिली नाही येकदर विस्वास पुरत नाही करणी येक व बोलावे

---

१ 'श्रीमंत स्वामी' पेशवे ।

येक यास्तव याचे चितप्रवर्तना आणिकहि येत्न करीतच आहे परतु यानी फार ओढून धरिले आहे ऐसी याची पुरती निष्ठा पाहून मग श्रीमत स्वामीनी पत्रे दिल्ही होती ते दाखविली व कितेक संभाशण केले ते सर्व यासी सागितले त्याजवरून यानी पूर्ण विस्वास स्वामीचे ठाई धरिला आहे ज्याप्रा आम्ही बोलिलो आहों तेणेप्रमाणें दृढ निष्टेने श्रीमंत राजश्री बाबासाहेबाचे ठाई पूर्ण निष्ठा श्रीमंत कैलासवासी वडील[१] त्याज प्रा धरली आहे त्यांचे कागद व आपला कागद सेवसी रवाना केल आहेत मजपासी संभाशण केलें त्याजवरी हे बेफिकीर भरवसीयाने आहेत ये समई दिलीत काही जीव नाही नासरजग ते आवघे येक जालीयावरी मग भारी आहेत खावदाचे कपाल थोर ये समई राजश्री सुभेदारावरी बोलल्याप्रा लोभ करून कामे याचे हाते घ्यावी याची सलाबत दिली आदिकरून रजवाड याजवरी आहे श्रेहीहि यैसे आहेत की जे समई याचे पत्र जाईल ते समई रजवाडे आवघे फौजेनसी येतील स्वामीसी मी बोलिलो त्याप्रों हा सरदार कायेम आहे निसरडा होत नाही स्वामीचा याउपरी भरोसा पूर्ण धरितों व खावदासी येकनिष्ट ऐसे आहें याउपर लौकर देशास येणार पत्री विस्तर कोठवरी ल्याहावा सकलीत लिा असे पत्र वाचून चाख करावे शेवसी श्रुत होये हे विज्ञापना[३]

---

ले. १५८ श्रीशकर श. १६७०
इ. स. १७४८

चिरजीव राजश्री नाना यासी प्रती रघुनाथ बाजीराव आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले लिहिला मजकूर कलला यानंतर तीर्थरूप व भाऊ व आम्ही दोघे वगैरे सारे बसले होते दरबार होता त्यावर नाना व भाऊ व धोडोबा व मामा व आम्ही व जनार्दन ऐसे येकांतास गेलो त्यावर आम्हास सान्यास प्रश्न केले त्याची याद विलया[२] दिली उतरे लिहिली आहेत त्यावरून कलेल मामास म्हणाले की तुम्ही शाहाणे आहां आणि सर्व झाले होणार प्रकृत सर्व ठाऊक आहे तर बोला तेव्हा मामा वगैरे सारे बोलल कीं विचा-

---

१ माहादोबा बाबा ! २ कोण ! ३ पत्र सखारामबापूचें पुरंदऱ्यास बहुधा माहादोबा पुरंदरे यास असावें.

रून सागून त्यावर आम्ही म्हटले की आम्हास येक से ख ची ली सी युक्त सुचली आहे तरी काय ती सागा म्हणाले सर्व आईकत होते त्यावर आम्ही उतरे[१] दि ( अपूर्ण )

---

ले. १५९ श्रीशंकर इ. स. १७४५ पूर्वी

यादी पुसल्या प्रकाराची उतरे येणेप्रा बि तपसील

घरच्या बदोबस्ताची गोष्ट पुसली तरी इमारती वगैरे काही कसोसी करून ठीक करावे १

५ आम्हास कर्ज झाले व राज्याच्या कर्जाबदल रुपये द्यावे लागतात व रघोजीस कर्नाटक होते त्याचे तेज्याचे अवर्धन झाले पाहिजे व रुपये मिळाले पाहिजेत मालव्यातील रुपये उगवले पाहिजेत येाा प्रश्न पाच इतक्याचे मिलोन उतर केले की

१ तुमची फौज तिकडे पावसाला गेलीयावर जाईल तेव्हा रघोजीच्या पुत्रास तंबी द्यावी आणि मारावा येणेकरून रघोजीचा पराभव दिसेल आणि तुम्हास पातशहाने पैका तीस लाख देऊ केला आहे तो येईल तेणेकडून काही कर्ज व काही राज्याचे कर्ज असे वारेल मालव्यात फौज जाईलच पैका मेळवावा मेहनती करून

१ मल्हारबा व राणबा येके जागा राहात नाहीत यास कसे करावे त्यास आम्ही म्हटले की मल्हारबाबा मालव्यात पाठऊ नयेत आणिक दाहा हजार फौज पाठवावी त्यावरून तीर्थरूप म्हणाले की तुमची सारी फौज किती आम्ही उतर केले की चालीस हजार पसतीस हजार याप्रो दोघाचा सालजाब

१ तिसरे प्रश्न की कोकणात जेजिरा घ्यावयाचे चितात आहे व तिकडे पहावयाचे चितात आहे आणि तिकडे सावंत वगैरे जबरदस्त जाहाले आहेत त्याचे कैसे आम्ही म्हटले की आपण पाचा हजार फौजेनसी तिकडे जावे सुखरूप बंदोबस्त करावा दुसरे राष्ट घ्यावयाची इछा धरू नये या काली

---

१ पुढील ले. त विचारलेले प्रश्न व त्याचीं उत्तरें पाहावयास मिळतील. हें पत्र खुद्द राघोबाच्या हातचें आहे.

१ राज्यास काही तूर्त दिल्हे पाहिजे त्यास उतर की राज्यास तूर्त पाच लाख रुपये द्यावे पुढे ते रुपये आलेयावर द्यावे त्यावरून ते म्हणाले की राजा कसा आईकतो आम्ही म्हटले की असे उतर द्यावे की पंचवीस लाख आम्हास तुम्ही घरी बसविल्याने कर्ज झाले असे सालकोजीमालकाजी करून करावे

येकूण फौज पंधरा हजाराची वाटली बाकी वीस हजार राहिली ती म्हटले रघोजीवर कर्नाटकात पाठवावी भाऊबराबर तेव्हा ते म्हणाले की राजा आम्हास कसा कर्नाटकात जाऊ देईल आपण म्हटले की याची तोड उतमसी दिसत नाही पाच सात तोडी आहेत परतु त्या साधतील न साधतील हें न कले त्या कोणकोणत्या तर राज्यापासून मागून घ्यावे आथवा नवाबापासून येकादा सुभा सजावा आथवा उगेच जावे असे उदंड आहे पर कसे आहे परंतु रघोजीचा लेक मारिला म्हणजे सहजच तो वाकेल येकायेकी तो काही कोणाचे राज्य मोडवणार नाही तर ते म्हणाले की रघोजीच्या लेकाने अलाबिर्दीस मोडिले आणि पैका वसूल जाहाला तर त्यास उतर हे होणेच नाही तथापी याणे मोडिले तर आगोधर आता आलाबिर्दीस कागद लेहून पाठवावा की तुह्मास यद्यपी त्याणे जेर केले तथापि पैका न देणे आणि आम्ही दोहो चहू महिन्या येऊन खामखा मोडून टाकूच असे ल्याहावे म्हणजे ठीक होईल तिकडे पंधरा हजार पावेतो मल्हारबावा वाचून फौज पाठवावी म्हणजे ठीक होईल असी प्रत्युतरे केली[1]

---

ले. १६०

श्री मोरया

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे शेवेसी

विनंती सेवक मलारजी होळकर कृतानेक दंडवत विज्ञापना येथील कुशल फाल्गुन शुध नवमी स्वामीच्या (प्र)तापे करून येथास्थित असे विशेष राजश्री माहादाजीपंतबावास स्वामीनी पत्र पाठविले की मल्हारजी होळकर याच्या मनामधें कितेक प्रकारें कोणाच्या सांगितल्यावरून संशये आला आहे त्यामुळें ते आपल्या चितात संन्न आहेत तरी तुम्ही

---

१ सबंद यादी राघोबाच्या हातची.

त्याची भेटी घेऊन बहुता प्रकारे त्याचे समाधान करणे आमचा लोभ आकुत्रीम त्याचे ठायी आहे दुसरा अर्थ जाणत नाही कैलासवासी उभयेतापासून त्याची येकनिष्ठता आकुत्रीम त्याज आमची हि कृपा परस्परे सागितल्या आइकिल्या गोस्टी किमपी मनात न आणावी सर्व प्रकारे भरवसा इमारत चाकरीचा त्याजवर आहे तेहि आतर करीतच नाहीं येसेच सविस्तरे पत्री लिहिले होते त्यासि राजश्री बाबाजी राजश्री गंगाधरपंत रामाजीपंत यासि बोलाऊन नेऊन पत्रार्थ सागितला त्यासि स्वामीनी मात्र चित प्रश्यस्त निःसंवशये आसो द्यावा सेवेवरहि द्रिष्टी आसावी कोन्ही कसाहि मातबर आप्तपणे दरशऊन स्वामीच्या मनात संवशये घालतील ते मात्र सत्ये न मानावा आ(म्ही) कोणाचेंहि कुतीम सागणे ध्याना(त) तिलतुल्य आणीत नाही हा पूर्ण भरवसा शेफतपूर्वक आसो द्यावा प्राणांतिक निमकहरामी श्वप्नीहि आणणार नाही हे सत्ये जाणावे राजश्री गंगोबा रामाजीपंत सासवडीहून आ + + समाधानपूर्वक स्वामीकडील उतरे सागितली आंम्हास सिरसा वंद्य आसें हे उभयेता ब्राह्मण आमचे पदरी आहेत आपले आनाचे वाढविले आहेत आणि उभये पक्षी इष्टचिंतन येकनिष्टेने सवा करितात याजमुळें कोणीं संवशये दरशवीत आसतील तर किमपीहि मनात न आणावे आम्ही स्वामीचे पदरी मातबरी स्वामीचीच दिधली आहे त्यामुले सर्वेहि हिष्ट आनिष्ट आहेत ते कागदीपत्री आप्तपणा दर्शवितात कागदिपत्री लिहितात त्याचे त्यापरी समाधाने उतर निरोतर करजेत आहे स्वामीचे येख्तीयारीचा जाणौन जावसाल होतो दस्तायैवजी गुतत नाहींत कार्येनाश होऊ देत नाहींत याजमुले कोणास आसाये होऊन कुतीम दरशवीत आसत काडीमात्र दुसऱ्या आर्थेकरून मना(त) संवशये आणिला न पाहिजे सेवकाच्या बहुमानास आंतराये केला न पाहिजे म्हणजे सर्वेहि जे आहे आर्थे(प्रा)णें स्वामीचें आसो दुसरा आर्थच जाणत नाही शेंवेसी श्रूत होये हे विज्ञापना

---

**ले. १६१** श्री

*[1] सहश्रायू चिरंजीव राजश्री नानास माहादाजी अंबाजी असीर्वाद उपरी येथील वर्तमान ता। पौष शुध शस्टी बुधवार येथास्थित असे विशेष साताराहून राजश्रीची पत्रे वारंवार शफतपुरस्कर यावयाविसी येतात

१ यापुढील मजकूर निराळ्या वळणाचा.

त्यावरून जावे हा सिधात करून येतो म्हणून आपा चिटनीस व भिकाजी परभू यासी अजी रवाना केले दशमीस श्रीमत येथून निघणार तुम्ही नारो माहादेव याजबराबर शनवारी येतो म्हणून सागोन पाठविले तर मुहूर्त पाहून घरीहून निघणे मग येथे गाठ पडल अथवा वाटेस पडेल येथून बायेका पाठवाव्या लागतात तरी पालखी पाठवणे वेदमूर्ती कचेस्वरभट आले परतु सोयेरीक वाडेकरासी करावी न करावी हा सिधात काही सागितला नाही तर मातुश्री आबईच्या व तुमच्या विचारें काये विचार तो लेहून पाठवणे त्यासारिखे त्यास सागितले पाहिजे तरी उतर लौकर पाठवणे तुम्हास ज्वर आला होता म्हणून कलले तरी काये वर्तमान ते लिहिणे पालखी सत्वर पाठवणे हे आसीर्वाद

---

ले. १६२ श्री श. १६६९ वैशाख शु. १४
इ. स. १७४७ मे १२

चिरंजीव राजमान्य राजश्री नाना* यासि बालाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणें विशेष नवाबाचा शह चिरंजीव राजश्री भाऊ यावर होता यास्तव आम्ही राजश्री स्वामीचा निरोप घेऊन मजल दर मजल पंढरपूरच्या रोखे आलो चिरंजीव सावनूर प्रांती होते त्यास सांप्रत नवाब वानरा सगमाकडे गेले नासरजंग फौजसुधा सिरे प्रांती गेले मजल दर मजल श्रीरंगपटणाकडे जाणार चिरंजिवाकडे त्यांचा रोख होता तो टलला व अखेर सालचे दिवस आले याजकरिता चिरंजीव मजल दर मजल त्या प्रांतीहून निघोन आजी छ ११ जमादिलोवली इंदुवारी नजीक इदापूर येथे चिरंजीव आले भेट जाहाली याउपरी इकडे काही गुंता आहे यैसे नाही हे वर्तमान तुम्हास कलावे म्हणोन लिहिले असे तर समयोचित राजश्री स्वामीचे कानावरी घालणे राजश्रीच्या कानावरी मर्जीमुले घालावयास न बने तरी सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेब वाडा दुसरा यास विनती करणे म्हणजे राजश्री स्वामीस अवगत होईल वरकड वर्तमान मागाहून विस्तारे लिहिले जाईल छ १२ जमादिलावल हे आसीर्वाद

---

* नाना साहेब, भाऊसाहेब वगैरे पेशवे मंडळी ज्याला 'चिरंजीव नाना' असें संबोधितात तो त्र्यंबक सदाशिव ऊर्फ नाना पुरंदरे होय.

ले. १६३ श्री श. १६७० चैत्र शु. ८
इ. स. १७४८ मार्च २५

श्रियासह चिरंजीव राजमान्य राजश्री अण्णा यासी माहादाजी अंबाजी आसीर्वाद उपरी येथील वर्तमान ता छ ६ रविलवल मुकाम मनावर प्रांत कोटरे रेवा उत्तार तीर येथास्थित असे विशेष इकडील वर्तमान तर अहमदशाहा पातशाहा विलायतेहून अटक उतरोन लाहोरास आला लाहोर घेतले दोन प्रहर पर्यंत कतल आम केले पैका मबलक मेळविला तेथून फौजेबदी तोफखाना तमाम जमाव करून दिलीवर यावे या उदेशे लाहोराहून दाहा कोस पुढे चालिला हे वर्तमान ऐकोन दिलीहून वजीर व मनसूर अलीखान पातशाहाजाद्यास घेऊन बाहेर निघाले वीस कोसपर्यंत गेले आहेत श्रीमंतास एक दोन पत्रे आली कीं सत्वर येणें त्यावरून हेहि मजल दर मजल जातात परंतु पंथ दूर हे जात तोपर्येत त्या उभयेताचे युध न जाहाले तरी हेहि जातील कळले पाहिजे वरकड वर्तमान इकडील नवल विशेष लिहिणेसे नाहीं तुम्ही आपणाकडील वर्तमान सविस्तर लेहून पुण्यास पत्र रामाजीबावा चिटणीस याजकडे पाठवीत जाणे म्हणजे ते लस्करात रवाना करितील पुण्यातील सवसाराचे साहित्य जागा जागा माहालकरी वगैरे याकडे करार केले आहे त्याची यादी विसोबा जवल दिल्ही आहे तर वरचेवर माणसे पाठऊन जिकडील साहित्य येणे तिकडील आणवणे शामराऊ पुणेकर व हरिपंत जुनरकर याजकडे कडबा दो दोशा रुपयाचा करार केला आहे तर पैका देऊन कडबा पुण्यात जमा करणे वरकडहि यादीप्रा साहित्य करार केले आहे ते आणवणे हे आसिर्वाद

चिरजीव राजश्री आ(भा?)सकरराऊ यासी आसीवाद उपरी विसोबापासी यादी दिल्ही आहे त्याप्रा साहित्य जमा करणे येविसी हैगे न करणे घरचे वर्तमान लेहून पाठवीत जाणे हे आसीर्वाद

पो छ २९ रावल

---

ले.. १६४ श्री श. १६७० वैशाख शुा ११
इ. स. १७४८ एप्रील २८

आसीर्वाद उपरी लस्करात गोविदराव नाना आम्हास निरोप दिल्हा ते समईचा मजकूर राजश्रीची व धाकटे बाईची मर्जी माणिकगडा-

वरून कूड आहे त्यास मसीदंचे पारपत्य जालेच आहे पैकीयाचे देशमुखीचे बोलावे गड द्यावा मर्जी खुशाल करावी कर्ज राजश्री बावीस लाख घेईन आसे शफतपूर्वक बोलेले आहेत गड देऊन मर्जी खुश करून विसावर कारभार करावा मुदत चौ साला इा समान त्यास समानचे पाच तिसात दसरियास द्यावे त्यास येदा वोढीमुले राजश्री चैत्र मासी पाचा पैकी दीड द्यावा व राजश्रीचे कर्ज आहे त्यापैकी पनास द्यावे याप्रो जाले त्यास गोविद्राव सेनापतीकडे गेले तेथे कार्य प्रस्तुत नाही परंतु त्याचा लाभ ( लोभ ) याकरितां त्याचा घरचा कारभार घाटून तेथे आहेत राजश्री व धाकटीबाई येका जागा. बसून नानास वोढ सागून तूर्त लाख रुा द्यावे वैशाख मासपासून हप्ते व दसरीयाचा यैवज यावर चिठ्या न द्याव्या गोविद्राव येऊन कर्जाची बोली जाहलियावर मग भलते यैवजी देऊ तेव्हा चिठ्या पुढे करून यैसे जाले निकड पाहून द्यावे लागले दिल्हे याप्रा जाले दुसरे राजश्रीनी मानाजी आगरे याचा गडचा मजकूर काढिला याचा जाबसाल समर्पक करून सेवट याप्रो जाले की मसीदीचा गुता उरकला देशमुखीचा मजकूर ठीक करून मी देईन रुा त्याकडे आहेत ते माझे यैवजात वजा करा याप्रा करार होऊन गड द्यावयाचे जाले येविसीचे नानाचे पत्र आले त्याची नकल पाठविली आसे आसलच पाठविले आसे पाहून पाठऊन देणे याचा विचारहि लिहिणे लस्करातील मजकूर सखाराम-पतास ठाऊक आहे रा छ १० जमादिलोवल हे आसीर्वाद

---

ले. १६५ श्री श. १६७० वैशाख
इ. स. १७४८ एप्रील

आसीर्वाद उपरी साहा महिने जाहाले याची कालजी आपण न करावी वडिलाकडे कारभार ते करितील म्हणून लिहिले त्यास मी काही त्या भावे लिहिले नाही प्रस्तुत काही जालेहि नाही बाईच काय करते ते करीतील त्याची आम्हास कालजी काय आमचेकडे जे काम आसेल त्यांचे-विषी आम्ही कसे राहावे आसे लिहिले होते त्याचे उतर लिहिणे बाईचे मते पढरपुरास आठा दाहा दिवसी जावे पुढे आषाढी करून आखेर आषा-ढात यावे आसे आहे याचे आजून मला पुसले नाही आपले जागा मात्र

१ पत्र भाऊसाहेबांचें धोंडोबा आप्पांस.

बोलत होती त्यासहि पुसलीयावर जावयाचे सागावे की काय हे लिहिणे हे आसीर्वाद मानाजी आगरे याचा मजकूर लिहिला तो कलला उतर आलियावर लेहून पाठवणे हे आसीर्वाद[१]

---

ले. १६६ श्री श. १६७० वैशा. शुा ११
इ. स. १७४८ एप्रील २८

(आसी)र्वाद उपरी राजश्री बाबूजी (नाईक) याचा मजकूर तर महिनाभर उ + केले प्रकारे कजिये केले यामुलें याप्रो निकाल निघाला की नाइकानी कजिया करू नये कर्ज आपले फेडावे बाकी मागू नये पहिला सरंजाम आहे तो खावा दुसरा साडेतीन लाखावारी कर्नाटक सारे बाबुजी नाइकास सरंजाम द्यावे याप्रो होऊन वस्त्रे दिल्ही याप्रो जाले त्या आलीकडील वर्तमानाची पत्रे आली ती व रघुजीबावा फतेसिगबावा याचे मजकुराची पत्रे पाठविली आहेत त्यावरून कलेल चिरंजीव दादास सातारियास आमचे मते तूर्त पाठवावे महिनाभरा आणावे फार दिवस निराले न ठेवावे बुधी + + + आहे लबाड नाही भलेपण आहे पर + + + + दिसे पदार्थ ग्राह्य लौकर होत + + + रा छ १० जमादिलोवल सखा(रामा)स पाठवणे हे आसीर्वाद

---

ले. १६७ श्री श. १६७० ज्येष्ठ शुा ३
इ. स. १७४८ मे १९

आसीर्वाद उपरी सखारा(म)पत बाबूरायाचा मजकूर तर बाबूरायाची मर्जी बरीच आहे *बाबाचे न्यावे आमलसे दूरचे दूर आसावे आसे आहे सखारामपंताविसी पहिले लिहिले होते त्याप्रो बाबूरायासी आम्ही ठीक राखली यास ठीक पडले सखारामपंताचेहि तसेच दूर आसावे आहो तुम्ही त्याचे आगी लाविले आम्ही त्यास पुसले ते तसे काही नाही त्रिबकपंतानी उठविले आसे म्हणत होते मुख्य गोष्ट त्यास आसे केलेच पाहिजे आम्ही त्यास सागून बोलून खुलासा राखून करणे ते ठीक करतो त्याजला मलऊन ठीक करतो वाईट न दिसे ते बाहेर न राहाता त्याचे मनात मज-

---

१ पत्र भाऊसा. चें धोंडोबाआप्पास. * 'बाबा' ह्मणजे माहादाजी अंबाजी पुरंदरे असें सर्वत्र समजावें

विंसी वाईट न ये ते करतो तुम्ही सखारामपंतास काही लेहून हे काय लिहितात ते लिहिणे विशेष आढललीयावर सविस्तर लेहून पाठवीन आमचे बाईकोस सा महिने होऊन सातवा लागला पुढे विचार कसा तो लिहिणे सिरेचे वैद्यासहि सागितले वोखद काही दिल्हे आपले आपून बरे जाले आता काहीं नाहीं आसे आहे रा छ २ जमादिलाखर हे आसीर्वाद येदा फौजानी बहुता प्रकारें त्या प्राती नवा जुना कारभार जाला बुदेल-खंडी आमल नवा येसवतरायाचे खुसपट यासाठी च्यारी गोष्टीस छावणी करावी बरे पडते व आम्हासहि बरे पडेल आसे वाटते फार करून येणार नाहीं तीर्थरूपाचे नामर्जीमुले काय होईल पाहावे हे आसीर्वाद

---

ले. १६८ श्री श. १६७० ज्येष्ठ शुा ४
इ. स. १७४८ मे २०

आसीर्वाद उपरी चिरंजीव राजश्री नानाची पत्रे तुम्हास आली ती तुम्ही पाठविली ती पावली लिहिले की मागील पैका व पुढे देसमुखी व पैका दरसाल द्यावयाचे राजश्रीचे हाते करार करून घेऊन किला द्यावे आसे त्यास लिहिले आहे त्याचे उतर आलियावर त्याप्रो करावे म्हणून लिहिले ते कलले ऐसीयास त्यास आम्ही सदरहू कलमाचा जमान घ्यावायाचे लिहिले नाही मागील बाकीचा निकाल कोणते यैवजी तो सागावा पैका द्यावा आमल देसमुखीचा मावियाविसी त्यास ताकीद करावी त्याणी कबूल करावे याप्रो त्याणी कबूल केलियावर आम्ही किला द्यावा त्यास आण वाहिली याचा मजकूर याणी लिहिला औसीयास बाबा नानासी बोलले किला खामखा देतील त्यास विस्वास न ये तेव्हा मजला सागितले याचे पत्र द्यावयाचे आलियावर याप्रो आम्ही आण तेव्हाच वाहिली परंतु केवल रुपयाचे आगदीच सोडावे आसे नसेल आसे वाटते आण वेलेस हा मज-कूर जाला नाही आम्ही दूर खरावे ठीक करावे लेहून ठेवावे ते वेडझवेपण केले बरे आसो साराष विचार पाहाता देसमुखीस आपला रुा फारसा खर्च जाला नाहीं मोठे आमचे काम मसीदीचे ते आनायासे जाले दुसरे त्याकडील साल दरसाल पैका यावयाचा मजकूर तर आपा मेलियापासून रुा येत नाही पुढे येऊन नफा कलतच आहे दुसरे माणीकगडाखालील मुलकाचा पंधरा वीस हजार वसूलहि सरकारात आला आहे बाकीचे रुा

क्षेपनिक्षेप राजश्रीकडून देविविती याप्रो तेथेच बोली जाली तेव्हा फा-रसा गुता नाही जेव्हा किला घेतला तेसमई बाई ढीग रागे भरली परतु मसदिचे देसमुखी वगैरे मुदे त्याच्याने कबूल न होत म्हणून तसेच राहिले पुढे आपले मातबर काम जाले देसमुखी त्याच्याने तो कबूल करवणार नाही बाईचे राज्याची मर्जी राहाते व ह्या लालचीमुळे कर्जाचे काम राजश्री साडे बावीस ती साला घेईन आसी आण वाहिली आहे त्याणी पाच साला वीस केले रदबदलीची आमलसी खलखल पडेल तेसमई ह्या आशेने तेहि गोड करावे राजश्रीचे कर्जहि वारेल किला देऊन दोघहि खुशाल जाले आसे होते यासाठी तेसमई तीर्थरूपानी पुर्त मागील बाकीची मात्र निशा करून द्यावी देसमुखीची गोष्ट बोलावी मलमलीत आसली तथापि आड न धरावी स्थल द्यावे आसे जाले आसेल आसे मला वाटते सखारामपतास आसेच वाटते क्षेपनिक्षेप सई पुर्ती नाही त्यास प्रस्तुत येथे कसे जाले नाना जवलून राजश्रीने लाख रुा घेतले ते समई याणी कबूल मर्जीसाठी केले कबूल केले यासाठी आम्ही दिल्हे व व पुढे ढीग यैवजहि आहे यासाठी दिल्हे तसे किला कर्जाचे विल्हे न लागेल मागील बाकीचा पुर्ते ठीक नसता देऊ केला यामुले ते ठीक पडत नाही सारे ठीक जाले मग किलाहि मर्जीसाठी देऊन गोड करावे कर्जाची रदबदली गोविंदराव करितील तेव्हा वाईट वाटले तेव्हा हे देऊन आपला पैका आमला यैवजी घ्यावा आसे ठीक करून द्यावा मणजे गोड होते यासाठी तूर्त पर्याये आम्ही लिहिला तो ठीक आहे सारे कारभार होतील ते बरे नानाचेहि मर्जीस चड लागतो हे वाईट यासाठी तुम्ही त्यास लिहिले आहे ते उतम आहे आणखी काही तूर्त ल्याहावयाचे नाही त्याचा जाब येईल त्या सारखे लिहिण ते ल्याहावे पुढेहि त्याच्याने देसमुखी कबूल करवते असे नाही परंतु याची पुर्ती आड न धरावी असेही वाटते परंतु हे तूर्त करावयाचे नाही तूर्त पेशजी प्रो च्यारी गोष्टी बोलून पुढे गोड करावयाचे होते बरे चुकले ते चुकले पुढे बोलावे गोविंदराव आलियावर येकदाच सारे करणे ते करावे असे आहे दुसरे नानाचे प्रस्तुत आले त्यात लिहिले होते की गोविंदरायास बोला राजश्रीचे गेले त्याणी दाभाडियाचा तपसील लावून लिहिले त्यास दोन महिने लागतील या साठीं नानासीच कर्जाचा मजकूर बोलावयाचा घातला आहे राजश्री समजले आहेत की

ज्याप्रो मी आण वाहिली त्याप्रो च हे करून आले आहेत आसे आहे त्यात मात्र आमची रदबदली आहे असे धाकटे बाईकडून राजश्रीस कलवावे पुढे बोली गोविंदरावावरच ठेवावी असे नानास आम्ही लिहिले आहे आमचे विचारे असा मजकूर आहे याचा विचार तुम्हीहि सविस्तर लिहिले त्याप्रो करून तीर्थरूप नानाकडील पत्रें पंचविसावे दिवसीची परवा येथे आली हे जयनगराचे आलियाकडे विसा कोसावर होते त्यास पातशाहा येकूणातिसावे राखरी मेले शाहाजादे मनसूर खान याचे अमलेस चितशुध पुर्ती नाही हेहि दिलीस आले तख्तावरी बसलीयावर लेहून पाठवून म्हणून लिहिले आहे माधोसिंगास बारा लाखाचा मुलूख देविला असे लिहिले आहे कासीद सागत होता की पातशहाची खबर आलियावर येक मजल मागे मुकाम केला तेथेच राहिले पत्रांत लिहिले आहे की सवाई इस्वरसिंगाची बोली होत आहे दिलीचेहि काय ते पूर्त कलेल चहूकडील कललीयावर जो मनसुबा करणे तो करून असे लिहिले आहे लस्कर ताजे आहे लूट होत असते याप्रो वर्तमान आहे तुम्हास कलावे म्हणून लिहिले आसे बाबानी तुम्हास काय लिहिले ते लिहिणे आमचे पत्राचे विचार करून उतर लिहिणे रा छ २ जमादिलाखर हे आशीर्वाद

---

ले. १६९ श्री श. १६७० जेष्ठ
इ. स. १७४८ जून

*आसीर्वाद उपरी चिरजीव नानाकडून माणिकगडविसी पत्र आले व हातरोखा व हुजरे घेऊन आले तो पाठविला आसे पाहून पुढे याचा विचार काय हातरोख्यात तिनी गोष्टी करून देईन आसे लिहिले आहे यावर किला घ्यावा किवा कसे करावे हे लिहिणे प्रस्तुत धाकटे बाईसहि बरे वाटत नाही यासाठी दादास पाठऊन द्यावे आसे नानाने लिहिले आहे त्यास फारच पुढे जड जालियास आम्हासहि जावेच लागेल प्रस्तुत यास पाठवावे की काये लिहिणे जड जालियास आम्हासच जावे लागेल आसे वाटते बाबूजी नाईकानी विष घेतले होते त्यापैकी आबाजी नाइकाचे व थोरले बाईकोचे उतरले धाकटे बाईकोस व नाईकास उतार पडत नाही

---

* पत्र भाऊसाहेबांचें धोंडोबा आप्पांस.

फार आवस्ता कठीण आहे याप्रो सातारियाहून लेहून आले तुम्हास कलावे म्हणून लिहिले आसे सखारामपंत व बाबुराव सविस्तर बोलले काहीं कपट नाहीं सविस्तर तुम्हासीहि सखारामपंत बोलिले होते ल्याहावेसे नाहीं दिनकरपंताचीहि कारभाराची फाणाफाण करून वजन हलके पडे दुसरे माणसास व बाा याचा न पडेसे करितो जिवाजीपंताकडील मजकूर आज दोन वर्षे सातारियापासून आमलसे बरे वर्ततात आसे आईकतो त्यास दोन वर्षे त्याचा हिसेब पाहिला नाही वरकड ज्या कारभारावर त्याचे कारकून आहेत ते चोरी करीत नाही आसे नाही त्याचे ठिकाण कोठे ते बाहेर पाडीत नाही त्यास याचा कसा मजकूर आहे आतस्ते बाहेर मनास आणितो त्यास तिगस्ता नारो अपाजी काहीं तुम्हासी बोलले होते यामुले त्याचा त्याचा आमलसा पेचहि वाढला होता प्रस्तुत नारो आपाजीचा भाव पुसलियास काहीं बोलणार नाहीं आसे दिसते तेव्हा काय मजकूर जाला तो लिहिणे व आणखीहि आढलेल ते लिहिणे नवाबाचे खबरीमुले जागा जागा नामजादा रवाना केल्या आहेत बदोबस्त करविला आहे तूर्त च्यार माहिने उत्पात काहीं नाहीसे वाटते रविवार हे आशीर्वाद

---

ले. १७० श्री

* आसीर्वाद उपरी प्रस्तुत खडोजी माणकर येथे आले आहेत जे समई मख्ता जाला ते समई तीर्थरूपाची मर्जी नारोपताकडे मामला सागावा त्याप्रो जाले पुढे खडबानी वाईट मानून न जात तेव्हा तसेच घाणेरे ठेऊन समजावीस करून वाटे लावावयाची आज्ञा त्याप्रो जाले प्रस्तुत खडबाकडे नारो हरीचे मारफातीने आगी. लावावयाचा नारोपताने पेच आणिला व खडबास नारोपताने राहावे आथवा आपण राहावे व आ + + खरे खोटे करावे या भावे येथें आले पुढे रयेत उठून गेली तथापि ते आणून लावणीटुमणी करून उगवणी मख्तियाप्रो होते परंतु सरदेचा जागा सलाबतचा सरदार आसावा ते खडबा न गेलियास नाहीं तीर्थरूपा(ची) मर्जी आसीच आहे की केलेले फिरऊ नये खडबास आसेच गचगचेखाली घालून पुढे समजून गेले तरी उतम नाहींतर उतम आसे आहे बाबाची मर्जी खडबास दुसरा कोणी देऊन पाठवावे आसे आहे बोल [ना]ही उदासपण आहे म्हणून माझे मनचा विचार तर प्रस्तुत खंडबा

न गेलियास काहीं बुडत नाहीं नारोपताचेहि पदरी विशेष आंतर चोरीचे नाहीं व केलेले फिरत नाही मख्ताहि सन मजकुरी थोडीसी रयात केलियाने पुढेहि तूर्त तकुब ठेवावे हे पुढील चह्न सालावर उगऊन घ्यावे याप्रो होते यास्तव आहे तसे आसू द्यावे खडबा न जात तरी न जात आसे आहे परंतु नारोपताचा आम्ही पक्ष करितो यामुले तीर्थरूपासी याप्रो बोलिलो कीं त्रिंबक विनायेकास खडबा बो द्यावे खडबा शाहाणा आहे त्रिंबकपतासी घासणार नाही नारोपतास दूर केलियाचे मात्र येश घेईल त्रिबकप(त) (लाहान)साहान गोष्टीविसी त्याचे वजन राखील व कमाविशीने कारभार उतम करील परंतु मख्तियामध्यें थोडी कमी येईल फार येणार नाही याप्रो करून वाटे लावावे नारोपताचेहि बेड बाहेर पडेले आसले तरी नारोपतास तेथून काढून हो + + र सागावे त्रिबकपंत कल्याणहि संभालून ते करितील याप्रो बोलिलो तीर्थरूप उतम बोलले बाबाचे विचारास येत नाही सखारामासी याप्रोच बोलिलो व खडबा न जात तर न जात नारोपतानीच राहावे हा भाव सखारामासी नानासीहि थोडेसे बोलिलो आहे आद्याप निश्चय नाही तीर्थरूपची मर्जी माझे मनातील विचाराप्रोच गुप्तरूपे आहेसे वाटते जर मख्ता फिरलियास आम्ही केले ते फिरले आसे होते याची वाट काय लौकिक वाईट होतो याची तजवीज कसी करावी ते केलियास उतम पेचहि न पडे आसे जाले पाहिजे हे सविस्तर लेहून पाठवणे हे आसीर्वाद

---

ले. १७१ श्री श. १६७० ज्येष्ठ शु. १२
इ. स. १७४८ मे २८

* आसीर्वाद उपरी पत्रे पाठविली ती पावली त्यासहि पत्र दाखविले बोलीहि जाली सविस्तर मागून लेहून पाठवीन तुम्ही लिहीले तेप्रो माझेच न बोलण्यामुले जाले खरेच आहे तेहि काही कपट करूम न बोलले वरच्यावर होईल वर्तमान लेहून पाठवीन नवाबाचे वर्तमान[1] बहूत वाईट जाले तीर्थरूपाकडे खबर जाईल हे आईकून यावयाचे करितील की काय तर्के आसे दिसते की नासरजंगासहि नवाबवर पातशहाचा रागच

---

* पत्र भाऊसाहेबांचें धोंडोबा आपांस. १ निजामुलमुल्क हा श. १६७० वैशाख वा। १० रोजीं मरण पावला त्या संबंधींचा हा उल्लेख आहे.

होता यासाठी च्यार महिने काही गलबल करणार नाही दसरियाचे दिवसात दिलीकडील तालामाला पाहून मग जसा डौल घालणे तो घालील दिलीसहि उत्पात मनसूर आलीखानास तिकडील बदोबस्ताचा आहे यामुळे इकडे काही करणार नाहिसे दिसते तीर्थरूपासहि याची गडबड काही नाही तेव्हा न यावे हे उतम आसे वाटते याचाहि मजकूर लिहिणे रा छ ११ जमादिलाखर हे आसीर्वाद[1]

---

ले. १७२ श्री श. १६७० ज्येष्ठ शु. ११

इ. स. १७४८ मे २७

*आसीर्वाद उपरी हिंदुस्थानातील धारेचे वर्तमान तर राजश्री गोविद हरी याचे पत्र आले की येसवतराव व रामा(या)जी पवार माडोगडास येऊन दाखल जाले धारेचे तकवियास राऊत याचे फिरतच आसतात त्यास त्याणी पाच सातसे प्यादे व पाचसेपर्यंत राऊत घेऊन गावात चालले याची गाठ पडली गोपालराव फौजसुधा गेले पहिलियाने त्याणी रेटले त्याउपरी याणी आरबा दिऊन त्यावर गेले हातघाई याकडील दाहा बरे माणूस ठार व पचवीस जखमी दाहा वीस घोडी जखमी जाली याप्रो त्याकडीलहि जाले हतीजवळ फार सर्त करून त्याणी सभालली रामाजीस घोडीस मिलोन दोन तीन जखमा लागल्या सेवट ते सभालून गेले याप्रो आले तुम्हास कलावे म्हणून लिहिले आसे रा छ १० जमादिलाखर आसिर्वाद[1]

---

ले. १७३ श्री श. १६७० ज्येष्ठ

इ. स. १७४८ जून

* आसीर्वाद उपरी तीर्थरूप नानाची पत्रे छ १७ जमादिलोवलची आली ती पाठविली आहेत त्यावरून सविस्तर कलेल सखाराम बाबुरायास दाखविलि मला याचा भाव आसा वाटतो की आम्हास गोड वाटावे आम्ही त्यास ल्याहावे दुसरे कोकणचा बदोबस्त आम्ही पुर्ता न करावा पुढे मामलीयातील रुा वसूल करावयास जावे आसेहि वाटते दुसरे काही पेच मनात न आणता लिहिले आहे आसे वाटते येदा सर्व प्रकारे दौलतेस

---

१ पत्र भाऊसाचें धोंडोबा आप्पास.

जरब बसली रुा मिलाला नाही नवाबानें इजत घेतली पातशाहाचा पायेबद सरदारात कजिया इकडे नवाब मेला आसे आहे यास सर्व प्रकारे त्याणी तिकडेच छावणी करून राहावे हे उतम तिकडील हिसेब कितेक मामलती विल्हे लागतील फौज येके जागा आसेल दिलीकडे दबाव याणे इकडे पुढे कदाचित लबाडी मनात आणली तरी मग यावयासहि बरे घरी आलियास मागील कर्ज पुढे सातारियाचा कजिया लौकर निर्गम होणार नाही हैराण मात्र व्हावे आसे वाटते त्यास आम्ही मनसुबियाचे काही पर्याये ल्याहावे कीं काये ते लिहिणे व पत्रातील भावभगत काय हेहि लिहिणे माझे पत्रावर रामाजीबावाची सखारामाची चिठी होती त्यात पत्रे प्रविष्ट करणे दाखविली तरी पाहाणे आसे लिहिले होते सखारामास दाखविली बाबुरायास दाखविली तूर्त लस्करात पत्रे जावयाची आहेत तुमची पत्रे पाठवावयाची असली तर पाठऊन देणे रा रविवार बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद मागे मावलीयाचे कारभारास बालाजी नारायेण बाबाजी योजला होता मीहि फिरून बाबासी बोललो मग तसेच ठेविले तेव्हा राहाविवले माझे मते त्यात बरेच आहे प्रस्तुत काही करावे काय लिहिणे हे आसीर्वाद

---

ले. १७४ श्री श. १६७० आषाढ शु. ३
इ. स. १७४८ जून १७

* श्रियासह चिरंजीव राजमान्य राजश्री नाना यासी माहादाजी अंबाजी आसीर्वाद उपरी येथील वर्तमान ताा आशाढ सुध त्रितीया इदुवार परियेत येथास्थित असे विशेष तुम्ही कोयाजी बराबर पत्र पाठविले ते पावले लिहिले वर्तमान कलले राजश्रीचे मर्जीचा विस्तार व श्रीमंताचे मर्जीचा विच्चार सर्व कललाच आहे याउपर येथे आम्हास ठेवावेसे नाही म्हणून लिहिले ते कलले व अऱ्यानी हातरोख्याविसी राजकारण केले आहे तेविसी कसे करावे म्हणून लिहिले यैसीयासी अतस्ते राजकारण पैका देऊन करू लागल्यास तुम्ही काय येत्न करणे आपण पैका देईन म्हटल्यास कार्यास येत नाही असो हातरोखा घेतला तर काये चिंता आहे येविसी तुम्ही तेथे कोणासी काही न बोलणे वरकड राजकी विच्यार तर गजराबाई व लक्ष्मीबाई गुणवंताबाई वगैरे यासी आणावयाकरिता बाबूराव

---

* पत्र भाऊसा. चे धोंडोबा आप्पास.

फडनीस व इद्रोजी कद्म हे पाठविले आहेत हे त्यास घेऊन येतील तेथे आठ पधरा दिवस राहातील तुम्हापासीहि फौज अहेच प्रस्तुत सरलस्करचा सरंजामही श्रीमंतानी जफ्त करविला आहे यामुळे दर्याबाईस गल लागून तीही श्रीमंतासी अर्जमात होतील त्याचे हातून राजश्रीहि सुरलीत होतील तुम्ही शामरायासी अथवा दर्याबाईसी अथवा राजश्रीचे मडलीसी किमपी विरुध भाषण न करणे श्रीमंत रागे भरले तरी थोर आहेत मागती तेहि यासी रुजू होतील हे त्याचे मनोरंज्यन करितील आणि तुम्ही मात्र फिके दिसाल यास्तव उगेच चढी लागाल तर न लागणे सर्वासी गोड बोलणे सर्वांचे मायेत राहाणे आसे करिता महिना पधरा दिवस तेथें फौज आहे तो मानमार्ग पाहाणे पुढें फौज नेहेमी तेथें राहावीसी जाहाली तरी उतम जाहाले न जाहाली तरी तुम्हासहि यावयासी लेहून पाठऊ साराऊष फौज फार जमा जाहाली म्हणून हुऱ्या भरून सर्वास अव्हेरयुक्त बोलाल तर न बोलणे कालदेश वर्तमान पाहून शाहाणपणे वर्तणूक करणे गुजराबाई गुणवंताबाई अणते समई राजश्री रागे भरतील तरी त्यासी तुम्ही निस्टुर न बोलणे इद्रोजी कद्म बाबुराव यापासून बोलवणे तुम्ही काहीं राजश्री म्हणतील तर श्रीमंतांनीं पाठविले आहेत ते अज्ञेप्रमाणे वर्ततील आमचे यैकणार नाहींत तथापि माहाराजाचे आज्ञेप्रमाणे सागतो म्हणून येक वेरधार घालावी ऐकत नाहींत आम्ही काये करावे म्हणून जाबसाल करावा आपलेकडे निस्टुरता घेऊ नये कलले पाहिजे हे आसीर्वाद

---

ले. १७५ श्री श. १६७० आषाढ शुा ५
इ. स. १७४८ जून २०

आसीर्वाद उपरी तीर्थरूप राजश्री नानाची पत्रे अठरा दिवसाचे धारे नजिकचे मुकामची परवा आली त्यात मजकूर धारे माडोगड वगैरे परगणे घ्यावयाचा करार जाला त्याप्रो देखील ठाणी त्याणी सरकारात द्यावे त्यास साडे तीन माहाल द्यावयाचे आहेत ते द्यावे येसवतरायानी पुढे येकनिष्ठेने चाकरी करावी याप्रो करार होऊन त्यास आणावयास रामचंद्रबावा खडेराव होलकर जानोजी ढमढरे गेले येकूण तो कारभार उरकला पुढे आम्हास काही पैकीयाची तरतूद करावयाविसी लिहिले आहे उटे

कासारबारीस आणविली आहेत पत्री यावयाचाच मजकूर लिहिला आहे वहिनीस पुढे रवाना केले पुढे काय होईल पाहावे बहुधा राहाणे जालिया मनसुबियास उचीत पडेल बाबाची मर्जी याप्रोच आसेल उदासपणे आमलसे आलीकडे राहू लागले नानाचे आग्रहास्तव कदाचित येतील आसेहि वाटते दुसरे नवाब मेलियाचे खबरीमुले नासरजंगाची मर्जी जलद यामुले साता-रियासारखे तेथे आवाई आहे आसे पत्रात भाव आहे रा छ २ रजब बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद

---

ले. १७६ श्री श. १६७० आषाढ
इ. स. १७४८ जून

*आसीर्वाद उपरी गोपिकाबाई परवा येणार त्यास येक बाईको घरी गरवार आसता बाहेरून दुसरी आली तरी जोपर्यंत प्रस्तुत होये तोपर्यंत भेटी परस्परे बाईकाची न व्हावी आसे आहे त्यास प्रस्तुतँ बाई येथे नाही ताई आहेत त्याकडून चौघास पुसून ज्याप्रो आसेलँ त्याप्रो करून राहावेसे जाले तरी बरेच जाले जावेसे जाले तरी तूत तात्याचे येथे पाठऊन पुढे वहिनी आलियावर त्याचे विचारे लोहगडास पाठवणे तरी पाठवावे लागेल त्यास लोहगडची हवा वाईट सासूची मर्जी येक प्रकार इचे पोरपण दूर नसावे बरे जालेच तेव्हा तात्याचे येथे ठेवावे किंवा माहेरी जावे हे पुर्त रीतभात मनात आणून लिहिणे ताईजवल पाच सात बाईकाचा शोध केला त्यास ही रीतच नाही येक दोन दिवस घरचीने बाहेर आसावे बाहेरची जुनी जालीयावर येके जागा कोनी देखील निघतात आसे आहे आणखी शोध करितो आसे जाले तरी बरेच जाले तसेच जाले तरी त्याचा विचार लिहिणे कोकणस्तात दडक नाही देस-स्थात आहे आसे बोलतात यातहि जसे होईल तसे करून पत्राचे उतर पाठवणे सखारामपंतासी बाबूरायासी असा मजकूर बोलत असतो रा मंदवार तिसरा प्रहर हे आसिर्वाद उतर लौकर पाठवणे आथवा येथले माणूस भागले तरी तेथून पाठऊन देणे हे आसीर्वाद[१]

---

१ पत्र भाऊसाोचे धोंडोबा आप्पास.

ले. १७७ श्री श. १६७० आषाढ
इ. स. १७४८ जून

* आसीर्वाद उपरी तुम्ही पत्राचे उतर पाठविले ते पावले बाबा वैद्यास पत्र पाठविले ते पावले वैद्य हिवस्त आहे तजवीजेने आगावर घेऊन पुसावे सखारामाचा मजकूर तर त्यास बरे वाटत नाही म्हणून लिहिले ते कलले ऐसीयास बाबा वैद्य रामाजी विस्वनाथ तेथे गेले होते त्याणी सविस्तर लस्करचे वर्तमान सागितलेच आसेल तुमचे जवल काही मजकूर मजवल काही न सागितलेले आसेल तरी लेहून पाठवणे सखारामाचा मजकूर तर आजपर्यंत ताप येत होता हाली येत नाही रोज दरबारी येत असतात त्याचा लेहून पाठवावयाचा दडक नाही तुम्ही त्यास लेहून पाठवावे की तीर्थरूपा आसे वर्तमान गेले याची तजवीज कसी केली आहे व वर्तमान नवल तुम्ही आदीक काय आहे हे लेहून पाठविलीयावर जाब लिहितील प्रस्तुत गोपिकाबाईचे मर्जी फारसे राहातो सखारामपताची मर्जी ठाऊक आहे त्याजवल राखावयाचे ते राखून वरकडविसी खुलासा उतम प्रकारे राखून मर्जीतच आहो आमचे बाईकोस निराले ठेवावे येविसी सहजावरी रामाजीपंतासी बाबा वैद्यासी बोलावयाचे रीतीने बोललेत तो मजकूर व हा आम्हा लोकातहि दडक आहे येविसी येसूवदाबाई बोलली तो भाव वैद्य मजसी बोलले त्यास माझे मनातील भाव बाईकोचे रितीवरून जवलच आसावे परंतु रीतीची गोष्ट आसलीयास सहसा विरुध न दिसू द्यावे निराले ठेवावे यासाठी ताई वडील त्याजकरवी मनास आणून त्याचे आज्ञेप्रो केले प्रस्तुत आसे बोलतात यासाठीं फिरून रामाजीपंत गंगाधरभट याची गाठ घालून बबीनी ताईस सांगून जसा दडक आसेल त्याप्रो करावे आसे केले आहे वहिनीसी खुलासा उतम प्रकारे राखतो जसे आसेल त्याप्रा तात्याचे येथे पाठवावयाचे जालियास वहीनी करून पाठऊन उतर पाठऊन देणे पत्र फाडून टाकणे हे आसीर्वाद

---

१ पत्र भाऊसोचे धोंडोबा आप्पास.

ले. १७८ श्री श. १६७० आषाढ शुा १२
इ. स. १७४८ जून २७

* आसीर्वाद उपरी चिरंजीव नानाचे पत्र साताराहू(न) आले त्याचा मजकूर मुख्य पत्री लिहिलाच आहे ऐसीयास आमचे विचारे साक्ष पत्रावर घालावयाचा मजकूर तेथे नानाने न घालावी यास इतके युक्तीस पडते गोविंदरायाची नानाची मैत्रीकीस वाईट दुसरे उगेच आपण होये म्हणावे हात न सापडावा पुढे तीर्थरूपाचे मनात आणीख प्रकार आसलीया आपण न सापडावे दुसरा विचार हे गोष्ट परभानी केली हे तीर्थरूपाची विचारास आली नवती कदाचित दुसरा प्रकार मनात आणलीयास कासीपासून देखील सातारा येक प्रकार जाला तेव्हा चालणार नाही व तीर्थरूपहि करणार नाही तेव्हा नानानी साक्ष तेथे न घालावी आम्हावर घालावे मणजे त्याचाहि पेच वारेल आम्हाकडे येमाजी(प)ती नेटी लाऊन लिहिल्यास आम्हास घाला(वी)च लागेल तेव्हा आम्हाकडेहि फारसा पेच नाहीं सारे सातारियात जाले तेव्हा आम्ही काय करावे व इकडेहि पूर्ती प्रसिद्ध होईल आसे दोन विचार आहेत परतु बलकट विचार पाहाता साक्ष घालावीच लागेल येथें आथवा तेथें दोनी येकच आहे त्यात येथें जालीया उ(तम) येक नानाचा पेच वारतो आसे तरी पुर्ते मनन करून नानास कसे उतर ल्याहावे ते लेहून पा(ठ)वणे केवळ नानाने तेथे मलमलीत बोललियास आह्माकडे तूर्तच पत्र तेथील येईल असा मजकूर आहे राजश्रीस येकाती याचा मजकूर पुसावाहि लागेल रा छ ११ रजबू हे आसीर्वाद आमचे बाईकोस माहेर घरीं माठवावयाचा मजकूर त्यास मातुश्री + + ई येथें वडील त्यानी सागून त्याणी शोध केला आम्ही पुर्ते सागितले कीं येखादा चुकले ह्मणतील आसे करू नका त्यास दाहापाचाचे येथे शोध त्याणी केला त्यास तो दडक कोकणस्तात काही नाही सुखरूप घरीच राहावे कोठे न जावे आसे जाले तुम्हास कलावे म्हणून लिहिले आसे पत्राचे उतर लौकर पाठऊन देणे आसीर्वाद

---

१ पत्र भाऊ हिंग्यांचे धोंडोचा आपास.

ले. १७९ श्री श. १६७० आषाढ
इ. स. १७४८ जून

आसीर्वाद उपरी पुणियास प्रविष्ट जाहाल्याची पत्रे राजश्रीस पाठविली ती समयोचित प्रविष्ट करणे यदाचे स्वारीचा अर्थ सर्व परस्परे कललाच असेल फौज मातबर कर्जाचा प्रसंग याजमुळे लोकाचे रवानगीचा गुता हा कालवर मातबरच आहे नवाब नासर[जं]ग तूर्त दिलीकडील पेचामुळे स्नेहार्थ बोलतात परतु बाजत बरसात कोणे प्रकारे वर्ततील हाहि संदेह आहेच दिलीकडीलहि निरतर पत्रे येतात की पातशा बाजत बरसात बाहेर निघणार इतकेहि अर्थ श्रीकृपेने व खावंदाचे साहित्याने उतमच प्रकारे निभावतील तूर्त तो राजश्रीची मर्जी माहालातील वेथेमुळे दिक असेल तथापि समय सापडल्यास येकांती या अशये थोडो बहूत अर्थ कानावर घालणे हे आसीर्वाद[1]

---

ले. १८० श्री श. १६७० आषाढ
इ. स. १७४८ जून

*आसीर्वाद उपरी माणीकगडचे मजकुरावरून कितेक तपसिले लिहिले ते कलले ऐसीयास इतके ल्याहावेसे काये आहे परस्परे मनापासून विदीत आहे वीस लाख रुो तीर्थरूपानी करार केलियाप्रो करार जाला महिपतराव निवेदन करितील म्हणून लिहिले ते कलले ऐसीयास महिपतराव तेथे आला वर्तमान कलले इतके सारे होईल आसे मला पहिले वाटत नवते धज धरून काम केले फार उतम जाले बाईची मर्जी राजश्रीची मर्जी व कर्जाचा कारभार सर्वासी वोलख आतल्यापासून बाहेरपर्यंत ज्याच्या त्याप्रो वर्तून राखिली येणेकरून बहूत सतोष जाला पत्री काय ल्याहावे तीर्थरूपहि कर्जाचे मजकुरामुले खुशाल जाले प्रस्तुत तीर्थरूपाची मर्जी सातारियास कोणी न जावे आसी आहे याचा भाव काय वरकड राजश्रीसी नानापासून कोणेविसी पेच नाही दो देवढीचे कबज साबज उपद्रवामुले व येदा आपलेच वोढीने घरास आले आहेत गुा नवाबापासूनहि येक प्रकार जाला दिलीचा मनसुबा नेट धरून न केलाच पाववले पैका न मिलाला कर्ज जाले यासाठी लौकर तरतूद करून मालवियात जावे पातशाहा नवा कुरमनसूर आलीखा-

---

१ नानासाहेबांचें नाना पुरंधरे यांस पत्र.

नास वजिरी जाली सादतखान मामा होता त्यास बक्षीगीरी जाली दिलीत फौजबदी होते बगालीयाचे सुभीयाने समसेरखान वगैरे पठाण रघूजीचे पुत्रास मिलाले त्यास मारून टाकले अहमदशा पठाण पातशाहाजादीयापासून पलाला तोहि आटके पलीकडे दाहा हजार फौज जमा केली आणखी फौज जमा करतो व नादरशाहाचा पुतण्याहि आटके पलीकडे तीस हजार फौजेनसी आला व वजीरी मनसूरआलीस जाली याकरिता वजिराचा पुत्र पंधरा हजार फौजेनसी लाहोरी आहे तोहि खटा आहे व मनसूर आलीचे मनात रजपुताचाहि बाजत-बारसात बदोबस्त करावा आसे आहे बाहेरील मनसुबीयाचे घरचे कर्जाचे वगैरे पेच याकरिता लौकर तयार होऊन जावयाचा मजकूर आहे यासाठी सातारियाचे मवकूफ करावे आसे आहे माझेहि मते आम्हा कोणाचे जाणे सातारा न व्हावे कदांचित राजश्रीची मर्जी जवल कोणी असावा तर दादास पाठवावे याप्रो जालियास तर्थिरूपाची मर्जी उतम होईल व खरीच गोष्ट आहे याप्रोच तुम्हास केले पाहिजे आमचा कोणाचा यावयाचा गुता न पडे ते करणे होईल ते लिहीत जाणे हे आसीर्वाद

---

ले. १८१ श्री श. १६७० आषाढ
इ. स. १७४८ जून

आसीर्वाद उपरी तीर्थरूपाचे व बाबाचे मर्जीचा मजकूर तर बाबाचे व तर्थिरूपाचे प्रस्तुत कटकट जाली आहे याचा भाव काय दिलिकडे नीट जावयाविसीच्या यावयाचा मनसुबा वोढ धरुन केला आहे पुढे देसास वोढ धरून आले नाना प्रकारेचे रागरंग करावयाचे मनात व कितेक जागा बाबावाचून जाबसाल नाही नानानी खेलावे तेव्हा यासहि राग आला बाबानीहि कसे होते ते पाहावे यासाठी निराले राहिले नानानीच कारभाराचे सूत्र राखून कामकाज करावे बाबानी केव्हा केव्हा यावे मर्जीप्रो विचार बोलावा आसे जाले होते रवानगीहि तीर्थरूपानीच केली त्यास हे मजकूर तीर्थरूप सखारामासी बोलले येथीलहि वर्तमान पुसले व कितेक गोष्टी आईकिल्या त्याचे भाव काढावयाजोगेहि पुसत होते याणीहि सविस्तर सागितले मनातहि मजविसी बरेच आले सारे बोलले त्याचा

---

१ सबंद पत्र भाऊसाहेबांच्या हातचें.

मुख्य भाव कारभार मी करीन सर्वांपासून घेईन बाबानी आनकूल असावे रागरंग करीन बाबानी वाईट दाखवितात ते दाखऊ नये बाबा घरीहून लौकर आले तरी बरे नाहीतर मी मोरगावास श्रावण वद्य चतुर्थीस जावयाचे आहे तेव्हा सासवडी जाऊन बाबास बोलावीन नाहीतरी ते भाऊ कामकाज करितात मलाहि सुचेल ते सागेन मी मोरगावी जाऊन बसेन याप्रो बोलले तेहि बाबास सखारामाने सागून घरास जातेवेलेस बाबाचे ना नें च बोलणे होऊन नीट नानास आनकूल वर्तावे याप्रो जाले बाबाचा मजकूर तरी सखारामाजवल बाबानी नानानी चिवड सागितली येथीलहि पुसले सखारामाने दोन आधिक सागून त्याची मर्जी वाईट केली आसे जाले नाही यथास्थितच सागितले बाबाची मर्जी मजविसी बरी सर्व प्रकारे बरी आसे भाव काढून घेतले नानाचा आसा भाव यामुले आम्ही भाऊनी कसे वर्तावे हे सखारामाने पुसले बाबास त्याणीहि सागितले त्याचा भाव तूर्त नानास आनकूल दिसेल ते करावे आपण कारभाराची आस्ता दाखऊ नये नानाची मर्जी पाहून सागतील ते करावे खुशामत करावी त्याची मर्जी आपण सर्व करावे चौघास सागावे त्यास आनकूल वर्तावे मीहि लौकरच येईन खुशामत कराल ती त्यास दिसू देऊ नका याप्रो मायेने बोलले आसे सखारामाने सागितले माझे त्याचे बोलणे व्हावे हे बोललो परंतु नानामुले बोलणे न व्हावे आसे ते बोलले उभाउभी दोन गोष्टी याच भावाचे बोलले पुढे नानाचे त्याचे बोलणे निरोपाचे वेलेस होऊन मजकडे बोलावयास आले तो काय बोलतील यासाठी तीर्थरूप मागून आले बाबानी उपक्रम काढला तो राहिला निरोप घेऊन घरास गेले शालग्रामाचे घरी नेऊन सासवडास गेले येकूण गाठ पुर्ती न पडली सखारामासी मजकूर मजविसी बोलले तो मायापुरस्कर बोलले मीहि सखारामासी बाबास नानास उपयुक्त भाव पडत आसे बोललो त्यास नानाचे व बाबाचे मनात मजविसी वेडावाकडा भाव काहीं आला नाहीं परंतु तीर्थरूपाचे मनात आपण कारभार करावयाचा आहे त्याचा आर्थ काय आपण बसावे व भाऊनी बाबानी देखील लाहान साहान जे पुसणे ते पुसावे तेव्हाच करावे चौघानी सारियानी रद्बदलीप्रो वर्तून आपण खावदागिरीने जाबसाल करावा त्यास आम्ही काय याप्रोच डौल घालतो त्यास गोड वाटे आसे करिता येथील सर्व कोकणचे कामाचा आमला जागा आसे

चुकलेले आहे हे वर्तमान सागता समजाऊन देतो पुढे लाहान-साहान गोष्टीपासून थोर मनसुबापर्यंत सुचल ते बोलावे गडबड करून जे लाहान साहान देखिले त्यास पुसून करावे आसे करितो परंतु यात थोडासा भाव दिसेल की भाऊ सारे न पुसताहि करीत होते ते आता फारदा पुसून करावे आसे होईल तर होऊ परंतु मर्जी याप्रा आहे तूर्त रगात मिलोन याप्रो केले पाहिजे पुढे जसे नजरेस पडेल तसे करावे दुसरे माझे मते बाबाची मर्जी कदांचित आसी आसेल मी कामकाज करितो यास पेच आणलियाने फजीत पडत नाही यासाठी नानाचे नानानीच केलियास हे फिके पडतील आसाहि कदांचित आसेल आसे वाटते परंतु बोलणीयात चालीत किमपी वेडा भाव दिसत नाही आसेहि प्रकारे नानाची मर्जीत मिलोन राहिलीयास पुढे आपणच करावे आसे होईल आसे वाटते तूर्त मात्र फार करून त्याचे आज्ञेसिवाय होत नाही आसे आडस दाखविले पाहिजे ते करितो आसेहि केलियाने काही रुक्ष मजकडे पडते आसेहि होत नाही या डौलाने चालतो सखारामाची मर्जी बरी आहे आम्हीहि उतम प्रकारे राखतो बाबूरायाची आत बाहेर जसे राखावयाचे तसे राखतो लस्करचे लूच (?) काही पुरते आम्हासी बोलत नाही माझे बोलीचाहि त्याचा भाव दिसत नाही मामा [?] खापर आधिकच बोलून आले जनार्दनबावा पोरपण करीत होते ते प्रस्तुत उमजले आहेत त्यातून दाब स ली स मर्यादेविसी आधिक आसे आहे जनार्दनबावास कामकाज काही विशेष नवते हे आंसीर्वाद

---

**ले. १८२** श्री श. १६७० आषाढ
इ. स. १७४८ जून–जुलई

आंसिर्वाद उपरी सखारामपत याणी तुम्हास पत्र पाठविले त्याची नकल पाठविली ती पावली व लिहिले की तीर्थरूप नाना व बाबाची मर्जीच उपयोगीच पडेल त्याचा विचार करून करावे हे उतम त्याचा विचार व दादास तर्बेत करावयाचा मजकूर सर्व प्रकारे आणखीहि कितेक मजकूर बारीक पेच फार आहेत आपण मनात आणीत आसतील नाही तरी आणून करितील सर्वा प्रयोजनी मत्री आसावा याउपरी मी वारंवार

१ पत्र भाऊसाहेबांचें धोंडोबा आपास.

लिहिणार नाही म्हणून लिहिले ते कलले असो यांसि तुम्ही लिहिले ते प्राचं आहे त्याप्रो मनात आणून केलीयास पेच पडत नाही हे खरेच येविसी मी मनन करून सखारामपंत बाबूराव यासी बोलत जाईन प्रस्तुत कसे आहे ते तोंडाने नाही म्हणतात परंतु रीत कसी पुसावे ते येथास्थित चाचपडत सागावे आसे आहे त्यास नीट बोलून त्याचे मनात आले ते काढतो पुढे त्याचे त्याणी नीट पेचपाच बोलतसे करितो याप्रो करितो बाबूरायाचा मजकूर तर आधी आमचे मैत्रकीमुले पोलले त्याचे मनात आले की गुा आम्हास सखारामानेच फजीत पाडले हे सशये धरितात तेव्हा आपणहि दूर आसावे त्यासी येथास्थित रीतीने गोड दाखऊन आसावे आसे आहे परंतु ते काही कामाचे नाही पुढे त्यास बोलावयास पुसतात ते सागतो हे कार्याचे नाही ते न होये ते करितो जसे करीन तसे लिहून पाठवीन तुम्ही आसेच सिक्षायुक्त लिहिलेच पाहिजे लेहून न पाठवीन म्हटल्यास कार्याचे नाही मग इलाज काय मत्री आसावे सर्वास पाडवादिकास लागले म्हणून लिहिले तरी हे खरेच आहे वरकड मी काही लबाडी करून माजून शहाणपणाचा गर्व आणून बोलत नाही आसा भाव नाही कुटिलपणे राहात नाही फारच फार आधीक कल्पना काढून बोलावे तर हे मला पुर्तें ज्ञान नाही कुटिलपणा मी धरीत नाही व पुर्ते समजून आसावे ते करीत नाही पेच धरितात तो न धरावा हे उतम आहे मीहि आपले बुधीने बोलावयाचे ते बोलेन सविस्तर लेहून पाठवीन तुम्हीहि लेहून पाठवावयाचे ते त्यास लिहिणे मीहि त्यासी बोलतो परंतु त्याणी पुर्ता आमचा मनापासून स्वभाव पाहून नीट वर्तावे व पेचपाच आपण होऊन बोलावे आसे लिहिणे रा मगलवार हे आसीर्वाद

---

ले. १८३ श्री श. १६७० आषाढ
इ. स. १७४८ जून–जुलै

विनंती[1] उपरी स्वामीनी जासुदा बा पत्र पाठविलें तें पावले श्रीमंताचे काही भाषण जाले कीं नाहीं ते काहींच लिहिलें नाहीं म्हणून लिा तरी येथें आलियावरी दोन तीन रोजानी येकदां भाषण आम्हासीहि केले

---

१ पत्र भाऊसाचें धोंडोपा आप्पास

व बाबुरायासी केले कीं तुम्ही उदास काये ह्मणोन त्यास उतर केले कीं उदास काही नाही आम्ही जर कारभारांत मन घालावें तरी तें कामाचे नाहीं स्वामी कारभार करितात तेणें स्वामीचा लौकिक उतम होतो यासाठी आम्ही दूरदूर राहातों यांत काहीं दुसरा भाव नाहीं यैसे च्यार गोष्टी समजाऊन सागितल्या त्यामध्येच समजोन आम्हासी काहीं फिरोन भाषण केलेच नाहीं जर उपज घेऊन बोलले कीं तुम्ही बालिलां हे बास्कल आहे चितातील आर्थ आमच्या आपल्या पष्ट बोलल्याखेरीज कार्यास न ये यैसेच उतम चिंते करून पुसते तरी लक्ष प्रकारे स्वामीसी ज्याप्रमाणें बोलिलो आहो त्याप्रो बोलतो वरकड येथें आलीयावरी जो कारभार पुसतात आगर सागतात तो यथाज्ञाने बाबुराव अगर मी सागतो बोलतो काही गुंता नाही याउपरी आपण आज्ञा करितील त्याप्रो वर्तणूक करून श्रीमंतासहि जे ल्याहावयाचे ते ल्याहावे लोभ आसो दीजे हे विनती[1]

---

**ले.१८४** श्री श. १६७० आषाढ
इ. स. १७४८ जून–जुलै

विनंती उपरी स्वामीनी पत्र पाठविले ते पावलें श्रीमंताचे पत्राचा आर्थ लिहिला तो कलला आपण लिहिले कीं यास गर्व जाला आहे व कोणी गुरूहि जाला आसेल तर ह्या दोन्हीहि गोष्टी नाहीत परिछिन्न आज्ञानपणें करितात चितात थोडासा खावंदगिरीचा भाव आणितात त्यास याचे मर्जीनुरूप व्हावें यास सर्वस्व आम्ही जपतों हे न समजतां अल्पबुधीमुले यैसी कुटिलता ध्यानात आणून परस्परे संकोच धरून खुलासा न पाडावा हे काये म्हणोन करावें बाबूरायाच्या खुलासा आहे म्हणून त्यानी तुम्हास लिहिले परंतु बाबूरायाचा याचा खुलासा आधीक आहे कीं नाही तो मी जेव्हां भाऊसी बोलन तेव्हां रुजू करून देईन आमचा बाबूरायाचा जो आहे तो त्याचा नाही यैसे असतां यांस काहींच समजेना आणि जे गोष्टीची मुले तोडावी तेथें पाणी घालून वाढवितात यैशास जे न करावयाचे ते करावे काराभाराचा नाश आपला दुर्लौकिक हेच व्हावें यैसे कोणती गोष्टीचा प्रतिबंद आहे यद्यपि तुम्ही रागे भरून यैसेच ठेविलें तथापि वाईट जालें ते भाऊचेच आहे आणि तुमचे आमचे

---

१ पत्र सखारामबापूंचें धोंडोबा आपास.

नाही यैसे नाही याचे उतम तेच आपलें यैसा निश्चये आहे यासाठी तुम्ही त्यांस पष्ट लिहिणें कीं सर्व गोष्टी तुम्ही सखाराम बाबूराऊ बसोन बोलणें संकोच येकंदर न धरणें पुढें कितेक कामकाजाची सुरत धरून पैरवी करावी परस्परे स्वच्छता व्हावी गतवर्षी स्वारीत तिघेहि येक विचारे होतो तर धण्याचे पुण्ये सर्व कार्यसिधी जाली तैसेच येदाहि मातबर कार्य करावें हा हेत आहे प्राक्तनानरूप जे घडेल ते खरे अलस कराल तरी माझी आण असे या उपरी जे खातरेस येईल ते करावे मागती येक सिपाई पाठवावा त्याजबरोबर उतर पाठवावें बाबूरायाचा बाबाचा पेच खराच परंतु आम्ही याचा खुलासा बहुता प्रकारे राखिला आहे काये म्हणोन म्हणाल तर दुर्लोकिक येकंदर न व्हावा हे सर्व येक विचारे आहेत यैसे आसलीयास कोणाचेहि काही चालणार नाही आपणास उपयोगी आहे हे विनती

---

ले. १८५ श्री श. १६७० आषाढ
इ. स. १७४८ जून

आसीर्वाद उपरी मालवीयातील वर्तमान तर रामचंद्रबाबा तीर्थरूपाची आज्ञा घेऊन गेले ते उजेनीस गेले धोडो दतात्रय व अताजी माणकेश्वर बुदेलखडात रवाना केले बुदेलखडचे जमीदारानी आमलास खलेल केली आहे तीर्थरूप माघारे आले यामुले नाना प्रकारच्या खबरी बोलतात राजे मेले याचा मोड जाला म्हणून देसास गेले आसे बोलतात रामचंद्रबावा राहिले फौज गेलीयाने निवलेल मल्हारबा तीर्थरूपाचा निरोप घेऊन ईश्वरसिगाकडे गेले कीं च्यार परगणे माधोसिगास दिले ते याप्रो निभाऊन न्यावे यासाठीं गेले मल्हारबाची पत्रे आली आहेत त्यात लिहिले आहे की हे करारप्रो ईश्वरसिग निभावीत नाही आम्ही विसा कोसावर आहो तेहि फौज जमा करितात केसोदास गेले आहेत जाबासाल करून आलीयावर होईल ते लेहून पाठऊन याप्रो लिहिले आहे त्यास जयनगरी ईश्वरसिगाजवल गोविदपत यानी वकील बापूजी माहादेवाचे निसबतीचा रामचद्रबावाचे पक्षाचा आहे त्याणी लिहिले आहे की मल्हारबाजवल फौज पांच

---

१ पत्र सखारामबापूंचें धोंडोबा आप्पास.

सा हजार आहे मल्हारबानी सागून पाठविले की पहिला करार जाला होता की च्यार परगणे दिल्हे त्यापैकी जमीदारी ठाणीयावेगल वरकड ठाणी ईश्वरसिगाने खाली करून द्यावी जमीदारी ज्याचे त्याणे घ्यावी आसे होते त्यास याणी सागितले की सारी ठाणी तुम्ही खाली करून द्यावी दुसरी बुद्दल उमेदसिंगास द्यावयाचा मल्हारबाचा आग्रह होता ते रायानी सवाईचे भिडेवरून त्याचे जावयाचे हवाली केली प्रस्तुतहि तीर्थरूपानी ते गोष्ट न बोलावी आसे केले आसता मल्हारबा उमेद्-सिगास राज्य द्यावे आसे म्हणतात व आपल्यास दोन च्यार लाख मेजवानी द्यावी आसे नव्या बोल्या घातल्या हे बोलतात की आम्ही तीर्थरूपाचे करारप्राो निभाऊ मल्हारबा आईकत नाही हे म्हणतात हे झुजलीयावर आपण झुज देऊ गावाबाहेरच देऊन आसे करून फौज जमा केली पंधरा हजार फौज व याप्राो प्यादे व तोफ-खाना जमा जाला मल्हारबा आईकून लस्करातून केशोदासास निरोप दिल्हा आपण दोन कूचे करून दाहा कोसावर गेले ईश्वरसिगाने पेशखाने बाहेर देविले मल्हारबाकडे राठोड दोन हजार व राणाजीकडील च्यार हजार व बाडे दोन हजार याप्राो कुमकेस येतात वाटेस नद्या भरल्या पर्जन्य लागला मल्हारबाहि च्यार दिवस बोलीवर घालून फौज जमा करि-तील आसे वाटते आदीच कजिया जालियास जबून ( ? ) गोस्ट दिसते होईल वर्तमान ते पुढे लेहून पाठऊन हे आसीर्वाद

---

ले. १८६ श्री श. १६७० आषाढ

इ. स. १७४८ जून-जुलै

[1]विनंती उपरी स्वामीनी पत्र पाठविलें तें पावलें श्रीमंत पत्र दाख-वितील आगर बोलतील अथःपर काही संशय नाही म्हणून लिहिलें तर यथार्थच आपलें पत्र होते तेच आम्हा उभयेतास दाखविले तदोतर चितात जितके अर्थ आले तितके बोलिलों त्याचेंहि चितात आले सर्व भाव कल-लिया त्यास उपयोगीहि होतील दिवसेंदिवस करण्यांतहि येतील सारांश आपणासारखे सुज्ञतर जेथें आहेत तेथें कोणेविसी न्यून पडो देतीलसे नाही विशेष काये ल्याहावें अधिकोतर तूर्त तपसीलवार ल्याहावें तरी

---

१ पत्र भाऊसाहेबांचें धोंडोबा आप्पास.

बो(ल)ण्याचा प्रकार सर्व आपणास ठावकाच आहे त्याप्रमाणेंच बोलिलों लोभ आसों दीजे हे विनती

---

ले. १८७ श्री श. १६७० आषाढ
इ. स. १७४८ जून–जुलै

विनंती उपरी सेताचा मजकूर तूलरासें यैकत नाहीत खरें आसता आम्हासी देखील रेटाईच्या गोष्टी सागतात तरी जबरदस्तीनेच सेत करावें हे इमानी आहेतसे ठावकेच आहेत म्हणून लिा तरी आती उतम आमचे विचारे होते की स्वामीचे यैकेल परंतु त्याचे मर्जीस सांप्रत विपर्यास आहे यैसे जालें तेव्हां तुम्ही जे सागता तेच उतम आहे लक्ष प्रकारे नारो दादाजी येथे आले आहेत तरी गावकरी यास पुणीयास यावयाची तजवीज करावी आम्ही श्रीमंतास विनंती करून ठेवितो आपणहि श्रीमंतास पत्र ल्याहावें त्यात आमचा भाव मात्र सुचवावा की सखारामपंत खासगत विनंती करितील ते कार्य करून द्यावे म्हणजे याची खातरजमा होईल कार्य खामखा होईल वरकड किरकोल पेचपाच काही करावयास राहूजी अनमान करणार नाही त्याचा विचार चितात आसो द्यावा हे विनती

---

ले. १८८ श्री श. १६७० आषाढ
इ. स. १७४८ जून-जुलै

विनती उपरी श्रीमंताचे बोलण्याचा भावार्थ पदाजी बाा लिहिला होता त्यावरून कळलाच आसेल यैशास तुम्ही त्यांस लिहिले होते की उभयेतासी बोलणे त्यावरूनच येकदा मात्र थोडासा भाव दाखविला पुढें काही बोलावे ते बोलिलेच नाहीत त्याचे मते याणी अधिकोतर काये लिहिलें आणि आम्ही यांसी काय बोलावे यैसा निश्चये करून राहिले तुमच्या पत्राचे उतर पाठविले न पाठविलें हेहि कळले नाही सारांश तुमच्या लिहिल्याप्रमाणें याचे ध्यानात भाव अले आहेत किवा नाहीत हे काहीच कळत नाही अम्ही व बाबुरायानी बोलावे न बोलावे हा संशय जाला आहे तरी आपल्यास त्याणी लिहिलेच आसेल त्याजवरून विचार ध्यानास आणून

१ पत्र सखाराम बापूंचें धोंडोबा आप्पास. ले. १८७ ते १८९ हीं तीन पत्रें सखारामबापूंची धोंडोबा आप्पास.

उतर पाठवावे त्याप्रमाणे बोलोन मुजरद माणूस पाठवावे पत्र ल्याहावयाचा अलस न करावा आपा आमची सर्वांची मदार साप्रत तुम्हावरी आहे यासाठी जे होते ते लिहितों आज्ञा येईल त्याप्रो वर्तणूक करून सेताचा विचार येंदा राहू द्यावासा नाही त्यात खातरेस येईल ते खरे बहूत काय लिहिणें लोभ आसो दीजे हे विनती उदईक उतर पाठवावे हे विनंती[1]

---

ले. १८९ श्री

आसीर्वाद उपरी तुम्ही पत्राचे उतर पाठविले ते पावले सविस्तर बाबाचे बोलणीयाचा वगैर मजकूर लिहिला तो कळला तुमचे लिहील्याप्रोच करितो दुसरे लिहिले की बाबाचे बोलणीयात येदा भाऊ दोन गोष्टी चुकले की नानाचा कागद माणिकगडचा आला आसता न दिल्हा व सातारियास न गेले म्हणून बोलले त्यास याचा भाव काय आमचेकडे जावयाचे काय होते माणिकगडाविसी कसे चुकलो याचा भाव लिहिणे व सखारामाचा मजकूर लिहिणे म्हणून लिहिले त्यास बाबाची तो मर्जी त्याणे राखिलीच आहे केवळ मजविसी लबाडीची गोष्ट बोलणार नाही बोलला नसेल परंतु दिनकरपंतासी बाबूरायासी खुलासा आसे बाबा बोलले त्यास बाबूरायासी मात्र आहे परंतु फारच दाखवीत आम्ही नाही त्यास याचे कारण काय कदाचित याणी येविसी बोलले आसतील आसेहि वाटते लिहिणे सखारामाने मजसी बरेच बोलतो राखतो आम्ही नाना बाबाचे विसी जी बोलावयाची ते राखून बाकी बोलतो केवल खुशामतीसहि बाधावयाचा नव्हे यासी थोडेंबहूत बरेवाईट ज्यात दस्तायैवज नाही व आपल्या रिकाम्या आसे बोलून राखतो दुसरे थोडीसी माझे ठायी बाबाचीहि आस्ता बाबाचे नानाचे ठीक नाही नानाहि मजवर दया करितात आमचे जवळ राहिलीयाने ठीक राखलीयास मातबरी यासाठीहि आमलसे मनापासूनहि बरे आहेत परंतु दुसरा प्रसंग पडलियास कान पाडवयास चुकणार नाही आसेहि आहे परंतु प्रस्तुत उतम आहे नानाहि आमचेसाठी बाबासहि उतम वाटावे यास्तव सखारामावर दया करितात याप्रो मजकूर आहे तुम्हास मी लिहिले होते की सखारामास लिहून काय लिहिले ते लिहिणे त्यास तुमचे पत्र आले आसता सविस्तर तो लिहित नाही याचा

---

१ पत्र सखारामबापूचें धोंडोबा आप्पास.

भाव लिहिणीयात्त कोठे आतर पडलीयास खाईल यासाठी लिहित नाही मजवरच घालून लिहून पाठविले आसेल वरकड सविस्तर उतर मागून लेहून पाठऊन बाबाचे पत्र तीर्थरूपास आले की श्रावण वद्य त्रयोदसीस मध्यम मुहूर्त आहे पुढे चतुर्थी भाद्रपदी पर्यंत येत नाही आज्ञा होईल तरी येव्हाच येऊन आथवा मुहूर्त उतम पुढे पाहून येऊन म्हणून लिा होते त्यास तूर्तच येणे आसे उतर गेले प्रस्तुत काल सिऊबाहि येथे आला त्यास याचा भाव मला वाटतो की दरबारची रीतभातहि पाहावी व वहिमीचे पायाविसी नानास गरव्हारपणाचे म्हणून समाधानपूर्वक सागावे आपल्यास बरे वाटत नाही यावयाचे लाबणीवर घालावयाचाहि दाखवावा आसे मजकूर वाटतो पुर्ता कललीयावर लेहून पाठऊन सिवबास पाठविलीयाचा भाव काय लिहिणे रा गुरुवार हे आसीर्वाद[1]

---

**ले. १९०** श्री श. १६६९ आषाढ वाा १३
इ. स. १७४७ जुलई २४

आसीर्वाद उपरी थोरले बाईचा कारभार अववस्थ आहे राजश्री गोविद्राऊ यासी सिरसेदा पर्येत बे अबरूच्या गोस्टी बोलिली तुमच्या व गोविद्राऊ याच्या पायात बेड्या घालाव्या म्हणूनही चर्चा करितात म्हणून विस्तारे तुम्ही लिहिल्यावरून कललें यैसीयासी थोरले बाईस काही विचार राहिला आहे यैसे नाही कोणे समई काये करितील हाहि भरवसा येत नाही बोलावयाची तों बाकी राहिलीच नाही असो त्याचे रागाचे उलहाण काही शांत होईल तदूतर राजश्री गोविद्राऊ याणी राजश्री स्वामीपासी येकाती विनंती करावी की पेशवेहि माहाराजाचे मातबर चाकर व बाईसाहेब तो धनीच परस्पर त्याच्या पेचात आम्हास ( पुढे एक ओळ कसरीनें खाल्ली आहे. ) खावंद लोका (क)डील बेअबरू व्हावे तर वडिलापासून जिवाभ्य श्रु(श्र)म करून इजती मेलविल्या त्या काही पेशव्याची मधस्ती करून गमावावयासाठीं मेलवल्या नाहीत इतके दिवस माहाराजानी अज्ञा केली त्यावरून पेशव्याच्या जाबसालात पडत होतो याउपरी त्याजकडील जाबसाल दुसऱ्यास कोणास सागणे तो सागावा आपण त्या कामात पडणार नाही म्हणून साफ बोलून पायावर डोई

---

१ पत्र भाऊसाहेबांचें धोंडोबा आप्पांस.

ठेवावी काघावे पुर्ते करावे तेव्हा राजश्री समाधान करितील याच रीतीने थोरले बाईपासीहि बोलून काघावे करून पायावर डोई ठेवावी म्हणजे ती सह[ज]च बोलतील की तुजकडे काये दोष आहे आपण रागे भरले तर काये चिंता अहे यैसे कितेक समाधानपूर्वक बोलतील म्हणजे जेव्हा रागे भरितील तेव्हा बोलावयासी कामास येईल तरी सदरहूप्रो गोविंदराऊ याणी खामखा बोलावे येते समई माहादोबानी व आम्ही धाकटे बाईचे स्वाधीन केले ते समई हेच बोलिलो होतो की थोरली बाईचा कारभार अनिवार ती नाना प्रकारचे कजिये करितील आमच्या लोकाचे कजिये होतील मनास येईल तशी रागे भरतील तर ये गोस्टीची शरम तुम्हास म्हणून बोलिलो होतों त्याच अन्वये आताही तुम्ही धाकटे बाईकडे येकांती जाऊन थोरली बाई बोलिली व बोलतात हे वृत सविस्तर विदीत करणे त्याजपासून माहाराजासी बोलाऊन येकांती राजश्रीयाविसी बोलतात काये ते सविस्तर वर्तमान धाकटीबाई काये बोलतात ते सविस्तर लिहिणे धाकटे बाईसी परिछिन्न बोलणे की पेशवे मातबर साहेब तो धणीच त्याच्या रागे आमची बेअबरू होऊ लागली तर येथे कसे राहाणे होईल असा भाव काघावे करून दाखवणे तदुतर राजश्रीची व बाईची मर्जी कसी होती ते लिहिणे छ २६ (रज)ब हे आसीर्वाद[1]

---

ले. १९१ श्री श. १६६९ आषाढ
इ. स. १७४७ जून-जुलै

आसीर्वाद उपरी थोरले बाईस नाइकानी पत्र पाठविले की आपली वस्तवानी धाहा पंधरा लक्षाची कूल नेली याचे पारपत्य करावे व या पत्र-वर बाई साहेबी मजकूर चितात आणिला त्याचा अर्थ लिहिला तो कलला ऐशीयास त्याचे वस्तवानीसी आम्हास दरकार काय जे सौ भिवबाईचे होते ते तिणे जिवंत असता कूल आपले लेहून काढले आणि फला!णे धर्म करा फ[ला]णे क्रियेस वेचा याप्रा यादी लेहून देऊन जिवंत असताच कितेक धर्म आगावरील वस्ता आदिकरून केल्या व दाने गज्यादिक केली काही राहिले ते मृत्य पावलीयावरी केले धा कैचे पंधरा कैचे ते काय

---

१ सबंध पत्र महादाजी अंबाजीच्या हातचें असून सातान्यास नाना पुरंधन्यास पाठविलें आहे.

लिहितात त्यात त्याचे काय होते हा विचार सर्व कलतच आहे मुख्य भाव हा असे राजश्री बोलतील तरी त्यासी जाबसाल उचीत जाणून करावा लागेल यास्तव हे वर्तमान लिहिले असे कालचे पत्रात विस्तारे सविस्तर अर्थ लिहिला आहे त्याप्रा कोणी पुसेल तेव्हा वर्तमान सागणे व धाकटे वाडियात समय पाहून वर्तमान सविस्तर सागून राजश्रीचे कानावर पडे ऐसे करणे या मजकुरात जीव काय आहे नाहाक नाखुषी करून घेतील तर घेऊत हे आसीर्वाद[1]

---

ले. १९२ श्री श. १६६९ आषाढ

इ. स. १७४७ जून–जुलै

आसीर्वाद उपरी उभयेता बाईचे कारभारी अनिवार मनास येईल ते कजिये उभे करितात तितके सोसीन म्हटल्यास अनकूल पडत नाही न सोसावे तर वारंवार बोभाट तेथे येतात त्यामुले बाई रागे भरतात राजश्रीहि तोच अन्वये ध्यानात अणून मनास येईल तसे बोलतात असो कालगतीस यत्न काये परतु येक विचार कसा म्हणाल तर जे जे कजिये होतात व होणार ते तुम्हास लिहितच आहो व काही राहिले असिले तर लेहून पाठऊ परंतु सविस्तर वृत येकांती राजश्रीच्या कानावर अगोधर घालीत असावे म्हणजे पुढे धननींनी कजिया केला तऱ्ही अगोधर कानावर पडले असता केवल बेमर्जी होणार नाही तऱ्ही बाईच्या समाधानार्थ बोलतील तरी येविसी तुम्ही व गोविंद(राव)अवसी पाहाटे जपून जाहाले वर्तमान राजश्रीस विदीत करीत जाणे रोज उठोन वाडियातील नालीश कशी सागावी हा संकोच चितात आणाल तर राजश्रीची मर्जी येथास्थित राहाणार नाही यास्तव खामखा जाहाले वर्तमान राजश्री स्वामीस विदीत करीत जावे उतम असे तसेच धाकटे बाईकडील काही फारसे कजिये नाही कोठे थोडे बहूत आहेत तेंहि कारभारी याखेरीज बाईस येकांती गाठून अगोधर वर्तमान सागत जाणे तहनाम्याचे करारात अंतर कोणीकडून होते हे तजविजेने आधी हरयेकविसी राजश्रीचे कानावर पडल्यास काही तरी उपयोगी पडल हे आसीर्वाद

---

[1] पत्र नानासाहेबांचें नाना पुरंदरे यांस. या पुढील मजकूर खाशाच्या हातचा. बाकीचा मजकूर माहादोबाच्या हातचा.

ले. १९३ श्री श. १६६९ आषाढ
इ. स. १७४७ जुन–जुलै

* आसिर्वाद उपर धाकटे बाईची मर्जी नीट जाहाली यावर भीऊ-बाईकडील कचे वर्तमान बाईजवळ सागून राजश्रीचे कानावर पडे ते करणे हे आसिर्वाद[1]

---

ले. १९४ श्री श. १६६९ आषाढ
इ. स. १७४७ जून जुलै

* आसिर्वाद उपरी थोरले व धाकटे वाडियातील कजियाचा तपसील लिहिता परतु कर्णाटकचा विचार काय आपण काय करावे राजश्रीची मर्जी काय होईल काय सर्व घरगती डौलास ठीक कसे केल्यास होईल तो विचार लिहीत नाही पुर्ते च्यार अर्थ ध्यानात आणून लिहिणे येकदेसी जे वाडियातून सागतील ते आयकावे इतके लिहिता हे अपूर्व आहे हे आसीर्वाद[2]

---

ले. १९५ श्री श. १६६९ आषाढ
इ. स. १७४७ जून जुलै

आसीर्वाद उपरी तुम्ही दरबारचे वर्तमान व उभयेता वाडीयातील मर्जीचा व राजश्रीचे मर्जीचा अर्थ लिहिल्याप्रमाणे सविस्तर कलला उतरे अलाहिदा लिहिली आहेत त्याचा विचार तुम्ही व गोविदराऊ करून उतरे सत्वर पाठवणे तदनरूप विचार कर्तव्य तो करू आणि तुम्हास लेहून पाठऊ हे आसीर्वाद[3]

---

ले. १९६ श्री श. १६७० श्रावण
इ. स. १७४८ आगष्ट

* आसीर्वाद[4] उपरी येथील वर्तमान पूर्वी सविस्तर लिहिले आहे त्यावरून कललेच आसेल आलीकडील वर्तमान तरी नानाची येक दोन पत्रे लौकर यावयाविसी आली येथून न येण्याचेच पर्याये लिहिले

---

१ चिठी नानासाहेबांची. २ पत्र नानासाहेबांचे. ३ सबंद चिठी माहादाजी अंबाजींच्या हातची. ४ पत्र भाऊ साहेबांचें धोंडोबा आपास.

तथापि दसमीस निघून येतील आसे तेथे बोलळे येविसी येथूनहि पत्रे गेली बाईची राजश्रीची मर्जी पाहून जाबसाल करितील जावयाचे राहिले तेथे नाना तेथे मर्जी दिक होईल पुढे होईल वर्तमान लिहिले येईल ते लेहून पाठऊन तीर्थरूपाची मर्जी उतम आहे काही पथकाचे समजाविसीचा डौल पडला आहे मलाच करावयास सागितले आहे वरच्यावर पुसून करावयावयाचे सूत्र राखितो आद्याप फारसे नाही रामाजी माहादेवहि आले तेथील काराभाराची फार घाण आहे बाबास तीर्थरूपानी लौकर यावे म्हणून लिहिले होते येतो दिवस पाहून आसे उतर आले तेथे बाबाची मर्जी नवल विशेष काय आहे लिहिणे तुम्हासी आमच्या कारभाराच्या आथवा घरच्या काही बोलतात नाही लिहिणे पुत्र जालियाचे वर्तमान तीर्थरूपानी लिहिले होते त्यावरून कललेच आसेल वहिनीचे पायास थोडीसी सूज आली आहे हेराण थोडीसी आहे जवलच वेल आहे आठा चौ दिवसी प्रसूत होतील मालवियातील मजकूर तर रामचंद्रबावा उजेनीस आहेत मल्हारबा जयनगरा आलीकडे चहू कोसावर गेले मल्हारबानी नवी बोली घातली यामुले रस न जाला त्याचेहि जाठ वगैरे पंधरा हजार जमावले शहराबाहेर जागाजागा उभे टोल्या करून होते याची फौज सडी गगोबा घेऊन गेले लडाई[१] जाली मल्हारबा गेले नवते तोफखानियाखाली घोडे माणूस जाया होऊन निघाले दुसरे दिवशी ईश्वरसिगहि बाहेर निघणार मल्हारबाहि जाणार लडाई होणार याप्रो वर्तमान आहे ते तेथून लेहून आले कदाचित बोली होईल आथवा लडाई होइल हे फजीत पडतील यास मनसूर आलीखानाचें सूत्र आहे मनसूर आलीचा सवाईवर पेच आहे ते दोनी त्याचे सुभियाचा बदोबस्त करणार यासाठी व तीर्थरूपचे पेचासाठी सवाई वचकून झुजतात याप्रो मजकूर आहे दिलीकडील मजकूर तर पातशहाचा मामा साद‌तखान यास बक्षिगीरी खानडौलाचा हुदा जाला मनसूरआलीस वजिरी जाली वजिरीचे पुत्रास वडिलास दुसरी बक्षिगीरी जाली वजिराचा कारभार जुलाल आहे सर्व कष्टी आहेत वजिराचा व नवाबाचा माल जफ्त करणार साद‌तखानास आकबराबादचा सुभा जाला आजमेराचा सुभाहि ईश्वरसिगाचा निघणार

---

१ ही गंगाधरपताची लढाई श. १६७० च्या आषाढ वा। २ स झाली. (रा. सं. ६ पृ. २९१)

सादतखानासी आमचे सूत्र बरे आहे मनसूरआलीहि तादृश आहे पातशहा बाजत बरसात बाहेर निघणार याप्रो मजकूर आहे मागाहून होईल ते लेहून पाठऊन बाबाची मर्जी काय येणार कधी हे लिहिणे रा। मंगलवार हे आसीर्वाद प्रातःकाल

---

ले. १९७ श्री श. १६७० श्रावण वा। ७
इ. स. १७४८ आगष्ट ४

आसीर्वाद उपरी प्रस्तुत[१] पुत्र जाला त्याचे बारावे दिवसी बारसे करावे लागेल स + यासी माझे मते आधी थोडे वयात दोन मुले जाली हेहि वाईट वाटते व येकदा जाले ते बरेच जाले लागोपाठ होते त्यास माझे मते दोघे पुत्र नानाचे त्याचे आद्याप बारसे जाले नाही व बारसे पुढेहि केलियास कार्यासहि येईल वरकड शास्त्ररीतीने तूर्तच करावे तीर्थरूप येथे आहेत गाठ सर्वाची पडली आहे करिवतील त्यास उगीच काही लाज वाटते न करावे आसे वाटते पुढे वर्षभरा केलियास कार्यास येईल त्यास येविसी काही सखारामाकडून भाव दाखवावा की काय किंवा वाईट दिसत आसलियास करावेच भावहि न दाखवावा पचमीपूजन शष्टीपूजन हे तो करावेच लागेल त्यास याचा मजकूर लिहिणे बाईकोस काही विशेष दुखणे जाले नाही बरेच आहे बारसे करावेसे जालियास पुण्यावाचनास बाईको जवल बसेल की काय बारावे दिसी आनकूल पडणार नाही + + कसे होईल दडक कसा करावे न करावे कसे करावे हे लिहिणे कोनेरी कृष्ण व काही विशेष बोलत नाही कृष्णराव कोनेरीसी आपले बनत नाही आपण सोडले येविसीहि भाव दाखवितात पुढे होईल मजकूर तो लेहून पाठऊन उतर लौकर पाठऊन देणे बाबास त्रयोदसीस येणे आसे पत्र गेले आहे त्यास यावयाचे करितात किंवा काय भाव हा लिहिणे रा। गुरुवार हे आसीर्वाद तीर्थरूप बाबूरायापेक्षा बोलणीयात रिकामे मनसुबियात सखारामास आधिक बोलतात बाबूरायासी रुक्ष दाखवित काही नाही सखारामावर आमलसी विशेष प्रीत दाखवावी हा भाव बाबूरायानी आपले कामात खबर आसावे इतका भाव दिसतो विशेष काही लिहिजेसे नाही हे आसी-

---

१ पत्र भाऊसाहेबांचें धोंडोबा आप्पास. भाऊसाहेबास पुत्र छ १५ साबान रोजीं झाला (सं. २ प. १०५)

र्वाद मामा निर्माल्य तुल्य आहेत तीर्थरूपाचा भाव थोडे थोडे काम सागावे आम्ही त्याप्रोच वर्ततो काम पडलियावर सागून सागावयास आता चिता काय सागावयाचे ते सागून तीर्थरूपास उतम वाटे ते करू + रामचद्र हरीची मात्र समजावीस जाली हे आसीर्वाद

---

ले. १९८ श्री श. १६७० श्रावण
इ. स. १७४८ आगष्ट

आसीर्वाद उपरी तुमचे पत्राचे उतर संविस्तर लेहून पाठविले आहे त्यावरून + + यासि पहिले बाबानी विचार लिहिला + + + तीर्थरूपास की सातारियास जरूर जावे आसे जालियास भाऊस पाठवावे कामहि होईल लवकर यास निरोप होईल आसे लिहिले होते त्यास तीर्थरूपाचे मनात मजला तो नच पाठवावे आदी कोणीच न जावे जाणे तरी आपण जावे मजला न पाठवावे पाठविलियाने राजश्रीचे मनात ज्यांविसी पेच तोहि पुर्ता निघणार नाही व आप्रतिष्ठा यासाठी न पाठवावे आसे आहे त्यास कदाचित बाबा आलियावर दुसरे प्रकारचा विचार जालियास काये करावे माझे मते मला पाठऊ लागलियास न जावे तेथे गेलियास नाना का नाही आले तुम्ही का आलेत आसी आप्रतिष्ठा राजश्रीचे मनातील न जाणे यासा(ठी) फजीती मात्र होईल यासाठी + + + यास त्याचा विचार लिहिणे व + + + + न बाबा गेले ते समई मजसी कोणेविसी पेच आसा भाव नवता तेथे येविसी काही बोलतात काय येकदा येथे आलियावर सर्वहि भाव निघतील मागती सारे मुरदाडलियावर ठीक होईल त्यास येविसी तेथे काही भाव आहे काय लिहिणे वरकड येथे सर्व सखाराम मी + + + + विचारेच तीर्थरूपाची मर्जी + + + तो तीर्थरूपाची मर्जी उतम आहे रा। गुरुवार हे आसीर्वाद

---

ले. १९९ श्री श. १६७० श्रावण
इ. स. १७४८ आगष्ट

आसीर्वाद उपरी बाईस बरे वाटत नाही भरवसा नाही आसी नानाची पत्रे वरचेवर येतात जाणियाचे गुतून पडतील न जाणियाने

---

१ पत्र भाऊसाहेबांचें धोंडोबा आप्पास.

लौकिक विरुध राजश्रीचे मनात गुा पेशवे रुसून गेले ते आपलेजवळ आणावे त्यास मनातून पेच आणितील गेलियाने लौकर उलगडा न होये तेव्हा जावे न जावे व मेलियावर जावे न जावे याचा विचार लिहिणे विचार जाला आहे की प्रस्तुतहि न जावे पुढे दोन महिनीयात जो भिवरे-पलीकडे जाणे जाले तोपर्यंत अगदींच मेली तरी मग न जावे आसे आहे याचा विचार लिहिणे नानाविसी बाबाची मर्जी कसी आहे तुम्हाहून लक्षे प्रकारे बरी परंतु कसी हे लिहिणे तुम्ही संसार आगदीं सोडला आपल्या पुर्ते च्यार खंडी दाणेहि घेता हे प्रत्ययास येऊन बोलावयाचेहि टेपर राहिले आसेल व आपले संसाराचा बदोबस्त बाबा कोणाकडून करविणार हे लिहिणे मल्हारबा तेथे फजीत पडलियास ही गोष्ट जबाऊन येशहि खावदाचा तह मोडून आपण केले ते सेवटास गेले आसे जालीयासहि जबऊन त्यास याचे हेक्याप्रो केवल तेथे होणार नाही काही थोडे बहूत होईल त्यास हे रजावंद होणार नाही तेव्हा झुज होईल जालीयास फजीत पडतील आसे वाटते त्यास याची तजवीज काय मनसुबा काये लिहिले येथील मजकूर तर आपण तह केला तो मोडला यासाठी सवाईसहि लिहिता न ये रामचद्रबावाचे जाणे या दिसात कुमकेस होत नाही आसे बोलण्यात भाव आहे त्यास याचा विचार लिहिणे जसे मागे धोडो गोविंदानी मालवीयाचे सुभा पातशाहापासून करून घ्यावा आसे राणबा राजकारण करितात आसे निमित्य आणिले होते ते लबाड पडले तसे प्रस्तुत मनसूरआलीखानाचे मारफातीने मल्हार-बाचे राजकारण आहे सुभा करून घेणार फाजित पडतील आसे बापूजी माहादेवानी लिहिले होते त्यास यात काही रामचंद्रबावाचे कुचोद आसेल आसे वाटते लबाडी करून लिहिले आहे आसे वाटते येविसी तीर्थरूपाचे मनातहि याप्रोच आहे वर्तमान कलावे म्हणून लिा आसे हे आसीर्वाद[1]

---

ले. २०० श्री श. १६७० श्रावण

इ. स. १७४८ आगष्ट

आसीर्वाद उपरी सविस्तर मजकूर चिरंजीवाचे पत्री लिहिला आहे त्यावरून कलेल साराष राजश्री जेजुरीस आले आसता आम्ही निरेवर न

---

१ पत्र भाऊसाहेबांचें धोंडोबा आप्पास.

यावे आसा मजकूर काही नाही राजश्री पासून लौकर निरोप व्हावा येविसी पर्याये लिहून पाठवितो आसे मनात न आणणे येथील मजकूरावरून यावे न यावे आसा सदेह होतो त्यासाठी निरेवर यावयाचे बनत नाही राजश्री हि फारा मजलीने जेजूरीस येऊन येथेही आठ च्यार रोज राहाणेच आहे तेथे दर्शनास येऊन सविस्तर मजकूर तुम्हास कलावा व आमचे पुढे न येणियाचा भाव राजश्रीस कलावा यासाठीं लिहिले आहे प्रसगोपात राजश्री सही श्रवण करणे * साराश ये समई निरेवर यावे दर्शन घेऊन सेवेत रहावे जेजुरीहून राजश्री माघारे फिरले म्हणजे निरोप घेऊन पुणीयास यावे ऐसा सिधात केला असता येकायेकी वाताचा प्रकार होऊन संकटाचा प्रसंग प्राप्त जाहाला आज साहा दिवस जाहाले बारा दिवस श्रीकृपेने गेलें तर दर्शनास जेजुरीस उभाउभी येऊन जाऊ वेथेचे अतीशयामुले ऐसे येकायेकी प्राप्त जाहाले जर आज पासून वात पुढे न जाहाला तर तो येतच आहो विस्तार काये लिहिणे हे आसीर्वाद

---

ले. २०१ श्री श. १६७०
इ. स. १७४८

आज्ञापत्र रा। बापूजी खडेराव याजबराबर पाठविले व अणखीहि स्वहस्ते आज्ञापत्र सत्वर हुजूर यावयाविसी लिहिली ती प्रविष्ट जाहाली सविस्तर आज्ञेप्रा। रा। बापूजी खडेराव यानी माहाराजांची आज्ञा वचने सेवकास सागितली ऐसीयास निरतर माहाराजाचे सेवेत असावे हा उतम पक्ष तथापि ते कार्यसंबंधामुले न घडे तर जे समई आज्ञा होहेल ते समई सेवेसी हाजर व्हावे हा सेवकाचा धर्म हे दौलत माहाराजाची इचा बंदोबस्त राहाणे हेहि कार्य साहेबाचे आहे गुा। स्वारीस सेवक गेला परतु कार्य काही न जाहाले यामुले कर्जासीच गाठ पडली यदा कर्ज घेऊन फौज महाराजापासून आलियापासून ठेविली हगामसीर मुलकात जावे जमीदार हरा[म]जादे त्यास नरम करावे यासाठी बाहेर निघालो परतु मुहूर्त उतम नव्हता यास्तव दुसरे मुहूर्ते जावे ऐसा विचार केला साप्रत फौज जमा होत चालली ईस येथें कर्जेहि मिलत नाहीं याजमुले पोटाचे संकट दोन

---

*खुणेपर्यंतचा मजकूर भाऊसाहेबांच्या हातचा असून त्यापुढील नानासाहेबांचा हातचा आहे.

वर्षे सेवकाचा कारभार वोढीखाली पडला हे दौलत माहाराजाची मोठी आहे वरचेवर उस्तवार राहिली तरच कामाची हा सर्व अर्थ माहाराज जाणतात आम्ही सेवक व लेकरे ल्याहावासा काय आहे साहेबीहि हा अर्थ ध्यानात आणूनच सेवकास निरोप यदा दिल्हा पातशाहाचे पेशखाने बाहेर निघाले अगरीयास यावयाची फार आवाई आहे या दिवसात फौज सुधा बाहेर जाणे न जाहाल्याने सेवकाचा लौकीकहि उतम नाही याउपर जी आज्ञा होईल ते प्रमाण असे[1]

---

ले. २०२ श्री

यादी बाईनी सागितले त्याचे स्मरण

२ रहिमतपूर व निंब बायकास बेगमीस द्यावे

१ सोने सिवाजीपंतास द्यावी

१ बोरगाव

१ जोगू भोसले यास येक गाव द्यावा व वतनाचा गाव चालवावा

१ संगूबाई आवाई यासी हजार रुपये द्यावे

१ नागो देवराऊ यासी दोन हजार रुपये द्यावे

१ कान्होजी जयसिंग यास लाख रुपये द्यावे

१ दोघे बुढे यांसी दोन चावर जमीन द्यावी

१ बागड्या घातल्या त्यास रुपये दोनसे द्यावे

१ जवळू बाईस गोडोली द्यावी

१ दोन हजार चितामण दिक्षीता[स]

१ संभाजी कोडालकर हजार

१०० किता बायको

१ मुवबखणी वगैरे हजार

---

ले. २०३ श्री

* आसीर्वाद उपरी घोडीचे मजकुरावरून तुम्ही कितेक परिहार लिहिला ते पत्र पाऊन सविस्तर अर्थ अवगत जाहाला ऐसियास बरे वाईट

---

१ पत्र नानासाहेबांचें हातचें शाहू महाराजांस आहे. २ याद नाना पुरंदऱ्यांच्या हातची.

जे समई जे मनात आले ते तुम्हास न ल्याहावे तेव्हा कोणास ल्याहावे आमचे रुक्ष लिहिणे तुम्ही आयकावे सारांश घ्यावा काहिले न व्हावे सिक्षे-साठी सर्व ल्याहावे लागते ते गोष्टीचे तुम्ही वाईट न मानावे उचित असे हे आसीर्वाद

---

ले. २०४ श्री

* चिरंजीव राजश्री नाना यासि प्रती बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील वर्तमान ताा छ १४ साबान जाणून स्वकीये लिहिणे विशेष तुम्ही घोडीविसी विस्तारे आम्हास पत्र लिहिले त्यात अधैर्ययुक्त शब्द फार होते कोनेरपंतासहि विस्तारे लिहिले होते ऐसीयास घोडे वगैरे सर्व संपदेतील पदार्थ उतम रिझेचे तुम्हास न द्यावे ऐसी रीत नसता तुम्ही घाबरे जाहालेस याजवरून आम्हास अपूर्व वाटले कोणेसमई घोढे बाग जवाहीर वस्त्र बरी रीत वाईट रीत आम्ही माहादोबा मिलोन काय वेचू हे कले ऐसेहि मनात आले असेलसे दिसते तर ही घोडी वगैरे जे जे पदार्थाचे तुमचे रिझेचे असतील ते येकदाच तुम्हाकडे पाठऊन देऊ म्हणजे तुम्हास अन्न गोड लागेल नाहीतर आमचा माहादोबाचा भरवसा नाही याजमुले नित्य चित उद्विग्न राहील चित उद्विग्न राहिल्यास उतम नाही येके घोडीवरून तुम्ही इतके घाबरे जाहालेस तेव्हा चिताचे औदार्य-रीतीची रीत अवगत जाहाली पुढेही दुरंदेसी विचार आपले व आमचे रीतीचा करणे जोपावेतो आम्हास माहादोबास खावंद वडील चितापासून जाणत होतेस आता आमची माहादोबाची रीत येक प्रकार जाहाली त्याजमुले बहूत विचारात पडला असाल मागे लेकूरपण होते तेव्हा आमचे बाबाचे मर्जीप्रो चाललेस आम्हीहि रुक्ष वाईट केले ते चालले या उपर दौलतेचे खावंद तुम्ही आहा सर्व बरे वा वाईट आटोपाल तरही उतम याजपेक्षा अधीक काये आहे हे आसीर्वाद[1]

---

ले. २०५ श्री

आसीर्वाद उपरी आज दोन दिवस तुम्ही येत नाहीं ज्याची भेट वियोग दोहो चहू घटकानी व्हावा त्याचा वियोग दोन दिवस ऐसे उदा-सिन्न कोप ईर्षाजन काय विनोद वाक्ये आपण अकंप्य हे दृढ असता सको-

---

१ पत्र नानासाहेबांचें नाना पुरंदऱ्यांस स्वदस्तुरचें.

पसे दिसलेस रतिकाली उभयपक्षी अमर्याद भाषण प्रीतिजनक ऐसे शास्त्र-निर्णित अनभवहि श्रवणीकृत आहे तैसेच युधकाली शूर स्वामीस अथवा स्वामी यशोत्कंठ होऊन अमर्याद वाक्ये परस्पेर बोलतात ऐसे वीर चूडाम-णीचे मुखे श्रवणी शृत आहे तुम्ही कार्येकर्ते यात प्रमुख जे त्याचे कुली उत्पन्न व बाल व मित्र व आप्त तुम्हास कार्याचे ठाई योजावे या अर्थे अनेक भाषाविलास–प्रकार बोलली असता त्या वाक्यातील गुण टाकून कुतर्क घेतला दोन दिवस जेवावयास येत नाही हे सतोषाचे दिवस आमचे पत्रावरून तुम्ही समजावे अथवा तुमचे मित्र आमचे इतबारी त्याचे वचन समजून यावे हे उतम कदांचित गाढमानप्रभावे येणे न घडे तर आम्ही येऊ परतु हे न शोभे घरगती विषयात यास्तव सूचनापत्र लिहिले असे येक सर्वात कठीण कार्य असेल ते आपण अवलंबावे अथवा सर्व समारभात जो तो अनभवावा या अर्थे आम्ही सत्य बोलली तुम्ही सत्छिष जसा आरबी घोडा सिक्षा सहन करून गुरुकृत सिक्षा कोपकोपकारक न मानिता आज्ञे-नरूप कार्यकर्तासा तद्नरूप तुम्हास कर्तव्य योग्य पित्याने पुत्रासी प्रिय न बोलावे गुरूने सिष्यासी न बोलावे तैसे तुम्ही आम्हास जर सत्छिष्य आहा तर जो काही आमचे वाक्यात गुण तुल्हास भूषणावह परिणामी असेला तो घ्याल यावे हे आसीर्वाद

---

ले. २०६ श्री श. १६६९ आषाढ

इ. स. १७४७ जून–जुलै

आसीर्वाद उपरी फतेसिगास वाचवावा आपल्या आपल्यांस आठाचा सरजाम मिलावा त्यात चहू पाचाचा वाटा तिहीचा आपल्यास मेलवावा फतेसिगाचे सरदारीत येक मर्द शाहाणा योजून सर्व सरजामाचा कार-भार करावा या साठी राज्याची वोढ तो दर्याबाईस तोडतो त्यास फते-सिग मनापासून नीट नसला आठाचा सरजाम आम्ही मागू तो न द्यावा ऐसा विचार त्याचे मनात असला तर तसेच लिहिणे येक दोन वेल लिहि-लेत की फतेसिगबावा आपले आज्ञे खेरीज नाहीत गोरखोजी भापकर नाईक बोलतात की आज फतेसिगबावा उठोन पुणियास येतात सरजाम आठाचा जो आपण मागतील तो देतात ऐसे बोलतात हे गोष्ट भरवसी-

---

१ पत्र नानासाहेबांचें नाना पुरंदऱ्यांस.

याची असली तर आम्ही तूर्त विचार योजिला तो उतमच आहे जर फते-सिंगबावा लबाडीवरच असले व आठाचा सरजाम देत नसले वरकड सर्व-विसी सांगितले आईकत नसले तर आम्हीहि त्याचा अगत्य वाद सोडून देऊन रग राजश्रीचेच मर्जीस थोडा बहूत भरू याचा शा(शो)ध उ[त]म प्रकारे पाहून यथार्थ लिहिणे हे पत्र तुम्हीच वाचणे फाडून टाकणे हे आसीर्वाद[१]

---

ले. २०७ श्री

*आसीर्वाद उपरी राजश्री फतेसिगबावा यास उतेजन देऊन सर्व प्रकारे साहित्य करून बाहेर काढावे म्हणजे आपले पदरी येश पडेल व बावावर टेपर चढेल म्हणून कितेक तपसीलवार लिहिले ते कळले ऐसियास त्याचे करण्या न करण्याचे उतर आलाहिदा पुरवणी पत्री लिहिले आहे त्यावरून कलेल साराश विनाकारण बावास उगेच काढावे यात उतम काय बाहेर निघून भलता मातबर मनसुबा होत असेल तरी बाहेर काढावे आम्हीहि साहित्य करावे हे युक्त आहे तरी याणी बाहेर निघून कोणते कार्य करावयाचे आहे याचे तपसीलवार लेहून पाठवणे त्याप्रो साहि-त्याच्या मजकुराचा विचार करून लेहून पाठऊन कर्णाट[क] याचे होत असेल तर यानी बाहेर निघावे केवल आपले सरंजामात जाऊन याव-यासाठी मात्र बाहेर निघावे ऐसे नाही त्यास गोविंदरायाचे विचारे कसे कसे करावे उपयोग काय ते लिहिणे छ २६ साबान हे आसीर्वाद[२] पौ छ २८ साबान

---

ले. २०८ श्री

आसीर्वाद उपरी आठा पंधरा दिवसा आड येवतेश्वरास जाऊन दरबारचे थोकथोक वर्तमान सागत जाणे ते थोर आहेत त्याची कृपा आहे यासाठी कुशल व विघ्न त्याचे कानावर असावे वरकड कलामतीने जे होणे ते होते हे आसीर्वाद[३]

---

१ पत्र नानासाहेबांचें नानां पुरंदऱ्यांस. २ सबंद पत्र भाऊसाहेबांच्या हातचें. ३ नाना साहेबांची चिठ्ठी.

ले. २०९ श्री

* चिरजीव नाना यासी भाऊ आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहिणे राजश्री फतेसिगबावाचे फार करून राहाणे कुरल्यास आहे काकी तेथेच आहेत राजश्री कदाचित चितापासून यावर खटे आहेत कजियाची गोष्ट मनात आणालियास तुल्ही तेथे राऊत पाठऊन देणे उपद्रव न होये ते करणे पुढेहि तेथे पेच जे येतील ते तुम्हास सभालावे लागतील मौजे चिहाले बाबुराव उपाध्ये यास दिल्हा आहे त्याचप्रो कर्डीयात दुसरा नेमून देतील तो देऊन हा गाव सोडवणे हे आसीर्वाद राहिले सरंजामाची राजपत्रे हातरोखे सारे करून घेणे हे आसीर्वाद

---

ले. २१० श्री श. १६६९ पौष शुा १०
इ. स. १७४७ दिजें. २६

चिरंजीव राजश्री नाना यासी सदाशिव चिमणाजी आसीर्वाद उपरी येथील कुशल ताा छ ५ मोहरम जाणून स्वकीये लिहिणे विशेष राजश्री बाबुराव कोनेर येथे आहेत मामला सागोन रसद द्यावी हे आपले मातबरीस योग्य नाही आपणास बरोबर बालगावे विसाजीपंताचे नावे कर्ज द्यावे आपणापासून मातबरीनेच चाकरी याची आज्ञा काय ते करावी म्हणजे विसाजीपंतास तेथे पाठऊ तेथे आलियावर त्याची बोलीचाली होईल म्हणजे मग पैका देतील म्हणून तुम्ही लिहिले ऐशास ते मातबर माणूस त्यास पदरी बालगून त्याचे उतम असेल ते करावे तेहि योग्य आहेत याचे पर्याय रसद घेऊन व्याज मुशारा द्यावा त्रिचनापलीचा मामला सागावा दोन लक्ष रुाो रसद द्यावी बराबरहि यावे हा पर्याय होईल तर बहूतच उतम दुसरा पर्याय कर्ज ध्यावे मारानिलेनी बरोबर यावे दाहा बारा हजारपर्यंत मुशारा द्यावा यात पहिला पर्याय लिहिला हाच बोलोन चालोन करावा नच होय तेव्हा दुसरा पर्याय लिहिला हा करावा विसाजीपंतानी येथे येऊन बोलोन चालोन जावे यास दिवसगत लागेल पैका जमा जाला पाहिजे येथे येऊन तेथे जातील यास बारा पंधरा दिवस लागतील पुढे पैका जमा करावयास आठ दिवस लावितील तेव्हा बहूतच लावणीवर पडेल याकरिता लिहिल्याप्रमाणे बोलोन जो ठहराव होईल तो लिहून पाठवणे * दोन लाख रुाो कर्ज येकोत्रा निदान

बिनसूट द्यावे मामला त्रिचनापली मुशाराहि रसदेचा सात आठ पडेल आगर व्याजूम कर्ज दाहा निदान पधरा पर्यंत खासीयास पावावे आमचे बाा आसावे याप्रो करून पैका घेणे लावणीवर येथे बोलावयाचे जाली-यास पडते याप्रो करार करून पैका तूर्त ध्यावा क्षेपानिक्षेप येईल तो खरा तोडे लोक काय कामाचा याचा पुर्ता करार करून ताावार सत्वर लेहून पाठवणे गोपालराव वगैरे याचाही पुर्ता शोध घेणे लिहिणे कृष्णापा रास्ते यास पत्र पाठविले हे त्याकडे पाठवणे तेहि काही तरतूद करितील रा छ ६ मोहरम हे आसीर्वाद

---

ले. २११ श्री श. १६७० कार्तीक
इ. स. १७४८ नवंबर

* आसीर्वाद उपरी नासरजगाकडील वर्तमान तरी आपले घरी खुशाल आहेत डेरे बाहेर काढले होते ते याची पत्रे गोलियावर आत नेले गडगडा किला देविला तो येका दो रोजात दिलियाची खबर येईल जीवधनीसहि त्याकडील कोणी येऊन आठा चहू रोजात फैसल होईल प्रस्तुत दिलीचीहि गरमीची खबर आ...... साठी बाहेर निघावे हा मनसूर...... हे पुढे महिना दीडपर्यंत फौज जमा + + + होईल मग तिकडे जावे आम्ही कोकणात जावे आसा मजकूर होऊन मार्गशीर्ष शुध प्रतिपदेस उतम मुहूर्त बाबास व नानास आहे मला द्वितियेस आहे येक नानास आष्टमीस आहे पण प्रतिपदेचाच होईल प्रस्तुत वहिनी बाहेर निघावया जोगी आहेत त्यास केवल येथे आठ पधरा दिवस गुता आहे तो काही निघणार नाही वहिनी वाईसहि जाऊन भेटी घेऊन आटोपून येणार आसेहि आहे त्यासी आमचे बाईकोस वहिनी नसता डेरियास ठेवावे हे उतम नाही वहिनी माहेरास गेली तरी इला माहेरास पाठवीन म्हटले तरी आईबाची तूर्तच भेट जाली आहे व जागाहि वाईट काही प्रयोजन नाही नेहमी पुण्यातच ठेवावे तरी तेहि वाईट दिसेल पुढे बहुता प्रकारे तीर्थरूपच स्वारीस जातील (कदा)चित आमचा विचार जाला तरी बाो (बाय)को नेली पाहिजे तेव्हा वहिनी जेव्हा (ल)स्करास येतील तेव्हा आमची बाईकोहि आणावी वहिनी घरीच आसिली आथवा माहेरास गेली तरी आमचे बायकोने घरीच राहावे आसे माझे मते आहे तुमचे

विचारे याचा विचार कसा करावा तो लिहिणे त्याप्रो करीन लहानपणी बो पोर येक दाई याची लाज वाटते बो तो न्यावीच लागेल याचा विचार सविस्तर लिहिणे हे आसीर्वाद

---

ले. २१२ श्री श. १६६९ माघ
इ. स. १७४८ जाने.

*आसीर्वाद नदाचे मारफात बनेश्वरचे काम ठीक जाले दोन तीन रोज जाले भेट जाली परतु दाटीमुले काहीच जाले नाही फार विशेष उतम पदार्थ नाही काही उष्णतासीहि वाटते गाठ पडलिया फिरून भेट घेऊ सैदलस्करखान जानबा पेडगावी नई उतरतात आमचे उद्या कूच मध्ये भेट होईल मल्हारबा पर्जन्यामुले नर्मदा उतरले नाही त्याचे लौकर येणे व आमचे जाणे नाही यामुले राजकारजे सर्वा जागे आहेत परतु सर्द भागानगरकर जागाच आहे तेथे फारात फितूर आहे ग्रहस्ताची तुमची गाठ पडलीच पाहिजे बंगला अथवा आमचे रंगमाहालाचा प्रकार म्हणत होता तो गुप्त राहाणार नाही तिकडून याल तेव्हाच पुण्याकडून यावे यात कसे करणार तुमचा सखारामाचा मुहूर्त कधी हेहि लिहिणे वरकड सर्व मर्जी व वर्तमान यथास्थित आहे हे आसीर्वाद रा बुधवार + तीन प्रहर आसीर्वाद कोनेरपंतास आज्ञेप्रो च होईल ते चाकरी करावी हुजूर आथवा बाहेर वरकड सर्व गुणे सोडून आसावे बोलून परवा पायावर घातले पुढे आपले कर्मानुरूप फल पावतील हे आसीर्वाद[1]

---

ले. २१३ श्री श. १६६९ माघ
इ. स. १७४८ जाने.

* आसीर्वाद उपरी राजश्रीचे मनात कर्जाचे रुपये ती वर्षात घ्यावे बावीस घ्यावे हे गोष्ट आम्हास सहसा अनकूल पडणार नाही तेव्हा दबावयासाठी रुक्षता दाखऊ लागतील माहालाकडील कजिये म्हणजे वामनाची पदे विष्णुपत सिवाजीपंत केवल बालके त्याचे सागितले केले माहालात प्रमाण दुसरे सर्वाचे मते आम्ही म्हणजे सोन्याचे झाड जितके पेचात येईल तितके आणून ठकावे नाहीतर अडकून पाडावे येक बाई खुशाल तर येक बाई

१ सबंद पत्र भाऊसाहेबांच्या हातचें.

रागे राजे तर सर्वत्र मलमलिता मागे आम्हास हुजूर बोलाविले परिछिन नेट धरून आठा दिवसात निरोप दिल्हा तैसे करणार नाहीत मागे आम्हास वोढ नव्हती याजमुले दोन वर्षे संसार बुडून राहिलो आता हे हरयेक याचे कर्तव्याचे दिवस या दिवसात तयार होऊन हरयेक जागा पोट मेहनत करून भरले पाहिजे दिलीकडील प्रसग अवघड रामचद्र बावा मल्हारबा येक जागा नाहीत तीस लाख कर्ज जाहाले यदा काय होईल ते पाहावे परंतु कर्ज करीन म्हटल्यास मिळणार नाही सावकारा सर्व अप्रमाणिक सरदारानी बुडविला ऐसे अनेक अडचणीचे प्रसग जाणून खावदानी येव्हडी सरदारी हा कालवर सर्व प्रकारे शाबूत आहे हे राखावी हरयेकविसी सोईने आज्ञा करावी वरकड काही द्यावे लागत नाही सर्व प्रकारे राजश्रीचे पाय पाहावे हे नाना माझे मनात होते परतु पेच फार याजमुले इलाज नाही तुम्ही ऐवजाविसी वगैरे बहूत कसीसीने वर्तणे समयानसार वर्तणे शाहाणपणाचे मुख्य लक्षण आहे हे आसीर्वाद[1]

---

ले. २१४ श्री श. १६६९ माघ

नकल इ. स. १७४८ जाने०

राजमान्य राजश्री बालाजीपंडित प्रधान यास आज्ञा केली यैसी जे स्वामीचे कर्ज वारावयाबदल तुम्हाकडे यैवज करार केला रु २०००००० वीस लक्ष येविसी राजश्री त्रिंबक सदासीव व राजश्री खडेराव बापूजी याणी विनती केली त्याजवरून सदरहू यैवजी हाप्ते करार करून दिल्हे बिा

| सन समानचे सन तिसात देणे | सन तिसाचे सन खमसैनात देणे |
|---|---|
| २५०००० आश्वीन अखेर | २५०००० आश्वीन अखेर |
| २५०००० जेष्ठ अखेर | २५०००० जेष्ठ अखेर |
| ५००००० | ५००००० |
| सन खमसैनातील सन ईहीदेत देणे | सन ईहीदेतील सन इसनेत देणे |
| २५०००० आश्वीन अखेर | २५०००० आश्वीन अखेर |
| २५०००० जेष्ठ अखेर | २५०००० जेष्ठ मास अखेर |
| ५००००० | ५००००० |

---

१ पत्र नानासाहेबांचें नाना पुरंधरे यांस.

येणेप्रमाणे हाते करून दिल्हे आहेत तरी सदरहू यैवजी मुास साव-काराच्या चिठ्या तुम्हावरी होतील त्याजप्रमाणे यैवज सावकारास पावता करून पावलियाची कबजे घेणे तुम्हापासून वैशाख मासात सन समानात लाख रुपये घेतले ते साल मजकूरचे पहिल्या हत्तियात उगऊन घेणे जाणिजे वीस लाख करार केले त्याच्या चिठ्या घेणे सुदन असा

---

ले. २१५ श्री श. १६६९ माघ व. ७
इ. स. १७४८ फेब्रु. १०

यादी राजश्री— स्वामीस यैवज द्यावा सुा समान अर्बैन मया अलफ

१५०००० कर्जास वीस लक्ष रुा कबूल केले त्यापैकी सन तिसाचे अस्वीन मासी अडीच लक्ष रुा द्यावे यैसीयासी येक साला राजश्री— स्वामीचे सरकारात वोढ जाहाली सबब चैत्र अखेर द्यावे येक वरीस मात्र द्यावे पुढे अलाहिदा यादीप्रा मुदती सरकारातून करार करून घ्याव्या तेव्हा रुा द्यावे

५०००० राजश्री स्वामीचे कर्ज आहे ते ऐवजी चैत्र अखेर द्यावे परंतु खतावर वासिलात घालावी व अमचे रुा येक लक्ष तीस हजार गुदस्ता घेतले आहेत त्याचे खत खडोजी गोगवले याणी दुहोत्र्याच्या व्याजे आम्हास लेहून द्यावेत तेव्हा द्यावे

२०००००

येणे प्रो दोन लक्ष रुा द्यावे[1] येणे[2] प्रा करार छ २१ सफर

---

ले. २१६ श्री श. १६६९
इ. स. १७४८

यादी राजश्री स्वामीस कर्जाबा यैवज करार केला सुा समान आर्बैन मयां अलफ करार बेरीज रुपये

---

१ येथपर्यंतचा मजकूर महादोबा पुरंदऱ्यांच्या हातचा. २ यापुढील मजकूर खुद्द नानासाहेब पेशव्यांच्या हातचा.

२००००० वीस लाख करार छ २१ सफर

यादी मुद्‌ती मार्फात राजश्री गोविंद खंडेराव चिटनिवीस मुा नसरतपूर खोजे प्रा खानदेश

| | |
|---|---|
| सन समानचे सन तिसांत द्यावे | सन तिसाचे सन खमसैनात द्यावे |
| २५०००० अश्वीन अखेर | २५०००० अश्वीन अखेर |
| २५०००० जेष्ठ अखेर अखेर साल | २५०००० जेष्ठ अखेर अखेर साल |
| ५००००० | ५००००० |
| पाच लाख येणे प्रा द्यावे करार[1] | पाच लाख येणे प्रा करार[1] |
| सन खमसैनाचे सन ईहीदेत द्यावे | सन ईहीदेतील सन इसनेत द्यावे |
| २५०००० अश्वीन अखेर | २५०००० अश्वीन अखेर |
| २५०००० जेष्ठ अखेर अखेर साल | २५०००० जेष्ठ अखेर अखेर साल |
| ५००००० | ५००००० |
| पाच लाख येणे प्रो करार | पाच लाख येणे प्रा करार[1] |

---

ले. २१७ श्रीमार्तंड शं. १६६९ माघ
इ. स. १७४८

यादी राजश्री स्वामीस कर्जाबा यैवज करार केला सुा समान आर्बैन मया अलफ करार बेरीज रु
२००००००

यासी मुद्‌ती रुो

| | |
|---|---|
| सन समानचे सन तिसांत द्यावे | सन तिसाचे सन खमसा(सै ना?)त द्यावे |
| २५०००० दसरा आखेर | २५०००० दसरा आखेर |
| २५०००० जेष्ठ आखेर | २५०००० जेष्ठ आखेर |
| ५००००० | ५००००० |
| सन खमसा(सैना?)चे सन ईहीदेत द्यावे | सन ईहीदेतील सन इसनेत द्यावे |
| २५०००० दसरा आखेर | २५०००० दसरा आखेर |
| २५०००० जेष्ठ आखेर | २५०००० जेष्ठ अखेर |
| ५००००० | ५००००० |

सदरहूप्रमाणे मुद्‌ती केल्या आहेत त्यास राजश्री स्वामीच्या समजाविसी करता तिसाचे दसरियाचे रुपये चैत्र आखेर द्यावे साऱ्या बेरजेच्या

१ 'वीस लाख करार' व 'करार' हा मजकूर निराळ्या वळणाचा.

।चिठ्या राजश्री स्वामीनी केल्या तर राजश्री भाऊनी ।चिठ्या घेऊन मुदती प्रा यैवज द्यावा

---

ले. २१८ श्री श. १६७०
इ. स. १७४८

यादि हुजराती राजश्री स्वामीचे कर्ज वारावयास वीस लाख रुपये कबूल केले त्यापैकी हाता सन समान आर्बैनची मुदत सन तिसा मध्ये द्यावे सुा तिसा आर्बैन मया व अलफ रुो

५०००००

मुा आश्वीन मास
...............रुपये
२५००००

१००००० सन समान मध्ये राजश्री स्वामीनी रोख मागितले ते दिल्हे
......रुपये
५०००० छ...
५०००० छ...
१०००००

२६००० छ ११ जावल सन समान हातरोखा सा गुा हाणुराम मोदी

२५००० छ ९ जाखर खा गुा मियालु अतार बा हात–रोखा

५०००० छ....................
राजश्री विष्णु विश्वनाथ १५०००० पैकी

४९००० रद्द कर्ज गुा माहादावा ना तांबवेकर छ १२ रजब २००००० पैकीं

२५००००

मुा जेष्ठमास रुपये
२५००००

१६८५०० रद्द कर्ज गुा माहादावा ना तांबवेकर चिठ्या छ १२ रजब
१५११००० किता रुा
२००००० पैकीं
१७५०० किता चिठी
१६८५००

४२००० खा गुा दतू कासार

३९५०० रद्द कर्ज गुा विष्णु विश्वनाथ रुा १५०००० पैकी बाकी पेस्तरसालीं

२५००००

---

१ सबंद चिठी नाना पुरंदरे यांच्या हातची.

ले. २१९ श्रीशकर श. १६७० वैशाख–ज्येष्ठ
इ. स. १७४८ एप्रील–मे

*चिरजीव राजश्री नाना यासी प्रती रघुनाथ बाजीराव आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले लिहिला मजकूर कलला ऐसियास आम्ही दो चौ रोजा आड पत्रे पाठवितो परतु तुम्हास पावतात न पावतात हे काहीच कलत नाही आम्ही तर दो चौ रोजा आड येखादे पत्र पाठवितो विशेष काही लिहिजे नाही यानंतर येथे तीर्थरूपाची पत्रे आली की तिकडील पठाणास हिकडून या पातशाहाची फौज गेली होती तिणे मोडिले ते दो चौ हजारानिसी पलाले ऐसी पत्रे आली आता दिसोन येते की यंदा प्रायः तीर्थरूप देशास येतील मग पुढे होइल ते कलल्यासारिखे लिहू तुम्हास कलावे म्हणून लिहिले असे तिकडील वर्तमान वरचेवर लिहीत जाणे आमचे येथे राहावयाचे बरे आहे उतम प्रकारे तीर्थरूपाची मर्जी व विद्याभ्यास करितो दरबारास दुवख्त जातो दंड काढतो बहूत काय लिहिणे हे आसीर्वाद

---

ले. २२० श्री श. १६७० आषाढ
इ. स. १७४८ जुलै

आसीर्वाद उपरी जानबा निबालकर याकडील मजकूर तर दाहा बारा दिवस पहिले बहूमानाखाली गेले उपरातिक नासरजगानी मजकूर सागितला याची याद लिहिली होती ते दिली त्यात खुलासा हाच की पूर्वील करारप्रमाणे श्नेह मजबूत राखावा आम्ही हुजूर दिलीस जातो तेथील जाबसाल आमचे मारफातीने करावा पातशाहाचे मर्जीनसार फौज बोलाविलीया तुमचे सरदारास आज्ञा आसावी इकडे सैदलस्करखान ठेविले आहेत त्याची सर्व प्रकारे कुमक करावी किलियाचे वाटे न जावे हिदायेद मोहिदीखानाकडील राजकारण आपणाकडे आले आहे त्यास श्नेहाच आमचे उचित त्याप्रो त्यासी जाबसाल करावा याप्रो आहे वरकड विशेष नाही मुख्य हिदायेत मोहिदीखानाचा मु(दु?)गला त्यात याणी न पडावे याप्रो यादीत आहे आद्याप जाबसाल जाला नाही प्रस्तुत नासरजंग दिलीकडे जात होते आकबरपूर नरमदातीरपर्यंत गेले सर्व जवलेचे आमिराने न जावयाची मसलत बराणपुराहून निघालियापासून मसलत देत होते परंतु कबूल न

करता तेथपर्यंत गेले तेथून माघारे फिरून दोन मजली आले जाणे राहिले याउपरी शहरास येतात याप्रा बातमी आली आहे मालवियातील प्रस्तुत बाबाची नानाची मर्जी बहुमानाची जसी आहे तसीच आहे विशेष नाही वर्तमान विशेष नाही प्रस्तुत हिदायेत मोहिदीखान याचा मनसुबा तीर्थरूपांचे मनात फार भरला आहे भलता कर्नाटकचा उपद्वाप करून त्रिंबक हरीस ते प्राती रवाना करावे आसा मजकूर आहे बाबाची मर्जी नाही प्रस्तुत त्रिंबक हरीने ते प्राती येक किला घेऊन पुडावेहि आपले जागा मोडले आहे वरकड माझे मते हिदायेत मोहिदीखानाचा मनसुबा करणे तेव्हा याप्रो जोड जाली पाहिजे नासरजंगासी बिघाड करावा पातशाहाचाहि त्यावर राग येविसी तेथील सूत्र आसावे सरदारानी यावे किले घ्यावे तेव्हा मनसुबा उतम ती खटपट बहूत हा उपद्वाप होत नाही तेव्हा उगेच राखून ठेवावे तूर्त काही करू नये नासरजगासी बिघडू नये जानबासी स्नेहे करून बोलून पुस्तवानी करावी आसे आहे प्रस्तुत कालाप्रो उपद्वाप सेवटास जाणार नाही चहू-कडे राखावे हेच उतम आसे वाटते यात तुमचे विचारे कसे ते लिहिणे हे आसीर्वाद सातारियाकडील विशेष नाही राजश्री सातारियाजवल छावणी केली हे आसीर्वाद

---

ले. २२१ श्री

*तीर्थरूप राजश्री आपा स्वामीचे सेवेसी

आपत्ये नानाने कृतानेक साष्टांग नमस्कार विनती येथील वर्तमान ता वैशाख शुध चतोर्थी परियेत स्वामीच्या आसीर्वादेकरून येथास्थित असे विशेष स्वामीनी आसीर्वाद पत्र पाठविले ते पावले प्रतिनिधी व अणा का रुसून गेले हे लेहून पाठवणे म्हणून आज्ञा येशियास प्रतिनिधीचे थोरले बाईचे लागले आहे याजमुले अणा तलतलून राजश्रीसी बोलले सेवटी अणा बोलले की अत:पर आम्ही लोकीं दरबारास यावेसे नाही इजतीचे येऊन पडले आहे तेव्हा राजश्री बोलले की तर दरबारास न यावे इतके बोल-ताच आणानी मजुरा करून उठोन गेले ते गेलेच प्रतिनिधीस हे वर्तमान कललियावर तेहि अणामागे उठोन गेले किन्हेवर आहेत इतका मार

---

१ पत्र भाऊसाचें धोंडोबा आप्पांस.

नाईक अद्यापि बसलेच आहेत निकाल होणे ईश्वरी सता कळले पा. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना[1] पौ छ ५ जमादिलावल

---

ले. २२२ श्री श. १६७१ भाद्रपद
इ. स. १७४९ सप्टेंबर

*राजश्री माहादोबा स्वामी गोसावी यासि

विनंति उपरी कालपासून जानबास वेथा फार आहे यास्तव बाबा वैद्यास सध्याकाळचे पाठऊन विसोबा वैद्यास आणवावे व राजेश्वर वैद्या-कडीलहि मुलीस उतार पडला असला तरी त्यास आणवावे परिछिन बाबा वैद्यास दो दिवस पाठऊ परतु नेहमी वैद्य जवल असला पाहिजे यास्तव विसोबास व राजेश्वर वैद्यास आणवणे हे विनंती[2]

---

ले. २२३ श्री १६७१ माघ वा। ४
१७५० फेब्रु. १४

आसीर्वाद उपरी हिदायेद मोहीदीखान यास राचुराजवल छ १७ रालोवली पठाण व मराठे फौजेने मारिले कडपेकर पलाला कनोलकर व सावनूरकर मारला गेला असी खबर भालकीची राजश्री फतेसिगबाबाजवल आली तेथून येथे लिहिले आले आहे मागाहून दुबारेल ते प्रमाण तुम्हास हि लेहून पाठऊन सारांश याप्रो घडले असेल तर गुताच उरकला हा[3] कालवर तहकीक नाहीं दो तिही दिवसांत निश्चय कलेल ईश्वर इच्छा काये असेल हे न कले हे आसीर्वाद

---

ले. २२४ श्री श. १६७४ पौष
इ. स. १७५२ जाने.

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
माहादोबा स्वामी गो॥ यासि

पोष्य बालाजी बाजिराव प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लेखन करणे विशेष पत्र पाठविले ते पावले

---

१ पत्र बाळाजी बाजिरावांचें चिमाजी आपांस । २ पत्र नानासाहेबांचें.
३ यापुढील मजकूर सुद्ध नानासाहेबांच्या हातचा.

शरीरप्रकृतीचा अर्थ लिहिला तो सर्व अवगत जाहाला पुढे औशध उतम घेऊन बरे होणे आम्ही अदवानी बल्हारी व रायेचूर व हरपनहळी कनकदुर्ग येथील मामलियेत वीस लाऊन चित्रदुर्गावरून श्रीरंगपटणास जातो सर्वेहि निर्गम होऊन येई पूर्वी पत्रे पाठविली आहेत त्याप्रो करावे शरीर उपाय तीन महिने करुन आरोग्य संपादावे इकडील काम प्रसंगोपात होईल तसे करु बहूत काये लिहिणे हे विनती

---

ले. २२५ श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री गोविंद्राव गोसावी यांसि

स्नेहपूर्वक बाळाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असिले पाहिजे विशेष राजश्री माहादोबा याजकडे किले पुरधरची सबनिसी करून द्यावी म्हणोन तुम्हांस रुबरू सागितले व वारंवार लिहिले तथापी तुम्ही उत्तर पाठवीत नाही याचा भाव काये खामखा सबनिसी करून घेणे येविसी दिसगतीवर न घालणे हे आसीर्वाद

---

ले. २२६ श्री १६७८ वैशा. शु. १२

नकल १७५६ मे १२

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री जिवाजी
गणेश स्वामी गोसावी यांसी

पोष्य बाळाजी बाजिराव प्रधान नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत जाणें विशेष किले सिंहीगड येथील सबनिसी राजश्री माहादाजी आंबाजी याजकडे आहे त्यासी हाली वाटणीमध्यें राजश्री त्रिंबक सदासिव याजकडे सबनीसी दिल्ही आसे तरी मारनिलेच्या कारकुनापासून पेस्तर साल सन सबा पासून सबनिसीची सेवा घेऊन वेतन पेशजी प्रो पाववीत जाणे जाणिजे छ १२ साबान सुा सीत खमसैन मया आलफ बहूत काये लिहिणे हे विनति

---

ले. २२७ श्री श. १६७० भाद्रपद(?)

आसीर्वाद उपरी तुम्ही पत्र पाठविले ते पावले विसापुरास जावयाचा मजकूर लिहिला की आपलियावर भार काय आहे तीर्थरूप लिहि-

तील त्याप्रो जावे म्हणून लिहिले अैसीयास आमचे मते गेलियास दोष पडत आसलियास न गेलीयास आज्ञेचा फारसा गुता पडणार नाही तूर्तच गेलीयास ह्याच कामासाठी गेलेसे होते व कोकणची आवाई पडती त्यास आमचे मते तूर्त हलू हलू दोन तीन मजलीनी भिवरेवर जावे घरास यावयाचे आगोधर आठ दाहा रोज मध्ये दोन चार रोजात सडे जाऊन पाहून यावा आसे आहे याचा विचार लिहिणे सखारामपंताचे मते या प्रोच आंहे वरकड स्वामीनी सखारामपतास चाबलीचे सेत विहीर पानमलीयासुधा दिल्हे म्हणून वर्तमान आईकिले व तान्हा हा पुणीयाहून आला त्याणेहि वर्तमान सागितले दुसरे आईकतो की स्वामी सखारा(म)पतास पालखी देणार दिलीयास उतम आहे तेहि आशक्त आहेत याचे वर्तमान लेहून पाठवावे म्हणून लिहिले औसीयास सखारामपत लाहान साहान गोष्टीची आमचे जवल रदबदली करीत नाही सेताची ते काम करून घेतील आम्ही का देऊन तीर्थरूपाजवलच त्याणी रदबदली केली द्यावयाचा करार जाला मीहि याचेवारची रदबदली केली द्यावेसे जाले तेव्हा तीर्थरूपाचे आज्ञेप्रो दिल्हे वरकड पहिली मर्जी तीर्थरूपाची न द्यावयाची होती महिना पधरा दिवस रदबदली तेच करीत होते द्यावेसे जाले मीहि सेवटी तीर्थरूप जातेसमई रदबदली केली द्यावेसे जाले तेव्हा दिल्हे वरकड पालखीची रदबदली ते का करितील आम्ही का देऊन यास काहीं मूलहि नाही लबाडी कोणी उठविली आसेत आसे गोष्ट तुमचे पत्रावरून तुम्हास प्रमाण वर्तमान वाट(ले)से वाटते याचा भाव काय सारे + +म्ही मनास येई(ल) (ते) करितो म्हणून कीं काय...लिहिणे चुकलो तरी दुसरा...त्रिबक विनायेक तेथें आले आहेत त्यासहि पुसणे उतर सविस्तर पाठवणे (रा) भ्रगुवार ति(सरा प्रहर) हे आ(सी)र्वाद

---

ले. २२८ श्री श. १६७४ ज्येष्ठ वा. १२
इ. स. १७५२ मे २९

राजश्री खंडो बाबुराऊ कमावीसदार प्रा इंदूर गोसावी यासी

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य श्री मलारजी होलकर दंडवत सुा सलास खमसैन मयां अलफ तुम्हीं मुजरद कासिदासमागमे पत्र पाठविलें पावलें लिहिलें कीं आज्ञेप्रमाणे तोफा व बाणांच्या काठ्या सर्व

सिधता आहे ज्या रोखे घेऊन यावयाची आज्ञा होईल त्या रोखे घेऊन येऊ म्हणून लिहिले कलो असें यैसियासी इकडील वर्तमान नवाब गाजुदीन खांन यांसी दक्षणच्या सुभ्याची वस्त्रे पातशाहाकडून देविली त्यास समागमे घेऊन अगरीयापरियेत अलो बारबारा कोसाच्या मजली करून देशास जात आहों रेवा—हंडयाच्या घाटापासी उतरायाचें अहे तुम्हांस पूर्वी दोन च्यार वेळा तोफखान्याचे सिधतेविसी तपसिले लिहिलें होते त्याप्रमाणें

| | |
|---|---|
| श्री म्हाळसा | तोफा सेरी दुसेरी तीन सेरी साडेतीन सेरी चौसेरी |
| कांत चरणि त | पाच सेरी या गोळया प्रमाणे तोफा व त्याचे गाडे |
| त्पर खडोजी सुत | बैल वगैरे त्याचे सामान व त्या तोफांचे सांच्याच्या |
| मल्हारजी हो | गोले व बाणांच्या छड्यां व जिजालांचे सामान इंदुरी |
| ळकर | आहे ते व सेंदवियांत आहे ते व तुम्हांपासी हती आहे |
| (गोल शिक्का.) | तो वगैरे जिंनस पुर्वी लिहिल्याप्रमाणे घेऊन खरगोणा- |

कडे सरंजामसुधां तुम्ही येणें आम्हीं इकडून हंडयाचे घाटास येत आसों तुम्ही गई—गुदर करून राहाल आम्ही आलिया तोफामुलें वगैरे सामानामुलें खोलंबा जालियां कार्यास येणार नाहीं हें पत्र बहूत पत्राचे जागां जाणून लिहिल्याप्रा सरंजाम घेऊन खरगोणच्या रोखें सिध आसणे आम्हास तेथ येक घडीचा अटकाव न होये यैसें करणें प्रजंन्य लागला नाहीं उघाड जों आहे तों तडकोन जावें लागते तर लिहिल्याप्रा सिध असणें मानपूरचा मजकूर लिहिला त्यास पूर्वी राजश्री त्र्यंबक राजदेव यांसी ताकीद पत्रें दिल्हीं आहेत ते गोष्टीचे संकट काये थोरलीं कामें जालियाउपरी पारपत्य केलें जाईल जाणिजे छ २५[1] रंजब बहूत काये लिहिणे हे कार्य निकटीचे जाणून मुजरद सरकारची जोडी पा। आसे हे विनंती मोर्तब सुद (गोल)

---

ले. २२९ श्री श. १६७२ श्रावण शुा ११

इ. स. १७५० आगष्ट २

श्रीमत् माहाराज मातोश्री आईसाहेब याणी राजश्री त्रिंबक सदाशिव यासी आज्ञा केली ऐसी जे कैलासवासी चिरंजीव राजश्री शाहू राजे याच्या आस्तीची रवानगी श्री स करावयाचा विचार केला त्यास माहुलीस अस्ती ठेविल्या होत्या तेथे पाहवयास गेले तो घागरी नाहीत म्हणोन

१ पंचविसाचा आंकडा संशईत आहे.

साहेबास विदित जाले ऐशीयास याचा विचार कसा काय जाला तो न कले आरंभापासून रखवालीस माणसे ठेवावी ते गोष्टी न केली तन्मुळे असा प्रसग जाला याउपरी सगुणाबाई व येसूबाई यांच्या वृंदावनाचे कारखाने चालतात तेथील हवालदार व कारकून वगैरे लोक त्या जागीयापासून समीप हमेशा असतात तसेच विराईच्या थड्यासमीपहि लोक असतात त्यास सर्वांस आणून उतम प्रकारे या गोष्टीची चौकसी करून थाक लावणे कोणी क्षुद्रानी ताब्याच्या घागरीची लालूच करून भलत्या जागियास अस्ती टाकून घागरी नेल्या असतीलसे साहेबास वाटते दुसरा प्रकार काही व्हावासा दिसत नाही यास्तव तेथील कारखानियाच्या लोकास रेवसीने ताकीद करून पुरता शोध करवणे येविसी अलश सर्वथी न करणे थाक लागतो अगर न लागतो हे हुजूर लेहून पाठवणें येसूबाईच्या वृंदावनाच्या कारखानियाजवळीच ठेविल्या होत्यास त्या लोकास दाबदबाव करून ठिकाण लागे ते करणे अस्ती काढता देहावसान जाल्या दिवसापासून येकणोचालिसावे दिवसी काढून नेल्या असा शोध लागतो तेथें चवकी होती ती कोणाची व ती किती दिवस होती त्या चवकीच्याहि लोकासहि आणून चवकसी मनास आणणे जाणिजे रा छ १० रमजान *बहूत काये लिहिणे मोर्तब सुद ( वा. शि. )

रुजू

पौ छ १४ रमजान सुा

ईहिदे खमसैन

---

**ले. २३०** श्री श. १६७२ पौष शुा ९
इ. स. १७५० दिजें. २६

++ [1]जंग याजकडे असता तेथ उपद्रव करून बदोबस्त करितात गावर्नदोर थोर त्याचा पेगाम आम्हाकडे आला की नज(न?)राज याचे आमचे सख्य करून देणे ते आम्ही येक होऊन महमद अलीखानाचे पारपत्य करून त्यास ननराज याचा इतबार त्यास नये आम्हास दरम्यान येणे

* अक्षर वेगळें. १ त्रुटित. हें पत्र पुरंदरे दप्तरांतील नसून फत्तेसिंग भोसल्यांशीं संबंध असलेल्या अत्रे घराण्यांत मिळालें. तेव्हां ही हालचाल पेशव्यांची नसून अन्य सरदारांची असावा असें वाटतें.

म्हणोन पेगाम केला त्याजवरून फुलचरी जवल आलो उभयेताची भेटी करून देतो म्हणोन उल्लेखपुरसर लिहिले ते कलले ऐसीयास आपण मनसुबा करीत असतील तो उचितच परतु श्रीरगपट्टणकर आम्हासी बहूत दिवस रुजू नाहीत त्यापासून मातबर द्रव्य घ्यावे तमाम कर्नाटक प्राते चोथ सरदेशमुखीचा अमल संस्थाने पाळेगार वगैरे याजवरी बैसऊन हा ज (?) सुबेजातचा अमल चालतो तो चालवावा हा सकल्प पहिल्यापासून आहे जाणतात आम्ही व नवाब सलबतजग यानी तिकडे यावे ऐसा निश्चय केला असता त्यास कार्य उपस्थित होऊन ते भागानगर प्राते गेले आम्ही आजी पोश शुध नवमीस तुंगभद्रा उतरून दक्षणतिरी मुकाम केला मजल दरमजल पटणप्राते येतो ते धर्मसंस्थान तेथील संस्थानिक व दलवाई दूरदृष्टी आहेत त्याणी आपला मातबर पाठऊन आमच्या चितानरुप विवेक करावा यात त्याचे हित व संस्थानचे कल्याण व पुढेहि स्वछयता होऊन त्याच्या उपयोगी गोष्टी असतील त्या उचित इकडून होणे त्या होतीलच सारांश कर्नाटक प्रातीचा मनसुबा आपले विचारे करावा आपला आमचा निश्चयेहि पहिलाच आहे आपण आम्हास असंख्य द्रव्य मेलऊन द्यावे येतद्विशई आपण हरोल होऊन ( अपूर्ण )

---

ल. २३१ श्री श. १६२९ पौष शुा ११
इ. स. १७०७ दिर्जेबर २४

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३४ सर्वजित सवछरे पौष्य शुध येकादसी सौम्य वासरे क्षेत्रीय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामि याणी माा मळहार तुकदेऊ यास आज्ञा केली ऐसा जे स्वामीचे अगमन श्वदेशास जाले तेव्हा तुम्ही औधिया आगोधर खानदेशामध्ये लावकानीचे मुकामी येऊन श्वामिचे दर्शन घेतले कितेक कार्य प्रयोजने केली एकनिष्टेने सेवा करीत आहेत म्हणून स्वामी तुम्हावरी कृपालू होऊन पाा सुपे व काा सासवड ये माहालीची सरदेशमुखीची मुतालकी वतनी करून द्यावयाचा निर्वाह करून हे आज्ञापत्र सादर केले असे तरी तुम्ही साल दरसाल व पुढे वंशपरंपरेने मुतालकी करून सुखरूप असणे तुम्हास वेतनाची माईन करून आजबाब सनद सादर केली आहे तो होनू पाा ३०० तीनसे रास केले आसे ती वर्जा[१] करून उरले वतन खात जाणे

---

१ यापुढील कांहीं मजकूर घेण्याचा राहिला.

लिहिणार लिहिले घेत जाणे सदरहूप्रमाणे दर हरसाल पिढी दर पिढी स्वामी तुमचे चालवितील याविसी शपतपूर्वक आज्ञा केली असे तुम्ही वतनी मुतालकी करून ऐवज माल हुजूर पावीत जाणे जाणिजे मर्या+राजते(मो) ( ˘ श्री ०।++ +। शिव नरपति हर्ष । निधान मोरेश्वर सुत । भैरव मुख्य् प्रधान । या ५ ओळींचा गोल शिक्का. )

---

**ले. २३२** श्री श. १६६२ पौष शुा १५
इ. स. १७४० दिजें. २१

श्रियासह चिरजीव राजश्री नानास प्रती मल्हार तुकुदेव आसीर्वाद उपरी येथील कुशल ताा छ सवाल परियेत यथास्थित असे विशेष श्रीमंत राजश्री आपा स्वामीचे वर्तमान तुम्हास विदित जाहालेच असेल त्यावरून तुम्ही पुण्यास गेलाच असाल अथवा जावयाचा विचार केला नसेल तर तुम्ही पत्रदर्शनी पुण्यास जाणे बराबर चिरजीव शिवबास बराबर घेऊन जाणे आणि तेरा दिवस होत पर्यंत तेथें राहणे आणि शेला अस्टगोली ऊच सफद (सफेत) श्रीमत सदोबास तेरावे दिवसी देणे मग आपल्या घरास येणे तोपर्यंत तेथेंच वास करणे बहू काये लिहिणे लोभ असो दीजे हा आसीर्वाद छ १२ सवाल

---

**ले. २३३** श्री श. १६७२ कार्तिक
इ. स. १७५० आक्टो.

पुा श्रीमत् राजश्री नाना स्वामीचे शेवेसी

विनति उपरी येथील वर्तमान खालून गडावर राबता बहूत जाहाला परवानगीचें येकीकडे नाहीं दिनकरपंतास येक दोन वेल तुम्हीच परवानगी-रसानगी देत जाणे म्हणून सांगितले आईकत नाहींत आम्ही येथूनच परवानगी द्यावी तेहि येक परवानगी वर चालत नाही निराले परवानगीने त्याकडील राबता बहूत बाजार पेढीयां पावेतों हमरस्ता माणूस दाणादुणा हर जिनस जातो ते वरील राजकारणांत आहेत वरील कारभार क्षणभंगुर बुधी आपणास विदीतच आहेत वरील राजकारण जाहाल्या दाखल दिसते सेवट काहीं नाहींसे निदर्शनास येतें हें आपण जाणतात तेव्हा येखादे समई लटकी बदलामी मात्र आम्हाकडील राबत्याची येऊ सके

येैसें नाना प्रकारचे पच मात्र सांप्रत आहेत येविसी येक दोन वेल आपणास लिहून पाठविले परंतु येविसीं काय कर्तव्य तें काहींच लिहून न पाठविले यास्तव हे पत्र लिहून पाठविलें असे लिहिला मजकूर अक्षरषा ध्यानात आणून जे आज्ञा कर्तव्य ते करावी तेणेप्रमाणे वर्तणूक करू येथे सध्या अणिक तो कारभार किमपी नाहीं पेच कुपेंच मात्र विशेषात्कारें दिसोन येतात वरून राजश्री खाली गावगंन्ना मसाले हातरोखे करितात व अमलदारासहि हातरोखे मसाले करितात ज्यास हातरोखा येतो तो आम्हांपासी येतो मान्य करून येक दोन रोख्याचे मसाले दिल्हे सध्या बहूतच यावयास लागले न मानावे तर तेंहि अनुतम मानावे तर फारच होईल याचेहि काय तें लिहावे बहूत काय लिहिणे हे विज्ञापना

---

ले. २३४ श्री शके १६७२ कार्तिक

इ. स. १७५० आक्टो.

* आसीर्वाद उपरी दर्याबाई फार न वाढवावी फतेसिगाचा आब राहावा आपणास काही मिलावे यासाठी नवा सरंजाम सहसा देणार नाही ऐसा विचार ठहराऊन बीड वगैरे तमाम सरजाम जुना जप्त करविला जुना आडकला म्हणजे नवा मागावयाचा राहून जुना मात्र करार तुम्हापासी रजबदली करून करार करून घ्यावा या डौलानें बंद केला आहे हे हे वर्तमान त्यास कललेच असेल याचा विचार काये त्यानी आपले जागा केला आहे तो लिहिणे दुसरा येक प्रकार तुमचे मुदसदगिरीचे प्रकाराचा राजे वरकड सर्व आईकतच आसले येक दर्याबाईचे सरजामाची अड त्यास हा दसरा जाऊन पुढील दसरा येई तोपावेतो सरजाम मागू नये तूर्त त्यासी आम्हासी बिघडले आहे हे ती उतम प्रकारे चालू लागली म्हणजे आमचे संतोषास येऊन पुढले वर्षी सरंजाम देऊ नवाबाकडून हा कालवर सरलस्कर करणार आले नाहीत असे असता येके वर्षासाठी इतके पेच वाढवावे हे ल्यासहि बरे नव्हे येव्हा जुना म (?) करार माहा प्रयासे करतील नवा मागूसा नका येका वर्ष वरकड सर्व निभाऊद्या मग रजबदली करून सरजाम करून देऊ ऐसा प्रकार मध्यस्तीने तुमचे मते बोलल्यास निकाल पडतो वरकड चालता गाडा होतो ऐसे दिसेल तर लटके

बोलून एके वर्षावर नेणे पुढे जसा प्रसंग पाहून तसे करू हा प्रकार आमचे बोलाविल्याने बोलला ऐसे नसावे हे आसीर्वाद[1]

---

ले. २३५ श्री श. १६७२ कार्तिक
इ. स. १७५० आक्टो.-नोव्हे.

* चिरजीव राजश्री नाना यासी प्रती बालाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष राजश्री ज्याप्रा पूर्वी कारभार केला आहे त्याप्रा आयकतात नेमल्याप्रा सभुसिंग पिराजी नाईक यास सरजामाचे हातरोखे देणार सर्व प्रकारे सागितले आईकणार याप्रा ते सिध जाहाले असता कार्यभाग करावा ऐसे गोविदराव येशवंतरायाचे विचारे आहे ऐसियास सचिवाचा कारभार नवा प्राप्त जाहाला आहे यास कर्यात मावलचा मोबदला जवल दिल्हा पाहिजे वरकडहि लाहान साहान गुते आहेत ते उरकावे लागतात आई-साहेबाची समजाविसी जाहाली पाहिजे राजे येक दर्याबाईचे हातास सर-जाम आला पाहिजे यास्तव मात्र नरम गोष्टी सागतात आम्ही फतेसिगासी बोलत आलो त्याची गत काये करावी चारी अर्थ मनात मनन करून तोटानफा समजून पायासुध केले पाहिजे वरवर गरम नरम कामाचे नाही नवा सरजाम दर्याबाईस न द्यावा ऐसे पुर्ते मनात आहे साहेब तो दर्याबाई-मुले गोसावी येथेच होऊन कासीस जाणार ऐसे पेच फार आहेत पुर्ता विना तुम्हा दोघातून येकाची भेट जाहाल्या वाचून मनात भरत नाही ऐसे कितेक विचार आहेत हे आसीर्वाद

---

ले. २३६ श्री श. १६७२ कार्तिक वा। १२
इ. स. १७५० नोव्हे. १४

* आसीर्वाद उपरी राजश्री गोपालराव माहादेव याणी रदबदल करून पंचवीस हजार मजुरा द्यावयाची चिठी नेली आहे त्यास गोविदराव वीस हजार म्हणत होते पाच हजार मात्र ज्याजती जाहाले त्याप्रो द्यावेच गुंता नाही वरकड त्याची रदबलीस्तव लिहिणे ते लिहिले असे याचा अर्थ तुम्हास राजश्री गोविदराव यास अवगतच आहे रा छ २५

१ पत्र नानासाहेबांचें नाना पुरंदऱ्यांस.

जिल्हेज [1]वरकड पचविसा हजारासिवाय पैका सोडावयाचा नाही लक्ष्मण बलाल याची येक दोन पत्रे आली त्यात दाभाडियाकडील राजकारण व सभाजी राजीयाचीहि पत्रे आईसाहेबास येतात म्हणून लिहिले आहे येकूण याचा पुर्ता शोध करणे राजश्रीची तुमची भेट जालीयावर काय मर्जी कसे राजकारण सर्व लिहिणे दाभाडे वगैरे सर्व फजीत पडतील परंतु सभाजी राजे किलियावर आणले म्हणजे सारे बुडाले याविसी राजश्रीसहि पुर्ता कीलियाचा शोध घेऊन वरते जाणे तरी जावे व गोविंद्रायासहि पुर्ती सूठ फुकून बाल प्रभूकडून तिकडील करवीरची बातमी आणणे व या गोष्टीस फार जपणे गडकरी याचा लगाम राखून याचे कोणे कामास येणार आहे राजश्रीचे भेट जालीयावर आईसाहेबाकडे कोण रवाना केले सामादिकाचे आतस्तचे राजकारणाने भाव कसे नजरेस पडतात हे सर्व दिसास येक पत्र आम्हास तुमचे येईसे करणे आम्ही गवताचे सोईवर माचपुरी आहो तीर्थरूपाकडीलहि विशेष बातमी येईल ते लिहिणे नरसिगराव जानबा आपाजी जाधव कानडे वाघ पदमोजी नाचला वगैरे दोन आडीच हजार फौज चागली रवाना केली चौथे पाचवे रोजी तीर्थरूपाजवल पोहचतील पधरा सोला हालकी वीस हजार तीर्थरूपाकडे फौज होईल पाच हजार पर्यंत जमा जाली आहे आम्हाजवल पाच सा हजार मात्र आहे डाक चौकीची आम्हाकडे राउताची व ( पुढील एक ओळ फाटली गेली ) हे आसीर्वाद

---

**ले. २३७**

श. १६७२ कार्तिक वा। १३
इ. स. १७५० नोव्हे. १५

*आसीर्वाद उपरी करवीरवासीयाचा आईसाहेबाचा दोरा असला तर तसेच लिहिणे इद्रोजी कदमासारखे येखादे पथक वारणातिरी पाठऊन वाटेवर राहील ते नसले तरी प्रयोजन नाही वरकड तीर्थरूप आहेत तो दाभाडे कलतच आहेत तुम्हाजवल पाच सातसे आहेत मातबरच प्रयोजन लागलिया आम्ही जवलच आहो तुमचे विचारे व तेथें गेलियावरहि फार मानायाजोगे नसेल तरी तसेच लिहिणे आम्ही कर्नाटकचे तरतुदेस लागू पैकाहि मेलवावयाचे तुम्हास पुर्ते लेहून तीर्थरूपाचे पत्र आले होते

---

१ यापुढील मजकूर भाऊसाहेबांच्या हातचा आहे.

त्यात मलमलीतच लिहिले होते स्थाईभाव कललाच आहे पुर्ते लिहिले जरी आले की येणे तरी जातो करा आसे आले आणि आईसाहेबाची सेडी थरारली तरी देसीच रहावे लागेल दाभाडियाकडे कोण लोक काय तरतुदेत कोण प्रकारे राजकारण याची पुर्ती बातमी तुम्हीहि चांगली राखणे व त्याचे आप्त कारभारी आहेत त्याकडीलहि कोणे प्रकारे आहे हे लिहिणे येकूण दर रोज येक पत्र येईच आसे करणे डाकेस लाब पडले आहे जलद राऊत रवाना करीत जाणे रा छ २६ जिल्हेज हे आसीर्वाद[1]

---

**ले. २३८** श्री श. १६७२ मार्ग. शु. ३
इ. स. १७५० नोव्हें. २१

*चिरजीव राजश्री नाना यांसी सदाशिव चिमणाजी आसीर्वाद उपरी येथील कुशल ताा छ २ मोहरम जाणून स्वकीये लिहिणे विशेष कर्नाटकाचा मजकूर तीर्थरूपाकडून अद्याप मलमलीतच लिहिले येते बनोन आलिया पैकियाची तरतूद असली पाहिजे याकरिता येथें राजश्री गोविदराव व राजश्री येशवंतराव तुम्ही असता यांसी बोलिलोंच होतो त्याणीहि मान्य केले होते की आम्ही येशवतराव रत्नाकरपंत व अनगल वगैरे सावकार मिलोन पाच सात लाखाची तरतूद करितो याकरिता सांडीबराबरहि पत्र पाठविलें आहें तें पावलेंच असेल हालींहि पत्र लिहिलें असें तर गोविदराव व येशवतराव व गोपालराव रत्नाकरपंत व अनगल वगैरे सावकार कोण किती यैवज क्षेपनिक्षेप देतात आजी मान्य केले आणि वराता जालीयावर वरातास न पावेत गुजराथचे मामले करून रसदा कबूल पैका द्यावयाचे पडते तेव्हा सनदा माघाऱ्या देऊ लागले या प्रकारचा यैवज कबूल केला तो काय कार्याचा यास्तव क्षेपनिक्षेप द्यावेच द्यावे वराता ज्याच्या कराव्या त्याच्या पदरी सत्वर यैवज पडावा ऐसें कोण किती कबूल करितों ते करार करून सत्वर लिहून पाठवणे मुख्य गोष्ट गोविदराव गोपालराव व येशवतराव व रत्नाकरपंत व अनगल वगैरे सावकार यांसी बोलोन चालोन पांच सातपर्यंत खामखा ठीक करून लिहून पाठवणे साराष तीर्थरूपाचे लिहिणे करावयाविसी मलमलीतच आहे बाबूजी नाइकाची समजावीस काढावयाचा गुता तो आम्ही गुजराथेत करावे आसे लिहिलेच आहे इतकेहि

---

१ 'श्री' कार नाहीं, पत्र भाऊसाहेबांचें.

पर्याय लेहून तीर्थरूपाचे प्रत्यासहि आणून करावयाचेच जाले तरी मूल पैका पाहिजे तो क्षेपनिक्षेप आम्ही लस्करात आणू निमे वराता त्याचे पदरी लागलाच पडावा याप्रो येकोत्रा निदान सवोत्रा बिन सूट पैका किती मिलेल हे साफ लेहून पाठवा त्यासारखा सुमार बाधू जुने फौजेस पैकियाची वोढ नवा पैका पाच पर्यंत सातारा मिलाला तरी सुरत बाधू तिसरे रोजी जाब पाठवणे वरकडहि आईसाहेब वगैरे मुतसद्दी याचा करावयाचा भावगर्भ लिहिणे रा छ २ मोहरम गुरुवार हे आसीर्वाद

---

**ले. २३९** श्री श. १६७२ मार्ग. शु. ४
इ. स. १७५० नो. २२

चिरंजीव राजश्री नाना यासि बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले राजश्रीनी मातुश्री आईसाहेबाकडे रा विष्णुपंत व चितो विनायेक पाठविले होते गडावर जाऊन साल जाब जाला तो मजकूर व राजश्री गडावर जाऊन माहाल घेऊन आले तो मजकूर लिहिला तो कलला उतम केले याउपरी दरबारचे वर्तमान वरच्यावरी लिहीत जाणे इकडील वर्तमान तर मातुश्री उमाबाई बुधवारी भेटीस आली भेटी जाली ते वृत तुम्हास लिहिलेच आहे बोलीचालीचा खुलासा तरी त्याच्या चितात दाहा पाचा लक्षावरी आमची समजावीस होईल तर करावी नव्हे तरी गैर कबजी मुलूक आम्हास दाखवावा सुरत गुजराथ अमली मुलकात काही देऊ नये इकडे बोलीचा प्रसंग पाडावा फौजेचीहि तरतूद करितात यैसी दो विचारावर आहेत याचा आमचा तह बनतो असा अर्थ नाही व बुधीचेहि वाटेने तह होईल हा विचार दिसत नाही या प्रसगी तुम्हास येथे बोलवावे उमाईसी तुम्हास बोलवावयास लावावे असे चितात होते परतु तेथील कारभार नवा राजश्री तेथे आले आईसाहेब गडावर आहेत उभयेताचा विचार कसकसा जाहाला येक जाली किवा पहिल्या प्रोच फाट आहे कसकसा विचार तेथील होईल यास्तव तुम्हास बोलाविले नाहीं जरी तेथे काम नसेल तुमच्या विचारे इकडे आलो तर फिकीर नाही असे असेल तर तसेच लेहून पाठवणे तुम्हास व राजश्री गोविदराव यास उमाबाईसी बोला-

वयास बोलाविले जाईल येव्हा* तुम्हास बोलाविले तर तुम्हीच लोक कारभार फिरवाल याची तर्तुदेत आईसाहेब आहेत त्यास रिकामे रान सापडेल यास्तव न बोलाविले या अर्थाचा पेच न पडे ऐसे असेल तर सत्वर लिहून पाठवणे येथे उमाबाईचे कारभार पाच त्यात येक मत नाही सेनापती अंबिकाबाई देवजी ताकपीर ते मडली येक विचार याखेरीज गाईकवाड तिकडे वेगळे तमत आहेतच या मजलसीत हरयेक दुरंदशीने रग पडणे दिसत नाही मग ईश्वर इछा न कळे लटक्याच आवया उठवीत की आज उद्या आम्हावर छपा घालतात तेथे आवाई नसलेस यासाठी येथे येऊन बसल्यास भय नाही हाहि येक प्रकार आहे येका दो दिवसात काय होईल ते लिहून पाठऊ येथे फौज नव्हती काही होती त्यात निवडक थोडी यासाठी तुम्हाकडील लोक आणविले आता भाऊकडील फौज येत चालली तुम्हाकडील लोक तुम्हाकडे यामुळे रवाना केले नसतील ते रवाना न करणे छ ३ मोहरम हे आसीर्वाद

---

ले. २४० श्री श १६७२ मार्गशीर्ष शुा७
इ. स. १७५० नो. २४

आसीर्वाद उपरी आईसाहेबानी बहूत आम्हाविसी वाईट मानिले सांप्रत राजेश्री त्याच विचारात अतस्ते असतीलसे मजला वाटते ऐसीयास नसले व आम्हाकडे असले तरी अडकून पडले तेव्हा उपयोग काय आम्ही मसलतसीर कर्जदार या दिवसात लटके दुराभिमान धरून कलह खावंद लोकासी वाढवणे योग्य नाही तुम्ही मागील गावचे नव्हेत ऐसे बोलून आईसाहेबासी बोलणे की खावंदानी इतकी इतराजी करावी ऐसे नाही व्यर्थ लौकिक दिलीपावेतो वाईट होतो जे जे मर्जी असेल ते आज्ञा करावी त्याप्रा वर्तणूक करू दुरभिमान करणार नाही याअन्वये बोलणे आणि अतरर्भावास तोड पाडणे सोहलतीखाली घालावे आईसाहेबाचा वसवस दूर करून संतोषे आपले मर्जीनरूप कार्यभाग करीत ते करावे आम्हास खावंदानी उदंड दिल्हे आहे तितके नीट करून खाऊन जे चाकरी सागतील त्यास हाजर राहून पूर्वी काल पत्र पाठविले आहे त्यावरून तुम्ही आईसाहेबासी पुराणीक वगैरे त्याचे मारफातीने संदेह दूर व्हावयाचे मागील परिहाराचे प्रकार योजून प्रसंग जाणून बोलावयास आरंभ केलाच

असेल जर तुम्ही बोलला आणि त्याचाहि भाव तुम्हांसी बोलावा ऐसा दिसला तर सांप्रत आईसाहेबास पत्र लिहून पाठविले आहे हे देणे त्याजवरच इमारत बाधून सोहलतीचे प्रकार पुढे तूर्त पडत ऐसे करणे जर काही बोलूहि नये ऐसेच त्याचे मनोगत दिसले तर हे पत्र न देणे उगेच आठ पंधरा दिवस आपले जागा खबरदार व विरुध न दाखविता राहाणे छ ९ मोहरम हे आसीर्वाद सिदभटासारखा बोलणार जो आईसाहेबासी बोलत असेल व त्याचे मायेचा जाणून त्यासी रुसवा काही व सोहलत काही व सेवाधर्म काही ऐसे प्रकार धरून येकदा दोनदा सागून तो पाठवणे बरे काय त्याजवर बोलतात हे आसीर्वाद

---

ले. २४१ श्री श. १६७२ मार्ग. शु. ८
इ. स. १७५० नोहे. २५

आसीर्वाद उपरी अनगलाकडील रुपये घ्यावयाचा मजकूर लक्ष्मण बलाल यास तीर्थरूपानी लिहिला आहे त्याप्रो जाहाले तरी घ्यावे नाहीतर गला पडावेसे काय आहे आणि त्याणीहि या समई हा मजकूर मध्ये आणू नये यातच उचित * असे जाणिजे सविस्तर मजकूर लिहिलाच आहे त्यावरून कलेल येदाचा सर्व मनसुबियाचा हि मजकूर लिहिणे पाच सात हजार फौज येथे ठेविली वरकड सारी पाठविली फौजेचा आम्हाकडे गुता नाही दाभाडियाकाडिल कारभार करून गुजराथचे स्वारीसहि ठीक पडे आसी फौज गेली येक जुने फौजेस दाहा हजार पर्यंत पैका पावला नाही वोढावेच लागले आम्ही इकडे नवी पाच सात तरी ठेवली पाहिजे आम्ही मेलऊ पैका हा उद्योग केला तरी मिलणे उगाच मिलणार नाही तोटा आहे तो आहेच दाभाडियासी उगेच बाबा नाना (आप)सात भाडून फेदी पाडले आहे पैकाच घेऊन तह करावा आसाहि मनसुबा करितात येथून न करावे आसे लिहिले आहे तुम्हास सारे भाव बाबाचे गोविदराया जवल आढलतच आसतील सर्व विचारहि लिहिणे पैका क्षेपनिक्षेप किती मिलेल ते लिहिणे रा छ ६ मोहरम आम्ही येथे नवा उदीम करीत होतो कामाचे पाहिले तो पाणी जड भोजन येकदा केले तुम्ही कुटुबातच पडला आसाल याचा मजकूर निरालेच लेहून पाठवणे

---

१ पत्र नानासाहेबांचें नाना पुरंधरे यांस.

तेथे येथे केलेप्रो कारभार निभावावयाचा मजकूर दिसतो कीं हजार पेच आहेत हे सविस्तर लिहिणे गेलियाताा येकहि पत्र सुधे आले नाही वरकड आजपर्यंत तीर्थरूपाची मर्जी येक प्रकारची होती म्हणून नाहीसे होते प्रस्तुत करा आसेहि लिहितात पुर्ते मर्जीस आले तरच करू नाही तरी करावयाचाहि आमचे मुले त्यास पेच पडावासा आसलीया आम्ही करणार नाही सर्व अर्थ मनात आणून पैका कसा मिलेल तूर्त कर्ज हे सर्व खोलून लिहिणे हे आसिर्वाद[1]

---

**ले. २४२** श्री श. १६७२ मार्ग शु. १०
इ. स. १७५० नोहें. २७

आसीर्वाद उपरी हुजरातीकडील लोकाचे तैनात जाबिते व नेमणुका तमाम ज्या केल्या त्या राजश्री स्वामीस वाचून दाखविल्यास संतोषी जाले तीन लक्ष रुाये खजानीयाचे ते कोठे हेहि पुसिले म्हणून सविस्तर लिहिले ते कलले केला आहे कारभार तो उतमच आहे राजश्री हि खाली आले तरी समजून करितीलच वरते येकच होऊन फिरऊ लागलिया पाहून घेऊन आगर जबरदस्तीने ठेविले आसेच राहिलियास किलेकरी पाहून घेऊन राा छ ८ मोहरम हे आसीर्वाद

---

**ले. २४३** श्री श. १६७२ मार्ग. शु. १०
इ. स. १७५० नोहे. २७

*श्रियासह चिरंजीव नानास प्रती माहादाजी अंबाजी आसीर्वाद उपरी येथील वर्तमान ताा छ ८ मोहरम मुकाम चऱ्होली येथास्थित असे विशेष आईसाहेब सातारियावर राहून गडकरी आपले लगामी लाऊन राजश्री ठेऊन घेतल्याचे वर्तमान तुम्ही श्रीमंतास लिहिल्यावरून सविस्तर कलले यैसीयासी राजश्रीसी व मातुश्रीसी विरुध होऊन राजश्रीस अटकाविले किवा सोनारकल करून हे राहिले हे तत्वता मनास आणून लिहिणे गडावर गोविंदराव याचा लगाम होता त्याचे काये जाहाले पुढे राजश्रीवर जबर-

---

१ पत्र भाऊसाहेबांचें.

दस्ती करून मातुश्री कोणता फेल ( खेल ? ) करितात सामादिक मडलीत व मुतसदी यात मातुश्रीचे मलणींत कोण व राजश्रीकडे कोण व दर्याबाई शामराव याचे काये वर्तमान किल्यावर सामान सरजाम वरच्या वर नेतात काये हे तपसीलवार लिहिणे जामदारखाना पोते गडावरील फोडून गडा-कोटास पैका मातुश्री वाटितात म्हणून यैकतो तरी याचे काये वर्तमान पैका कोठील कोणास कसा दिल्हा फौज काहीं मेलवितात कीं काये मन-सबा होतो हे सविस्तर वरच्यावर लिहीत जाणे अलस न करणे हे आसीर्वाद

---

ले. २४३ श्री शके १६७२ मार्ग. शु. १०
इ. स. १७५० नोहे. २७

आसीर्वाद उपरी राजश्री स्वामी शष्टीचे भोजनास किल्यावर गेले रात्रौ तेथे राहिले दुसरे दिवसी मातुश्रीनी राजश्रीस ह॒म॒वा॒र करावयाचे रीतीने केले परतु न आईकले दोष खाऊन दरवाजियाजवल आले तेथे गडकरी आडवे होऊन उभें केलें राजश्री घोडियावरून उतरून पटा घेतला तो आवघ्यानी पटा घेऊन घोडीयावर बसऊन माघारे नेले कैदेत ठेवि-लिया दाखल आहेत म्हणून कितेक तपसीलवार लिहिले ते साद्यंत कलले पुढेहि जे होत जाईल ते वरचेवर लिहून पाठवीत जाणे *गडकरी याचें गोपालप्रभूसी मजकूर बोलून वरते पाठविले आहेत किलेकरी आपलेसे जालियास से पनांस धारकरी वरते घेऊन जाऊन राजश्रीस जोरबेजोर आणतो बहुता प्रकारे फेदी पडेल म्हणून लिहिले ऐसीयास किलेकरी यानी लबाडी आईसाहेबास वरती घेतली तेव्हापासूनच आरभिली ते सर्व येकीकडे ठेऊन बोललेप्रमाणे निभावावे आम्ही मनात पेच न आणावा राजश्री गेलियावर सर्व प्रकारे रंग उतरावा आसेहि बोललो ते सर्व येकीकडे राहून गेले मनास येईल तसे वर्तू लागले पुढेहि तुम्ही बोला त्याप्रो जालिया आमचेहि मना-तील पेच जातील बोलीप्रो चालऊ नाही तरी राजश्री पुर्ते आडकले आसेच जाले तरी आम्हास सेवाधर्म करावा लागेल वरकड विचारे करून गोविद-रायाचे हाती गडकरी आहेतच मुतसदगिरी होईल तेथपर्यंत करतील जाले तरी उतमच आहे बातमी बहूत बारीक राखून खबर मुजरद राउता-बा पाठवीत जाणे हे वर्तमान आलीयावर पाच सातसे राऊत तुम्हाकडे

१ सबंद पत्र बाबांच्या हातचें.

रवाना केले डाकेचे राउत तुम्ही उठऊन नेणे आपले जागा खबरदार राहणे रा छ ८ मोहरम पुण्याहून पत्रे आली बाबाची उमाबाई तीर्थरूपाजवल फौज जमा जाली म्हणून बोलीस आली भेटी जाल्यास तह होणार येकूण काम सिले पडलसे आहे हजार चढी लावणार प्रस्तुत आईसाहेबाची सेडी थरारली आहे त्याकडे तुमची पत्रे गेलीच आहेत हरयेक दाभाडियाचा निकाल पडून फौज लाऊन देऊन तीर्थरूप राहिले तरी आम्ही इकडे पोट भरतच आहो तिकडेच केवल जरूर बोलावले तरी जावे लागेल मागून डौल बाधून लेहून पाठऊन थोरात आपलेच आहेत जमाहि जाले आहेत करविराकडील बातमी त्यास लेहून राखणे रा छ मजकूर हे आसीर्वाद

---

**ले. २४४** श्री श. १६७२ मार्ग. शुा १०
इ. स. १७५० नोहें. २७

चिरजीव राजश्री नाना यांसि बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहिणे विशेष तुम्ही पत्र छ ५ मोहरमचे पाठविले ते छ ७ मीनहूस पावले दुसरे छ ६ मोहरमचे पाठविले ते छ ८ मीनहूस पावले राजश्री शष्टीस गेले ते आम्हास विचारून गेले गडावर गेलियावर मातुश्रीनी परिछिन बैसविले येके सोफीयात माहाल देखील ठेविले मातुश्रीच्या चोक्या बैसल्या आहेत राजश्रीजवल दोन च्यार पोरे आहेत वरील माणोस खाली येऊ देऊ नये व खालील वरती जाऊ देऊ नका बदोबस्त कारखाने देखील करा म्हणोन राजश्री—चे निरोप येतात आपली सुटका करा म्हणौन बहूत ग्लानतेने सागून पाठवितात गडकरी यास देहावर आणावयाचे अगाध नाही दोन हजार राऊत व दोन हजार प्यादे हशम पाठवावे नाके जातबंद करून अयास आणितो म्हणौन विस्तारे लिहिले ते कलले ऐशास राजश्री व आईसाहेब येक होऊन हरयेक मनसुबा करितो तर त्याचा इतबार हरयेकास पुरोन मनसुबियाची गोष्ट अवघड पडती ते न होता राजश्रीस कैददाखल ठेऊन आईसाहेबच राज्य करू म्हणतील तर राजश्री–स धरलियाचा बदलोकी(क) लोकोतर जाहाला मातुश्रीच्या वचनावरून कोते अंदेश असतील त्यासहि आईसाहेबाजवल यावयास विचार पडेल तेथे दीर्धदर्शी असतील ते तो येणार नाही

---

१ पत्र भाऊसाहेबांचें.

हे राज्य रामेश्वरापासून दिलीपर्यंत आहेत गडावरी बैसोन आईसाहेब हुकूम हकीम चालऊन राज्य नादवीन म्हणतील तर कसे नादेल असो भावी पदार्थानरूप त्याणी मनसुबा योजणे करणे तो केला असेल वरकड लोक हशम पाठऊन द्यावे गडास चोक्या देऊन बदोबस्त करू म्हणोन तर राजश्रीची मनोभाव आपलेकडे असता चोक्या बैसवावयाचे अगाध नाही परतु राजश्री व आईसाहेब गडावरी आहेत आम्ही सेवक तीन पिढ्या निष्टेनेच सेवा केली आणि आजी चोक्या बैसविल्या तर आमची दुंदाई जबरदस्ती दिसेल या गोष्टीचे कसे करावे वरकड चोक्या बैसऊन गडकरास देहावरी आणावे असा काल प्राप्त जालाच आहे असो तुम्ही कोणी गोष्ट तटी न लावणे आईसाहेबासी बोलता गोडच बोलत जाणे आम्ही सेवक धण्याच्या मर्जी खेरीज नाही जैसी आज्ञा होईल तैसी वर्तणूक करू यैसेच म्हणत जाणे जितकी गोष्ट तुम्ही तटी लावाल तेच त्यास संकट वाटोन न करावी ते राजकारणे करितील आयोग्यास हाती धरितील देणे ते देतील हे गोष्ट आपण त्यास सुचऊन दिल्हीसे होते तुम्ही मातबर सेवक तुम्हीच वचक तुमचा तुम्ही पीळ सोडिलासे त्याचे दृष्टीस पडलियावर तिहीं साहास करणे सोडितील यास्तव गोड बोलावे किलेकरांचे कबिले धरावयाचे उपद्वापात सह[सा] न पडणे गडकरासीहि गोड बोलणे छ ८ मोहरम हे आसीर्वाद

---

**ले. २४५** श्री श. १६७२ मार्ग. शु. ११
इ. स. १७५० नोव्हें. २८

आशीर्वाद उपरी————————

साबाजी घाटगे यानी गोपालरायास मलवडीसाठी अडविले व मलवडीखाली बावाजी घाटगे करून देत नाहीत त्याचा प्रकार लिहिला तो कळला

भगवतराव बावडकराची माणसे संभाजी राजे याची स्त्री व मूल आणावयास देखील आईसाहेब मातुश्री आई साहेबास सरंजाम द्यावा त्याचे लाहे माफीक चालवावे तेव्हा ती येणार म्हणोन तरी पुढे होईल वर्तमान ते लेहून पाठवणे

हुजरातीचा कारभार सर्व समजाविला म्हणोन लिहिले ते कळले उतम आहे

याची गेली याचा मजकूर लिहिला तो कलला पुढे तथ्य वर्तमान ठिकाणी लाऊन लेहून पाठवणे

मातुश्री आईसाहेबी गडकरी याची समजावीस केली व सभाजी राजे याजकडेहि पत्रे जाता[त] म्हणोन कितेक बातमी वर्तमान लिहिले ते कलले पुढे कोण कोण काय करिता[त] कसा रंग पडतो ते सर्व लिहिणे

नागोराव यास देवकात्याचे उतर खडे दिल्हे ते व बाबाजी जाधव यास सरकाराकडील सरजामी यापैकी माहाल दिल्हे तो कारभार फिरलासा जाहालियाचा तपसील लिहिला तो कलला

मल्हारजी होलकर व जयाजी सिंदे याजपासी हती दोन दोन घोड व कडी घेऊ ऐसे म्हणतात कागदावरी सिके करावयास अनमान करितात म्हणोन लिहिले ते कलल ऐशियास या उभयताचे व महिपतराव याचे काग[2] कागदावरी सिके तजविजीने घ्यावे हे देणार कार्य कलतच आहे

रा छ ९ मोहरम हे आसीर्वाद[1]

---

ले. २४६ श्री श. १६७० आषाढ वा। १४
इ. स. १७४८ जुलई १३

* आसीर्वाद उपरी तीर्थरूप मजसीहि मोठे मोठे गोष्टी बोलत होते मीहि इकडील तसेच बोललो आमलसे लबाडपण न येता त्याचे मनात भाऊ बोलत नाहीत आसे आहे ते हलू हलू उडवावे या अन्वये बोलतो तुमचा काही विशेष मजकूर नाही प्रस्तुत बाबा तेथे आले आहेत कसे कसे द्रिष्टीस भाव पडतील सविस्तर लिहून पाठवणे फार करून बाबाची मर्जी मजविसी बरीच आहे नानाची धावत मात्र पुरावी आसे भावे नानानीच कारभार करावयाचा डौल आहे किवा काही फिके पडावयाचे तऱ्हेने आहे हेहि लिहून पाठवणे येद्यपि फिके पडावयाचा आसला तथापि जितक्या राखावयाच्या आहेत त्या राखून त्याचे मर्जीस अनकूल दिसे आसेच केले पाहिजे बाबाची मर्जी उतम आसलियास गुताच नाही त्यास तेथें कसकसी मर्जी आढलेल ते

१ येथून भाऊसाहेबांच्या हातचें. २ 'काग' आधीक पडला आहे.

लेहून पाठवणे तुम्हासांहे वर्तमान पुसतील त्यास आमचे मते तुम्ही काही ठाऊक नाही काही सागवे केवल काहीच ठाऊक नाहीं आसे न बोलावे व सखारामाचे बाबूरायाचे भाऊचे सर्व प्रकारे उतम हे भाव दाखवावे आसे आहे वहिनीची प्रस्तुत माझी मर्जी बरी आसे वहिनीकडून तीर्थरूपास सागिवले आसे वहिनीसी राखून ठेविले त्याचे मनात याप्रो। आणून दिल्हे सविस्तर कलावे म्हणून लिहिले आसे पुर्ते भाव द्रिष्टीस न पडले म्हणून पत्र लिहिले नवते पुढें होईल ते लेहून पाठऊ येविसी आम्ही डौल घातला असाच किवा आणखी प्रकार आहे जे मनात येईल ते वरचेवर लेहून पाठवीत जाणे माणिकगड घावयाचा विचार जाला रा छ २७ रजब बुधवार प्रातकाळ हे आसीर्वाद तुम्ही उतरे पाठवाल त्यात सखारामास कलायाजोगे नसेल तो भाव निराले पुरवणीत लिहीत जाणे हे आसीर्वाद[1]

---

**ले. २४७** श्री इ. स. १६७० श्रावण
इ. स. १७४८ आगष्ट

* आसीर्वाद उपरी बाबा बाा येऊ ना आसे पहिले बोलत होते त्यास प्रस्तुत ते गोष्टीचीं काही चर्चा नाही बाा जातील मला आसे वाटते की तिकडे पातशाहा बाहेर निघाला येदा तीर्थरूपानी कारभार केला आसा लौकिक आहे' यामुले तीर्थरूपच स्वारीस जातील आमचे राहाणे घरी गुाा कारभारी घेऊन होईल याप्रो वाटते घरी बालाची मुजहि करावयाची आहे तेव्हा बहुता प्रकारे वहिनी जाणार नाहीत पातशाहाची गडबड नसती तरी तीर्थरूपही न जाते पण प्रस्तुत बाहेर निघाला वाईट जालियास आपण तेथे असले पाहिजे अथवा येखादा मनसुबा तरी मातबर होईल यासाठी आपणच जातील आसे वाटते तुमचे विचारे कसा मजकूर होईल हे कसे करितील पातशाहा काय मनसुबा करितील नासरजग काय करितील हा सविस्तर सालभर कसकसे कोणाचे कोणे रगास जाईल याचा मनन करून लिहून पाठवणे रामाजी माहादेव यास गंगाधर विस्वनाथ कारभारी करून दिल्हे उतर सत्वर पाठवणे नानाने येथून आपल मु ( ? ) लाची बोटे पाहावी कसे करावे हे मनास आणून येथे येऊन सागावे याविसी सालु फिर्गी सरकारात वैद्य

---

१ पत्र भाऊसाहेबांचें धोंडोबा आप्पांस.

होता त्यास मजजवल पुसून पाठविले आहे तो येथे आलियावर बाबास पुसून करणे ते करावे असे आहे मजला पुसून नानाने पाठविला हे कोठे बाहेर भाव न काढणे बळवतराव तेथे आला आहे त्यास नाना बाबा मी दादा बाबा धाकटे नाना सखारापत सर्व मंडळीच्या मर्ज्या करणे तऱ्हा पुसणे ते सागतील त्यांत विषेश श्लेष आढलेल तो लिहिणे इद्रोजी कदमाचा कारभार विल्हे लागला पत्राचे उतर लौकर पाठवणे रा शुक्रवार दसमी हे आशीर्वाद[१]

---

ले. २४८ श्री श. १६७० श्रावण
इ. स. १७४८ आगष्ट

आसीर्वाद उपरी तीर्थरूपाची मर्जी प्रस्तुत बरीच पेशजीप्रोच्च आहे बहुत रागरगात नाही खुशामतीचे ठायी आहे लक्ष आपण धरून करतो असे मानितात करतात परतु अमलसे ठीक पडत नाही आम्ही मर्जीप्रो काही आम्ही करितो कितेक त्यास पुसून वरचेवरी करावे मर्जीस ठकि पडे ते करतो बाबा प्रस्तुत पधरा वीस दिवस जाऊन जाले अद्याप न आले कधी येणा(र) कर्नाटकचा मामला करावयावयांचा मजकूर व सातारियास प्रस्तुत बाईस बरे वाटत नाही यामुले राजश्री उभयेता बाईची मर्जी तेथे तीर्थरूप नानानी यावे येविशींचे विचार नानानी बाबास लिहिले होते त्यास बाबानी उतरे काही खुशामत काही आपण निराले राहून विचार आसे लिहितात याचा भाव काय हा सविस्तर मजकूर लेहून पाठवणे व मला असे वाटते कीं नानाचे मनात आपणच कारभार करावयाचा आहे आसे आपलियावरच वजन पाडून घ्यावे आपण खटे मणहि दाखवावे मणजे सहजेच वरकडावर पडेल वस्तुता बाबावाचून नानाचे काही होत नाही आसे दिसते आम्ही चहूकडेहि रगात मिलोन आहो केवल मला मामासारखे मुरदाडपणा पणाचे[२] भे नाही कोणाच्याने होत नाही वरकड जसे आसेल त्यात आम्ही उतम आहो काही वाईट नाही माझे मते प्रस्तुतचा विचार याप्रो घडून येईल की येवडे दोहो महिनीयात लौकर तयारी करून स्वारीस हर कोणी जावे लागेल सातारियास पर्याये न येण्याविसी लिहिले आहेत तेथे निदान जावयाचेच पडलियास तीर्थरूपासच पुढे जावे लागेल फार करून तीर्थ-

---

१ पत्र भाऊसाहेबांचें धोंडोबा आपास. २ अधिक पडलें आहे.

रूपाचा भाव आपणच जावे आसे आहे तीर्थरूप गेलियास उतम आहे कोकणचा कारभार तूर्त होत नाही पुढे सावकासपणी करावयास दिवस आहेत स्वारीस जाणे जालीयासहि भदावर वगैरे किरकोल जमिदारी कामे व बगालियातील मनसुबा व कमावीसदाराचे हिसेब आहेत त्यास कोण कोणे रगास मनसुबा जाईल याचा विचार तुमचे विचारे कसा दिसतो तो लेहून पाठवणे हे आसीर्वाद

---

ले. २४९ श्री श. १६७० आषाढ वा ३
इ. स. १७४८ जुलई २

आसीर्वाद उपरी त्रिबक विनायेकाचा मामला काढला नाही राघो गोविद दूर न केले विसाजीपंत फडनीस केले व आणखीहि खबरी तीर्थरूपाजवल लुचे नाना प्रकारे आमचे मनातून देखील पेच आसे नाना प्रकारे समजावितात त्यास येविसी तीर्थरूपाची मर्जी साफ आहे बाबाच्या मनातील पेच निघत नाही याची तरतूद आतापासून काही करावयाची आहे की काय हे लिहिणे बाबूरायाचे आमचे बरे सखारामाचे वाईट आसे आहे येविसी सखाराम सारेच बसून काम करावे खलबत च्यार लबाडी करावी बाहेर सखाराम वाईट न दिसावे आसे करितो बाईची मर्जी च्यारदा जाऊन बालून राखतो आणखी कोणे प्रकारे काय तजवीज करावयाची ते लेहून पाठवणे रा छ १६ रजब मंदवार कोटुरास पोरीस आणावयास मल्हारीस पाठऊन दिल्हे उद्या यथून जाईल हे आसीर्वाद[१]

---

ले. २५० श्री श. १६७२ मार्ग. शुा ११
इ. स. १७५० नोहे. २८

चिरंजीव राजश्री नाना यासि बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येर्थील कुशल जाणोन स्वकीये लिहिणे विशेष पत्र पाठविले ते पावले राजश्रीच्या वाडियांतील वस्तभाव गडावरी नेतात राजश्री—च्या वाड्यास आम्ही चोक्या ठेवाव्या तर कलह होईल जरी चोकी न ठेवावी तर राजश्री—चा शब्द लागेल याची काये आज्ञा ते करावी म्हणोन लिहिले ते कलले ऐशास तुम्ही चोक्या न ठेवणे वस्तभाव नेतील ते नेऊ देणे

---

१ पत्र भाऊसाहेबांचें धोंडोबा आप्पांस.

सर्व प्रकारे मातुश्री आईसाहेबाचेच मर्जीप्रो तुम्ही वर्तणूक करणे आईसाहेबाचे कारभारी पुराणिक व गोपालराव यांचे विद्यमाने बोलणे की न जाणो जाणोन नेणोन मागे मातुश्रीचे मर्जीसिवाये वर्तणूक जाली आसली तर असो सर्व प्रकारे आम्हास आईसाहेबाचीच मर्जी दरकार आहे आज्ञा करितील त्याप्रो वर्तणूक करू म्हणोन बोलोन आपले जागा बहूत सावध राहाणे कोण्हासी कजिया कथला न करणे वर्तमान वरच्यावरी लिहीत जाणे *राजश्रीस सांगून पाठवणे की आम्हास चवकी ठेविता येत नाही माहाराजानी आईसाहेबाचे विचारे असून जेणेकरून आईसाहेब संतोषी होत ऐसे करावे येणेकरूनच क्षेम आहे ऐसे मात्र भेट न होता सागून पाठवणे छ ९ मोहरम बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद

---

ले. २५१ श्री श. १६७२ मार्ग. शु. ११
इ. स. १७५० नोंहें. २८

श्रीमत माहाराज मातुश्री आईसाहेबाचे सेवेसी

विनती सेवक बालाजी बाजिराव प्रधान कृतानेक विज्ञापना सेवकाचे वर्तमान ताा छ ९ मोहरम पर्यंत साहेबाचे कृपावलोकनेकरून येथास्थित असे विनती साहेब [शंभु] माहादेवाहून सातारियास गेल्यापासून कृपा पत्र येऊन सेवकाचा साभाल होत नाही ऐसे नसावे व या दिवसात ऐकिले जाते की सेवकावरी साहेबाचा क्रोध आहे म्हणौन तर आम्ही साहेबाची लेकरे व सेवक असों नेणतपणे साहेबाचे मर्जी खेरीज वर्तणूक जाली असेल *तरी क्षमा करून वडीलपणे बुद्धिवाद आज्ञा करावी सेवक दुराग्रही नव्हे जसी मर्जी असेल तदनरूप वर्तणूक होईल विना मोठा आपराध जाहाल्या वाचून इतकी अवकृपा करणे उचित नव्हे बिस्तर काये लिहिणे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

ले. २५२ श्री श. १६७२ मार्ग. शु. १३
इ. स. १७५० नोंहें. ३०

चिरजीव राजश्री नाना यासी भाऊ आसीर्वाद तुम्ही पत्र पाठविले ते पावले सोमवारचे राजश्री तसेच आडकले आहेत येके सोपियात बायका सुधा कनात लाऊन ठेविले आहेत राजेखान सिदभट आले त्याणी

सविस्तर सागितले व निरोपहि सागितला म्हणून वगैरे सेते गडकरी याची बंद करिते। फौज काही वारणे नजीक पाठवावी म्हणून लिहिले सविस्तर ते आजच प्रहर दिसी पावले सर्व मजकूर कलला ऐसियास येविसीचा मजकूर लिहिणे तो तीर्थरूपास लिहिला आहे राजश्री स्वावंद त्याची सुटका व बदोबस्त आम्हास करावाच लागेल दाभाडियाकडील मजकूर होणे तो होऊन तीर्थरूप तिकडे जातच आहेत घरीच पेच पडला कर्नाटक आठवणे कलतच आहे आम्हासच करावे लागेल मागाहून सविस्तर लेहून तूर्त चिमणाजी बापू पाठविलेच आहेत येऊन पावतील थोरातास लिहिणे ते लेहून ते आपलेच आहेत आष्टे त्यास दिल्हेच आहे तुम्ही सभाजी राजियाचे वाटेवर खबरदारीविसी त्यास लिहिणे फौजाहि पाठऊन तूर्तच गडकरी याची सेते बद केली त्याणी गोले मारू लागले कामाचे काय करणे ते मातबरीने करावे लागेल वरते कोणी जाईल त्याच्या बाा आमचा निरोप राजश्रीस मायेचा सागून पाठवणे की आपण भिऊ नये दबून काही आईकू नका आम्ही लौकरच प्रतिकार करून बदोबस्त करितो येणे स्वालते लौकरच होईल आसे मायेने सागून ठेवणे त्याचा त्याचा बेबनाव आहे तो राखून ठेवणे पुणियाचे उतर येईल त्यासारखी तजवीज करून लेहून पाठऊन फौजाहि येईल रोजचे रोज दुसरे तिसरे रोजी पत्र येई आसे पाठवीत जाणे राा छ ११ मोहरम शुक्रवार दोन प्रहर हे आसीर्वाद

---

ले. २५३ श्री श. १६७२ मार्ग. वा
इ. स. १७५० दिजें.

* आसीर्वाद उपरी अलाहिदा पुरवणी पत्री उतर लिहिली आहेत साराश आईसाहेबाचे विचारात गडकरी सातारकर आहेत वरकडहि मिलकतीचे इछेने आज्ञांकितत्व तूर्त दाखवितात वर ऐवज मातबर व सर्वांची अनुमतेहि त्यात आहेत कोणी बाहेरून कोणी आतून अशा प्रसंगात तटी लाविल्यास मसलत प्राप्त होणार चालीसा लाखास कर्चदार जाहालो आता मसलत कोणे बलावर करावी तुम्ही म्हणाल की फार फौज नलगे ऐशियास राजे खाली असते आईसाहेब गड बलाविती तर वेढा बसविल्यास लौकिक विरुध दिलीपावितो विरुध न दिसता आता सर्व लौकिक

की राजे आईसाहेब येकमत तुम्ही आपले बले हरामखोरीनें गडास वेढा घालता व अशा वेढियाने अतिवाद मात्र वाढेल कार्यसिधी होणार नाही तूर्त तुम्ही राज्यास निरोप सागून पाठवणे की माहाराजानी आईसाहेबाचेच मर्जीत काही दिवस राहावे सोहलती खाली पडल्यास माहाराजाचे मर्जीनरूप होणे ते होईल तूर्त जोर चालत नाही व थोडासा जोर केलिया लोकिक विरुध होतो वरकड गडकरी बिफरून वाटा मारु लागतील यास्तव आईसाहेबाचे आज्ञेत राहून प्राण रक्षण करून त्यातच मिलोन असावे म्हणजे आईसाहेब संतोषी होऊन राहतील कार्यभाग त्याचे मर्जीप्रा करावा ऐसे मत्र न फुटे अशासमागमे सागून पाठवणे तुम्ही आपले घरी राऊत लोकानसी सावध राहाणे बायकोस सासवडास पाठवणे आईसाहेबासी गोड बोलावे की साहेबी खातरेस येईल ते करावे आमचा गुता नाही परतु दिली नासरजंग पावेतो राजे धरून बसविले हा लौकीक न करावा आम्ही चाकर आहो जे चुकलो असो त्याविसी आज्ञा करावी जी मर्जी असेल त्याप्रो वर्तणूक करू ऐसे राजकारण लावावे सिले-खाली गुतला हात सोहलतीनेच काढून घेतला पाहिजे येव्हा तुम्ही गडास वेढा बसवावा हे सहसा विचारास येत नाही अशा रीतीने काही दिवस घालवावे येक खासा हामे[श] फौज घरी राहील तो सर्व सभालील चिर-जीव भाऊस तुमची पत्रे गेलीच असतील त्याचेहि ध्यानात हेच आहे की फितर देसी उत्पन्न जाहाल्यास नवी मसलत होत नाही घरी राहून सभालले पाहिजे सारांश नम्र जाहालो असा भाव आईसाहेबाचे मनात येऊन सोहलती खाली पडे रिकाम्या गोड बोलण्याने ऐसे जरूर करणे वाकडे न बोलणे तटी लाविल्यास कलह वृधी होऊन मसलत उत्पन्न होते दिलीपावेतो आमचा लौकीक फटकल होते राजे रडतात तर त्यास हेच म्हणावे की तुम्ही तूर्त त्याचे विचारे राहून आपली सुटका होये ते करणे जोर करता येत नाही तुमचे रक्षणार्थ काही फौज पाठवितो बहूत सावध लेकूरपण टाकून या दिवसात शुक्र नीतीने असावे विशेष याजहून काही सुचत नाही[1]

---

१ पत्र पूर्ण आहे. सर्व पत्र नानासाहेबांच्या हातचें, बारीक अक्षराचें आहे.

ले. २५४ श्री श. १६७२ मार्ग.
इ. स. १७५० दिजे.

*आसीर्वाद उपरी नवी आवाई करवीरवासीकडील उत्पन्न जाहाली आहे हे पूर्वास्थितीवर आल्यानंतर चिमणाजी बापूजीनी उदाजी चव्हाणास त्याचे तालूकीयात पाठऊन द्यावे त्यानी हगामसीर आपली फौज जमा करून आपला सरंजाम मेहनत करून सोडवावा आमच्याने ज्यास सरंजाम द्यावा त्यास आपली फौज देऊन कर्जे खाऊन सरजाम सोडऊन द्यावा ऐसे अनकूल पडत नाही याप्रा मजकूर धरून चिमणाजी बापूजीनी हिमतबहादरासी बोलावे व फौज जमा जाहाल्यावर गरम नरम गोष्टी बोलून ते मुलकात उपसर्ग न करीत आपले जाग्यास तूर्त जात ऐसे येथील उदराचे अर्थ दर्शऊन बोलून माघारे यावयास मोकलीक होये ऐसे करावे करवीरवासी आले तर आम्ही चाकरीस हाजर आहो त्याखेरीज यमाजीपंताची ठाणी घेऊन द्यावयाची मसलत कर्जे खाऊन करावयास अनकूल सहसा पडत नाही या अन्वये मनन करून चिमणाजी बापूजीस सविस्तर लिहिणे व उदबासहि समजून लिहिणे हे आसीर्वाद

---

ले. २५५ श्री श. १६७२ मार्ग. व. २
इ. स. १७५० दिजें. ४

चिरजीव नाना यासी सदाशिव चिमणाजी आसीर्वाद तुम्ही पत्रे (पाठविली ती) छ ७ मोहरमची तेरावीस पावली छ ११ मोहरमची पधरावीस पावली छ१४ मोहरमची छ१६ मोहरम पावली सविस्तर मजकूर लिहिला तो कलला आईसाहेबी गडकरी नवे ठेवितात पारठीयास पालखी गाव करून दिल्हे तीनशे माणूस आले किले तमाम लगामी लावतात जागजागा गडकरी गावो गावे काजिये करतात तीर्थरुपानी आईसाहेबासी लाघाव्रल लावावी आसे लिहिले परतु हे जालियास राजाहि गेला आईसाहेब जबरदस्तीने मोडून नवे करणार येका पत्राने बिघडले राजा लगामी आमचे आजपर्यंत पुर्ता आहे केवल मोर्चे दिलीयास लौकिक विरुध यास्तव बाहेर तोडावर देऊन काही चालू मात्र देऊ नये लबाडास मारावे

---

१ सबंद पत्र नानासाहेबांच्या हातचें.

आसे करावे याचेच पर्याय पुण्यास लिहिले आहेत आपण लिहिणे तें लेहून पाठवावे याप्रा करावे म्हणून कितेक लिहिले ते सविस्तर कलले ऐसियास आमचे मते तुम्ही लिहिले पर्याये उतम तूर्त खालील जामदारखाना वगैरे वरते मात्र जाऊ न द्यावे लाबणीवरहि न घालावे मातबर तरतूद्च करावी राजा खावंद तो आमचा वरकडाचे भे काय मुलाजा का करावा हरामखोरी राजीयास करतो तर होते प्रस्तुत चाकरी आहे या त गे प णे करावे तरी चितास बाबा नानाचे न ये तरी फजित मात्र पडतील बाहेर घर बुडते हे मनात येतच नाही येक दाभाडियाचे पाया पडावे आगर टाकून गुजराथेस जावे आम्ही कर्नाटकास न जाता घर आईसाहेब आटोपू हे बाहेर गेलीयावर पेच नाही दाभाडियाचे पाया पडून आपण घरी रहात आसले तरी आम्हास तरी इकडे जा म्हणावे आपण नेट धरून घरचे करावे सारे पर्याये लिहिले आहेत आईसाहेबास पत्र तुम्ही दिल्हे नसेलच उतम आहे न द्यावे पुर्ते बाबा नाना विचार करून लिहितील त्याप्रा करावे च्यारी दीस दवडून कामे बुडवावी आसे आहे दोघाचेहि मते दौलत बुडाली तर उतम आसे करतात आसो काय करावे साफ उतर येईल त्याप्रा आम्हीहि करून लेहून पाठवून वरते लोक किती कसे कबिले वरते किती कोणाची राजकारणे कसी हे सर्व भाव बारीक लिहींत जाणे पहिले गावचे नाही आसे होऊन फिरून राजियाची चाकरी करावी तो आडकला आमच्याने काही होईना आणि पुराणिकाचे गडकरीयाचे पाया पडावे याहून मेले तर उतम पुराणीक गडकरी व आणखी सारे मिलून काय करतात हे तरी पाहावे होते आसो सविस्तर आसेच पर्याये लिहिले जावे रा गुरुवार हे आसीर्वाद

---

**ले. २५६** श्री श. १६७२ मार्ग. व ४
इ. स. १७५० दिजे. ६

आसीर्वाद उपरी मातुश्री आईसाहेब यानी चिटी पाठविली ते येथे पाहावयास पाठविली ते. पावली व आईसाहेब मनसुबा करितात पायेचे लोक ठेवितात गड किल्याचा बंदोबस्त करितात बागावर रोखे पत्र करून मेवेजात नेतात गावखेडीयावर रोखे करितास गोलियांस पालखी दिली भिवाजी कासुरडे कांहीं जमाव धरितात त्यास आईसाहेबाच्या रोखा न

चाले असी तजवीज करितों वरकड स्वामी लिहिले त्याप्रो आईसाहेब रजावंद होतील आपला नातू आपले जवळ ठेविला आहे खातेरेस मानेल तसा कारभार करीन तुम्हास पहिले शाहूमहाराजानी दिल्हे ते खाऊन चाकरी करून असणे आमचे चाकर आहा याप्रो साफ बोलतात स्वामीस याप्रो मानते कसे काये ल्याहावे तूत आई साहेबाची तोर असी आहे स्वामीनी पत्र पाठविले या मनसुब्याचा विचार तूर्त येथे करिता येत नाही व ठासहि लाविता येत नाही उदास आपले जागा खबरदार असावें राज-श्रीच्या मर्जीत असे असिले पाहिजे हेच उतम सर्वांचे विचारे म्हणोन तप-सिले लिहिले ते कलले ऐशास तुम्ही लिाला मजकूर येथार्थ आहे केवल आईसाहेबाची तोर फिरली आहे त्यास आमच्या लिहिल्यानी पुष्टता व्हावी या भावे लिहिले नाही आम्ही अग्र आहो असे त्याच्या ध्यानात येऊन त्याचा खुलासा बाहेर निघावा बोलतात काये करितात काये ते कलावे आम्हीं विनीत असे त्याच्या चितात येऊन त्याणीं साहस न करावे या भावे लिहिले होते तेर्थाल विचारानरूप तुम्ही लिहिले उतम तथापि त्याजसीं बोलणें सागोन पाठवणे ते नम्रपणेच सांगत जावे व काही उदास-ताहि दाखवावी त्याहि रोखे पत्र केले व करिता ते चालो न द्यावे जागा बंद बाधावा येक साताऱ्याविना दुसरे जागा काही न चालेसे करावें म्हणोन लिहिले तर हे गोष्ट बरीच आहे जेथवरी होईल तेथवर करणे उमाबाई-कडील कारभार तर बास्कल अगोधर पैक्याच्याच गोष्टी सागत होते त्या आम्हीं मान्य न केल्या येदाचा मात्र पैका घ्यावा पुढे मुलूक वाटून द्यावा म्हणाला ते गोष्ट त्यास मान्य जाली नाहीं मुलूकच वाटून घ्यावा म्हणाली यास त्याचे घरची खावंदगिरी साता ठाई येकात येक नाहीं ह्याहि गोष्टीचा जाबसाल त्वरेने न व्हे याजकरिता चऱ्होलीहून कूच करून चिख-लीस आलो येथून पाच कोस तलेगाव आहे तेहि युध्याची तरतुदेत आहेत गावाचा आश्रा करून असेत उमाबाईची बोली आद्याप तुटली नाहीं आजी सिधात होईल तों तुम्हास लिहिला जाईल *आज जानबा सटवोजी जाधव पाठविले आहेत तलेगाव टाकून काल रात्री सलाबतीमुले इदूरी कोसभर आहे तेथे कबिले घेऊन गेली येथून उमाबाई गेली ती मात्र तलेगावी आहेत फौज पाच हजार आहे ते इंदूरीचे व इद्राणीचा डोह आहे त्याचे आश्रियाने अडचणीत राहिली आहे उद्या सेनापती उमाबाई

आली तर तह होईल नाहींतर श्रीकृपेनें पारपत्य करीत आहो येथील अथ येके थरावर बसे तो दुसरा उद्योग आरभावयास फौज लोक रिकामे होत नाहीत ह्या मजकुराचा बरा वाईट निवाडा आठा चहू दिवसात जाहालियावर जे सुचेल चित श्वस्त होऊन ते तुम्हास लिहून तर्तूद करू तुम्ही सावधपणे तूर्त ज्यास आईसाहेब पोटीसी धरतील त्याचा प्रतिस्पर्धी असेल त्यासी अतस्ते उमेद बोलून राखणे छ १७ मोहरम हे आसीर्वाद

---

ले. २५७ श्री श. १६७१ मार्ग. व १०
इ. स. १७५० दिजें. १२

*[1] चिरजीव राजश्री नाना यासी भाऊ आसीर्वाद पुण्याचा कारभार हरयेक विल्हे लागेना आईसाहेबाची जड बलावत चालली दोन तीन येणे आसींहि पत्रे आली त्यावरून दर मजल पुण्यास गेलो जाताच होय न होय करून होईल त्याप्रो करू लेहून पाठऊन तुम्हीं आपले जागा खबरदार राहून राजश्री आतेस्त आहेत तसें तुम्हाकडे ठीक आसत आसे करणे हरी राम व मानाजी पाईगुडे दोन हजार फौजेनसीं सभाजी राजीयाचे शहावर व सावताचे कुमकेस पाठविले आहेत तुम्हाजवळहि लोक आहेतच विष्णुभटाकडे कर्जाचे तजवीज व मोरो विठल श्रोत्री याजकडे करार करावयास गणेश बलाल दामले पाठविले आहेत होईल त्याप्रो ज़मा अरणे दर्याबाई कडील राजकारण कसे व गडकरी कोण कोण आहेत सर्व लेहून च्यार रोजात पुण्यास जाऊ निराले वाटेने ल्याहावया जोगे आसेल ते लेहून पाठवीत जाणे रा बुधवार हे आसीर्वाद

---

ले. २५८ श्री श. १६७२ मार्ग. व. १३
इ. स. १७५० दिजे १५

*[1] आसीर्वाद उपरी राजश्री देवरावजी केवल आपलेच आहेत दरबारचा प्रकार एक तऱ्हेचा जाला सर्व प्रकारे नागोबा तेथे आहेत त्यास दुसरें न जाणता आपले समजून कामकाज करवीत जाणे थोडे बहूत खर्चासहि हुजूरचे यैवजी कोणाकडून देवणे आम्हींहि आज बारामतीस गेलो मगलवारी तीर्थरूपाजवल जाऊ तेथून सर्वहि मनसुबीयाचा निश्चय करून लेहून पाठऊ रा छ २६ मोहरम मंदवार बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद

---

१ पत्र नानासाहेबांचें नाना पुरंधऱ्यांस. १ पत्र भाऊसाहेबांचें नाना पुरंधऱ्यास.

ले. २५९ श्री श. १६७२ मार्ग. व ३०
इ. स. १७५० दिजे. १७

आसीर्वाद उपरी मातुश्री आईसाहेबाकडील आबाजी जाधव हुजऱ्या भेटला होता त्याणी सागितले कीं त्रिबकराव धायेगुडे व सेख मिरा फरीदखान याणी आईसाहेबापासी आण प्रमाण केली सिर्के मोहितेहि मिलाले आहेत यांजकडून येशवंतराव गोविंदराव याजवरी दगा करून गडावर नेणार म्हणोन लिहिले कलले *आपले जबरदस्तीने राहावे चिता काय आहे छ २८ मोहरम हे आसिर्वाद

---

ले. २६० श्री श. १६७२ पौष शुा ६
इ. स. १७५० दिजे. २३

* चिरजीव नाना यासी भाऊ आसीर्वाद तुम्ही.........वारची शामरायाचे कारकून कृष्णाजीपताबाा पाठविली ती पावली सविस्तर मजकूर कलला बलवंतरावहि आले सर्व पुसले सदेह मनात आला म्हणून लिहिले आहे ते दूर जाले लिहिलेप्रो पुढे लेहून पाठवीत जाणे सर्वासी होतियाचे भाव ठाऊकच आहे सर कामास तुम्हास उपरोध कोणे प्रकारे होता तो ठाऊकच आहे प्रस्तुत बालगिलीयास काम नासेल यथास्थित करणे येथील काम आवरंगाबादेचे जालीयात आहे पुर्ते जालीयावर लेहून याउपरी दरमजल भागानगराकडे जाऊ तुमचे पत्र लिहिले प्रो तीर्थरूपास दाखविले सदेह आजमासेच दूर होतील तूर्त नवे राजे निघाले आहेत याची उपेक्षा न करणे पुढे जड पडेल पलू न देणे समाधाने गुप्तरूपे येथे पाठवणे मरणार नाही आणापा गेलियावर आई खाली येईलसे वाटते होईल त्याप्रो काम करणे लौकीक दूर जालीया पुढे मोगलाईत फार उपयोग आहे मागे निर्वेध जाले तरी चौथे सरदार जमा करून खामखा मोगल ठिकाणीच लावितो ईश्वरी सता प्रमाण तूर्त जफ्तीच ठेवावी तरी फौज गुतते म्हणून पैका घेऊन आवरगाबाद सुभा मात्र मोकला करून पैका घ्यावा फार परतु फुलचरीहून आजपर्यंत निघाला बाा दाभाडे लचाड हजार घरचे पेच आमचे वजन आदी पडले पाहिजे यास्तव थोडेसे घेऊन मोकले होऊन पुढे जातो वरकड वर्तमान मा[गा]हून लेहून येदा व स त व्यर्थ बोलाव-

---

१ पत्र नानासाहेबांचें नाना पुरंदऱ्यांस

यास जागा नाही तीर्थरूप आपणच उमेद धरली म्हणून साहे जाले आहेत नास(च?) करीत नाही आम्ही कुसी खाजवितो तुम्ही तेथे आमचे नावे तरी मजल प्रकृतीस कलून करा रा छ ४ सफर बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद

---

ले. २६१ श्री श. १६७२ पौष शुा७ पूर्वी
इ. स. १७५० दिजे. २४

* पुा चिरजींव राजश्री नानास आसिर्वाद उपरी सातारा प्रसंग विज्वर जाहाला आहे या प्रसंगात तुम्ही कोणाचाहि विस्वास न धरणे घरी राहाणेहि कामाचे नाहीं यास्तव बाहेर करज्यापासी आपले राऊत व पायेचे लोक काही असतील तितक्यानसीं सावधपणे राहाणे घरी ऐकदर न जाणे सातारियावर काही कामा काजासाठी तुम्हास बोलावितील तर कोटीं लाभ असिला तरीं येकद्र न जाणे रामाजी माणकेस्वर पाठवणे तुम्ही आपला गोट सोडून[न] जाणे आपले तरफेनें राजश्रीसी अथवा मातुश्रीसी अथवा दर्याबाई शामराव यासी व मुतसद्दी यासी विरुध भाषण अगर विरुधाचरण येकंद्र न करणे तेथे बहूत जण बहुता भातानी चढी लावितील तुमच्या दबावाने सर्व होते म्हणतील परंतु ते कार्याचे नाही कोणासीहिं वाईट न होणें बहूत शाहाणपणे सावधपणें राहाणे च्यार दिवस तालामाला पाहू[न] त्यासारिखे तुम्हासहि बोलाऊ पाठऊ येथील वर्तमान तर उमाबाई येथें आली आहेत श्रीमंताची जबरदस्ती आहे यामुले त्याणी लबाडी करीन म्हटल्याने काये होणे आहे मुलूक वाटून देतील येसे दिसते तथापि होईल ते लेहून पाठऊ कलले पाहिजे हे असिर्वाद

---

ले. २६२ श्री श. १६७२ पौष शुा ७
इ. स. १७५० दि. २४

पौ छ १२ रबिलोवल

चिरजीव राजश्री नाना यासी बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल लिहित जाणे विशेष नवे राजेश्री उपस्थित जाली-याचा मजकूर लिहिला तो कलला दाहा पाचजण जाऊन बोलू लागले पुढे

१ पत्र बाबांचें

बंड वाढेल यास्तव साडणीस्वाराबा। मजकूर लिहिला आहे त्याप्रो समाधानयुक्त हातचे न जात आम्हा जवल येऊन पावत ते करणे आणापा येऊन पावलेच आसतील आईसाहेबाचा गुता उरकेलच गोपालराव चिमणाजी बापूजी यास इकडे पाठवणे वरकड फौज ठेवणे नाहीतरी काम कलतच आहे पाच सातसे ठेऊन सारे पाठऊन देणे चिमणोबासारखे येकच पथक ठेऊन वरकड पाठवणे आपाजी भावजी आतस्ते राजकारण हजार करीत होते त्याचे पारपत्य करावे आसे बावानी लिहिले त्यावरून विठल सिव[देव] वगैरे पाठविले होते तो आदीच दर्याबाईनी लुटिले पुढेहि जे लबाडी करितील ते धरून मारलियावाचून ताल पडणार नाहीं हजार जागे बडे उभे करितील सविस्तर इनाम देऊन वाइदियाने जासूद रवाना करीत जाणे जाणिजे छ ५ सफर बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद आपाजी भावजीचे मजकुरावरून कोण काय सूत्रे चालणार हे सर्व लिहिणे आवरगाबादेचे खानापासून पधरा घेतले रोख काही आले बाकी येका दो रोजात येतील दोन तीन याशिवाय मुलकात आले आवरंगाबाद सुभाची मात्र जफ्ती सोडली खानदेश बालाघाट वगैरे जफ्ती जालीच आहे तिचा तह केला नाही किले जे साधले ते घेतच आहो जफ्तीच ठेविली यापुढें कार्यास जाणे मागे कजियाने चालणार नाहीं म्हणून मोकली केली याउपरी लौकर पुढे भागानगराकडे जावयाचा डौल आहे गाईकवाडहि सोनगडाकडे गेले तहहि होऊन सावकार निशेष गेले जाले तरी वाके सुटतील नाहीतरी आहेतच बा। पुढे होईल ते लेहून पाठऊ बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद[1]

---

**ले. २६३** श्री शके १६७२ पौष शुा। ७

इ. स. १७५० दिजें. २४

चिरजीव राजश्री नाना यासी बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत जाणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले लिहिले की प्रस्तुत गडकरी बोलू लागले आहेत परतु आईसाहेबाजवल उत्पाताचे पुरुष पुराणीक भिवजी कासुर्डे आहेत त्याणी मेढेखोरे वगैरे जागाचे लोक हजार बाराशे जमा करून

---

१ सबंद पत्र भाऊसाहेबांच्या हातचें.

गावामध्ये व फतेसिगबावाचे वाडियावरते वगैरे चौक्या बसविल्या रेटीत यावे आम्हावरहि पडावे इतका विचार दिसू लागला तेव्हा हाजीरीस म्हणून सारे लोक जमा करून गेडियाजवलील मालावर घोडी फेरून बाजार पेढीयावरून चौकीयावर गेलो लोक पलाले काही हत्यार धरले तेथें पचवीस तीस मारले चालीस पनास जखमी केले चिमणोबाकडील व बावाकडील दोन पडले घोडे येक वरते गेले म्हणून लिहिले सविस्तर ते कलले ऐसियास आईसाहेबी राजश्री वरते ठेऊन डौल येक प्रकारचा धरला याचा चालून घ्यावा हाच येक निश्चय करून तुम्हास लेहून पाठवावे हाच मजकूर होता त्यास तुम्ही कलागत लाऊन मारले उतम जाले गडकरीहि तुम्हासी बोलतात त्यास वरते बोलावयास जागा होईल गडकरी तुमचे भिवजी व पुराणिकाचा जमाव फजीत पडलियास तुम्हावर तोफा डागतो कोण खुशाल शहर राखून गावात राहावे जाग-जागा सनंदा पत्रा आईसाहेबाच्या घेऊन डोहाणा माडिला त्यास कापून टाकणे से पनास मेलियास विचार कलतच आहे गडकरी याणी आजून पहिलेप्रो आमचे विचारात राहून राजश्री खालते यावे आईसाहेबासहि वरते सुख नाही आसे करून खालते उतरावे हे जालियास मागील आम्हा-सहि विसरावे लागेल नाहीतरी सर्वासीच पाहून घ्यावे लागेल आमचा खावद आडकून ठेविला आम्हास मुलाजा काय आसो मातबर चौक्या बसविल्यास येक प्रकारचे तूर्त तुमचे जवल सामानहि थोडे यास्तव जेथे तोंड निवेल खाली मुलकात येईल तेहि मारून टाकावे सनद न चालेसे करावे राजश्रीचा लगाम राखून ठेवणे हे आसीर्वाद[1]

पौ छ ५ सफर सोमवार

---

**ले. २६४** श्री श. १६७२ पौष शुा ७
इ. स १७५० दिजें. २४

आसीर्वाद चिरजीव भाऊ येथे आले दाभाडियाचा मजकूर करारात आला आहे आमचे जाणे पुढे होईल सविस्तर मागून लेहून पाठऊन चिर-जीव फौजसहवर्तमान तिकडे येतील कर्नाटकहि पोट भरावयासी आहे येवि-

---

१ पत्र भाऊसाहेबांच्या हातचें.

सीचा मागून सविस्तर लेहून पाठऊन तूर्त अवलंबिले कार्य तुम्ही लिहिले प्रो करणे कटकटीवरून आईसाहेब तुम्हास सागून पाठवितील की आमर्यादा काय कामाची आमचे मनास येईल तसा राज्यभार करून असे म्हणतील त्यास सागावे की मागे ज्या समई मोठे परचक्राचा कजिया पडले ते समई गडावर राज्य जाले प्रस्तुत लौकीकहि साहेबानी फटकल करून घेतला राजश्रीनी आपण खालते राहून सर्व सरदार राज्य केलेप्रो करावे हे उचीत मुलकात डोहाणा करितात होतो तो येक प्रकारचा साहेबाचे आज्ञेने ज्याचे त्याचे हवाला मुलूक आहे त्याचा बदोबस्त राखिलाच पाहिजे याप्रो सागणे साराष दिसेल ते कराल ठासून मारून टाकणे फितूरवाले नरम होतील याप्रो करणे येका दिसात येथे खबर पावेसे करणे तुलाजी आगरे मानाजी आगरे याजकडील कुमक गडावर आली आहे की काय राजकरणे सर्वा सरदाराची लाहान मोठी याची कसी व मामलेदार देखील मिरजकर व भोसले याचाहि मजकूर लेहून पाठवणे राजश्री—स हरतऱ्हेने वरचेवर सागून संदेह पडतील ते दूर करून मायेत राखून ठेवणे अलाहिदा सविस्तर [1]लिहिण्या प्रा चिरंजीव भाऊ रामचंद्रबाबा आम्ही बसून ठासूनच ताल्यावर आणून राजे खाली उतरत भिवजी पुराणीक नरम होत ऐसे करावे ऐसे ठहरले तुमचे विचारात गडकरी व सर्व कारभारी असता जे इछाल ते कराल गोविंदरावहि निखालसतेने आमचेच डौलावर आहेतसे दिसते या प्रकारे पाहाता तुम्ही धरिला डौल तेणेच करून नीट होईल गडकरी याचा भरवसा मोठा आम्हास होता येकदा गोष्ट त्यापासून गेली आता जरी त्यानी संभालून तुमचे विचारे कर्तव्य ते केलिया जेणेकरून त्याचे बरे व राजे कृपा करीत तेच करू असे असता विचारास न येत तर आम्हास तो खावंद अडकून पडला त्यासाठी जोर करणे प्राप्तच आहे परतु मग गैर मजा होऊन नरम होतील त्यापेक्षा आता दूरदेशी गडकरी करून वर्तणूक करीत ऐसे करणे इतकेहि गोविंदराव हर तजवीज नरम गरम करून करितील हा भरवसा बालगितो का की ते शफतपूर्वक आमचे आहेत हे आसीर्वाद

---

१ पत्र नानासाहेबांचें असून येथपर्यंतचा मजकूर भाऊसाहेबांच्या हातचा व पुढील नानासाहेबांच्या हातचा आहे.

ले. २६५ श्री श. १६७२ पौष शुा ७
इ. स. १७५० दि. २४

आसीर्वाद उपरी दाभाडियाकडील तह मुलकावरच ठहरला निमे मुलूक व निमे ठाणी चागली वाईट त्याणी आम्ही वाटून घ्यावी मुलकात आमचा आमलदार कमावीसदार बैसोन सुरलीत अमल चालतो राजश्री त्रिबकराव दाभाडे सेनाखासखेल व दमाजी गाईकवाड याचा पुत्र व उमाबाई व आबिकाबाई यानी आमच्या लस्करात असावे असा करार जाला आहे *दमाजीचे पुत्रास व सेनाखासेखलीस आणावयास आज गेली तीन रोजा आली उतम नाही तरी करार कलतच आहे रा छ ५ सफर हे आसीर्वाद

---

ले. २६६ श्री श. १६७२ पौष शुा ७
इ. स. १७५० दिर्जे. २४

आसीर्वाद उपरी मातुश्री आईसाहेबी घोरपडियास बोलाविले ते येत नाही गडकरी आपल्यात आपण कालवली मातुश्रीस जाऊन बोलले कीं तुम्ही व राजश्री येकचित होऊन कारभार करा नाहीतर आम्हासी साफ सागा म्हणतात याजवरून आईसाहेब हमावार जालीसे वाटते परतु गडकरास माकूल केल्याखेरीज ठीक पडणार नाही त्याहि तरतुदेस लागलो असों व गोपालराव माहादेव यांज[पा]सूनहि करवीत असों म्हणोन तपसिले लिहिले ते कलले *गडकरी याचे विचारे पुराणीकबावा कासुर्डे नवे कारभारी याचे पारपत्य जाले उतम जाले आनयासेच गडकरी आपले जालिया बंड मोडेल रा छ ५ सफर हे आसीर्वाद[१]

---

ले. २६७ श्री श. १६७२ पौष शुा ८
इ. स. १७५० दिर्जे. २५

* राजश्री बलवतराव गणपत स्वामी गोसावी यासि

पोष्य सदाशिव चिमणाजी नमस्कार विनंती दररोज बाबा नानाचा पेच विशेषच वाढला नाना बाबाचे बोलणे कलतच आहे मोरगावचे स्वारीस बाबा घरी राहिले तसेच प्रस्तुत दाभाडियाचा गुता उरकला नाना बाबाचे

---

१ पत्र भाऊसाहेबांचें.

पुढे बो जाणे बनेना यास्तव आज पुण्यास गेले सरकारची माणसे देखील नेत नवते आम्ही सर्व प्रकारे समजाऊन सांगून घेऊन गेले पुण्यातच राहणार नानाने सातारा राहून तीर्थरूपाचे लिहिले प्रो काम करावे आपाहि येथेच येणार अहेत येकूण मागे येकदा जाले तसे आहे आम्हीहि नानास समजाऊन रंग पडेसा करितो वारसोढ करून आम्हा बाा आसतील आसे आहे तरी तुम्ही पत्र पावताच उठोन सातारा नानाकडे जाऊन सर्व मजकूर सागणे आणि तुम्ही तेथेच राहणे याविसी बाबाचे मनापासून आहे त्रिबका बरोबर सागूनहि पाठवितील सदेहने सदेह वाढतो तुम्ही येकदर उठोन न येणे कामकाज करणे आलिया फारच चाकरी टाकून सारे कोणी कडे जातात आसे होते तरी आमचे मित्रपणे विचार खरा सागू हा भरवसा आसलिया तेथे राहावे याप्रो जाऊन सागणे वरकड राजश्रीचा कारभाराचा मजकूर तीर्थरूपानी लिहिले त्या लक्षाने गोविंदरायानेहि करावे आसे करणे सदेह वाढऊन उठोन याल तरी फजीत पडाल साफ तेथे राहाणे आसा आमचा निरोप सागणे व दरबारचा रागरंग ताराबाई वगैरे आनुसंधाने कोणे प्रकारची प्रस्तुत कलागत होऊन हशम मारलियापासून डौल कोणे प्रकारे पडला रामाजीबावा गोविंदरायास कोणे प्रकारे लिहितात नानानी काय केले हे लेहून पाठवणे रोज पत्र नानापासून पाठवीत जाणे व तुम्ही काय आढलेल ते लिहिणे म्हणजे खातरजमा होईल आठ रोज तेथेच राहाणे उतर सत्वर पाठवणे रा मंगलवार दोन प्रहर रात्र सासवडचीहि खबर येका खिजमतदाराबाा लिहिणे राण्या तेथे घेऊन जाणे पत्र पावताच उठोन येका रोजात जाणे तेथे जाताच पत्र लिहिणे राण्या दोन रोज ठेऊन पत्र पाठवणे तुम्ही आठ रोज नानाजवलच राहाणे हे विनंती पत्र नानास दाखवणे मग दोनीहि फाडून टाकणे कोणाजवल न बोलणे आण आहे हे विनंती लौकर लौकर जाणे हे विनती

---

ले. २६८ श्री श. १६७२ पौष शु. ८
इ. स. १७५० दिर्से. २५

पौ छ ६ सफर मंगलवार

आसीर्वाद उपरी मातुश्री—— आईसाहेब माणसानी माणोस जथीत चालली याचा मजकूर विस्तारे लिहिला त्यात मुख्यार्थ हाच कीं आई-

साहेबाचे कारभारी पुराणीक नारू काका व भिवजी कासुरडे हशमी लोक ठेवितात खाली चोक्या बैसावितात आमच्या व राजश्री गोविंद्राव याच्या वाड्यावर दगा करणार येक वेल मसलत केली होती ते हवालदारानी मोडिली प्रस्तुत तीनसे माणसाची चोकी त्यांची घोडी जवल येऊन बैसली आम्ही तो खबरदार असो परंतु स्वामीनी या गोष्टीची तजवीज काये केली आम्ही कसे करावे ते लिहिले पाहिजे म्हणोन तपसिले लिहिले व दिनचर्यचे आईसाहेबाचे वर्तमान लिहिले ते कलले ऐशास *राजमार्ग हाच की आईसाहेबानी राजश्रीस निग्रह करून वरते ठेविले उचित नाही गडकरी यानीहि करावे श्रेयस्कर काय असाच फितूर वाढलिया बंडे हजार होतील प्रस्तुत दाहा वीस माणूस मारले उतम जाले यावरच पुराणकाची जड मोडल मुलकातहि येका दो जागा आसेच करावे गडकरी यास पुर्ता कररप्रो चालवावयाचा विस्वास द्यावा त्याणीच आईसाहेबास समजून सागावे खाली दोघेहि राहावे केला कारभार निभावावा आईसाहेबाचे विचारेच न ये तरी गडकरी आमचे जाले त्याणी राजश्रीस आईसाहेबास खालते आणावे तरच आमचे खाली आईसाहेबानी वजन राखून राजश्रीनी कारभार करावा याप्रोच करावे तूर्त कजिया जाला याप्रो बाहेर फिरत आसतील ते मारावे सहजच मनसुबा विस्कलीत जालि[या] राजश्रीस खालते घेऊन येतील आम्हास राजश्री—सी हरामखोरी करून वरते आडकिवले आसता उगे कसे राहावेल गोविंद्राव तुम्ही माहीतगिरीने गडकरी लगामी लाऊन याप्रो करणे गडकरी यास भरवसा पुरऊन त्या हाती सर्व नरम करणे हे आसिर्वाद[1]

---

**ले. २६९** श्री श. १६७२ पौष शुा ९
इ. स. १७५० दिर्से. २६

*श्रियासह चिरंजीव नानास प्रती माहादाजी अंबाजी आसीर्वाद उपरी येथील वर्तमान ताा पौष सुध नवमी बुधवार परियेत येथास्थित असे विशेष प्रस्तुत आमचे शरीरी ग्लानही फार होती व श्रीमंताची मर्जीहि आम्ही जवल नसावेसी पाहिली यास्तव चिखलीहून श्रीमंताची आज्ञा घेऊन पुणीयासी आलो चिरंजीव घोडोबाहि बराबर आले तेथे काही काम

१ पत्र भाऊसाहेबांचें.

नव्हते यास्तव न राहिले आम्ही निरोप घेऊन आल्यामुळे लौकीक येक प्रकार जाहाला याकरिता तुम्ही तेथून इकडे यावयाचा विचार कराल तर येकंदर न करणे आम्ही घरास आलो म्हणून काही चाकरी टाकली यैसे नाही च्यार महिने घरी राहिलो तर काये चिंता आहे तुम्ही तेथे आहा त्याप्रमाणे असणे श्रीमंताचे मर्जीप्रमाणे सेवा करणे आपले तरफेने किमपी अंतर पडो न देणे येविसी दुसरा विच्यार ध्यानात आणाल तर तुम्हास आमच्या गल्याची शफत असे कदाचित तुम्ही इकडे [ याल ] यास्तव तेथे राजश्री बाबुराव फडनीस व गोपालराऊ गोविंद श्रीमंतानी पाठविले आहेत फौजहि बराबर दिल्ही आहे तरी तुम्ही व हे तेथेच राहाणे यावयाचे येकंदर न करणे हे आसीर्वाद

---

**ले. २७०** श्रीशंकर श. १६७२ मार्गशीर्ष शा ९
इ. स. १७५० डिसें. २६

*चिरंजीव राजश्री नाना यासी रघुनाथ बाजिराव आसीर्वाद उपरी येथील जाणून स्वकीये लिहिणे विशेष साप्रत आपण आम्हास पत्र पाठविले तेणेकरून अपूर्व भासले तरी ऐसे न करावे सदैव पत्र पाठवीत गेले पाहिजे येथील वर्तमान तर काल बाबा रुसून पुणियास गेले हे तो कललेच असेल हिकडील मजकूर तर साप्रत दाभाडीयाकडील जसा तसा तह करून पंचविसा लाखावर तह करून मोगलाई आमल थोडा बहूत बंद करावा दाहा वीस लाख रुपये मेलवावे भाऊनी स्वारीस जावे नानानी घरी राहावे ऐसे बोलतात तह असा होईलसे वाटते तीर्थरूपानी घरी राहावे ते बाबास फार चढी लाऊ नये उगीच कधी कधी भेटावे मात्र तीर्थरूप घरी राहिल्यावर बाबानी काय करणे ते कलतच आहे आसो जसे होईल तसे पहावे सारांश तुम्ही आम्हास न विसरणे जाणिजे छ ८ सफर रामचंद्र बावाचे मते आताच बाबावर निकर्ष करावासे होते परतु ते न जाहाले पत्र कोणास न दाखिवणे फाडून टाकणे वरचेवर वर्तमान लिाहाणे जाणिजे छ ७ सफर हे आसीर्वाद

---

ले. २७१ श्री श. १६७२ पौष शु. १०
इ. स. १७५० दिर्से. २७

आसीर्वाद उपरी तुम्ही पत्र पाठविले तेथे लिहिले कीं गडकरियासी व आईसाहेबासी विरुध वाढले गडकरी यानी जबरदस्तीने राजे आपले हाती खलबत—खानियात आणून ठेविले या उपरी गडकरीयासी शफतपूर्वक निशा करितो येका दो दिवसात खाली राजे येत ऐसे होईल म्हणून लिहिले ते सविस्तर कलले ऐसीयास या प्रसंगी तुम्ही गोविंदरायानी उतम प्रकारे नेट धरून हा मनसबा या रकमेवर आणिला आताहि तिलमात्र संशय न मानिता गडकरी याची निशा करून सत्वर राजे खालि उतरणे आईसाहेबहि उतरली तरी उतम पुराणीक लुच उतरला तरी काय मजकूर यास्तव विलंब न करिता करार मदार सत्वर करून राजे उतरत ते करणे तुम्ही गडकरी हाती घेतले खालील लोकाचे पारपत्य केले याजमुले येथ पावेतो मजकूर आला आता आणखी फौजहि गोपालरायासमागमे पाठविली आहे मलमलीत पडले तर आणखी येखादे जागा लबाड असतील त्यास हमवार करून सत्वर योजिला मनसबा सिधीस नेणे आईसाहेब व राजे हर प्रकारे सत्वर खाली उतरत ते करणे विलंब कार्याचा नाही आता गडकरी याची व आईसाहेबाची चव राहिली नाही असे असता आईसा(हे)ब गडकरीयानी वर ठेविली तर गडकरियातच फूट करू इच्छितील राजकारण प्रसंगास विलंबाखाली पडल्यास अनेक नासावयास हात घालितात तथापी तुमची जबरदस्ती आहे श्रीकृपेने होईलच छ ८ सफर हे आसीर्वाद[1]

---

ले. २७२ श्री श. १६७२ पौष शुा १३
इ. स. १७५० दिर्से. २६

चिरजीव राजश्री नाना यासी सदाशिव चिमणाजी आसीर्वाद तुम्ही पत्र बलवंतराव पावलियावर शुक्रवारचे प्रातःकालचे पाठविले ते आज मंदवारी प्रहर दिवसास पावले लिहिले की बाबानी न येणे आसे आण घालून लिहिले परतु बाबा आपा पुण्यास आले यामुले लौकिक बहूतच येक प्रकारचा जाला आहे किलेकरीहि बोलत होते त्यास बाशाखाला आहे

---

१ सबंद पत्र नानासाहेबांच्या हातचें आहे.

फिरून नीट करून गोविंद्राव आपले जागा फारच भ्याले बाबुराव धराव॰ यास येतात म्हणून कबिले कोलियाकडे लाऊन देऊन आपण दोघे भाऊ सडे मात्र राहिले आहेत त्यासहि समाधानपत्र भय निवारण होईसे पाठ-वावे फिरून दोन चार रोज गडकरियाचे राजकारण बलाऊन राजा खाली आणू बाबाचे फारच विटले याचाहि रंग भरणे तो भरावा आपले आज्ञेप्रो मी येथे राहिलो परतु बाबाचे मनात पेचच असला तर तुमचे चाकरीहून दरकार नाही याचाहि विचार साफ लेहून पाठवाल म्हणून लिहिले ऐसीयास बाबाचा नानाचा पेच विशेषच दिसेदिस वाढत गेला याचा लौकिक फार फटकल जाला आमचे जाणे तिकडे होईना दौलत खावदाची लौकीकहि विरुध फौज इकडून येईना पैका नवे येथे ठेविले त्यास दिल्हा जुने लोकास न पावे यास्तव उठोन येथे आलो सविस्तर तुम्हास लिहिलेच होते येथे आलियावर रंग पाहिला तो बाबा नानाचे फारच बिघडले बो यावयाचे होतच नवते दाभाडियाचे कामास येथे आले ते येक थागी लागले पुढे तीर्थरूप स्वारीस जाणार आम्हास इकडे ठेवावे सातारियाचा गुता तुम्ही उरकिलाच तर दाहा पाच हजार फौजेने दिलीकडे जाऊन पोट भरावे आसे जाले याचा त्याचा बा जावयाचे करून पाहिले परतु पेच विशेषच वाढले दोन महिने याचे हे करितील त्याणी घरीच राहावे आसे जाले म्हणून मात्र गेले नेहमी रुसून बसावे आसे नाही याचा मजकूर मी बाबा बोललो तुम्ही तेथेच राहावे हेच बरे तोडून न यावे काम काज विल्हे लाऊन खाली सारी आणावी तुम्ही तेथे राहिलियामुले बाबाचे मनात तिलभर संशय नाही आसेच आहे यास्तव तुम्हास राहा आसे लिहिले कोणेविसी पेच नाही यास्तव राहाणे गोविंद्रायास कोणी धरीत नाही येथील लिहिले प्रो काम मन घालून यथास्थित करावे फौज तुमचे साहित्यास म्हणून गोपालराव पाठविले बाबूराव येत नाहीत येविसी नानाचेहि पत्र गोविंद्रायास व आपले पाठ-विले आहे हे देणे आणि येथील लक्षप्रो करावे रा छ १० सफर हे आशीर्वाद[1]

---

१ सबंद पत्र खाशाच्या हातचें.

ले. २७३ श्री श. १६७२ पौष शु.
इ. स. १७५० दिजें.

* चिरजीव नाना प्रती भाऊ आसीर्वाद गोविंदरायास चिठी लिहिली आहे ही त्यास देणे आणि लिहिलेप्रो काम करणे मागे येकदा गोविंदरायाचे गला पडला त्याप्रो आम्हापासून सातारा गेलियावर जाले म्हणून आईकिले तरी सविस्तर लिहिणे व आम्हापासून गेले तेव्हा कारभारी कोणाचे भाव कोणे प्रकारे तुम्हास दिसत होते ते ठाऊक आहेत पुढे तेथे कोणे प्रकारे घडले राजश्रीचे आईसाहेबापासून उद्वर्तन जाले यास मूल पुराणीक भिवजी की आणखी कोणाचे कसे होते हे सविस्तर लेहून पाठवणे चिठी फाडून टाकणे प्रस्तुत आम्ही दोहोकडेहि वाईट आहो कोणे प्रकारे करावे मोगलावर आम्हास बावास आगर बाबास पाठविले तरी जावे न जावे संदेह कोणे प्रकारे दूर करावे हे सविस्तर लिहिणे रा सोमवार संध्याकाल हे आसीर्वाद मुख्य पत्र गोविंदरायास दाखवणे हे आसीर्वाद

---

ले. २७४ श्री श. १६७२ पौष
इ. स. १७५० दिजें.

राजश्री त्रिबक सदासीव यांसी आज्ञा केली येसी जे गडचे गावास व गडकरी यास तुमचे राऊत व कही जाऊन वैरणीचा उपद्रव करितात म्हणोन विदीत जाहाले तरी हे गोस्ट कार्याची नाही गडकरी दिलगीर आहेत तरी तुम्ही आपल्या राऊतास वरकड हुजूरची पथके आहेत त्यास देखील ताकीद करून काडी इतका उपद्रव गडकरिया सातारियाचे न लागे ते करणे फिरोन बोभाट येऊ न देणे बहूत काये लिहिणे

---

ले. २७५ श्री श. १६७२ पौष वा १
इ. स. १७५१ जाने. १

* श्रियासह चिरजीव राजमान्य राजश्री नाना यासी माहादाजी अंबाजी आसीर्वाद उपरी येथील वर्तमान ता छ १३ सफर सोमवार परियेत येथास्थित असे विशेष तुम्ही सुभानाबराबर पत्र पाठविले ते पावले लिहिले वर्तमान सविस्तर कलले इकडील सविस्तर सखारामपंत याणी लिहिले आहे त्यावरून कलेल साराउष श्रीमंतास आपले जातीचा अभि-

मान फार आहे त्यामुले आम्ही गोविंदराऊ हे तो पूर्ण द्वेष कोटीत आलो भाऊ व रामचद्रबावा थाणी करनाटक करून घेतले पुढे हरयेकविसी अपल्यास अनकूल यैसे करीत नाहीत यावरून तेहि मर्जीस विरुध आहेत आम्ही सासवडास जाऊ लागलो तरी येथे राऊत लोक आहेत त्याणी जाऊ न द्यावे हाहि भाव आहे येवच चाकरीची चव याउपर राहिली यैसे नाही गड कोट बदलू हे देखील असतभावना जाहाली बाकी काये राहिली असो थोर आहेत जे चितास येईल ते करितील अम्हास धरावे पाई बेडी घालावी हा भर फार करून देणार देतात येज्यमानाच्याहि चितात तीन वाटे आहे अस्तू आम्ही लोकी डाग लाऊन घेऊ नये हेच श्रेयस्कर यास्तव जे करितील ते पाहातच आहो कदाचित असे करितील तऱ्ही उतमच मानितो का की तीन पिढ्याचे चाकर यास्तव लोकोपवाद वारला पुढे आमचे कपाल काही धुऊन नेत नाहीत हर कोठे दाहा पाच हजार रुा मेलऊन अबरूने व विस्वासानेच पोट भरू येक हिमत बुधी क्रिया मात्र शाबूत असावी ही घटकापर्येत आहे पुढेहि ईस्वर राखीलच तुम्ही चिता न करणे साताराहून यावयाचे न करणे तेथे श्रीमंताच्या भर-वसियावर कोणासी फारसे न घासणे कार्याकारणच असणे वरचेवर वर्त-मान लिहीत जाणे वर्तमान ल्याहावयासी अलस न करणे हे आसीर्वाद

---

ले. २७६ श्री श. १६७२ पौष वा १
इ. स. १७५१ जाने. १

* चिरंजीव नाना प्रती भाऊ आसीर्वाद बाबा पुण्यास गेले तुमचे-विसीचा पेच बाबाचा निघाला आहे थोडासा वरकड आम्हासी खुलासाच आहे नानाकडे विचारे फिरून रंग पाडतो तुम्ही याच आवईवर उठोन याल तर कामाचे नाहीं तेथेच राहून तीर्थरूपाचे लिहिले लक्षाप्रमाणे करणे राजा खालता आणणे पुराणीक मात्र गडकरी यास खा डू स तो काढून जसा वरते राजश्रीस पुराणिकाचा उपकार दाखऊन. आपले मायेत मेलऊन राजे वरतेच राहावितील आसे जालिया उतम नाही याची बारीक लक्षे गोविंदरायाची तुम्हास ठाऊक आहेत ती मनात आणून करणे दाभाडि-याचा गुता उरकला हे निमित्य व रोजचे भाडण म्हणून गेले पुण्यास प्रस्तुत नासरजगाने दुसरे वर्तमान आले पठाणानी दंगा करूनच मारिले आता मोगलाई जफ्तीचा काल आहे मातबर मनसबा होऊन पैका मिला-

याचा लाग आहे बाबास कोण राहूं देतो नाना घरीं राहातील बाबाचे आमचे जाणे होईलसे आहे बाबाचे आवाईवरून आगर रागे लिहितील त्यावरच उठोन याल तरी निर्माल्य व्हाल येकद्र न येणे राजा खालता उतरला म्हणजे मोठे येश मेलविलेत व गोविद्रायासहि सागून निदर्शनास आणून घेणे नानाचे मनात गोविद्रायाचे पेच विसेष तजविजेने निघतील याप्रो करणे पुढे मला शब्द लावाल मला स्वच्छतेने जे उचीत वाटले ते लिहिले यावर तुमचा येख्तीयार उतर सत्वर पाठवणे बलवंतरावहि सविस्तर सागेल त्यावरून कलेल रा मगलवार दोन प्रहर रात्र हे आसीर्वाद पत्र वाचून फाडून टाकणे कोणाजवल न बोलणे आण आहे हे आसीर्वाद[१]

---

ले. २७७ श्री श. १६७२ पौष वा २
इ. स. १७५१ जाने. २

*चिरजीव राजश्री नाना यांसि आसीर्वाद उपरी गोपालराव आज्ञा मानीत नाहीत या मजकुरावरून कितेक उदासतेने लिहिले ऐशीयास तुम्हाविसी तिलमात्र संशय असता तर तुम्हास हुजूरच बोलावितो याप्रसंगी आमचे मर्जीस न ये ऐसी आज्ञा येकांती बाबानी तुम्हास केली तरी तुम्ही आम्हास इतला देऊन करणे तेच कराल व बाबास ल्याहाल की आम्हास हुजूर बोलवावे कपट चाकरी न सागावी हा भरवसा तुमचा धरितो तुम्ही वाईट मानावे ऐसे नाही येथून गोपालरायास सागितले होते की तुम्ही इकडील आगे राहाणे चिमणाजी बापूजीस नाना तिकडे ठेवितील त्यावरून त्यानी उजूर केला नवे आहेत यास्तव अतर पडले असेल हली पत्र पाठविले आहे हे देणे निखालसतेने त्याजवर कृपा करून चाकरी घेणे बाबाचे इतराजीत आहेत तुम्हास कलावे म्हणून लिहिले असे हे आसीर्वाद[२]

---

ले. २७८ श्री शके १६७२ पौष वा २
इ. स. १७५१ जांने. २

* राजश्री गोपालराव गोविद यासि

नमस्कार सुा ईहीदे खमसैन मया अलफ चिरंजीव नानानी तुम्हास सातारियास पलीकडील आगे राहावयास सागितले असता तुम्ही न गेलेस

१ पत्र भाऊसाहेबांचें. २ पत्र नानासाहेबांचें नाना पुरंद्र्यांस.

म्हणून अवगत जाहाले ऐशियास चिरंजीव तुम्हास तेथे आमचे जागा जे सागतील ते जरूर केले पाहिजे याउपरी इकडील सशय न धरता जे सागतील ते करणे अनमान न करणे तुम्ही अनमान आमचे आज्ञेचे संकेतावरून केला असेल तर तो आर्थ नाही याउपर तेथे सागतील तें करणे छ १४ सफर बहूत काय लिहिणे लेखन सीमा

( गोल शिक्का. )

---

ले. २७१ श्री श. १६७२ पौष वा। २ (?)

इ. स. १७५१ जाने. २

*पुा। चिरंजीव नानास आसीर्वाद उपरी गोविंदराऊ यासी श्रीमंतानी पत्र पाठविले होते ते तुम्ही येथे पाठविले ते पाहून माघारे पाठविले आहे व रघुनाथ दादानी तुम्हास पत्र पाठविले होते ते तुम्ही येथे पहावयासी पाठविले होते ते पाहून माघारे पाठविले असे येथील कितेक मजकूर तुम्हास कलला पाहिजे तेथीलहि कितेक मजकूर आम्हास कलला पाहिजे यास्तव रामाजी माणकेस्वर यासी पाठवणे येक दिवस राहून जातील श्रीमंत काये म्हणतील हा उपरोध पडेल तरी तुम्ही लेहून पाठवणें की तीर्थरूप पुण्यास आल्यावर आम्हीच त्याजपर्यंत जावे परंतु स्वामीची आज्ञा की न येणे त्यावरून राहिलो आणि रामाजी माणकेस्वर पाठविले परामृष करून येतील म्हणून सागोन पाठवणें आणि रामाजीपंत यासी अगत्य पाठवणें गायेकवाड गुजराथेतून दोघे भाऊ पाच सात हजार फौजेनसी गगेवर आले म्हणून श्रीमंतहि पुढे मजल दर मजल गेले त्याणे जुझावे तो काये परंतु भेटोन तहरह जाहाला आहे त्याचे द्रढीकरण होऊन येईल रामाजीपंत येथून तुम्हापासी ये तोवर तुम्ही सातारकरासी अगर आईसाहेब अगर राजश्री याच्या माणसासी विरुध न दाखवणे श्रीमंत येका कार्यास गुतले आहेत तो अवधीकडे डव्हलावे उतम नाही तर कदापि कोणासी काजिया न करणे कोणेविसी चिता न करणे खुशाल असणे गोविंदरायासी अतर न करणे हे आसीर्वाद[1]

राजश्री रामाजीपंतास नमस्कार तुम्ही खामखा येणे अनमान न करणे हे विनती

---

१ पत्र महादाजी अंबाजीचें.

ले. २८० श्री श. १६७२ पौष वा २

इ. स. १७५१ जाने. २

चिरंजीव नाना यासी भाऊ आसीर्वाद येक दोन पत्रे पाठविली ती पावली सर्व कळले प्रस्तुत तुम्ही तेथेच राहून मर्जीप्रमाणे काम करून राजा खालता आणणे हे स्वरूपास उचीत याविसी बाबानीहि आण घालून सागितले आहे संदेह चितात आणून उठोन येकंदर न येणे येविसी त्रिंबक खंडेरावहि सागेल त्यावरून कळेल मोगलाचाहि मनसुबा तूर्त आहेच राजा खालता आलिया बहूत पेच वारतात रा बुधवार हे आसीर्वाद

---

ले. २८१ श्री श. १६७२ पौष व. ५

इ. स. १७५१ जाने. ५

चिरजीव राजश्री नाना प्रती बालाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल छ १८ सफर पावतो मुकाम नजीक गुडमठकल सुखरूप असो विशेष साप्रत तुम्हाकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाही तुम्ही ज्या कार्यास गेला ते कार्य कोठवर आले ते तपसीलवार लिहिणे राँ बाबाचे शरीराचे वर्तमान लिहिणे औषधी उपाये उतम करीत जाणे पथ्य उतम होये ते करणे *मोगल आला तर उतम न येई तर दरमजल जाऊ तुम्ही श्वकार्य उरकून मोकळे होणे पत्र पाठवीत जाणे हे आसीर्वाद

---

ले. २८२ श्री श. १६७२ पौष वा ५

इ. स. १७५१ जाने. ५

श्रियासह चिरजीव राजश्री नाना यासी माहादाजी अंबाजी आसीर्वाद उपरी येथील वर्तमान ता। पौष वद्य पंचमी मंदवार परियेत येथास्थित असे विशेष तुम्ही त्रिबक खडेराऊ याजबराबर पत्रे पाठविली ती पावली लिहिले वर्तमान सविस्तर कळले लोकानी लटक्या खबरी उठविल्या त्यावरून तुम्ही विमनस्क असाल तरी ते वर्तमान सर्व लटके आम्ही खुशाल आहो चौकी पाहारा किमपी नाही तुम्ही काही चिंता न करणे वरचेवर वर्तमान तेथील लिहीत जाणे येविसी हैगै न करणे बहूत काये लिहिणे लोभ आसो दीजे हे आसीर्वाद[1]

1 सबंद पत्र बाबाच्या हातचें.

ले. २८३ श्री श. १६७२ पौष वा १०
इ. स. १७५१ जाने. ११

* राजश्री बळवंतराव गोसांवी यासी

विनती उपरी बाबाचे गोविंदरायाचे पहिले लक्ष नानास ठाऊकच आहे प्रस्तुत कोणे प्रकारे नानाचा खुलासा कसा सर्व जे पुसने ते सागावे लागेल इतका शोध करून निरोप घेऊन लौकर येणे इकडे लस्कर लाबले चाकरी आहे तरी येणे नानानी लिहिलेप्रो तेथे राहून साफ मनापासून करावे आण आमची घालून सागणे तुम्ही लौकर येणे रा छ २३ सफर हे विनती

---

ले. २८४ श्रीशंकर श. १६७२ पौष वा ५
इ. स. १७५१ जाने. ५

चिरजीव राजश्री नाना यासी रघुनाथ बाजिराव आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष तुम्हीं पत्र पाठविले ते पावले वाचून फाडून टाकिले येथील मर्जी कसी ते लिहिणे म्हणोन तर तीर्थरूप भाऊनी तुम्हास लिहिलेच आसेल येथे पहिला दोन च्यार दिवस सदेह होता आलीकडे नाही आणि तुम्हींहि संदेह जोगे न करावे तुम्ही तो सर्व जाणता येथील मजकूर तर काल चिखलीहून कूच करून खेडास आलो आज पुढे सा सात कोस जातो रोख गुजरातेचा दिसतो त्यास लौकर पैका घ्या-वयास आनकूल पडत नाही आरधी गुजरातच देणार जर गुजरातेत गेले तर औरंगबाजचा मनसुबा राहील काय करितील ते पहावे सविस्तर भाऊनी लिा असेल रा छ १७ सफर बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद तिलगुल पाठविले ते पावले हे आसीर्वाद[1]

---

ले. २८५ श्री श. १६७२ पौष वा ११
इ. स. १७५१ जाने. १२

चिरजीव राजश्री नाना यासि प्रती बालाजी बाजीराऊ प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकुशल लिहीत जाणे विशेष राजश्री माहादोबास बरे वाटते किंवा नाही हे लिहिणे विशेष उपाय यथा-

---

१ संबद्ध पत्र भाऊसाहेबांच्या हातचें. १ सबंद पत्र नाशाच्या हातचे.

स्थित करीत ते करणे तुमचे लग्न कार्य कधी ठीक जाहाले ते लिहिणे येथील वर्तमान तरी चिरंजीव राजश्री दादास गुजराथेस रवाना करून दरमजल गुडमटकलास आलो येथून कृष्णा तिही दिवसाची वाट आहे मोगल येणार परतु मोगल मराठे कर्णाटकचे स्वारीस भितात फिरगी मात्र करारावर कायम आहेत आले तरी उतम प्रकारे कार्य होईल न आले तर जे थोडे बहूत होणे ते होईल देशी नानाप्रकारे राजकारणाची आभ्रे फिरतात व्यर्थ निमित्यहि बाबावर आणणार बहूत आहेत यास्तव आम्ही माघारे येऊ तो रामाजीपंतास सहजात दोन वर्षे न आला या बाहान्याने साता-रियाहून आणावे निरंतर पत्र पाठवीत जाणे छ ९ सफर बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद

---

ले. २८६ श्री श. १६७२ पौष वा।
इ. स. १७५१ जाने.

* चिरजीव राजश्री नाना यासी सदासिव चिमणाजी आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत जाणे विशेष तुम्ही पत्र ढलाइता बा। पाठविले तेथे लिहिले की हरकसे राजकारण करून तुम्ही गोविंदरायाचेहि समाधान राखून राजे खाली येत ते करा म्हणजे येश मिलाले सदेह तुटेल म्हणून लिहिले त्याप्रो। होईल ते करीतच आहो परतु गणेशपंतास वगैरे पत्रे निरालीच येऊन राजकारणाची चालणा होते तस्मात आमचा विस्वासच उडाला ज्या हरामखोऱ्या घालणे त्या घाला परतु तुमची स्वच्छता म्हणून लिहिले खावद आहा चितास येईल ते करा आमच्याने होईल ते आम्ही करितच आहो म्हणून सविस्तर लिहिले ऐसीयास नाना बाबा आपा सर्वांचे भाव कोणे प्रकारे माझा मनापासून सतोषाने रिणानबध कोणे प्रकारचा याचा विस्तार काये ल्याहावा असो पहिले बाबा गोविंदराव येक प्रकारचे आईसाहेबाविसी सातारा करीत होते नानास मूल दर्याबाई त्याची फले या थरास तेव्हाहि तुम्ही सारे बोलतच होता कसाहि विचार आसो तुमचा माझा पडदाच नाही प्रस्तुत बाबानी दाटून लौकीक केला परतु तुम्ही तेथे राहावे म्हणूनच लिहिले वरकड बातम्या पृथ्वीभर पसरल्या आईकू लागले म्हणून घाण जाली गणेशपंत पहिले उगाच व तुम्हास निरोप व रागरंग सर्व पाहून पुसून यावे म्हणूनच

गेले येथे बाबा पुण्यास गेलियाने लाहान माणूस येक प्रकारचे मनात आणून राजकारणे करू लागले येक दोन कागदात नानाजवल आढले त्यावरून बोलाऊन आणून फजीत तुमचे वजन वाढावे येविसी नानाचे मनातील संदेहहि दूर केले जे करावयाचे सुचले ते लेहून पाठविले माझे मनात तुमचे विसी संदेह नाही उगेच आणू नका पहिले बाबा आजपर्यंत गोविंदरायानी दरबारचा लगाम राखून नाना मुरदाड करावे हे करीत गेले तुम्ही आम्ही देखील नाना आपा सर्वांचे भाव बोलत गेलो गोविंदराव राजे बाा गेले तेव्हा आमची गत काय होती आईसाहेबाचे बल कोणे द्वारे हे सर्व कलले आम्ही बाबा गोविंद्राव आपा सारे येक तुम्ही नानाचे मायेचे म्हणून फजीत पडावयासी सातारा रवाना केले आसे तुम्हास वाटून मसी बोलला मी तुमची निशा केली परतु खरेहि वाटले नाही तेथें गेलियावरहि सर्वांचे लगाम द्रिष्टीस पडलेच परतु आम्ही इकडे आलो बाबासी आम्हीच पेच केला आसे संदेह मनात आणून मला लेहू लागलेत हा भाव माझे मनात येऊन तुह्मांस लिहिले त्याचे उतरहि आले नाही यामुले मला वाईट वाटले मागती बलवंत बलवंतराव येणार त्यास पुसून तुम्हास लिहिणे ते ल्याहावे म्हणून लिहिले नाही ते आमचाच संदेह वाटला बरे माझे प्राक्तनच आसे की संदेह पडावा आगर मीच हरामखोर आसेन आसो ईश्वरइच्छा प्रमाण

---

ले. २८७ श्री श. १६७२ पौष वा १४
इं. स. १७५१ जाने. १५

आसीर्वाद उपरी मल्हारबा गेलियापासून इकडे खबरी उडाल्या की दोघे सरदार बाबा तिघेहि रुसून गेले तदनंतर जानबाखान याची भेट जाली तेव्हा सभाजीराजा आगर ताराबाईचे राजकारण करून मोगलापासून फिरून बिघडवावी आसे जानबाखानाची सरदाराची मसलत जाली आण प्रमाण जाली मल्हारबाचे बाबूजी नाइकास बल पाडावे हेहि घाटते बाकी डोईवर पदरहि टाकावा याप्रो खबरी आईकिल्या त्यात मोगलहि माघारा चालना यामुले फारच गपा उठू लागल्या परतु आम्ही सर्व जाले उगीच दिसतील कोणहि गोष्ट व्हावयाची

१ पत्र पुरें आहे.

नाही सरदारास आम्ही बाहेर घातले नाही तो डोईवरचा पद्र का काढितील वरकड सातारा गेले ग्रहस्त फजीत पावतील मोगलाने बिघडावयाचे नाही फिरगी सहजा बिघडणार नाही खान जानबाचे व खासियाचे उफाडाचे बल कललेच आहे सरदारानी राजकारण करावे हे देसि आसता बिघडू कसे देतील येवंच सर्वहि लौकिक मात्र आहे आसा निश्चय करून पोट भरावयास जातो मोगलास जानबा खान चढी लाऊन रिकामी कल येखादी करितील वरकड मल्हारबाचा दंडकच चौघासी राखावे यास्तव साताराकडेहि दाट राबता आसेलच मल्हारबाचे आमचे नासावे हे फारास सुख गंगोबा तो बावासाठी आर्थे प्राणे आसतील आसे वाटते परतु कोणे प्रकारे आहे बाबासीहि ते बोलतच आसतील हे काय बोलतात ते काय करितात जयापाचे त्याचे कसे गंगोबा कोणे रंगावर बाबूजी नाईक प्रतिनिधी कोणे प्रकारे जड कसी बलावते च्यार महिने आम्ही येऊ तोपावेतो कोणे प्रकारे आमच्या राज्यातील व मोगलाचे मनसबे कसे होतील हा सर्वहि आर्थ तेथे दिसत आसेल तो लेहून पाठवणे तात्रार कलेल त्यासारखे येथे करावे लागेल आमृतराव सिद्बा गगोबास आणावयास गेले तेव्हा जानबा ढमढरे याची चिठी गेली की येथे आलिया रुा निशा करून घेतील तेव्हा निरोप देतील त्यावरून बिचकले हेहि आढळले आसेल ते लिहिणे बाबाचे शरीराचे व बलवंतरायाचे वर्तमान लिहिणे रा छ २७ सफर हे आसीर्वाद.[1]

---

ले. २८८ श्री श. १६७२ पौष वा १४
इ. स. १७५१ जाने. १५

चिरजीव राजश्री नाना यासि सदाशिव चिमणाजी आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष सविस्तर कितेक मजकूर आलाहिदा पत्री लिहिला आहे तो मनन करून उतरे लेहून पाठवणे बलवंतरायाचे शरीर फारच कृश आहे घरी राहणे जालेच आहे चागला उपाय करून सर्व रोग निःशेष होतसे करणे रा छ २७ सफर बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद[1]

---

१ पत्र भाऊसाहेबांचें. १ सबंद पत्र खाशाच्या हातचें.

ले. २८९ श्री श. १६७२ पौष वाा १४
इ. स. १७५१ जाने. १५

आसीर्वाद उपरी चिरजीव राजश्री दादा गुजराथेस रवाना केले वाटेस लाख दोन लाख रुाो शहरपर्यंत मेलऊन आजपर्यंत खानदेसात गेले आसतील तिकडे खबर येतच आसेल विशेष आसलिया लिहिणे दमाजी गाईकवाड दोन च्यार रोज वेडे जाले होते दादा बाा जनवार्ता पलाले आसे म्हणतात लिहिले आले नाही मल्हारबाकडे राजकारणार्थ धोंडो मल्हार तेथे आला होता जे कलले आसेल ते लिहिणे तुमचे लग्नाचा निश्चय कसा जाला स्वता चौकशी जालीच आसेल नवरी कसी आहे लग्न कधी होणार हे लिहिणे मल्हारबाकडील काही मजकूर त्रिबकपंतहि तेथे आहेत ते केवल निसूर राहाणार नाही जे कलेल ते लिहिणे आम्हास रिकामे राहवेना म्हणून स्थल शुध परतु आकार नाही दोन वेल प्रसंग जाला तुम्ही कासेगावावरून गेलाच आसाल प्रस्तुतहि चिठीहि पाठविली आहे देणे सर्वहि मामला फैसल करणे वरकडहि वोलखीचा समाचार घ्या-वा आम्ही पुसत होतो म्हणून सागावे कासेगावचे दोनीहि बागाचे विही-रीस पाणी लावावे बाग चागले होतील आम्हास पाहावयास कामास येईल आम्हाजवल द्रव्याचा मागे तोटा पडला होता प्रस्तुत बरे जमा जाले आहे कोणी माणूस येथास्थित व्यय करावयास नाही हातावरच संसार आहे आसो गाठ पडलियावर नीटच होईल सरदाराकडील विशेष उत्पात डोईवरील पद्र काढून करणार किवा निष्ठा उतम आहे दडकास काय करितील इतकाच प्रकार आहे पुढे मालवियात कधीं जाणार हा मनसुबियाचा सर्व आर्थ ताावार कलला पाहिजे त्याप्राा चितात लक्ष धरावा तर लेहून पाठवणे सविस्तर लिहिले प्राो सर्वहि उद्योग करावे आम्ही श्रवणमात्रेकरून संतोष पाऊ लग्नाचा आर्थ तुम्हावरच आहे कोणी शब्द न लावी आसे ठीक करणे आमलसी थोर आसेल तेच करणे राा छ २७ सफर हे आसीर्वाद [1]

---

१ पत्र भाऊसाहेबांचें.

ले. २९० श्री श. १६७२ पौष वा।
इ. स. १७५१ जाने.

आसीर्वाद उमाबाई गाईकवाड निखालस आबिकाबाईची नजर येक प्रकारची आहे गाईकवाडहि गंगेपलीकडे आले पुढे यास देखील बा। घेऊन जावे जे वाटणी होणे ते त्याचे विचारे होईल आथवा लबाडीच दिसलिया तोडात द्यावी हे काम होईल त्यासारखे गुजराथ आणखी कामास फौज घेऊन येकाने जावे आसा तूर्त विचार करून दोन मजला आले पुढे होईल ते लेहून पाठऊन जी काय होईल त्यासारखे बाबा आम्हाबा। येतील आम्हासहि कोणे प्रकारे राहावे हा उघडून विचार लेहून पाठवणे रा। शुक्रवार हे आसीर्वाद [1]

---

ले. २९१ श्री शके १६७२ पौष वा।
इ. स. १७५१ जाने.

* आसीर्वाद उपरी आईसाहेबानी डौल धरला त्यात राजा मुडदार राज्याचा आब दवडावा फितूर सर्वत्र वाढावा हे सर्वात्मना आम्हास होऊ न देणे राजश्रीनी मातुश्रीचे वडीलपण राखावे नेमणूकप्रा। आधिक आगले देऊन चालवावे कारभार जमाखर्च ज्याप्रा। जाला त्याप्रा। सर्व राज्यातील पुरातन सेवक आहेत त्याचे त्याचे हाते ज्याचे जे काम ते राजश्री——नी घेऊन काम चालवावे आमचे राजश्री —स हजार प्रकारचे सर्वा मुलकात खरेखोटेपणाचा लौकीक तो याप्रा। करून आपले जबरदस्तीखाली जो लबाडी करील त्यास राजश्रीचे आज्ञेत वर्तवावे आसे करून तेज चढवावे आईसाहेबाचेहि याणी वजन राखावे परतु हे बालिश आनकूल न पडे तरी त्याणी दुरूनच राखून घ्यावे हे लक्ष त्यास आईसाहेब पाणी घालून घाण करणार त्यास साहित्य भिवजी व पुराणीक हे मेळविणार राज्यातील चाकर काही कामाचे नाहीसे करणार यास्तव त्याचा जीव हाच की येकदा तो गत आणखी ही जागा जागा जे सनदा घेऊन मुलकात आहेत ते से पनास कापून टाकावे किलोकिला लेहून पाठवावे गोविंदरायाचे येशवंतरायाचे लगाम आहेतच की राजा वरता आडकून राज्य आईसाहेब नासणार राजश्रीचे चितात येत नाही

---

१ सबंद पत्र भाऊसाहेबांच्या हातचे.

तुमचे करारवाके येथास्थित चालेल सातारियासारखे जागा जागा बडे उठऊन राज्य नासाल मातबरीने तुम्हास पुसतील आसे दबऊन गरम नरम सागून आपले लगामी लाऊन ध्यावे व सातारकरहि आता तरी करितील तर उतम आहे त्यासीहि बोलून ठीक करणे हजार दीड हजार फौज रवाना करितो येऊन पावेल तुम्ही याप्रो करणे डाकेची खबरदारी करून वरचेवर पत्र पाठवीत जाणे मामलेदारापासून यैवज जमा करणे राजश्रीचे दौलास कार्याकारण खर्च करणे रा मंदवार दीड प्रहर रात्र हे आसीर्वाद[1]

---

**ले. २९२** श्री श. १६७२ पौष वा॥
इ. स. १७५१ जाने.

आसीर्वाद उपरी मातुश्री आईसाहेब दगा रातबिरात करितील हा वसवास दर्याबाईनी खाऊन आपले लस्करात गेली पानगावास जातात त्यांस वस्त्रे हती घोडे खर्चास देऊन रा करणे म्हणोन राजश्रीनी सागोन पाठविले त्याजवरून सर्व कारभारीसुधा गेलो वस्त्रे दर्याबाईनी घेतली नाही जीवनाबाईस वस्त्रे हती घोडा दिल्हा म्हणोन लिहिले ते कळले राजश्रीचे आज्ञेप्रो केले उतम केले *हे आसीर्वाद[2]

---

**ले. २९३** श्री श. १६७२ माघ शु॥ १
इ. स. १७४१ जाने. १७

चिरजीव नाना प्रती भाऊ आसीर्वाद सविस्तर जासुदाबो वर्तमान लेहून पाठविले आहे त्यावरून कलेल साराष आम्ही दर मजल कर्नाटकास चाललो मोगलासाठी महिनाभर वाट पाहिली लाहान साहान माहालचे दोन च्यार लाख रुो घेतले सेवट कलबुर्गेपर्यंत आले फिरंगी सर्व प्रकारे आमचे नवाबाचे खान जानबा उगेच तेथे राहिले त्यामुले गैरकामाचे म्हणून सारे मोगलाचे मते मजली करुन तलबेचा हगामा केला देखील फरास आसे झाले म्हणून माघारे गेले खानाची भेट जालियावर भागानगर आगर शहर इकडे जातील बिघडावयाची गोष्ट नाही आम्हीहि मागे पेच नाही आसे समजून पुढे चाललो वरकड मल्हारबा गेलियापासून नानाप्रकारे खबरी इकडे

---

१ पत्र भाऊंचें. २ पत्र नानासाहेबाचें.

येतात की ताराबाईसी राजकारण करून मोगलापासून सला बिघडावा सर्वांनी डोईवरील पदर काढावे आसे आईकतो मुख्य जीव पाहाता गगोबाचे मते खावदाचा त्याचा विशेष लगाम नसावा म्हणून आपले गावासाठी इतके वाईट दाखविले आसो लबाडी करील तो फजीत पावेल च्यार राजकारणे करावयाचा मल्हारबाचा दंडक आहेच परतु आमचे तर्केकरून विशेष पेच नाही गावचा रुसवाहि देखील कारकून त्याचे मर्जीप्रो जयापानी मल्हारबानी यादी पाठविल्या त्याप्रो सनदाहि दिल्या बाकी रुसवियाची राहिली नाही त्यात तेथे तुम्हास दिसत असेल ते लेहून पाठवणे जानबासी काय खलबत जाले आईसाहेबाकडून आबाजी नाईकहि आले आहेत म्हणून आईकिले येकूण सर्व चहूकडे घाटते काय परिणाम कसा सर्व तावार लिहिणे त्यासारखे लक्ष धरून बाबचे वेथेचे बलवंतरायाचे कानाचे वर्तमान लिहिणे लग्नाचा निश्चय तुम्हावरच आहे आम्ही न हासू आसे करणे कासेगावाचा दोहीचा समाचार घ्यावा वरकडहि सर्वांची खबर घ्यावी आमचेहि पुसणे सागावे आमची शरीरप्रकृत बरी आहे प्रस्तुत आदवानीस जातो येथील सर्व काम जालियावर उजवे हाते सावनूर टाकून बिदनूरपर्यंत किरकोल सर्व विल्हे लागे. तो महिना लागेल पुढे श्रीरंगपटण जवलच आठ दाहा मजली आहे सरद तेथेच आहे पुढे होईल वर्तमान ते लेहून पाठऊ मुजफारखान यास तीनसे राऊत दीड हजार माणूस दाहा तोफानिसी पंचावन हजार दरमाहा करून ठेविले पालेगारहि जमा होत जातील फौजही सरलस्कर फतेसिगबावाची वगैरे तीस पचतीस हजार आहे रा छ २९ सफर हे आसीर्वाद

---

ले. २९४ श्री श. १६७२ माघ शुा २

इ. स. १७५१ जाने. १८

चिरंजीव राजश्री नाना यासि बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष मातुश्री आईसाहेब व राजश्री स्वामी यानी खाली यावे येविसीचा प्रेत्न केलाच आहे उभयेताचे येणे खाली होताच रा म्हालोजी मुठे वगैरे किरकोल पथके आपलेपासी ठेऊन रा गोपाळराव गोविद व चिमणाजी बापूजी

---

१ सबंद पत्र भाऊसाहेबांच्या हातचें.

यास तुळजापूरचे रोखे आम्हाकडे पाठऊन देणें जरी उभयेताचे खाली यावयास विलब लागला तर म्हालोजी मुठे वगैरे किरकोल पथके व गोपालराव गोविद यैसे इकडे पाठवणे चिमणाजी बापूजीस तेथे ठेऊन घेणे वाडियातील चोकीस लोक असिले पाहिजेत तरी चाली[स] पंनास आरब ठेवणे मऱ्हाठे माणोस दाहावीस पाहिजे तर चाकर ठेवणें रा *छ रबिलोवल गडबड असली तर पागेचे हेटकरी बरकंदाज संभर दीडसे ठेवणे जर खाली आले तर प्रयोजन नाही हे आसिर्वाद

---

ले. २९५ श्री श. १६७२ माघ शुा ४
इ. स. १७५१ जाने० ३०

चिरजीव राजश्री नाना यासि बालाजी बाजिराव प्रधान आर्शीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत जाणे विशेष राजश्री स्वामी खाली यावें येविसीचा विचार करीतच आहा राजश्रीचे येणे खाली होताच रा म्हालोजी मुठे वगैरे किरकोल आपलेपासी ठेऊन रा गोपाळराव गोविद व चिमणाजी बापूजी यास इकडे पाठऊन देणे जरी राजश्री—च्या खाली येण्यास विलब लागला तरी किरकोळ पथके व गोपालराव गोविद यास इकडे पाठऊन देणे चिमणाजी बापूजी तुम्हीं आपले जवल ठेवणे सारांश मातुश्री——आईसाहेब व राजश्री खाली यावयाचा येत्न करणे उभयेता खाली येताच लोकाची रवानगी इकडे करणे विलब लागल्यास गोपालराव गोविद पाठवणे तुम्हास वाडियातील चोकीस * पायचे माणूस लागले तर हेटकरी बरकंदास शभर दीडसे ठेवणे येथील मजकुराचा निश्चय होईल ते लिहून पाठऊ हिदायेत मोहदीनखान व पठाण बहूत प्रकारे येक विचार होऊन दरमजल येणार ये प्रसगी सर्व फौज जमा जाहाली पाहिजे यास्तव येथील हरयेक प्रकार ठहराऊन लौकीक विरुध बाहेर न दिवसे येवढे तरी करून फौज इकडे पाठवणे छ ३ रबिलोवल हे आसीर्वाद

---

१ येथून पुढील मजकूर खाशांच्या हातचा.

ले. २९६ श्री श. १६७२ माघ शुा ५
इ. स. १७५१ जाने. २१

* चिरंजीव राजश्री नाना यासी बालाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल तागाईत छ ४ रबिलावल जाणून स्वकीये लिहीत जाणे विशेष तुम्ही पत्र पाठविले तें पावलें लिहिलें वर्तमान कललें नवा राजा उत्पन्न जाला दौलतराव याणी पाहिला राज्यचिन्हे तों दिसत नाही परतु बोलणे मात्र उदाम आहे खरें अथवा लटकें असो परतु यास ठिकाणी ठेवावे नाहीतर हे बंड उत्पन्न करून आई वर आहेत त्यास दगा करितील याचा विचार काय करावा ते लिहून पाठवावे म्हणून लिहिले ऐशास तुम्ही त्यास शफत दिल्ही असतां त्याचे वाईट करावे ऐसा अर्थ तो कदापि करू नये परंतु त्याची च्यर्या कसी आहे व तो कसा आहे हें येथे पाहिले पाहिजे याकरिता तुम्ही त्यासी बोलोन गोड गोष्टी सागोन समागमे पंचवीस राऊत देऊन इकडे पाठऊन देणें कदांचित यावयाविशी अनमान करील अथवा पलायनतत्पर होतील तर च्यार गोड गोष्टी बोलोन समाधानपूर्वक भाषण करून हे पत्र जे दिवसीं पावेल तेच क्षणी रवानगी करणे विलंब लागलिया पलोन जाईल येथे येऊन पावलियावर पोटास देऊन किलियावर ठेवले जातील यास किलियावर नेऊन ठेविले म्हणजे दुसरा कोणी उभा राहणार नाही याकरिता बहूत युग्तीने समागमे राऊत देऊन रवानगी करणे नवा राजा लस्करात नेतात ऐसा बोभाट न जाला पाहिजे याजकरिता शाहाणा माणूस व कारकून समागमे देऊन वाटेने येता कोणीकडून गेलें ऐसें कलो न देतां चोरून आले पाहिजे त्याची तों तुम्ही बातमी राखून ठेविलीच असेल मुख्य गोष्ट पत्र पावतांच रवानगी करणे बोभाट जालिया पलोन जाईल पलोन गेलिया तेहि गोष्ट वाईटच हर तजवीजेने बदोबस्ताने इकडे पाठवणे तेथे लटके सोग कामाचे नाही अवरंगाबादेजवलून नजर पंधरा करार केली याउपर सत्वरच बालाघाटाचे सुमारे जाऊ तुम्ही आणापा येताच रग भरून लौकीक उतम बाहेर दिसे ऐसे जरूर करणे काही दिवस पैठणचे सुमारे पत्र पाठवीत जाणे गाईकवाड दहशतीने गगातीरास आलो याजमुले माघारा गेला उमाबाई सेनाखासखेल दमाजीचा लेक येथे आडकलाच आहे वाट करितील तेव्हा जातील पुणियाचे डाकेने कागदास वाकडे पडते छ ४ रबिलोवल हे आसीर्वाद

---

ले. २९७ श्री श. १६७२ माघ शुा ५
इ. स. १७५१ जाने. २१

* श्रियासह चिरजीव राजश्री नानास प्रती माहादाजी अंबाजी असीर्वाद उपरी येथील वर्तमान ताा माघ शुध पचमी इंदुवार परियेत येथास्थित असे विशेष तुम्ही खासबारदार याजबराबर पत्र पाठविले ते पावले सविस्तर वर्तमान लिहिल्याप्रमाणे कलले रामाजी माणकेस्वर यासी पाठवावे म्हणून लिहिले यैसियासी रामाजीपंत तुम्हापासून आले ते येक दिवस येथे होते तो श्रीमंताचे पत्र आले की त्यास पाठवणे त्यावरून लस्करास गेले होते आठ दाहा दिवस तिकडे लागले ते आजीच येथे आले याउपर येक दोन दिवस घरी राहून तुम्हाकडे येतील सविस्तर लस्करचे व येथील वर्तमान सागतील वरकड तुम्ही लिहिले वर्तमान ते सविस्तर कलले साराउष तुम्हीं तेथे आहा श्रीमंताचे मर्जीप्रमाणे सेवा करणे परतु कोणास लटकी क्रिया बेलभडार न देणे व पैकियासी जमान होऊन दिवाणकार-भार चालवाल तर ते वडिलापासून कोणी केले नाही तुम्हीहि न करणे पोटास थोडेबहूत दैवानसार मिलणे तसे मिलेल परंतु कोणेविसी लचाड न पडे ते करणें व क्रिया देऊन विस्वासघात कोणाचा न करणे ह्या दोन गोष्टी मात्र जतन करणे वरकड खावद आहेत जसी आज्ञा करितील तसी सेवा करणे बातम्या फार लिहितात म्हणून लिहिले तर जसी जे वेलेस मर्जी असेल तसेच सेवक लोकी वर्तावे परतु डाग कोणेविसी लागू देऊ नये असे आहे तुम्ही पत्र लिहिले ते फाडून टाकावे म्हणून आण घालून लिहिले तर पत्र फाडून टाकिले कलले पाहिजे बहूत काये लिहिणे लोभ असो दीजे हे आसीर्वाद

---

ले. २९८ श्री श. १६७२ माघ शुा ९
इ. स. १७५१ जाने. २४

चिरजीव राजश्री नाना यासी बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद राजश्री खाली आणावे याविसी तुम्हास सविस्तर लिहिलेच आहे प्रस्तुत आईकितो की राजे पुराणीक दूर केलियास आईसाहेबाचे आज्ञेत राहणार आसे बोलतात ऐसियास या प्रकारचे करून तुमचे केले मोडले तरी काये कामाचे यास्तव राजश्रीसी आपली पुर्ती आस्था लाऊन आईसाहेबाचा

कटाला राहे ते करणे गडकरी लगामी लाऊन राजे खालते उतरणे आई-साहेबसहि खाली आलिया वडीलपण राखून करून आसेहि बोलून खाली आणावी राजे आई खाली या व ली ष ये ठेऊन राजश्रीपासून करवावे केले-प्रो करावे येकूण जर गडकरी तुमचे पुर्ते होतात तरी लौकर खाली आ-णावे राजे मलमलीत असले तरी तुमचे लक्षात राहाणार तेव्हा रामाजीपंत लक्ष्मणपंत आणखी कोणी वरते पाठऊन खाली आणावे याप्रो करणे छ ७ सफर हे आसीर्वाद[1]

---

**ले. २९९** श्री श. १६७२ माघ शुध ११
इ. स. १७५१ जाने. २६

आसीर्वाद उपरी येमाजीपंत दाभाडे थोरात वगैरे याचे चालत नाही हाच गुता नाही तरी सभाजिराजीयाकडे राजकारणे आहेतच व मातुश्री-कडेहि आहेत ऐसीयास दाभाडे आम्हाजवल गाईकवाडास आमची फौज सोनगडास पोहचावील इकडे येऊ देत नाही येमाजीपंत आमचे बाच वाग-विले थोरातहि बोलाविले आहेत दादोबा मात्र आहेत तेयाने कमाल लबाडी केली तरी तुम्ही गोविंदराव समाचार घ्यालच बाहेरील मनसुबा मातबर आवलबिला आहे जे साहित्य होईल ते सर्वांनी आपलेवर सोसून करावे दरबारचे कारभारी यानी मासोलीचे लाभाचे पेच येकीकडे ठेऊन चहूकडून लगाट करून मर्जी मेलऊन घेऊन खाली उतरावी लौकीक दूर करावा याप्रो करणे आम्ही लाबत चाललो तुम्ही गोविंदराव तेथे आहा जसा प्रसंग दिसेल तसे करून दुसरे हजार चढी लावितील ते सेवटास न जाऊ देता आपले कार्य करणे सभाजी राजे फिसादीस बाहेरील सर्वांस मूल यास्तव त्याची स्थले आपलेकडे करून तेथे दोन च्यारसे राऊत त्याचे उरावर राहातील येखादा प्रसगच पडला तरी आपले लगामीहि आहेतच आसे केले आहे विसाजी नारायेण तेथे राहातील थोरातास आष्टे दिल्हे आहे ते राखावे मणजे आपलेच आहेत तुम्ही प्रतिनिधीची फौज मिलोन हजार दीड चागलेच तेथे आहां मग चिता काय चहू दिसाआड येथे पत्र आम्हास पावे याचप्रो रवाना करीत जाणे सर्व घरचे बाहेरचे पेच तुम्हास ठाऊकच

---

१ सबंद पत्र भाऊसाहेबांच्या हातचें असून 'हे आसीर्वाद' एवढा मजकूर नाना साहेबांच्या हातचा आहे.

आहेत इतकीहि लक्षे चितात आणून काम करणे आम्हास लेहून मसलत करणे बाकी नाही तुम्हीच सर्व मनात आणून करणे इकडेहि लिहिणे वरच्यावर आज्ञा करणे ते केली जाईल लाहान साहान कामे मातबर हुदे रोजगार यावेगल चाकरानफराची आहेत त्यात फारसे वोढीत न जाणे आमलसी सैल दोरी देऊन गोडी राखणे येविसी जेथे आतर पडेल तो गोविंदरायाकडे शब्द येईल उचित रीतीने करणे रा छ ९ रालावल हे आसीर्वाद[1]

---

ले. ३०० श्री श. १६७२ माघ शु.
इ. स. १७५१ जान.

* चिरजीव नाना यासि तुम्ही रविवारी येणे बाबास पत्र ल्याहावयाचा प्रकार लिहिला त्यात मुख्य भावार्थ इतकाच की आम्हाजवल आल्या गेल्यास गुता न पडावा तुम्ही सहजाखाली आलेस तरी चिता नाही परतु येथील मंडलीचा प्रकार तुम्ही जाणत आहा आथवा जसे धोंडोबा घरी बसले आहेत तसे तुम्ही बसावे हे मजला उतम दिसत नाही यास्तव मात्र पत्र ल्याहावे ऐसे लिहिले त्याचे उतरच न लिहिले याचा अर्थ काये आहे हे आसीर्वाद[2]

---

ले. ३०१ श्री श. १६७२ माघ शुा १४
इ. स. १७५१ जाने. २९

चिरंजीव राजश्री नाना यांसि सदासीव चिमणाजी आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिंहीत जाणे विशेष तुम्ही लौकर यावे ते आद्याप येत नाही थोर थोर घरीच आहेत याजमुले कामाची निकड नाही असे सर्वांस वाटत असेल याजकरितां तुम्ही सत्वर यावयाचे करणे रा छ १२ रालाखर बहूत काये लिहिणे फौज जमा जाली असती तर काम होते तुम्ही सत्वर येणे घरी राहावे लौकर जमा न व्हावे हे आम्हास वाईट वाटते सत्वर येणे हे आसीर्वाद बलवंतरायाचे पत्रावरून मोगलाचे वृत कलले सत्वर येणे आसीर्वाद

---

१ सबंद पत्र भाऊसाहेबांच्या हातचें. २ पत्र नानासाहेबांचें.

ले. ३०२ श्री श. १६७२ माघ शु०
इ. स. १७५१ जाने०

* आसीर्वाद जे आले मनात ते लिहिले यावरच विशेष संदेह मानू नका जे आहे तेच आहे तुम्हास वाटेल तसे यथास्थित सर्व लेहून पाठवा नानाबाो आम्ही आमचाच तुम्हास संदेह म्हणजे इलाज नाही बाबास माझा भरोसाच आहे थोडेसे वाईटहि वाटते आपा रागेच आहेत नानाजवल कारभार तर करितो निराले मामा रामचद्रबावाकडे फार करून बाबाचेविसी येकदोनदा बोललो त्यास संदेह फारच आमचे पडतात आसे आहे आबरू बाचवणे ईश्वराआधीन आहे इकडील मजकूर तर सर्वत्र जफ्ती जाली त्यात आवरगाबाद सुभा सोडावा खानापासून पधरा वीस घ्यावे खानदेश वगैरे आम्हाकडेच आसे होत आहे होईल तेव्हा खरे गाईकवाडास आणावयास गेले आहे हजाराची कुचोदे लबाडीची नजर जाले तरी उतम नाहीतरी हे काम जालिया दाभाडी जवल आहेत याचा त्याचा समाचार घेऊन पुढे सारे जमा करून भागानगरात पैका घेऊन तोडावर जातो मोगलहि सुधेसे दिसत नाही आमचे बावाचे नेटासहि बेजार जालो गाव लुटून एकीकडे जाणे होईल तरी उतम आहे आसो जे होईल ते लेहून पाठऊन वरकड तुझा पेच पडावा आसे ढीग लिहितील परतु संदेह आणू नको रामाजीपंत आणापा आले होते त्याजवल आईसाहेबानी खाली यावे आमचा संदेह न धरावा कारभार केला सारा चालवावा राजे वेडे खरेच परतु त्यासहि विचारे करून सागणे ते सागावे बदीखाना दाखल न करावे आईसाहेबानी आरवाली सोसावी आसेच बोलून क्रियाहि दिल्ही हे विचारे करून जितके होईल ते करून राजे आई खाली आणावी फौज लाऊन द्यावी हे जालिया बाहेर सोई पडेल नाहीतरी कामाचे नाही हर इलाजे तुम्ही कामे केलिया दौलतेतील मातबर पेच काढलासा होईल नाहीतरी आसूनहि लग नसून खोलबा आसे होईल प्रस्तुतहि बाबाचे गोविदरायाचे वगैरे सर्व भाव तुम्हास स्पष्ट दिसून मजसी पडदा करिता आसे वाटते हे साफ लेहून पाठवणे वरकड आम्ही शुध आहो तुम्हास काही कालजी नाही मग्नच फार आहा आसा लौकीक फार जाला आहे हाहि दूर करणे कार्याकारण सर्व करावे लागेल करणे लेहून पाठवणे रा मंदवार प्रातःकाल हे आसीर्वाद

---

ले. ३०३ श्री श. १६७२ माघ शुा
इ. स. १७५१ जाने.

पुा चिरजीव राजश्री नाना यासि आसीर्वाद[१] उपरी राजश्री गोविंदराव यांस आम्ही विचारिले कीं गडचे राजकारण तुम्हांकडे तुम्ही आम्हासी बोलत गेलेस त्यास कां फाट पडावा येविसी त्याची आमची बोली बहूत जाली त्यानी शफतपुर सागणे ते सांगितले वस्तुता पाहातां आईसाहेब पुराणिक यांजवरी क्रोधरूप आहेत यांचे वस्तुत छद्म करवते असे रा येमाजीपताची अवाई आली त्याजवरून गडकरी बिथरली याचा विस्तार लिहिला तो कलला ऐशांस गोविंदरायानी नस्ते सकल्प विकल्प चितांतें नाणावे संशये न धरावा स्वच्छचिते करीत होते त्याप्रो राजश्री स आईसाहेबास खाली येत ते करावें येविसी दोन बंद विस्तारे मारनिलेस लिहिला आहे त्याप्रो चित्तात आणून केल्यास सर्वहि गोष्टीचे कल्याण असे उचीत जाणतील व ज्यात आमची मर्जी राही तेच ते करितील व करावे आम्ही निखालसतेने लिहीत असता त्यानी अतरी संदेह बाह्यात्कारे चालता गाडा ऐसे करावे योग्य नाही हे आसीर्वाद

---

ले. ३०४ श्री श. १६७२ माघ शुा
इ. स. १७५१ जाने.

आसीर्वाद उपरी सक्रमणाचे तील पाठविले ते पावले नवलविशेष लेहून पाठवावे म्हणून लिहिले ऐसीयास येथून तेथील करावयाचा आर्थ वारवार तुम्हास लिहिलाच आहे त्याप्रो करावा पहिलेपासून दरबारी गोविंदरायानी सूत्रे लाऊन वडुथापासून कोणे प्रकारे ठेविली त्याचेच पेच किती वाढले हे तुम्हास ठाऊकच आहे पुढे सातारा कोणे प्रकारे जाले तुम्हासी राजश्रीचे कजियाचे दिसात कोणे प्रकारे वर्तले आलीकडे आईसाहेब कोणे विचारे नेली येमाजीपतास ठेविलियापासून दरबारीदेखील कर्नाटकचे काम हिसके कोणे प्रकारे पडले आईसाहेब गडावरी राजश्री—नी जाते समई तुम्हास आमचा देखील सदेह वाटला की हे सारे यास ठाऊक राजे ते येक फजीत मात्र पडावयास लावितात आसे बोलायाच प्रकार पुढेहि तेथे तुम्हास दिसतच आसेल इतके आसून प्रस्तुत राजे खाली येत

१ पत्र नानासाहेबांस

होते ते बाबा पुण्यास गेलियापासून तेथे गोविंदराव सडे राहून कामाचा डौल येक प्रकारचा पडला तुम्ही आईसाहेब फारच उऱ्या करतात त्यास केला कारभार मोडून त्याचे मर्जीने राहावे आसे विचार लिहिता राजेहि त्याचे मायेत मिलावयाचा तेथील ग्रहस्त इलाज करितात हे सर्व पृथ्वीभर दिसून येथेहि दिसते या सर्व आर्थाची तुम्हास पहिली होती प्रस्तुत तुम्हाखावदाचा पेच म्हणून उदास राहून कसेहि हो आसे राहाता की काय याचा विचार कलत नाही यामुले सदेह थोडासा मलाहि वाटतो तर तुम्हावर कोणेविसी नानाचा पेचसा दिसत नाही तुम्ही उदास राहून काम बुडवावे उतम नाही तेथे तडकाऊन चौघाचे लगाम राखून करावेच करावे बाबाचाहि विशेष पेच नाही हे उतम किंवा पहिलेपासून सोबतीचा प्रकार दिसतच होता आता फारच मोकला दिसतो तथापि तुम्हीहि त्यातच मिलून आसावे हे साफ लिहिणे नाहीतरी उग्याच चौक्या बसवाव्या तुम्हीही उदास ज्याचे पेच तुम्हास दिसतात ते मलाहि लेहून पाठवीत नाही हे उतम नाही नाही याचा डौल कोणे प्रकारे धरला आहे हे मनापासून साफ जे दिसत आसेल ते लेहून पाठवणे कागद फाडून टाकणे आण आहे रा। शुक्रवार हे आसीर्वाद

---

**ले. ३०५** श्री शके १६७२ माघ व॥ १
इ. स. १७५१ जाने. ३१

* श्रियासह चिरंजीव राजमान्य राजश्री नाना यासी माहादाजी अंबाजी आसीर्वाद उपरी येथील वर्तमान ता। माघ वद्य प्रतिपदा गुरुवार येथास्थित असे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले लिहिले की दादोबा सातारियावर चढले आईसाहेबी खुशालीच्या तोफा केल्या याउपर येथे कटकट प्राप्त जाहाली दाहा पाच हजार मावलाहि जमा जाहाला आम्ही कसे करावे आणापासी धातूपोषण भाषण केले म्हणून तपसिले लिहिले ते कलले यैसियासी कोणाचे गारुड काही कलत नाही दादोबा व येमाजीपंत सर्व प्रकारे येक आहेत गडकऱ्याचा व येमाजीपंताचा मातबर पेच असे असता दादोबा गडकऱ्यानी वर कसे घेतले पुढे येमाजीपत तेथे येणार की कसे जर येमाजीपंत दादोबा हे येक होऊन गडकरी त्यासी मिलाले येकूण

---

१ सबंद पत्र भाऊसाहेबांच्या हातचें.

गड आईसाहेब दादोबा येमाजीपंत येक जाहाले आसिले तर श्रीमंताचे मर्जीप्रमाणेच जाहाले महत प्रयेत्न लाख पनास हजार रुो खर्च करावा परतु येमाजीपंताचे हाती गड लागे ते करावे या प्रयेत्नात होते ते अनयासे जाहाले उतम असे पुढे श्रीमंत आज्ञा करितील त्याप्रमाणे वर्तावे दुसरा विचार काये आहे तेथे मावले वगैरे लोक जमा होऊन तुह्मासी कोणी कटकट करितील तर हे तो होणे नाही तथापि असाच प्रसग द्रिष्टीस पडला तर आपण फौज सुधा बाहेर राहावे पुढे आईसाहेब काये मनसबा करितात श्रीमंत काये आज्ञा करितात ते पाहावे त्यासारिखा विचार करावा येविसीचा कितेक तपसील रामाजीपंत याजपासी सांगितला आहे मारनिले सासवडाहून जेजूरीवरून पाच साता दिवसा तेथे येणार होते परतु तुमचे पत्र हे आले त्यावरून उदईक शुक्रवारी येथून निघोन वडगावास जातील शनवारी तुम्हापासी येतील सविस्तर सागतील साराउष तुम्ही सावध राहाणे बेफाम न राहणें गडावर चौक्या केवल बसऊ नयेत परंतु श्रीमंतास हे वर्तमान कलून तेथून आज्ञा ये तोपर्यत वरते माणूस कोणा जाईल येईल तरी त्याची चौकसी करावी गाफीलपणे राहिल्याने उतम नाही तथापी तेथील विच्यार व श्रीमंताची आज्ञा जसी येईल त्याप्रा वर्तणूक करणे खर्चाचे वोढीविसी लिहिले तरी श्रीमंतास लिहिणे इतके दिवस पैका नव्हता प्रस्तूत शहरची खडणी अली अता पैका पाठवितील हे आसीर्वाद तेथील गारूड काये आहे ते सविस्तर वर्तमान वरचेवर लिहीत जाणे हे असीर्वाद तुम्ही पत्र पाठविले ते गुरुवारी तिसऱ्या पाहार दिवसा येथे पावले उतर तेच क्षणी जासूदापासी दिल्हे हे आसीर्वाद

---

ले. ३०६ श्री श. १६७२ माघ वा १ नंतर
इ. स. १७५१ फेब्रु०

आसीर्वाद उपरी विस्तारे अलाहिदा पुरवण्यात लिहिले आहे सारांश लक्षाप्रकारे पुराणिकास हाती घेऊन आईसाहेबासी सलूख करावा कदाचि[त] कोणेहि प्रकारे नच बने आणि मनापासून गोविंदराव दादोबाचे विचारात नसेल तसेच यशवतराव तर वेणेचे काठी राहून हजार प्रकारे तोडजोड करावे येखादी जागा हाती लागली तर जरूर या दिवसात लगामी लावावी जर गोविंदराव यशवतराव गोपाळराव दादोबाचे विचारात असले तर

तुमची स्थित तेथे राहात नाही तुम्हास पुणे संभालावे लागेल राजमंडलच सर्व फिरले असले गमाजीपंत दोन अडीच हजार जमा होऊन आले तर मग आहे ते वेलेस गाड वाकडी करावी अथवा फारासी थोड्यानी जुझावे हे मसलत उचीत नाही जर येक आईसाहे दादोबा पुराणीक हे पत्र येक विचार वरकड सर्व मडली तुमचे हाती असली तर सर्व येकत्रै जमा होऊन त्याचा प्रत्यपकार करीत जाणे हे दिवस फार कठीण आले आहेत या दिवसात गोविंदरायानी मागील अर्थ लटके येकीकडे ठेऊन हरयेक रकमेवर बाजी राखावी श्रीकृपा आहे तर आम्ही इकडील प्रसग सपादून आल्यावर सर्व ठीक होईल आमचे मनात होते की ये प्रसंगी आईसाहेबासी खरे लटके बोलून सलूख करून त्याचे कागदपत्र समस्त सरदारास मोगलास घ्यावे या विचारे आणापा-समागमे दुराभिमान सोडून सागून पाठविले होते साप्रत दादोबा वर गेले या प्रसगी येमाजीपंतास धरावे ऐसे लिहिल्यावर धरले आता कल माजली गमाजीपंत खामखा फौज जमा करून येईलच तस्मात पेचपाचाने त्याचे कार्य नाश होईल तितका करावा आपण आपले जागा खबरदार राहावे येणेकरून आपले आहे ते तो जतन होईल जर श्रीने कृपा केली बाहेरील आब राहिला तर मग दोन महिनियाने घरातील हरयेक ताल्या-वर बसऊं[1]

---

ले. ३०७ श्री श. १६७३ पौष माघ वा। १ नंतर
इ. स. १७५१ फेब्रु.

* आसीर्वाद उपरी राजश्री दादोबा अदर्शी त्याणी जागा जागा रोखे चालविले की तुम्ही वसूल न देणे आमचा अमल आम्हाकडे चालता होतो म्हणोन तर त्याणी रोखे पाठविल्याचा मजकूर काय तुम्ही राजश्री गोपा-लराव यांस सागून आपला अमल जबरदस्तीने घेवणे त्याणी गोपालरा-याच्या अमलास नवदिगर करावे असी यांची जुरात काये त्याजपासी यैवज काये गोपालरायानी हिमत धरून आपला अमल करावा ठाणीठुणी किले खबरदार राखावें आईसाहेबी उदड गडकरास लिहिले तथापि बेगमी

---

१ सबंद पत्र नानासाहेबांच्या हातचें. जागा कोरी शिलक असून पत्र पुरें कां केलें नाहीं ?

करणे सरजाम चालवणे गोपालरायाकडे याणी विशेष आशा दाखविली अगर तुमचे बरे करू देऊ घेऊ म्हटले म्हणजे अर्थातच सर्व यांजकडे लागले त्याचे आईकतो कोण असे करावे ज्याचे त्याणे जबरदस्तीने या काली राखिले पाहिजे ऐसा प्रसगच प्राप्त आहे हे आसीर्वाद[1]

---

ले. ३०८ श्री श. १६७२ माघ वा १ नंतर
इ. स. १७५१ फेब्रु०

* चिरंजीव राजश्री नाना यासि प्रती बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे तुम्ही साडणीस्वारा समागमे बुधवारी पत्र रवाना केले ते रविवारी प्रातःकाली पावले दादोबा व अताजीपंत आईसाहेबी वर आणिले प्रथम वस्त्रे दिल्ही तोफा दोन केल्या आणापा आले परतु काही नीट दो दिवसातहि बोलली नाहीत परिछिन आम्हाकडील जाबसालावर मुतवजे नाहीत याउपरी चौक्या बसवतो गुप्त तो म्हणून लिहिले ते अवगत जाहाले ऐसियास दादोबा वर आले तर येकदाच किले वगैरे लगामी लागतात ऐसे नाही विज्यापूर प्रांत उद्दाजी चव्हाणानीच आटोपिला काही आम्हाकडे लागेल बाकी माण खटाव वाई कराड राहिले तेव्हडियावर किती फौज घेऊन कोणता मनसबा करणार गोपालरायाजवल वसंतगड आहेच चार पाचशे राऊतहि आहेत आपले जागा खबरदारीने बसले तर काय करणे आहे घानबानी जाऊन इसलामपुरात राहावे ज्यास ज्यास भय वर धरून नेतील असे असल त्यास सूचना करून आपले था(ठा ?)णे आटोपीत ऐसे करणे नाहक गरीब लोक बुडवावे ऐसे नाही गोविंदरायानी धीर पुरेल तर तेथे राहाणे नाही तर आपले हाते गडास राहावे येथे यावयास मन त्याचे उछाह धरणार नाही साप्रत आम्ही लाब चाललो तुम्हाजवल दोन अडीच हजार फौज आहे तिच्या चौक्या वाटणी करून तुम्ही ठेविल्यास रात्री दगा करून मावले येखादे चौकीवर पडतील दुसरे ऐशा चौक्यानी किल्याचे काय होणार आम्ही जवळ होतो तेव्हा सलाबत होती की आहेत यासी कजिया केलिया अणखी दाहा हजार पुण्याहून येतील अता तुमची पुस्तवानी तूर्त तुटली उगेच तुम्ही बाहेर वेणयचे काठी राहावे तर

---

[1] पत्र नानासाहेबांचें.

तेथे बसून काय करावे दोन तीनसे रावतानसी रामाजीपंतास तेथे ठेवावे येक पैसा कोणास देऊ नये तुम्ही दोन हजार फौज घेऊन दरमजल आम्हाकडे मोगलाचा प्रसग आहे ये समई हौसेने जवल असावे जर दो महिनियात सारी फौज येकत्र करून मोगलावर सलाबत बसऊन सला करून माधारे आलो तर त्या तेजानेच सर्व हतप्रभ होऊन आमचे विचारात येतील बाहेर विष्कलित कालगतीने जाहाले तर मग घरी कोण पुसतो बाहेरील घरातील सर्व मेलऊन येकदा मोगलावर सलाबत बसवावी आपले किले मात्र राहावे वरकड सर्व आशा दोन महिने सोडावी ऐसा विचार केला आहे तुम्ही तेथे न जुझणे जुझल्यास लौकीक वाईट होतो मर्दुमी करावयाची जागा नाही बाहेर मोगलासी जुझावे घरी खावंदासी जुझावे इकडे दाभाडियासी जुझावे हा मन[स]बा योग्य नव्हे येकासी बिघाड रगडून करावा ते कार्य जाहाल्यानतर दुसरे आरभावे हे युक्त मसलत जाणून लिहिले असे घरगती मजकुरामुळे केवल येथे यावयास कामास नच येई तर फौज पाठवणे तुम्ही पुणियास जाणे नाहीतर येणे येते समई आईसाहेबास सागन पाठवणे की सर्व प्रकारे मर्जीप्रा आणापा समागमे सागून पाठविले असता साहेबाचे खातरेस न येत तर आम्ही जातो घरी बसतो खातरेस येईल ते करावे हे आसीर्वाद

---

ले. ३०९ श्री श. १६७२ माघ वा १

इ. स. १७५१ जाने. ३१

*चिरजीव राजश्री नाना यासि भाऊ आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन केले पाहिजे विशेष तुम्ही पत्र तीर्थरूपाचे नावे पाठविले बुधवारचे त्यात दादोबा अंताजीपंत वरते रात्री आले दादोबा चोपदाराने पाहिले गोपालरायास सागितले असून बातमी न राखली आता आईसाहेबाकडे आणापा गेले त्यासी धातूपोषणा बोलतात मावले जमा करून आम्हासी कजिये करणार याचा विचार ल्याहावा त्याप्रो करून म्हणून लिहिले ते कलले त्याचे उतर तीर्थरूपानी पाठविले आहे त्यावरून कलेल साराष दाभाडियासी कामाची बोली करून बराबर घेतली ती सेवटपर्यंत लबाडीस आली नासरजंग मेलियामुले काम उत्पन

१ सर्व पत्र खाशांच्या हातचें.

जाले पधरा वीस लाख रुा मिळाले पुढे मोगल कमतनु दावाहि लागला सर्व एकीकडे गुडाळून मातबर फौज करून जावे जुझावे हेच प्राप्त जाले दाभाडे बरोबर आहेत हर इलाजे मागील फितूर तुटून चाकरीस बाा येत तेच करितो सुलतानजीचे पुत्र येका दो मजली जवळ पडेल यावयाचे बोलतात काय ते कळेल फतेसिग रघूजी चवाण पुढेच आहेत येतील या दिसात आणापा आईसाहेबाकडून निरोप घेऊन आले त्याप्रोच त्याचे मर्जीने वर्तावे आसे कबूल करून रवाना केले तुमचे लिहिलियात हरइलाजे होईलच यामुळे आस्ता सोडून मनसुबा आरंभिला पुढे आसे जाले तरी बाहेरील मातबर मनसुबा आवलंबिला तेव्हा आईसी कजिया न करावा दोन तीन हजार फौजेनेसी गड येत नाही आगर हमवार होणार नाही कजिया करून मागे लचाड आणि बदनामी मोठी येखादे दिसी राजे करतील आपले हाती काये आहे यास्तव फौज इकडे पाठवावी याविसी तीर्थरूपानी पर्याये लिहिले ते उतमच आहेत माझे मते तुम्ही पाचसातसे राहाल तेच कृष्णातीरी लाब राहून ज्याचे त्याचे हाते बळ धरावे आपण गोडच बोलावे की आपले विचारास येईल त्याप्रो करावे आमचा गुता काये आज घालमेल केली कोठे सेवटास जाणार लगाम राखून सैल सोडलिया राजा वाचेल सभाजी आणणार नाही विशेष कजियाचा लौकिक होणार नाही हे येक उतम आगर फौज घेवून इकडेच यावे रामाजी दोन चारसे गोविंद्रायाजवळ ठेवावे ज्याचे केले मोडतील त्याचा तोच चालू देणार नाही आपण आपले जागा मात्र खबरदार राहून असावे कनिष्ट पक्ष घरी जाऊन बसावे कामाचे नाही आईसी साफ बोलावे की तुमचे आज्ञेप्रो कबूल करून क्रियापुरसर आणापा आले आम्ही याउपरी कजिया करीत नाही चितास येईल ते करावे परतु केले चालवावे यात लौकिक उतम आम्ही निराळे नाही· आसे गोडच बोलून मोकळेच परिछिन सोडावे कजिया बाहेर मातबर आरंभिला असता तेथे कजिया दोन तीन हजार फौजेने केलिया होणे नाही लौकिक फटकल यास्तव गोडीच दिसे तिही चौघा सरदारास पत्रे पाठवीत असे करणे तुम्ही गोड बोलून पाचसातशे व गोपाळराव गोविंद्राव आसलिया भे नाही कजियाच पोकळ सोडावे दोरी राखलीसी दिसेल तुटके दिसणार नाही राहावयाचे युक्तीने ठीक नच दिसे तरी ज्याचे त्याचे गळा घालून जे हया (?) जाधव वगैरे येतील ते व आपली फौज घेऊन येथेच येणे यात तेथील विचार द्रिष्टीस पडेल त्या-

प्रो करणे परतु फौज आड लावून कजियावर येकदर न[ने]णे बाहेरील काम पुरते जाले तरी मग सारीच समजून घ्याल चिता काय आहे तेथे साडणी आसतील वरचेवर लिहिणे आठ दाहा रोज नादेडापर्यंत आहो

हे आसीर्वाद इकडे यावयास बाबाचा मात्र पेच आहे तोच बाळगलियास तुटकेसे दिसते याचे उतर तर सत्वर पाठवणे हे आसीर्वाद[1]

---

ले. ३१० श्री श. १६७२ माघ वा। २

इ. स. १७५१ फेब्रु. १

* चिरजीव राजश्री नाना यासी सदासिव चिमणाजी आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष देवरायाचे साडणीस्वारा बो पत्र पाठविले ते पावले लिहिला मजकूर सर्व कलला मल्हारबापासून डोईवरील पदर काढवणार निष्टेस आतर का करितील हा भरवसा आहेच तथापि पुर्ता शोध करून लिहिणे मनुष्याचे येणे येथून कसे होईल चिठीवर काम करावे बाबास सविस्तर तीर्थरूपानी लिहिले आहे त्याप्रो मल्हारबास समजाऊन सागावे शरीराचे वगैरे सर्व वर्तमान लिहून पाठवणे जयापाहि पुण्यास मल्हारबास घेऊन यावे यासाठी गेले म्हणून आईकले सविस्तर भाव लिहिणे आम्ही आदवानीहून काम उरकून पुढे चाललो जिकडे जाऊ तिकडे सर्व सातारियाहून चालीस पंनास गावे आहे लाब पला नाही सविस्तर मार्मिक प्रकारे खबर मात्र तुमची कलली पाहिजे रा छ १५ रालावल बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद बलवंत-रायानी बरे होऊन हरेश्वरास जाऊन नवस फेडून लौकरच यावे हे आसी-र्वाद दादाकडील विशेष वर्तमान येईल ते लिहिणे हे आसीर्वाद

---

ले. ३११ श्री श. १६७२ माघ वा। १

इ. स. १७५१ जाने. ३१

* चिरजीव राजश्री नाना यासी सदासिव चिमणाजी आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष तुम्हा-कडून गेलिया ता। पत्र येऊन वर्तमान कलत नाही तरी यैसे न करावे सदैव कृपा करून पत्र पाठवीत जावे कितेक मजकुरे लेहून दोन च्यार

---

१ पत्र भाऊसाहेबांचें.

पत्रे पाठविली आहेत त्याची उतरे सविस्तर लेहून पाठवणे प्रस्तुत आफवा आईकतो की बाबा प्रतिनिधी करणार मल्हारबा सेनापती जयापा सरळ-स्कर होणार बाबूजी नाईक साताराहून मल्हारबास आणावयास निघाले म्हणून खबरी आईकतो आम्ही मनसुबियाचे रीतीने सर्व लबाड आसे मानून पुढे जात आसो तर काय मजकूर तो सर्वांचे भावगर्भ मनसुबे होतात हे लिहिणे मल्हारबा कदाचित बिघडलेच आसले तरी त्यासहि समजाऊन सागोवे याविसी बाबास तीर्थरूपानी लिहिले आहे त्यावरून कलेल त्याप्रो करावे साराष सर्व कचा मनसुबियाचा डौल लिहिणे सक्रम-णचे तील आपले देखता चागले तयार करून आम्ही दिले तुम्हास म्हणून खाणे येथून पाठविले नाही बलवंतरायास देणे वरकड इष्टमित्रास देणे इकडे ( नवल ) विशेष वर्तमान त मा सा नाही मातबर सस्थाने पुढेच आहेत शरीर बलकट आहे जागा नाही प्रस्तुत नवरदेव आबा म्हणून येक शब्द लिहिला आहे राग न मानने मसकरी आहे सविस्तर आपले व मनसुबियाचे अर्थ लिहिणे रा छ १४ रालावल हे आसीर्वाद

रा बलवतराव यास साष्टाग नमस्कार सविस्तर वर्तमान लेहून पाठ-वणे तिलगूल नाना देतील तो खाणे येथून तेथचा काय मनसुबे सेवट कोणता हा सर्वाचा भाव लिहिणे येंदा मोठा सर्वाचा कस आहे ज्यास जे चागले दिसेल तो ते करील ज्याची जसी क्रिया त्यास ईश्वर फल करील आपली हिमत मात्र शाबूत आसावी आसो होईल ते लिहिणे कामच पडलियास बाबा देखील पुण्य स जातीलसे वाटते तुम्हीहि बरे लौकर होणे पुढे काम फार आहे हे आशीर्वाद

---

ले. ३१२ श्री श. १६७२ माघ वा। ७
इ. स. १७५१ फेब्रु. ६

* श्रियासह चिरंजीव राजश्री नाना यांसी माहादाजी अंबाजी आसीर्वाद उपरी येथील वर्तमान ता। माघ वद्य सप्तमी बुधवार परियेत येथास्थित असे विशेष तुम्ही रविवारचे पत्र पाठविले ते पावले लिहिले वर्तमान कलले दादोबास प्रतिनिधी सागितली मावले येवतेश्वरी बाजार पेडच्यावर अवातर जागा जमा होत चालिले किल्यावरून तोफाचा वगैरे

मार होतो व मातोश्रीचे बोलीचा आशयाचे वर्तमान लिहिले ते सविस्तर कळले येैसी तुम्ही सविस्तर श्रीमतास लिहिणे ते लिहिलेच आहे तेथील उतरे येतील गोविद्राऊ गोपालराऊ नलगे तेव्हा हे येज्यमानासहि इष्टच आहे तथापि मातुश्री धनी त्यासी केवल श्रीमंत विरुध करितासे नाही का की विरुध केलिया सेवटास जाणार नाही दुसरे यासी जे दिल्हे ते शास्वत आहे वरकड कारभार त्याचा ती करू . म्हणतात तरी सुखरूप करितील मातबर थोरवट जो होणे तो श्रीमंताच्या मता खेरीज त्याणी करीन म्हटल्या सेवटास कोठे जाणार आहे यास्तव याच्याच विचारे करितील किरकोल त्याणी केला तरी करूत याप्रमाणे उभये पक्षी विचारावर येऊन करितील तुम्ही तेथे जे विरुध कराल ते तुमचेच पद्री मूर्खपण कराल लोक तुमच्या विचारे राहातील पेचात पडतील मातुश्री धनीपणे त्याचा अकस करू लागतील तेव्हा तुम्ही कोठपर्येत साभाल करणार यास्तव तूर्त अणापा सारिख्याबराबर सामोपचारेच सागोन पाठवावे की तुम्ही धनीच विरुध का दाखविता श्रीमंताचे उतर येई तावत्काल क्षमा करा तदुतर जे कर्तव्य ते करा श्रीमंत तुम्हासिवाये नाहीत जे करणे ते त्याची आपली मर्जी मेलवून करा गोविद्राऊ गोपालराऊ याचा मजकूर तर त्याचा काही अन्याये नाही तथापी तुमचे खातरेस न ये तरी तेहिविशीचा निकाल जसा विचारे होईल तसा केला जाईल असेहि असोन विरुधच करू म्हणाल तरी संभाजीराजे यासी आम्ही आणिले यर कोण नको म्हणतो आपण किल्यावर बसली तऱ्ही काही होणे नाही अखेर जबरदस्त आहेत असे गरम नरम सामोपचारे सागोन पाठवावे तूर्त कलह दूर होये ते करावे साराऊष मातुश्री बलावली याउपर श्रीमंताहि त्यासी घासीत नाहीत त्याहीमधे गोपालराव गोविद्राऊ याचा उच्छेद जाहाला व येमाजीपंताचे हाती सर्व लागले हे परम ईस्ट जाहाले याउपर मातुश्रीसी श्रीमंत कलह कदापि करीत नाही तुम्ही करू म्हणाल तरी तुम्हीच वाईट दिसाल दाटून लोकास बदलाम——आपण मुडदार असे का करिता लीनतेने सामोपचारे कलह दूर होये ते करणे त्याहीमधे तुम्हापासी सामान थोडे अभर्वसी पडाल त्यात जीव नाही तरी सामोपचारे कलह दूर होये ते करणे त्याचे केवल शाकभाजी डुभते तुम्ही मना केले असेल ते मोकले करणे पुढे श्रीमंत काये विचार करितात कसी आज्ञा करिता[त] ते पाहून त्यासारिखा विचार करणे

बाहेर राहावे हे उतम शहरात घोडमैदान नाही रात्रीवर्ती दगा करितील यास्तव तेथे रामाजीपंत गोपाल गोविंदराऊ खंडेराऊ जाधव याच्या विचारे मानमार्ग पाहून राहावयाचे झाले तर राहाणे रिकामी होरड करून फसाल तरी येसे न करणे वर्तमान वरचेवर लिहीत जाणे रा छ १९ रावल मगलवार मध्यरात्र हे आसीर्वाद राजश्री रामाजीपंत यासी नमस्कार रात्रदिवस सावध राहाणे रिकामी होरड न करणे हवेलीत राहिल्याने चिंता नाही असे सर्वांचे विचारे जाहाले तर राहाणे नाहीतर बाहेर राहाणे फौज बाहेर तुम्ही हवेलीत यामुले फौज अवाई निराली होईल तुम्हावर निराली होईल दोन्ही सोसणार नाही रात्री अडचणीत पायेच्याचा माना उतम तुम्हास विरुध त्याहीमधें तुम्ही अगोधर मावल्यासी कलह केला हे दुख त्यास आहे तरी दोन्ही अवाया सोसेत असे आसिल्यास हवेलीत राहाणे नाहीतर लटकी इरे मनात आणून हवे[ली] कसी सोडावी म्हणाल आणि फसाल तर कामाची गोष्ट नाही उतर सविस्तर पाठवणे हे विनती

---

ले. ३१३ श्री श. १६७२ माघ वा ८
इ. स. १७५१ फेब्रु. ६

*चिरंजीव राजश्री नाना यासि बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहिणे विशेष तुम्ही पत्र छ १४ रालोवलचे रिकीबदाराबर पाठविले ते छ २० मिनहूस पावले लिहिला मजकूर कलला आईसाहेबाचे पत्राचे उतर पाठविले ते पावले सर्व कापटच्य भाव असो रिकीबदारास इनाम देऊन रा केले असेत * छ २१ रविलोवल हे आसीर्वाद

---

ले. ३१४ श्री श. १६७२ माघ वा ८
इ. स. १७५१ फेब्रु० ७

*आसीर्वाद उपरी दादोबा अंताजीपंत गडावरी चढले ते येमाजी-पंताचे विचारे चढले स्वामी येमाजीपंताचे गोड गोष्टी मायावीपणावर जातील तर न जावे त्यास पूर्ववतप्रो ठेवावे म्हणोन लिहिले ते कलले ऐशांस दादोबा अताजीपत्त गडावरी गेले तर काये चिता येमाजीपंत वल-वल करणार होते त्यास आम्ही पध्यावरी येके पर्वतावरी ठेविले दादोबा

अंताजीपंत कितीकसे मर्द माणोस व आकलेचे सागर आहेत ते कललेच आहेत परतु पहिले येमाजीपंतास धरिले याचा प्रकार निराळा होता हाली आम्ही यास धरिले ते आईसाहेबास दुराग्रह पडावयाचे आहे आईसाहेबास अड घालावयास जागा जाली असो येकवेल धरले सोडले हाली धरले सोडावे हे होत नाही दादोबाचे आमचे हाडवैर पडले असो अंत:पर होणार ते होईल पाहातच आहो या उपरी गोविद्राव आमचा संशय मानतील तर मानोत आम्ही नि:सदेह करणे ते करितो छ २१ रबिलावल हे आसीर्वाद

---

ले. ३१५ श्री श. १६७२ माघ वा ८
इ. स. १७५१ फेब्रु. ७

*आसीर्वाद उपरी येथे खर्चास यैवज नाही फारच तारबल हुजरातचे लोक विना दिल्या खेरीज कसे लगामी लागतात तथापि आम्ही पचवीस हजार रुा कर्ज मेलऊन हा कालवरी जसे तसे चालविले राजश्री—चे पोत्यात रुा आहेत आहेत परतु आज्ञे खेरीज रुा घेवत नाही येविसी काये आज्ञा म्हणोन तर रुा याचे सकट अवरगाबादेस काही यैवज मिलाला याजपैकी पनास हजार रुा तुम्हाकडे रा करविले त्याणी आपले लस्करचा व किरकोल खर्च चालवणे राजश्रीकडील चागले माणोस आपले कार्याचे असेल व लगामी लागल्यास उपयोग त्यास राजश्री—च्या पोत्यातील रुपये काढून देणे गैरसाल कवडीचे कामाचे माणोस त्यास काही न देणे राजश्री आईसाहेब गडावरिती खाली आलियावर देतील ऐसे म्हणोन टाक देत जाणे ऐसे करिता च्यालीस पनास राजश्री—चे रुपये चागल्या माणसास खर्च जाल्यास चिंता नाही तुम्ही जेथे राहाल तेथे राजश्री—ची वस्तभाव आदीकरून जतन करून ठेवणे *छ २१ रबिलावल हे आसीर्वाद.

---

ले. ३१६ श्री शके १६७२ माघ वा ९
इ. स. १७५१ फेब्रु. ८

*आसीर्वाद उपरी

दर्याबाईचे पथक इकडे पाठऊन गोविद्राव याजकडील रघोजी द्यावे ते येथे फार उपयोगाचे आहे खिरसागर यास स्वामीनी आणविले

---

१पत्र नानासाहेबांचें.

त्यास पाठऊन द्यावे म्हणोन लिा ते कलले * तूर्त तेथे पोटास त्यानी कोठील खावे फतेसिगाकडील आपाजी परभूची त्याची कटकट जाहाली याजमुले गिरफदारीत आहेत ते तयार होऊन येत होते त्यास आम्ही ठेऊन घेतले म्हणोन लिा ते कलले ठेऊन घेणे

छ २२ रबिलावल हे आसीर्वाद

---

ले. ३१७ श्री श. १६७२ माघ वाा ९
इ. स. १७५१ फेब्रु. ८

*आसीर्वाद उपरी पुराणीक व आईसाहेबाचे विचारे गडकरी फार त्यास खाली युध्यास म्हणोन पाठवावे फिरोन वरते न घ्यावें असी तजवीज केली आहे गडकरी खाली येत नाहीसे वाटते म्हणोन लिा ते कलले तुम्ही हरहुनरे गडकरी यांस सांगून खाली न येत ते करणे खाली आलियास गड तुम्हास प्राप्त होणार नाहीं यैसे सागून गडकरी लागत त्याचे काम नासे ते करणे छ २२ रबिलावल हे आसीर्वाद

---

ले. ३१८ श्री श. १६७२ माघ वाा ९
इ. स. १७५१ फेब्रु० ८

चिरजीव राजश्री नाना यासि बालाजी बाजिराव प्रधान आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहिणे विशेष राजश्री सिदोजी थोरात यांजकडे रा येसाजी भोसले याज बाा नव खेडी आहेत त्याजकरिता तुम्ही उपसर्ग करिता म्हणोन कलले ऐशास सिदोजी थोरात मातबर मनुष्य या समयात मातबराचा लगाम आपलेकडे असावा यांजकरिता व राजश्री वरते अडकताच आष्टियाची गोष्ट सोडली ऐसे असोन तुम्ही नवा गावाचा उद्योग व येसाजीचे मुलाचा पक्ष करणे काये उचीत होते अतःपर आष्टे व नव गाव तूर्त याजकडेच ठेऊन त्यास आपले लगामी लावणे सारांश हा समये असाच आहे कोण्हाचा पक्ष अथवा तटीण गोष्ट न लावणे रा छ २२ रविलोवल उमदा कर्ता जो आहे तो ये समई खामखा लगामी राखलेच पाहिजेत हे आसीर्वाद

---

१ पत्र नानासाहेबांचें. २ यापुढील मजकूर खाशाचा हातचा.

ले. ३१९ श्री श. १६७२ माघ वा। १०
इ. स. १७५१ फेब्रु. ९

आसीर्वाद उपरी आईसाहेबी हवालदाराची दादोबाची आण प्रमाण केली चंदन वंदन परेली महिपतगड दादोबाचे लगामी आहेतच आईसाहेबी राजश्री संभाजी राजे याजसी सूत्र लाविले त्यास इतबार न ये म्हणोन पुन्हा इतबाराच्या गोष्टी सागोन पाठविल्याचा मजकूर विस्तारे लिहिला तो कलला असो आईसाहेब आपली धावत असेल तेथवरी करितीलच सरदारास व मोगलास पत्रे पाठविली याचे वर्तमान लिा ते कलले सारांश संभाजी राजे यांस आईसाहेबाचा इतबार प्रत्यक्षच नाही ते येणार नाही व त्यानी न यावें येविसी लिहिले व तुम्ही तिकडून रा। विसाजी नारायेण यांस लिहिणे म्हणजे ते त्यास सागतील छ २३ * रविलावल हे आसीर्वाद

---

ले. ३२० श्री श. १६७२ माघ वा। १४
इ. स. १७५१ फेब्रु. १३

पौ छ ६ रबिलाखर

आसीर्वाद उपरी सातारियाचे कर्तव्यतेचा व गडकरी व मनसुबे क र्ते अ या स पावयाचा अर्थ विस्तारे लिहिणे तो दोन च्यार पत्री लिहिला आहेच त्यास वाडियातून राहाणे रात्रदिवस धोका वागवणे हे गोष्ट युक्त पडत नाही यास्तव वेणेवर यावे राहावे हे लिहिलेच त्याप्रो करणे तो विचार केलाच असेल जर प्रस्तुत झुज जाहाले यामुले गडकरी वरते गार होऊन वलवल राहावयास आली असली आणि तुम्हास तेथेच राहावयास अव पुरला असिला तरी बरेच परतु येका दो दिवसाचे राहाणे नाही दोन महिने तीन महिने कालहरण करावे त्यास कुमक पोहचू देऊ नये याचे बाहेर जाऊ देऊ नये भाजी पाले वगैरे सर्व दूर राहोन बंद करावे आपण कहीकाबाड भोवताले करावे गमाजी या[चे] कोण्ही वरते जावयास येतील त्याची बातमी राखोन खूब पारपत्य करावे की पुन्हा बाकी न राहे म्हणजे त्याची गुज मोडत मोडत मोडेल आपले पल्यावरी येतील यद्यपि न येत तरी इकडील गुता दो ती महिन्यात उरकून आम्ही फिरो मग जसे देखू तसे करू तोपर्यंत या प्रकारे

---

१ पत्र नानासाहेबांचें.

आपले बच्याव करून त्यास तो चेन न पडे· काम तो होऊन येईल लोका[त] तर आपण झुजतो यैसे न दिसे आणि झुजण्यापेक्षा मोर्च्यापेक्षा तो आधिक होऊ नये ते करावे शहर वोस करावे आणि सडसडीत असावे हाच उत्तम विचार याप्रो केलियास राजश्रीचा खजना व जव्हायेर वगैरे जे काही खाली असेल ते कूल त्याचे जामदार वरते राखोन आपले ज[व]-ळ आणून पुणियास निराळे ठेवावे राजश्री स्वामी या गोष्टीवर उतावळे होतील तरी त्यास आईसाहेब नेतील आह्मास शहरात राहाता बनत नाही यास्तव याप्रा केले स्वामी खाली आलियावरी हजर आहे यैसी निशा करून * मातुश्रीच्या हाती काही न लागता निधे ते करणे येविसी विस्तार वरचेवरी लिहिलाच असे छ २७ रबिलावल बहुत काय लिहिणे हे विनती[1]

---

ले. ३२१ श्री श. १६७२ माघ वाा ३०
इ. स. १७५१ फेब्रु. १४

आसीर्वाद उपरी राजश्री स्वामीचा पैका व जवाहीर व थोरले बाईचे व धाकटे बाईचा पैका व जवाहीर खाली आहे त्याजवरी राजश्री— —नी चोकीदार ठेविले आहेत त्यास उतम प्रकारे सागून पैका व ज[वा]हीर इत्यादि असेल ते कूल तुम्ही जे जागा राहाल तेथे घेऊन जाणे चोकीदार तुमचे सागितले नाईकेत तर पारपत्य करणे त्यात सात पाच लबाड आहेत त्यास ठिकाणीच लावणे पैका जवाहीर तुम्ही आपणा-जवळ आणून त्यापैकी लक्ष रुपये आपलेजवळ ठेवणे वरकड कूल पुण्यास लाऊन देणे जामदार पहिले असतील ते त्याजबाा दखलबंदीस पैक्या व जवाहिराबाा पाठऊन देणे राजश्री त्रिबकराव विस्वनाथ यांस लेहून नि-राळेच येक कोठडीत ठेवणे मुख्य गोष्ट आईसाहेबाच्या हाती येक रुपया अगर तोळाभर रुपे सोने हाती लागो न देणे सर्व पुण्यास लाऊन देणे खबरदारीने लावणें लक्ष रुपये ठेवाल त्याचा खर्च मायेचे व आपले उप-योगाचे हुजरातचे माणोस असेल त्यास रोजमरा देणे व नवे पाच सातसे अढळाचे चागले राऊत ठेविलेत तर त्यास व पाच सातसे हशम चागले ठेवाल त्यास रोजमरा देणे लिहिणे पढणे राजश्री येशवंतराव याजपासून

---

१ पत्र नानासाहेबांचें.

लेहवीत जाणें गडकराचे हाती कवडी खालील लागो न देणे *राजश्रीचा ऐवज सर्व खालील तुम्ही आपले श्वाधीन ठेवणे येक दोन जुने जामदार व लिहिणार ठेवणे पुढे राजे खाली आलियावर त्याचे हवाली करावे लागेल तूर्त लाख रुो मात्र काढून काम चालवणे त्याचे ऐवजातील खर्चवेच त्याजकडील पानगावचे व हुजूरचे लोकास खर्च करणे छ २८ रबिलोवल हे आसीर्वाद

पो छ ६ रबिलाखर

---

ले. ३२२ श्री श. १६७२ माघ वा ३०
इ. स. १७५१ फेब्रु० १४

आसीर्वाद उपरी तुम्ही पत्र छ २२ रालावलचे देवरायाचे साडणीबाा रवाना केले ते छ २९ माहे मजकुरी परली-वैद्यनाथानजीक पावले सविस्तर पर्याय लिहिले त्यात भावार्थ हाच कीं आपलियासी मातुश्री तूर्त जाले कारभारी त्याची कुशामत करून मोकले सोडले तरी राजाज्ञा तीन लाखाचा सरंजाम मिलतो फौज रिकामी होते परतु पुढे जड बलाऊन जड पाडावे हे तजवीज आहेच तूर्त गोविंदराव गोपालराव येशवतराव यास लाऊन घ्यावे आपलेकडे येतील आगर निक्षून पुढे जड बलावेल याचे पारपत्यच करणे तरी तसेच ल्याहावे सामान पाठवावे म्हणून व राजश्री—चे निखालसेतेचे व लोकाचे सर्व भाव मावले याचे फोडा फोडा करितो त्याचा ताल पडू देत नाही म्हणून तावार मजकूर लिहिला तो कलला ऐसियासी याची उतरे सर्व आर्थ चितात आणून दोन तीन पाठविली ती पावलीच आसतील त्याप्रो करणे तुम्ही येक दोन पत्रे आलीकडे पाठविली यात भाव की येमाजीपत आपले जवल प्रतिष्ठेने गोविंदरायाचे ठाई आवकृपा आईसाहेबासी सटाबटा करून फौज लौकर पाठवावी येविसी दोन चार पत्रेहि गेली तूर्त आपले आहे ते करार करितात पुढे करितील तर करोत आपले जबरदस्तीवर चालणे ते चालेल तूर्त कालाजिया करावा आपले गोविंदराव गोपालरायासाठी इतके काय म्हणून लाबवावे म्हणून कितेक प्रकारे चितात संदेह आणून लिहिले ऐसियास आईसाहेबासी विरुध न वाढवावे आसा मजकूर आणापा बोलून आले पेच न राहिला मग का करावा म्हणून फौजेविसीहि लिहिले येमाजीपंताचे बारीक भाव

१ पत्र नानासाहेबांचें.

दिसतच होते परतु आमचे सोबतीस दौलत मिलेल द्रोह घेऊन परिणाम नाही म्हणून न करितीलसे वाटत होते प्रस्तुत सर्व प्रत्यास आलियावर मोकले सोडले तरी कामाचे नाही आज आम्ही केले प्रतिनिधी मोडले उद्या सर्वास घालमेली करितील हे कामाचे नाही म्हणूनच येमाजीपंतास कावनईस रवाना केले करावयाचे प्रकारहि लिहिले तूर्त मोगलाचा मनसुबा फौज वारी नये घरीं सर्व पेच ठाऊक परंतु बाहेर लौकिक राजे आइ वर आसून गडास मोर्चे व आवाईतवाई हजार दोन हजार फौज गमाजीनें जथली व मावले जाले तरी मार खाऊन टिकणार नाही येकजण पुण्यात आसतो तरी पावभरी आसती तेहि नाही यास्तव दोन कोसावर राहून बाहेरून फिरोन जमाऊ पडू न द्यावा सापडेल ते मारावे खालील दोन च्यार कोसी किलियाचे गाव नाहीसे करावे गमाजीची बातमी राखून तोडात टाकावे तीन हजार फौज तुम्ही गोविंदराव आणखी हजारपर्यंत येकूण च्यारपर्यंत आसलिया आपले राकून मुलूक पाठीमागील राहून त्याची नड बलावणार नाही पुढे आजमासेच दोन महिनियाने निकाल पडेल या भावे करावयाचा मजकूर लिहिला आहे त्याप्रो करणे तुम्हास फजीत पाडून आम्ही पुराणकाचे पाया पडू हे कसे होईल होणार नाही पुर्ते समजणे येमाजीपतास ठेविले संदेह गोविंदरायानी का मानावा केवल मोकले सोडले तरी आमचे लोकास पेच जड बलावेल यास्तव लिहिलेप्रो करणे त्याची जड बलावेल त्याची फोडाफोड देऊन जबरदस्तीने उमेदवारीने जसे जेथे पडेल तसे करून तोडावी आपण चौकीस नसलिया मोकले कोणाचेहि भे [भय] नाही राजश्रीचा खजाना आपले जवल आणून पुण्यात त्याचच जामदार ठेऊन आमानत ठेवावा लाखपनास मात्र खर्चास घ्यावे दोन तीनसे लोक हजार पाचसे माणूसहि मिलेल ते ठेवावे येकूण आपले जागा संदेह आणून लिहिता ते दूर करून लिहिलेप्रो बहूत हिमतीने खबरदार राहून करणे छ २८ रबिलावल हे आसीर्वाद*

---

ले. ३२३ श्री श. १६७२ माघ वा ३०

इ. स. १७५१ फेब्रु० १४

*आसीर्वाद उपरी सातारा राजश्रीचा ऐवज त्याचे खाती लागून द्यावा अनामत ऐसे सर्वास दिसे याप्रकारे ठेवावा राजश्रीस सागून पाठवावे

---

* पत्र नानासाहेबांचें; लेखक भाऊसाहेब.

की गोल्यांचा मार खाऊन काम होत नाही बाहेर राहावे लागते हा सर्व ऐवज आईसाहेब घेऊन दादोबास व मावल्यास लोक ठेवावयास देणार यास्तव आम्ही अनामत ठेवितो स्वामीनी वितर्क न मानावा खबरदारीने गडबड न होता येणेप्रा सावधतेने तफर्का काडीचा न होता करणे नाहीतर सर्व आईसाहेब नेतील मनास येईल तसा खर्च करू लाग-तील सर्व आशाबध आहेत जिकडे पोटभर मिलेल तिकडे होतील यास्तव हा ऐवज सर्व खालील त्याचे हाती लागू न देणे तुम्ही वेणेवर राहावे बैल दाण्याचा येक जाऊ देऊ नये सेते गडकरी याची तमाम कहीकरवी लुटवावी नुस्ते शहर फार करून वोस जाहालेच आहे बाकी राहील तेहि वोस होईल तुम्ही वेणेवर राहावे येखादी फौज पाचसे सातसे येऊ लागेल तिचे पारपत्य करावे मावले बरकंदाज दोन तीनसे चाकर ठेवणे व त्रिबकरायास लिहून तिकडूनहि हशम आणवावे पलीकडील आंगचीही बातमी राखणे चोर छपी जे अणखी कोणी खाली त्याचे येतील ते मारावे मोठे भय गोल्याचे तो मार चुकाऊन तुम्ही राहिल्यास मग त्यानी काय करावे जे जे खाली उतरतील तेथे धाऊन जाऊन मारावे अगदी मोकले सोडले तर ती म्हणतील की दादोबाचे सलाबतीने इतके जाहाले केवल वेढा घालावा तर सामान तूर्त तुम्हाजवल थोडे नवी फौज या दिवसात येत नाही थोड्या सामानाने माहा व्याप केलिया फजीत पावावयाचे होईल यास्तव बाहेर राहावे ऐसे लिहितो तुम्ही पत्री लिहिता की जागा सोडीत नाही त्यास आठ पंधरा दिवस मार सोसल्याने काय केवल होत नाही असे असता का जाया व्हावे जे जे जवल राहून करावे तेच काम बाहेर राहून करावे याउपर आपले पक्षीचे लाहान मोठे असतील त्यानी शहर सोडावे हेच उचीत आहे तुम्ही शहराबाहेर गेला याजमुले चढी लागून खाली शहरात मावले व काही स्वार राहू लागले मागती तुम्ही सव[ड] फाऊन येकायेकी जाऊन मागती मारले तरी कामास येईल शह-रचा ताल गेलाच जो जो तुम्ही राखीत फिरता तो तो तुम्हास भारी पडते ती राखणार तुह्मी लुटणार ऐसे जाहाल्यास काय काय राखतील जर तुम्हाजवल सामान मातबर असते तर तेथे राहावयाचे लिहितो आताहि तुम्हा माहिताचे मते सामान तितक्यानसी हवेलीत राहिल्यास धोका नाही कार्य होते ऐसे असले तर न कले परतु आमचे मते हेकडपणे धाडस

केलीया कार्य न होता येखादे समई दगा मात्र खावा यास्तव वारवार लिहितो की त्याचा दाव मार आपणावर न चाले आपली स्वारीसिकारी दबा त्याजवर चाले या प्रकारे महिना पंधरा दिवस राहावे पुढे इकडील कार्य श्रीकृपेने येके थरावर बसल्यावर जसे करणे तसे करावे आमचे मते आईसाहेबाकरवी आपले आयकऊन उतम प्रकारे सेवा करावी ती नच आईकत चढी लागली तर रुसव्या दाखल असावे जे जे आपले पक्षीचे आहेत त्याचे सा(हि)त्य करावे ज्यास जे पोटास दिल्हे आहे तो आपले बले व आमचे साहित्याने खातच आहे केवल ज्यास नाही व कामाचा माणूस त्यास राजश्रीकडील देणियाचे ऐवजी पोटास देऊन ठेवावे नित्य आमची जरब सभालिताच त्यास पुरे होय ऐसे करावे छ २८ रबिलावल हे आसीर्वाद[1]

---

**ले. ३२४** श्री श. १६७२ माघ अखेर
इ. स. १७५१ फेब्रु.

* आसीर्वाद उपरी मातुश्री आईसाहेब यांची व रा आणापाची बोली परस्पर सालजाब जाहाल्याचा अर्थ विस्तारे लिहिला तो कलला ऐशांस ती धनी आहेत त्यास उचित दिसल ते करितील आम्ही आपले निष्टस अंतर न केले व न करू तुम्ही त्याचे केले येकदर न चाले पायेमल होये ते खामखा करणे इकडील मातबर मनसबा उरकलियावरी ते पाहून घेतच आहो तुम्ही फार सावध राहाणे त्याचा मार तुम्हावर न बसे ऐसे जागा नसून गरम नरम बोलणे चालते तेच उतम आहे हे आसीर्वाद

---

**ले. ३२५** श्री शके १६७२ फाल० शुा १
इ. स. १७५१ फेब्रु. १५

* आसीर्वाद उपरी बाजार पेठ्यावर गडकरी उतरले त्याचे पारपत्य गोपालरायानी व चिमणोबाचे लोकानी उतम प्रकारे केले नामोहरम जाहाले तोडाने नम्र बोलत आहो उतराची प्रतीक्षा करीत आहो म्हणून विस्तारे लिहिले ते अवगत जाहाले ऐसियास जितके सामान तुमचे तेथे आहे तितक्याने टिकाव शहरात हवेलीत न होय गमाजीमत ही येतील मग झुझून वेडेपणे मरावे तर ते गोष्ट नुस्ते सिपायगिरीचा आपला भर

---

[1] सबंद पत्र नानासाहेबांच्या हातचें.

बळाचा जाणून हरयेक मनसबा करावा हे उचित या अर्थे वेणेवर राहावे वरचेवर दाणा गला जाईल तेथील पारपत्य करावे गडकरी याचे गाव लुटावे शहरास आपले तर्फेने निरोप द्यावा ऐसे केलिया त्याचा दगा तुह्मावर न चाले या अर्थे लिहीत आहो तेथील प्रसंगानरूप तुम्ही येकदोनदा मोडले याजमुळे शहरातच टिकाव होता ऐसे दिसले तर शहरात राहाणे परतु गमाजीपताचा शह पडल्यास बाहेर निघूनच जुझावे लागेल परतु शहर त्याचे हाती लागल्यास दुपारा सकाळी रात्री साजे राऊत व हशम ठेऊन दाणा ब सामान जे जाईल ते मारावेच लागेल पालीनसार गडा भोवत्या चवक्या बसवाव्या लागतील तेथील प्रसंगानुसार तुमचे गोविंदरायाचे विचारे होईल ते करणे राज्याचा खालील ऐवज तुम्ही सहसा त्याचे हाती लागू न देणे चाळीस पंनास खर्च करून हुजूरचे लोकापैकी मर्द कामाचे माणूस आपले लगामी पोटास देऊन ठेवणे वरकड बुनगे त्याचे पाठीमागे खावयास आठ (?) गडावर होय ऐसे जाहाल्यास उतमच आहे गोपाळरायास पालखीचा मजकूर लिहिला त्यास योग्य आहे सुखरूप पालखी देणे घटकेत फार रागे घटकेत मेहेरबान ऐसे न करणे भारीपणे जे सेवटपावेतो कार्य जाहाल्यावर जेक्ष सरणे ते करावे काही बरकंदाज हेटकरी व काही नादनी इचलकरजीजवळ थोड्यादे चांगले आपल्याजवळ आणवणे फार कामे करितील मामासहि ५।०. ज्यास लिहिले आहे तेही काही लोक पाठवितील आपल्यावर जरब न बसे ऐसे संमजून सावधतेने त्यास नामोहरम करीत जाणे आम्ही लाब चाललो अतःपर केवल लिहिल्याप्रो कर्ता बनत नाही विचार तुम्ही ईश्वरावर भर ठेऊन सलूख बिघाड जसे पडेल तसे करणे लेकूरपण मात्र न करणे तोडाने आईसाहेबासी गोडच बोलत जाणे जे जे तुम्हाकडे ऐसे दाखऊन तिकडे अतर्यामी असतील ते लिहून पाठवणे छ २९ रबिलोबल हे आसीर्वाद

---

**ले. ३२६** श्री शके १६७२ फाल्गुन शुा २

इ. स. १७५१ फेब्रु. १७

* आशीर्वाद उपरी सातारियास मातुश्री आईसाहेबी हंगामा केला मावळे लोक जमा त्याचे पारपत्य केल्याचा मजकूर विस्तारे लिहिला त्यात

---

१ सबंद पत्र नानासाहेबांच्या हातचें.

मुख्यार्थ हाच कीं स्वामीनी आम्हांस सारी फौज घेऊन यावयाची आज्ञा केली त्याजवरून आम्ही फालगून सुध द्वितीयेचा मुहूर्त पाहिला आम्हांसहि झुझ भाडण पहावयाची हौस आहे परंतु आम्ही येथून तिकडे आलियानी येथील सर्व लक्षे सुटती(ल) आईसाहेब बळावतील हशम व स्वार जमा करितील मग स्वामीस भारी पडेल गड कोट किले त्याचे लगामी लागतील जे द्वामुशायेण आहेत ते त्याजकडे जातील कालच आम्ही गडकरियांचे व मावल्याचे पारपत्य केल्यावरून गडकरी आईसाहेबास व दादोबास वाईट बोलतात गडकरी श्रमी जाहाले आहे मावले रुसून गेले त्याजकडे आम्ही राजकारण लाविले गडावरील पाणी आटत चालले तेल तूप नासके दाणे अडीच पाइली जाले याजमुले लोक घाबरे होऊन किलबिलली गोविंद मोरेश्वर तुलाजी आगरे याजकडून च्यारसे स्वार आले त्यास दादोबानी आपले केले होते त्यास व मोहित्याचे पंचवीस स्वार आले होते ते लुटून घेतले त्याजवरून बरीच धाशत पडली आम्हास त्याणी धुडाऊन द्यावयाच्या पाच गोष्टी केल्या तितक्याहि निरार्थक होऊन खपीप जाली आम्ही आहो तसे दम धरून राहिलियानी आठा रोजात अनुसंधाने लागतील गडकरी राजा खाली आणून देतील आम्हीं येथून गेल्या राजा हातचा जाईल सर्व सूत्रे जातील स्वामीच्या लक्षाचे गोपालराव माहादेव व गोविंद-राव व येशवंतराव व नागोराव व खडेराव जाधव स्वामीकडे येतील तरी स्वामीनी पोख्ता विचार करून आज्ञा करावी त्याप्रो वर्तणूक करून म्हणोन विस्तारे लिहिले ते कलले ऐशास येविसीचा विचार विविक्तपणे पांच साहा पत्री तुम्हास लेहून पाठविलाच आहे व हालीहि लिहिला तो कीं तुम्हाजवल आहे फौज तितकियानसीच तुम्ही गडावरील सर्वांस नम्र करावयाचा अंगेज केला उतम केलें प्रस्तुत तुमची सलाबत वरल्यावर चढली आहे त्याकडे कमी आली या समयात भ्रमच राखून रुसवा उदा-सीनता दाखऊन तुम्ही वेणेवर राहोन खालील माणोस वरते जाऊ न दिल्हे वरील खाली येऊ न दिल्हे तसेच कुमकेस स्वार हशम लोक येतील त्याचे पारपत्य करीत गेला व भाजीपाले इत्यादि मना केली यानी तुम्ही म्हणतां तसे व्हावयास बहूत दिवस लागततसे नाही से पंनास स्वार व रामाजी माणकेश्वर तेथे ठेऊन तुम्ही सारी फौज घेऊन यावयाचे तुम्हास लिहिले होते खरच परतु दादोबा गडावरी गेले असता तो विचार युक्त

नाही तुम्हांजवळ फौज आहे ती घेऊन तुम्ही वेणेवर अडचणे जागा राहून लिहिलेप्रो पारपत्य निरतर करीत जावे दादोबा व अताजीपंत पुराणीक व रुस्तुमराव मोटे मर्दे अदमी कार्य कर्तेसे आईसाहेबाच्या ध्यानात आले होते त्यास गडकरी मावले याचे पारपत्य तुम्ही केले यांजवरून किंचित त्याचा हीर मोडला व चोघे निर्माल्य असे किंचित कललें समुली त्याचा हीर मोडून अंती नम्रता त्यानी धरून तुमचे तुम्ही आटोपा राजा खाली न्या ऐसे जाले पाहिजे ते तुम्ही सदरहू लिहिल्याप्रो देवाची दया आहे तरी तुम्ही करिता तो आम्ही मोगलाचा कारभार उरकून येतो मग जसे करणे तसे करू खर्चाविचाचा मजकूर तर तुमचे लस्करच्या रोजमरियास ऐवज पुण्याहून पाठविला आणिखी लागेल तेविसी तुम्ही राजश्री त्रिंबक-राव विस्वनाथ यास लेहून पाठवणे ते यैवज करून तुम्हाकडे पाठवितील हुजरातच्या बऱ्या माणसास व नवी काही फौज व हशम पाच सातसे ठेविले तर त्याचे खर्चास राजश्रीच्या पोत्यातून लाख रुपये आपणाजवल घेऊन खर्च करणे खर्च कराल तो राजश्री येशवंतराव याजपासून लेहवीत जाणे जामदार त्याचेच खर्चवेचास असो देणे साराश आम्ही विचार बाहेर राहून उद्योग करावयाचा लिहिला आहे हा फार कामाचा व सला-बतीचा सर्व तुम्हाजवल जिकडे म्हटले तिकडे पारपत्य करावयास तुह्मास विलंब लागणार नाही *भरवसा पुर्ता वाटला तरी हवेलीत राहावे नाहीतर वेणेवर राहावे दाणा गला तूप तेल जाऊ देऊ नये वरचेवर लुटावे चौक्या दोन तीन मजमूद ठेवाव्या दोन महिने ठासूनच राखावे राजश्रीचा ऐवज अनामत आपल्याजवळ ठेवावा आईसाहेबाचे हाती लागू देऊ नये अना-मत दाखल ठेवावा राजश्रीनीहि संशय तिलमात्र मानू नये ऐसे सागून पाठवावे काही हशम व राऊतहि नवे जरूर पडतील ते ठेवावे गाव गडी करियाचे लुटून टाकावे कोठे त्यास आव पुरू देऊ न[ये] हाच विचार तुम्हीहि लिहिला व येथेहि हाच ठहरला त्याचे प्रकार लिहिले आहेत बहूत सावधपणे तुम्ही गोविंदराव यशवतराव व सर्व मिलून करणे वरचेवर वर्त-मान कासिद अजुरदार त्वरेन पावत ऐसे पाठवीत जाणे छ १ रबिलाखर हे आसीर्वाद

---

[1] पत्र नानासाहेबांचें.

ले. ३२७ श्री शके १६७२ फाल. शुा ३
इ. स. १७५१ फेब्रु. १७

श्रियासह चिरंजीव राजमान्य राजश्री नानास प्रती माहादाजी आंबाजी आसीर्वाद उपरी येथील वर्तमान ताा छ १ राखर परियेत येथास्थित आसे विशेष तुम्ही गगू गिरमा यानबराबर पत्र पाठविले तेथे लिहिले की आम्हावर बदलामी दादोबा वर गेलियाची आणली याचा तपसील अलाहि [दा] पुरवणीत लिहिला आहे त्याजवरून कलल त्यास ते पत्र पावले नाही किवा विसरून तेथेच राहिले याचा शोध करून लेहून पाठवणे आथवा लिहिले नसेल तर हाली लेहून पाठवणे राजश्री येमाजीपंत श्रीमतानी धरले हे वर्तमान तुम्हास आगोधर कलले किवा आमच्या पत्रावरून कलले हे वर्तमान आईस व दादोबास कललियावर तेथील मनसुबा कसा जाहाला हे वृत तुम्ही किमपीहि लिहिले नाही तर सविस्तर लेहून पाठवणे पुढे आताजी दादोबा काय मनसबा करितात आईसाहेब काय विच्यार करितात हे कुदि या मनास आणून सविस्तर लिहिणे तुम्ही सदैव सावध आसणे घराबाहेर येकदर निघत न जाणे बहूत काये लिहिणे हे आंसीर्वाद

---

ले. ३२८ श्री शके १६७२ फालगून शुा ५
इ. स. १७५१ फेब्रु. १९

श्रियासह चिरंजीव राजमान्य राजश्री नानास प्रती माहादाजी आंबाजी आसीर्वाद उपरी येथील वर्तमान ताा छ ३ राखर परियेत येथास्थित आसे विशेष तुम्ही जासुदा समागमे पंत्र पाठविले तेथे आभिप्राय की आईसाहेबी येक आपला इतबारी आम्हाकडे पाठविला आहे मागे जे जाहाले ते तुम्ही चितात आणू नये आम्हीहि आणू नये पुढे दादोबा आताजीपंत याजला आम्ही निरोप देतो तुम्ही गोविंदराऊ येशवतराऊ याजला देणे आणि हा कारारमदार करणे आणिक कितेक मजकूर बोलिले पाहिजेत तर तुम्ही दोघे खिजम[त]गार घेऊन येणे मातबरीस बुऱ्हाणजी मोहिते आहेत तर येविषीचा विचार कसा करावा ते आज्ञा करावी म्हणजे तेणेप्रमाणे करू त्यास तुम्ही श्रीमंतास लिहिले आहे त्याचे उतर येईल तदनुसार वर्तुण[क] करणे तो परियेत उतावली सहसा न करणे तथापि आमचा विच्यार तर तुम्ही गडावर सहसा जाऊ नये म्हातारी मायावी आहे रामाजी

माणकेस्वर याजकडील मजकूर लिहिला तर तो आ छा दा व आस। नाही येथार्थ असलियास उतम रीतीने सासन करून पार पाडावे येमाजीपंत धरिले हे मातुश्रीस परम आसाध्य जाहाले यास्तव हजार प्रकारे माया करून तुम्हास वर बोलावील तरी तुम्ही सहसा न जाणे श्रीमंतहि तुम्हास गडावर जावयाविसी लिहिणार नाहीत तथापी कारभाराच्या लोभास्तव वरते जा म्हणून पत्र आले तथापि तुम्ही जावयाचे न करणे गोविंदराऊ येशवंतराऊ गोपालराऊ याणीहि वर जाऊ नये बावाजी पवार याचा मजकूर तर खरीच बायेको परटासी गेली असली तरी झाकावेसे नाही सचि...... ... मजकूर काही भारी वाडावासा नाही जसे तुम्ही सांगाल तसे यैकतील हे आसीर्वाद

———

ले. ३२९ श्री श. १६७२ फाल० शुा

इ. स. १७५१ फेब्रु.

[1]आसीर्वाद उपरी मावल्याकडे पेगाम लाविला त्यास फोडून आणितो गडकरीहि बोलो लागतील त्याजकडे अनुसधान लावितो वरकडहि जे जे फोडणे ते फोडितो म्हणोन लिहिले ते कलले तुमची सलाबत त्याजवरी चढली तुम्ही उद्योग करि तो तुम्हांस लिहिलेप्रा। करणे सर्वहि घडेल राजश्रीचा पैका भाडे जवाहीर सर्व तुम्ही नेऊन पुण्यास लाऊन देणे त्याचे जामदार असतील ते त्याजबा। इतबारी लावणे आपले लग्याचे ग्रहस्ताची माणसे थाग्याथाग्यानी लाऊन गडकराचे गाव व गीर्दनवाईचे गाव लुटून कहीकबाड करणे बहूत सावध राहून पारपत्य करणे जर तुमची जबरदस्ती शहरातच राहावयाजोगी पडली तर मग आहे तेथे असू देणे तुम्हास हवेलीत राहावयास न बनेसे जाहाले तर जामदारखाना राजश्रीचा उतम प्रकारे पुणियात ठेविलाच पाहिजे सावधतेने जितका रुपया मोहर सोने रुप्याची भाडी मात्र आपले स्वाधीन त्याचे जामदार लिहिणार ठेऊन ठेवावे वरकड उचलावयास आट कशास करावा हे आसीर्वाद

———

१ पत्र नानासाहेबांचें.

ले. ३३० श्री श. १६७२ फाल्गून शुा
इ. स. १७५१ फेब्रु.

* चिरंजीव राजश्री नाना यासि सदासिव चिमणाजी आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहिणे विशेष या दिवसात घरातील बाहेरी पेच नाना प्रकारचे उपस्थित जाले आहेत ते चितात न आणिता हिमत धरून खावंदाचे काम करावें यातच सर्व (प्र)कारे क्षेम आहे केवल गमाजीचे भय मानून पुण्यास याल तर——————गमाजी तुम्हास खातो ( या पुढील अर्धा बंद गाहाळ[1] ) पुण्याहून बाबा इतके उत्पातांचे प्रयोजन काय उठोन येणे आसे लिहितील परंतु काल नव्हे तेथेच दो तीहि कोसावर दूर राहून बदोबस्त करणे मोर्चे लाविलिया फौज फार पाहिजे लौकीक फटकल काम होणे नाही यास्तव बाहेर राहून केले मोडून जड बलाऊ देऊ नये केवल मोकले सोडले तरी बल पडेल येमाजी धरलियामुले आमचे चाकर लोक ढीग ते प्राती आहेत धराधर करितील यास्तव राहून करणे जरूर जाले करणे हे आसीर्वाद दादो(बा) वर गेलियामुलें गोविदराव सुधेच आसतील त्यासी नीट राखून काम करणे हे आसीर्वाद

---

ले. ३३१ श्री श. १६७२ फाल्गून शुा
इ. स. १७५१ फेब्रु.

आसीर्वाद उपरी इकडे उमदा मनसुबा प्राप्त झाला असता कोणासहि तिकडे येता येते असे नाही तीन साडे तीन हजार फौज राजश्री गोपालराव देखील तुम्हाजवल आहे गडास चोक्या न ठेविता खबरदार राहाणे गमाजी हजार राउतानी येईल त्याचे भये मानोन तुम्ही पुण्यास आल्याने नामर्दी तुमच्या पदरी येईल गमाजी आला तर काही तुमच्या फौजेस गिळणार नाही कलेल त्या रीतीने हिमत धरून पारपत्य करणे गमाजीसच तुम्ही ठिकाणी लाविलियास मग येतो कोण हवेलीत मात्र न राहाणे बाहेर खुले मैदानी अडचण जाग्यास राहून चहूकडील बातम्या राखणे गडकराची सेते भाते तुम्ही मलून आणणे आईसाहेब गडकरास खाली पाठवणार खाली आलियावर वरते न घ्यावे असा त्याचा विचार आहे तरी तुम्ही गडकरासहि सावध करणे की तुम्ही खाली उतरलियास वर न घ्यावे यात

---

१ यापुढील मजकूर खाशाच्या हातचा.

तुमचे बरे काये होते जाग्यापासूनहि सुटता ऐसे बोलोन गडावरहि फोडा-फोड होईल ती करणे किले कोट प्रतापगडासारिखे बोलोन चालोन देऊन घेऊन जितके लगामी लागतील तितक गोविंदरायाचे विचारे लाऊन घेणे आईसाहेबासी गोड बोलावे करण्या खुसपटे चितास येईल ती करून त्याचे केले धुलीस मेलवणे कोणेविसी संशये न धरणे राजश्रीचा पैका-टका जवाहीर आपले जवल कारभारी याचे मारफातीने आणणे सेभंर स्वार देऊन पुण्यास पाठवणे पनास हजार पावेतो खर्चास ठेवणे राजश्रीचे चागले माणोस जुझा भाडणाचे उपयोगाचे असेल त्यास मात्र पोटास देणे गेरी गढ्याळी माणसास न देणे ते त्याजकडे गेले तरी उपयोग काये तुमच्या खर्चास पुण्याहून पैका रा करविला तो रोजमरियास वगैरे खर्चास ठेवणे गावात राहीलिया गडावर जाईल खाली तुमच्याने जतन न होय गोटात तरी कारभारी याचे गुातीने पैका जवाहीर याद लेहून पंनास पाऊण खर्चास तेथे ठेऊन वरकड अमानत पुण्यास नेऊन ठेवणे तलेगा-वचीहि बातमी राखीत जाणे हे आसीर्वाद

---

ले. ३३२ श्री शके १६७२ फाल्. शुा

इ. स. १७५१ फेब्रु.

* चिरंजीव राजश्री नाना यासी सदासिव चिमणाजी आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष तुम्हाकडून आलीकडे पत्र येऊन वर्तमान कलत नाही तरी लेहून पाठवणे इकडील वर्तमान तरी भागानगराहून लिहिले होते आलीकडेहि सविस्तर लिहिले होते त्यावरून कललेच आसेल तेथून पाच सात मजली भागानगराचे रस्तियाने मोगलास आडवे आलो कृष्णे आलीकडे दो कोसावर मोगल आम्ही जवल आलो फतेसिग रघोजी सर्व सरदार सामील जाले नवाबाचे पुत्र याचे साहिल्यास येऊन वाईट करणे आपेशास पात्र म्हणून निकाल काढून सतरा लाख रुा पुढे कर्नाटकचा चौथाई वाजबी आमल त्रिचनापली भागानगर वगैरे बाकी या निकालाप्रो केले सर्व सरदार बा वागऊन काम जाले मागे गाईकवाडाचा वोढा न पडता तर आणखीहि काम होऊन दोन महिने पोट भरावयास कर्नाटकची सस्थाने होती प्रस्तुत याप्रो जाले

---

१ पत्र भाऊसाहेबांचें.

येका दो रोजात रघोजी फतेसिग यास निरोप देऊन बावा वराडात बर-घाटचे माहाल चुकऊन जातील फतेसिगबाबा आपले मुलकात दोन रोज फिरतील गाईकवाड गगा उतरून गेला मागे बापू वगैरे फौज आहे येकूण पुर्ता आवाचा माणूस कोणी नाही येकदा मोडले यास्तव त्यात नवे होतील तर भारी होतील यास्तव आम्ही दर मजल सारे फौजेने येतो आजपर्यंत तेहि तलेगावी येऊन सेनापतीस घेऊन साताराकडे जाणार बावानी आव धरला तर फौज बापू वगैरे आहेच तुम्हीहि गाईकवाड सातारा चालला तेथे होणे काय सारे येक होऊन पारपत्य घाटाखालीच गाठ घालावी सातारा जाऊ न द्यावा आसे केलेच आसेल बाबानी आज तेथे आसून चाकरी पडली आसता न केली तरी स्वरूप नाही बहुधा केले आसेल नाखुषीमुले न केले तरी तुम्ही तेथे आहा सारे जमा होऊन काम केले तरी पधरा हजार व्हाल आजपर्यंत जे होणे ते जालेच आसेल आम्ही मजल दर मजल येतो वरकड येथील सविस्तर दोन च्यार पत्रे तीर्थरूपानी पाठविली त्यावरून इकडील मनसुबा कलला आसेल मुरारराविहि आले त्याचे भेटीचा येका दो रोजाचा गुता आहे तो जालियावर पधरावे रोजी पंढरपुरामाजी येतो साराष मातबर फितूर गाईकवाडाचा आहे त्याचे निरा-करण जाले पाहिजे घाटामाजी सारे जमा होऊन बरेंवजेने ठास देणें कदाचित सेनापतीस घेऊन माघारेच गेले तरी तुम्ही सातारा आहाच बापू जवलहि लोक हुजरातचे दुलबदार भापकर निबालकर बोधे वगैरे आहेत कवडे वगैरे टोल्या बऱ्याच आहेत साराष ईश्वरे जे केले आसेल ते होईल आज फार वाईट काल पेचाचा आहे ज्यास हिमत होईल त्याने मना-पासून काम करावे[1]

---

ले. ३३३ श्रीशंकर श. १६७२ फाल. व.८
इ. स. १७५१ मार्च. ९

राजश्रिया विराजित राजमान्य राजेश्री
गोपालराव स्वामी गोसावी यासि

सेवक त्रिबकराव विस्वनाथ नमस्कार विनंती उपरी अज शनवारी दिडा प्रहरा दिवसा राजश्री बाबूजी बाजिराव याचे पत्र आले की गाईक-

---

१ सबंद पत्र भाऊसाहेबांच्या हातचें.

वाड काल केडूरपाबलावर होता आम्ही दोन कोस मागे आहो त्याचे आमचे युद्ध उद्ईक शनवारी होणार निबालकरासी फौज दोन हजार बापूस सामील जाली त्याची उमेद फारच आहे आपलेहि हुजरातचे मातबर लोक बा आहेतच श्रीमंत नसता गायेकवाड येश नेतो यापेक्षा आम्ही सारे जिवत राहून काय उपयोगी तर येविसी राजश्री नानासहि आम्ही लिा तर पत्र पावेल ते क्षणी तुम्ही फौजसहवर्तमान स्वार होऊन येणे उद्ईक आदितवारी गाईकवाड बोरघाटे[1] चढोन करेचे काठी मुा करणार तो इतक्यात लडाईचा बनाव कसकसा होतो पाहातो जर करिता रेटून चालिला तर तुम्ही व चिमणाजी बापूजी ऐसे सामील जालिया गायकवाडास घेतच आहो तो इताकियात मानाजी पायगुडे व रा तात्याहि येतील तर पत्रदर्शनी स्वार होऊन येणे याउपर येक घडीचा विलंब न करणे याचप्रा आम्हीहि राजश्री नानास लिा आहे उचित विचार हाच आहे लक्ष कामे टाकून त्याचा रोख चुकऊन ताबडतोब येणें बहूत काये लिहिणे हे विनंती रा मानाजी पायगुडे व व तात्यास पत्रे पा ती त्यांजकडे फार फार जलदीने लौकर रवाना करून ते लौकर येत ते करावे ईश्वरी दया आहे तर आम्हीहि बापूस जाऊन सामील होतो तर लिा प्रा रा चिमणाजी बापूजीसह वर्तमान जलदीने लौकर यावे बहूत बहूत प्रकारे याच अन्वये राजश्री नानासहि आम्ही लिा आहे तर कदांचित त्याचे विचारास ही गोष्ट न येच तर तुम्ही तर पत्रदर्शनी चिमणाजी बापूजीसह वर्तमान येणे याचप्रा मारनिलेसहि आम्ही लिा आहे बहूत काये लिहिणे लोभ असो देणे हे विनंती येविसीं रा रामराव व आनंदराव म्हालोजी मुठे यासहि येणे म्हणून लिा आसे तर पत्रदर्शनी सर्वास घेऊन आती सत्वर पावे हे विनंती पाटोगुड्याचे व तात्याचे पत्र लौकर रवाना करणे हे विनंती[2]

---

१ हा घाट पुणे मिरज रस्त्यावर जेजूरीच्या उत्तरेस पांच सहा कोसावर सदर्न मराठा रेलवेच्या गुन्होळी स्टेशनजवळ आहे. खंडाळ्याजवळील 'बोरघाटा'-खेरीज हा 'बोरघाट आहे. २ सबंद पत्र त्रिंबकराव मामांच्या हातचें.

ले. ३३४ श्री श. १६७२ फाल्गून वा १४
इ. स. १७५१ मार्च १५

* चिरजीव राजश्री नाना यासी भाऊ आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष तुम्ही पत्र छ १ राखरचे पाठविले ते पावले मल्हारबाचा वगैरे मजकूर लिहिला तो कलला आम्हाकडील वर्तमान तरी दोन तीन मजली श्रीरंगपटण राहिले आहे पुढे येथील मामलत फैसल जालियावर बिद्नूर सावनूर वगैरे होईल तूर्त इकडे येण्यामुले त्रिचनापलीचा वेध वारलासा जाला येथील निर्गम जालियावर होईल ते लेहून पाठऊन तुमचे लग्नाचे काय जाले लिहिणे ईस्वरी कृपेकरून सरदाराचेहि समाधान होतेच परतु बाहेरील आफवा पुण्यास गेलियामुले सर्व दूर जाल्या आमचा इकडे पेच वारला दोन महिने आवकाशहि आहे पहिली स्वारी आहे केवल कोठे तटीहि लाविता येत नाही विचारेकरून निर्गम करून लग्नाचे सोहाले आमचे वरचे घेणे प्रस्तुत बाबूजी नाईक प्रतिनिधीचे जुझ होऊन पुर्ते फजीत पडले आहेत इकडे मुराराव वगैरे चोलीकुचाली फार आहेत श्नेहाने सर्व आपले करून आपले कार्य होईल लागोपाठ तीन वर्षे फौज आलियास करोडो रुाची जागा होईल आसो रिणानबंध प्रमाण तिकडील नवलविशेष वर्तमान ल्याहावे सर्वा ग्रहस्ताचा समाचार घ्यावा रा छ २७ रालाखर हे आसीर्वाद

---

ले. ३३५ श्री श. १६७२ फाल्गून वा
इ. स. १७५१ मार्च

* चिरजीव नाना यासि भाऊ आसीर्वाद आलीकडे पत्र येऊन वर्तमान कलत नाही तरी सविस्तर लिहिणे गाईकवाडामुले सातारा सोडून पुण्यास आला असाल बाबाचे भेटी जाली आसेल पुढे बापू तुम्ही येक होऊन कोणे प्रकारे दौल धरला बाबानी कोणे प्रकारे सागितले हे लिहिणे वरकड सविस्तर तीर्थरूपानी लिहिले आहे त्याप्रो आज बाबा उदासपणे करीत नाही तेव्हा तुम्ही आबा बापू बा मोडले त्याचे आपले लोकाचा गाहा करून बापूचे जुने लोक मेलऊन देखील कोल्हापूरची सारी येक होऊन भारी होणे आमची फौज माडून प्रात लुटून सातारा राहाणार कसे पुर्वेल येथील गुता उरकिला दर मजल येतो गाईकवाड दादोबा पधरा

सतरा हजार जमा होऊन सातारा राहातील तुम्ही केवल खडे जवल दोन च्यार कोस राहून चैन पडू न द्यावे सामान न जाई तोड काडिलिया दम आसेल तसे करावे येकूण ते जबरदस्त आसून उगेच मर्दुमीने फौज फजीत न पाडणे तूर्त तुमची सलाबत बसणार नाही आम्ही येऊ तो आपले जागा गाहा करून खबरदार राहून त्यास चैन न पडू द्यावे हेच गोष्ट हिमतीने पाच हजार फौजेने होईल तुम्ही सारे पंधरा हजार व्हाल बापूस आपले मायेत लाऊन बरे हिमतीने राहाणे जो जो काठीण तो करावयाचे कस आसावे याप्रो करणे तेथील तुमचे लोक त्याचे हिमत येक दिली आईची तरतूद आमचा व सवास बाबाची तरतूद पुढे मनसबा कोणे थरास जाईल हे सर्व वरचेवर लिहिणे आम्हीहि चाकरीस लौकर हजर होऊ उदास भाव धराल म्हणजे घरच बुडवाल कामाचे नाही हे आसीर्वाद

---

ले. ३३६ श्री श. १६७३ चैत्र शुा ९
इ. स. १७५१ मार्च २४

* आसीर्वाद मुख्य पत्र लिहिले आहे त्यावरून कलेल वरकड येथील तीर्थरूपाचे मर्जीचे भाव पत्री कोठवर ल्याहावे रुबरूच बोलणे होईल तेव्हा कलेल तुम्ही बापूची फौज देखील देसी गाईकवाडाहून धाई-गुडे देखील जमा झाला हजार दोन हजार जाजती लोक चागले आहेत बाबा व सुभेदार यास येथून पत्रे गेली आहेत आव भरून केले तरी पुर्तेच होईल न केले तरी तुम्ही काय काम करावे साराष घावदाव पाहून तेथील मनसुबीयानरूप उपयुक्त पडेल तसे कराल करणे गोविंदरायास येक दोन पत्रे गेली त्याचे उतर न आले पुसून लिहिवणे आज गाईकवाडाचा फौजेचा पेच त्याचा विशेष काय त्यास पाठबल दरबारचे आहे यास हर इलाज करून या दिवसात आपली बाजू सेर केली पाहिजे वरकड बरेवाईट सर्वांचे भाव तेथे दिसतच आसतील लेहून पाठवणे आपले जिवास बहूत खबरदार राहाणे मारेकरियाची चाल निघाली उमाबाई आईसाहेबाचे येथेहि तोच उद्योग आहे खावद आहेत खावदासी जाली कशाने आता विस[र]ली आहेत बरे आसो दाभाडे गाईकवाड स्वस्थ जालियावर मग आम्हास त्यासी दुसरा आर्थ नाही तेथील बारीक भाव वर्तमान गाईकवा-डाविसी काय तरतूद बाबानी तुम्ही केली सविस्तर लेहून पाठवणे पत्र

वाचून फाडून टाकणे रा। छ ७ जमादिलौवल बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद कृष्णातीर पालादूर नजीक कनाले हे आसीर्वाद

---

ले. ३३७ श्री श. १६७३ चैत्र शुा
इ. स. १७५१ मार्च

चिरंजीव राजमान्य राजश्री नाना यासि प्रती बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहिणे विशेष राजश्री फतेसिगबावा याचे कुरले येथे मनमाने तैसा तुमचे राऊताचा उपसर्ग लागोन वल्ह्या (?) लुटल्या व गैर कितेक तसनस केली म्हणोन वर्तमान कलले ऐशियास कुरल्यास उपसर्ग करावा तेथील बंदोबस्त न व्हावा हे गोष्ट तो उचीत नाही आधी तो मुलकात परिछिन उपसर्ग न लागावा फौज रोजमरा खाते लुटते हे काय भाडण गायेकवाड यासी तरी त्यासी भाडावे रयतेचे काय पाप आहे याउपरी वरकडहि रखवाली करावी आणि कुरल्यास तो नेहमीच राऊत दाहा वीस ठेऊन काडिमात्र उपसर्ग न लागे ते करावे माारनिलेची वस्तवानी गैर कितेक लवाजिमा असे तरी खामखा रखवाली करणे *जरूर रखवाली करणे उचीत असे विस्तार काये लिहिणे हे आसीर्वाद

---

ले. ३३८ श्री श. १६७३ चैत्र शुा १३
इ. स. १७५१ मार्च २८

*चिरजीव राजश्री नाना यासि प्रती बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद आज छ ११ जमादिलावली मोगलाकडील भेट बोलणे चालणे सर्वास निरोप देणे उरकून कूच केले जलद येऊन विसा दिवसी पावतो तुम्ही बापू मानाजी पायगुडे येकत्र होऊन मनसबा थोपून राखणे या काली सर्व वडील वडिलानी उपेक्षा केली लेकराचे मडलीवर काम पडले आहे चार कामे करता दोन नीट होतात येक नासते ऐसे तो मोठ्या मोठ्यास होत आले आहे तुम्ही आवसान धरून सावधतेने राहावे आम्ही जवळ आलो ऐसे समजणे गाईकवाडाचे बरोबरीची फौज द(दे)शी सारी जमा जाहाली कामच वाढल्यास थोर लोकानी घरगती रुसवा पुढे न

---

१ पत्र भाऊसाहेबांचें.

आणावा अगेजे करून लौकीक करावा जेणेकरून आम्हासच येक प्रकार वाटते ऐसे करून दाखवावयाचा समय असता रुणानबध प्रमाण तुम्ही जे जे येक विचार असतील त्यासुधा मोठे हिमतीने राहावे छ ११ जमादिलावल मुा कृष्णातीर प्रात कर्णाल हे आसीर्वाद

---

ले. ३३९ श्री श. १६७३ चैत्र वा १
इ. स. १७५१ मार्च ३१

* पुा चिरजीव नाना यासि आसीर्वाद उपरी दाहा हजार फौजेने रघोजीबावा आले होते आज त्यास निरोप वराडात जावयास दिल्हा दोहो चहू दिवसी फतेसिग साता आठा हजारानसी आहेत त्यास निरोप देऊ मुरारजी घोरपडे दो ती दिवसी भेटतील त्यासहि उमेदवार राखून निरोप देऊ दिवस स्वारीचे सरले कडपे कर्णोल मोडले श्रीरगपटण बिदनुरास जावयास फावत नाही गैरहगामी गेलिया काम नीट होणार नाही यास्तव जात नाही मोगलाचा सलूख सोबती पाहुणे व मागील वर्तमाने नाना प्रकारची जाणून सलूख केला जर तुम्ही अगदी गाईकवाडास लुटले आईसाहेब ताल्यावर येऊन दादोबास काढून दिल्हे सेनापतीस तलेगावास जावयास निरोप दिल्हा आपण ज्ञानावर येऊन तुम्हासी सलूख करून राज्यास सोडून खाली आली ऐसे बेजिरीम काम विल्हेस श्रीने तुमचे हातून घेतले तर आम्ही सावनुराकडे जाऊ परतु इतके येकायेकी होणार नाही तेथे पेच फार आहेत यास्तव दर मजल येत असो छ १४ जमादिलावल हे आसीर्वाद[1]

---

ले. ३४० श्री श. १६७३ चैत्र वा ४
इ. स. १७५१ एप्रील ३

चिरजीव राजश्री नाना यासि आसीर्वाद उपरी आम्ही मोगलाचे कामास आलो मागे गाईकवाडाने खानदेश लुटला फौज मोडली हती नेले तडक पुणे देश लुटीत आला पुणे पलाले हा लौकीक दिली लाहोर मुलतानेस गेला तथापि तुम्ही बापूने हिमत धरून तर्तूद हिमत करून त्याजवर सलाबत बसविली परतु मल्हारपंतानी बोली लाविली आहे त्यास

१ सबंद पत्र नानासाहेबांच्या हातचं.

पंचवीस लक्ष हातास येत नाही अशा दिवसात सावकारी निशा जरूर होईल कागद कतबा द्यावयास मागैतले गावी कारभार होत होता तेव्हाच रजा-वंद होते त्याचा कतबा कामाचा नाही रोख रुपये द्यावयास त्यानी काही समागमे आणिले नाहीत लटकेबाटके बोलून निकाल काढून जावे तुमचा वेढा बसला आहे दाणा वैरण रात्र-दिवस मेहनत करून बंद केलीच असेल येवढ्या लस्करास वेढा कसा सोसतो याजमुले घरातील बाहेरील कारभारी मिलोन तह लटकाबाटका करितील तुम्हास आम्ही फिरलो दर मजल येतो हे कलल्यावर तो तुम्ही तह करणार नाही नेटच धराल कदाचित आमचा मोगलाचा तह जाहाला हे वर्तमान तहाचे संधीत कलले असेल तर मात्र वोढ धराल नाहीतर निकाल काढलाच असेल का की फौज त न लडाईस देत नाही नाना प्रकारचे भेदभाद आहेत यशाच्या मोटा बाधता गाठ पडत नाही ऐशा विचारे तह होऊन तो गेला असेल कदाचित आईसाहेबाचे जाबसालामुले दिवसगत लागली असली आणि आमचे पत्र पावले तर तुम्ही दम धराल हे आशा आहे गेली बाजी तुम्ही सावरली ये वेलेस गाइकवाडावर निकर्ष जाहाल्यास गुजराथची मसलत येक वर्षात तुम्ही सर घरी बसून केली यैसे होते सारांश आम्ही मोगलापासून मोकले न जाहालो या विचारास्तव तुम्ही निरोप दिल्हा असला व तो गेला असला तर इलाज नाही बोलीचालीमुले दिवसगत लागली आम्ही मोकले जाहालो हे वर्तमान कलता तुम्ही दमच धरून उतम प्रकारे पारपत्य करावे हशम बाण आणून डोगरावरून लस्करावर मार बाणाचा रात्री करावा सारांश गुजराथ निमे ठाणीसुधा वाटून घ्यावी रुपये घ्यावे तर तह केला कार्याचा नाहीतर त्याचा लौकीक दिलीरामेश्वरापावेतो जाहाला आम्ही मात्र मलमलीत निकाल काढला ऐसे दिसते जर आम्ही मोकले जाहालो नसतो तर प्रसंग जाणून निकाल काढणे योग्य होते आता निकाल न काढावा पायाशुध कार्य करावे हेच उतम हे आसीर्वाद सरलस्करची फौजेने यदा चाकरी उतम केली आम्हाखेरीज त्यास गत नाही दादोबास प्रतिनिधी न सागावी ह्या गोष्ट आईसाहेब सहसा आईकणार नाहीत तुमचा त्याचा ताल न बसे तेव्हा गाईकवाड इरेस पडून राहिलाच असेल तुमची सलाबत बसत चालली तुम्ही मलमलीत करणार नाही इतक्यात आमची प्रथम पत्रेहि पावतील तेव्हा तुम्ही दमच धराल ऐसे वाटते तथापि

प्रथम आठा दाहा दिवसात निकाल पडून गेला असला तर इलाज नाही छ १७ जमादिलावल मुा कांडलूर संगम हे आसीर्वाद

---

ले. ३४१ श्री श. १६७३ चैत्र वाा ५
इ. स. १७५१ एप्रिल ५

आसीर्वाद उपरी राजश्री मुरारजी घोरपडे छ १५ जमादिलोवली काडलूर सगमाखाली च्यार पाच कोस आमचे लस्करा समीप येऊन राहिले छ १६ +जिलोवली त्याच्या आमच्या भेटी जाहाल्या मुरारराया समागमे राजश्री दौलतराव घोरपडे व सुभाणराव घोरपडे व भुजंगराव घोरपडे आहेत चोघा भावानी येऊन भेटी घेतली त्या दिवसीं मुकामच जाहाला छ १७ जिलोवली काटलूर संगम कृष्णा भीमा उतरून उतर तीरी मुकाम केला तेथे राजश्री उदाजी चव्हाण हिमतबाहादर ममलकतमदार येऊन भेटले आजी छ १८ जिालोवली मुकाम केला मुराररायांची मेजवानी व निरोप देणे हे गोष्ट आजीच होईल उदैक येथून कूच करून मजल दरमजल येत आसों वरक[ड] वृत अलाहिदा लिहिले असे त्याजवरून कलेल छ १९ जमादिलावल हे आसीर्वाद

---

ले. ३४२ श्री श. १६७३ चैत्र वाा ११
इ. स. १७५१ एप्रिल ११

* पुा चिरंजीव राजश्री नाना यासी आसीर्वाद तुम्ही पत्रे छ १२ जमादिलावलची पत्रे रवाना केली ती छ २४ जमादिलावली प्रविष्ट जाहाली तेथे लिहिले की गाईकवाडाने शहर बलकाविले सेर सेवगे निंब तोडून मोर्चेबदी करितात आत वैरण आहे दाणाहि आहे दोन पायली धारण आहे आमची फौज फार परतु बेजरब सर्वांनी हिया करून कार्यसिधी संपादणे होत नाही आम्हाकडील मातबर मातबरास बकसिसे वतने द्यावयाच्या बोल्या आईसाहेबाकडून लागल्या आहेत तथापि प्रयत्न करून कोडून जरब देतो म्हणून विस्तारे लिहिले ते सर्व अवगत जाहाले ऐशियास प्रथम जुझाची पत्रे आली त्यावरून दिसले होते की दोहो तिही

---

१ पत्र नानासाहेबांचें.

दिवसात लुटाल पलून जाईल दुसरे पत्रावरून दिसोन आले की त्याने शहरात दम धरला साप्रत वीस बावीस दिवस जाहाले अद्याप तुमची जरब बसली नाही असो अडचणीत राहिले असता बहूत इरेस घालून दाहा पाच पथके नेऊन थडकली त[र] मार मात्र खाऊन जाया होतील यास्तव बाहेरील कडबे आणावे काही जालावे डोगर जालावे वाणी वलून आपले लस्करात आणावे शहरात पायउतारा परवारी अथवा शहरी लुच्यास इनाम देऊ करून वैरणीचे गंज जालावे बाण टाकीत जावे हशम चागले आणून येवतेश्वर आपले स्वाधीन राहे ते करावे आपल्या लोकात भेद आहे तो बारीक रीतीने मात्र पुर्ता समजावा परतु बोलण्यात करण्यात काहीच दाखऊ नये सर्वासी गोड बोलून उमेद्वार राखावे मुलकाची रखवाली करावी बापू तुम्ही गोविद्राव सर्व प्रकारे येक विचार आहाच मुख्य हर प्रयत्न करून रस्त व बाहेरील कही बंद करावी शहराची आस्ता कशास धरावी इत्यादि प्राप्त प्रसंग रात्रदिवस मेहनत करून तग करावा आम्ही जवल येऊन पावलो लस्कर मोठे ऊन फार सभालून यावे उमाबाई अंबिकाबाई हजारा श्वारानिसी समागमे हेहि मोठे झट आहे श्रीकृपेने पंधरा दिवसा आलीकडे येऊन पाऊ तोपावेतो हर तरतूद करून दाणावैरण बद करणे छ २५ जमादिलावल हे आसीर्वाद[1]

---

**ले. ३४३** श्री शके १६७३ चैत्र वा ११

इ. स. १७५१ एप्रिल १२

*चिरजीव राजश्री नाना यांसि प्रती बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल ताा छ २५ जमादिलावल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष मोगलासी सलूख उतम प्रकारे करून माघारे फिरलो या मजकुराची पत्रे प्रविष्ट जाहालीच असतील तदोतर रघोजी बावाचे मनात खामखा आम्हा समागमे येऊन गाईकवाडाचे पारपत्य करावे ऐसे होते तथापि त्याचे कामकाज वराडात चादे देवगडात फार यास्तव निरोप दिल्हा तुम्ही गाईकवाडास कोडिले आठा चहू दिवसात लुटाल आम्ही येतो असे असता रघोजीबावास कशास आणावे मातबर काम असते तर आणितो व त्याचे मनात फार यावयाचे होते रामचद्र

---

१ पत्र नानासाहेबांचे.

जाधव भेटले बहूत भले माणूस येकनिष्ट त्याचा कृत निश्चय नवाबाची चाकरी करावी दुसरा अर्थ तिलमात्र नाही आम्हासी बहूत मनापासून स्नेह राखीत होते भेटी प्रसंगामुले बहूत दृढ स्नेहीत जाहाले आमचे राज्यातील राजकारणे जातात त्यासी सिष्टाचार मात्र करितात वरकड कोणेहि वाकडे उत्पातात नाहीत तदोतर बहूत आदरे मुरारराव येऊन भेटले त्याचा भाव पाहाता स्पष्ट दिसला की आईसाहेब राज्यास न धरती राजे आपण मिलोन मनसबा उचीत करती तर उतम होते गैरपाया मनसबा योग्य नाही कर्नाटक आमचे जाहाले याजमुले त्यास बहूत सतोष व आम्ही या काली पाहाता मर्द मेहनती येकवचनी दूरदेशे या प्रकारचा पाहिला बहूत संतोष जाहाला कर्नाटकचे कामाचे उ(मु?)ख्य हत्यार ते मुकरर करून ठेविले याजमुले तोहि बहूत संतुष्ट होऊन गेला त्याचे मनात हि आम्हासमागमे येऊन येक मजल पुढे होऊन गाईकवाड मोडावा आपले मर्दुमीचा लौकीक हिदुस्थान पावेतो करून घ्यावा हे इछा फार होती परतु सरदारी वोढगस्त यास्तव निरोप दिल्हा व येके गाइकवाडावर इतके नेणे हेहि योग्य न दिसेल फतेसिगबावास निरोप देऊन फौज त्रिबक हरी गोरखोजी भापकर मात्र पाच हजारानसी समागमे येतील उदाजी चव्हाण निवडक दीड दोन हजारानसी समागमे येत आहेत तुम्हास सविस्तर वर्तमान सर्व सरदाराचे कलावे यास्तव लिहिले असे लटकीच इद्रजाले तुम्हास तेथे दाखवीत असतील तर ती सर्व मृषा जाणावी गाढे हिमतीने सर्व येक विचार होऊन गाईकवाडास जरब देणे हे कार्य तुमचे फौजेस अगाध नाही तथापि आश्रियास राहिला आहे हरयेक काम दावगिरीने केलिया उतम व सरदारानी कार्य युक्तीनेच केले पाहिजे जर ठिकाणी तुमचे कार्य न होय तर कही बंद करणे रस्त बद करणे श्रीकृपेने आम्ही येतो सर्वहि उतमच ईश्वरकृपेने होईल छ २५ जमादिलावल हे आसीर्वाद

पौ छ १ जाखर
दोनप्रहर दिवस

---

**ले. ३४४** श्री श. १६७२ चैत्र वा ११
इ. स. १७५१ एप्रिल ११

आसीर्वाद उपरी तुम्हास मुख्य पत्र लिहिले आहे हे सर्व सरदार मराठे ब्राह्मण मेलऊन सहजात वाचून दाखवणे त्रिबकराव मामास निरतर

पत्रे लिहीत जाणे बाण हाशम जेजाला जरूर आणवणे छ २५ जमादिलावल हे आसीर्वाद

---

ले. ३४५ श्रीं श. १६७२ श्रावण शुा ४
इ. स. १७५१ जुलई २६

* चिरजीव नाना यासी भाऊ आसीर्वाद येथील वर्तमान तरी बाबाचे नानाचे अत्यतच दिसेदीस मर्जी बिघडत चालली आहे रामचद्रबावा वरचेवर खुशामत करून आहेत आम्ही तरी आहो तेच आहो हजार चहूकडील पेच नानाहि ठीकसे बोलत नाही बाबाची मर्जी आहे ते आहे साराष आमचा पेच आहे तो ठाऊकच आहे तेथेहि येथील हजार खबरी येत असतील येमाजीपंतासहि पदरी घ्यावे आसाहि विचार होत आहे येकूण भलते मनसुबीयाचे सेवटपर्यंत नेट पुर्ते नाही बोलावयास देखील हजार पेच पडतात तुम्ही आम्हास तेथील हि सविस्तर लेहून पाठवीत नाही व आम्हास असे पेचात वाचऊन राहावयाचा विचार लिहीत नाही बरे आसो येथे विशेष होईल ते लेहून पाठऊन आमचेविसी तुमचे मनात सदेह येऊन लेहून पाठवीत नाही हे कामाचे नाही जे वाटेल ते लिहिणे आम्ही तुम्ही गेलियापासून रभीस मात्र दोन तिनदा आणिले होते सिगीचे ठीक होईल आमचे येथे बदोबस्त आहे परतु तेथे फुटलेसे वाटते म्हणून न केले भेकरहि आहो लक्ष्मी स ड राणबाचे वाडियात देखील गजराबाई व चिमणाजी बापूजीसी पागा रथखानियाजवल तेथे गुणाजी आहे तीर्थरूप सपादतीलसे दिसते येथे ठेवले आहे महिना दीडसे दोनसे करून ठेवले आमची आशा आसून काय कामाची तुम्ही कोणी वोलख्या पाठऊन रामाची वोलख करून द्यावी पुढले पुढे पाहातच आहो तूर्त ठीक पडणार नाहीसे दिसते व आमचे कपालहि आसे कोठे आहे येमाजीपंताचे आहे ते त्याकडे करार करून आपला चाकर करून दुसरेकडे शफतपूर्वक राजकारण न करावे आपले बाा स्वारीस न्यावे हा विचार आहे तुमचे विचारे कसे आहे ते लिहिणे नाना माझेविसी तुझे मनात सदेह येतो बरे तस्मात तुम्हासच सर्वासी गोड आसले पाहिजे त्याप्रमाणे आम्हासी वर्तता हे कामाचे नाही नीट लिहिणे पत्र जासुदा बाा पाठवावे त्याणे येथे बहेरजी नाईक वाडियाजवल द्यावे आसे करीत जाणे पत्र वाचून फाडून टाकणे आण आसे

तुमचे पोटात तिडीक सातारा उठली होती ते समई हरेश्वरास सेर सोनियाचा मुखवटा नवसला होता तो तेथे पाठऊन आगारा आला तो तुम्हाकडे पाठविला आसे दोन तीन रोज लावणे रवाना छ २ रमजान हे आसीर्वाद

---

ले. ३४६ श्री श. १६७२ फाल्गुन शुा ५
इ. स. १७५१ फेब्रु. १९

आसीर्वाद उपरी रा तुलाजी आगरे यानी मातुश्री आईसाहेबास नारल पाने मासे पाठविलियाचा मजकूर लिहिला तो कलला दमाजी पिसाल याजकडे मौजे निरवागी पाा इंदापूर हा गाव होता तो दूर करून खासगीकडे ठेविला तो त्याचा त्याजकडे करार करणे म्हणोन आईसाहेबानी सांगोन पाठविले त्याचा सालजाब सागून पाठविलियाचा मजकूर लिा तो कलला उतम केले खाली येऊन स्वस्तता जाहालिया जे उचित तेच सेवेशी विनंती करू ऐसे बोलत जाणे छ ३ रबिलावल हे आसीर्वाद

---

ले. ३४७ श्री श. १६७३ वैशाख शुा ३
इ. स. १७५१ एप्रील १७

चिरजीव नाना यासी आसीर्वाद उपरी आता सर्व मेहनत मसलत येकले तुम्हावरच पडली ईश्वर निभावे सविस्तर चिरंजीवाचे पत्रावरून कलेल जलद पत्रे आम्हास पावतसे जरूर करणे छ १ जमादिलाखर हे आसीर्वाद[२]

---

ले. ३४८ श्री श. १६७३ वैशाख शुा ७
इ. स. १७५१ एप्रील २१

पुा चिरंजीव राजश्री नाना यासी आसीर्वाद उपरी वैशाखात चिरजिवाचे लग्न होणार साहित्य पाहिजे त्रिबकरायाजवल मागितल्यास अनमान होता तर त्यास पत्र पाठवावे म्हणून लिहिले त्यावरून चिरंजीव राजश्री विश्वासराव यास पत्र लिहिले आहे तुम्ही लिहून पाठवाल त्याप्रमाणे सर्व साहित्य पाठऊन देतील मखण व कासेगावकरी दोन ताफे

---

१ सबंद पत्र भाऊसाहेबांच्या हातचें. २ पत्र नानासाहेबांचें.

तीर्थरूपाची मर्जी आसली तर पुसोन चिठी पाठऊन द्यावी म्हणून लिा त्यास तीर्थरूपाची मर्जी पाहून पुसोन चिरंजीव राजश्री विस्वासराव यांस चिठी पाठविली आहे त्याजकडे चिठी पाठवणे पाठऊन देतील नारोबा नाईक पढरीकडील आमचा ऐवज आठशे रुपये घेऊन पाठऊन द्यावे म्हणून लिहिले ऐशास त्याणी उतर केले की गुदस्ता कमावीसदार निराला होता साल मजकुरी दुसराच आहे कमावीसदारानी पहिलेंच सांगितले असते तर देतों कमावीदारानी सांगितल्या वितरिग्त मजला देता न येत त्यावरून आठशा रुपये नारोबानाईकाकडील व अडीचशे रुपये मालजी सिंदे यांज-कडील साडे दाहाशे रुपयाची वरात चिरंजीव राजश्री विश्वासराव यांचे नावे लिहून पाठविली आहे पुणेयास पाठऊन रुपये घेणे कमावीसदार व मालजी सिंदे पुणियास आलियावर त्याजपासून सरकारांत घेऊ सौ बच्याबाई घाटगी यास सिबंदीचा व खर्चाविसी बहूत उपद्रव जाला त्याणी आपले हाल बहूत लिहून पाठविले जरूर जाणून येकदा पांचशे रुपये तीनशे आख व दुसऱ्याने तीन हजार पाठविले याची वरात पाठवावी पुढे जसा बदोबस्त करणे तसा करावा म्हणून लिा त्यावरून साडे तीन हजार रुपये व तीनशे आखाची चिठी पाठविली आहे पुणियास पाठऊन रुो व कापड आणवणे रा छ ५ जमादिलाखर * हे आसीर्वाद

---

**ले. ३४९** श्री श. १६७३ वैशाख शुा ७
इ. स. १७५१ एप्रील २१

*[1]चिरंजीव राजश्री नाना यासी सदासिव चिमणाजी आशीर्वाद उपरी येथील कुशल ताा छ ५ जमादिलाखर जाणून स्वकीये लिहीत जाणे विशेष तुम्ही फालगून शुध ११ चे पत्र पाठविले ते पावले राजश्री देवराव यांचे सांडीबराबर लग्न जालियाचे पत्र पाठविलें तेहि पूर्वीच पावले चिरंजिवाची मुजी चैत्र शुध पचमीस निश्चय केला आहे तीर्थरूपानी मुजीची आराश फार धरली आहे स्वामीचे आसीर्वादेकरून कार्यसिधी होईल रामाजी यादवाची नात नवरी उतम आहे बाबाचे मनांत हौस आली आहे वैशाख मासी लग्न चिरजिवाचे करणार मुंजीत लग्नांत उभयता स्वामी असते

---

१ पत्र भाऊसाहेबांचें.

म्हणजे मजला फार संतोष वाटता म्हणून लिहिले वैशाख मासांत स्वामीचे येणें होईल + + ते ल्याहावे वि प रा र + + येऊन * आठ दाहा रोज जाले पधरा + + साठ हजार रुो यास मामलत यैवज आठ चहू रोजात येईल दाहा लाखपर्यंत रवाना जाले आठ रोज येथील गुता उरकेल पुढे सावनूर सा सात गावे आहे सोधेहि जवल आहे चैत्र आखेर सर्व निर्गम दोहींचा होईल वैशाखात फिरणे होईल पधरा वीस रोज वाटेस लागतील येकूण वैशाख आखेर आगर जेष्ठ शुधात येणे होईलसे आहे परतु कामामुले होईल ते खरे केवल आमची वाट पाहावीसे नाही शुभस्य सीघ्रं उरकावे पुढे होईल ते लेहून पाठऊन हे आसीर्वाद

---

ले. ३५० श्री श. १६७३ जेष्ठ शुा ६
इ. स. १७५१ मे १९

* चिरजीव राजश्री नाना यासि प्रती बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद तुम्ही आईसाहेबाकडील पत्रे परसोजी कलाडे याजसमागमे पाठविली ती काल शनिवारी दोन घटिका दिवस बाकी राहिला तेव्हा मोरश्वरी पावली उतरे तेच समई लिहून खिजमतगार व ढलाईताबरोबर पाठविली तुम्हीच आईसाहेबासी बोलणे निदान त्यानी म्हटले की चौक्या उठवणे आम्ही खाली येतो ऐसे म्हटले तरी प्रहर दोन प्रहर वेला मुहूर्त मुकरर करून पायेचे लोक मात्र शहरात ठेवणे वरील चौक्या खाली आणने फौज दिसशी वेणेवर राहावणे खासी येताच तुम्ही चालीस पंनाशा खाशानिसी भेटणे सर्वांची निर्वणूक करणे निरोप मागणे यणेप्रो जर खाली येतील तर करणे आम्ही असता न आली आता येणार नाहीत तुम्हासी तो विषमता फार तुमचा भरवसा त्यास येणारच नाही तथापि बाबाजी जाधव बराणजी मोहिते यानी निशा केली व तुम्ही हवालदारासी दादोबासी पुर्तें गोड बोललेत तर न कले राजश्रीस मात्र सश्नेह निरोप येखादा सागून पाठवीत जाणे वरचेवर वरील वर्तमान अतरबाह्य आशय लिहीत जाणे रवाना रविवार दोन घटका दिवस हे आसीर्वाद

---

ले. ३५१ श्री श. १६७३ ज्येष्ठ शुा ९
इ. स. १७५१ मे २२

चिरजीव राजश्री नाना यासि बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत जाणे विशेष आम्ही छ ७ रजब बुधवारी पुण्यास दाखल जालो मातुश्री आईसाहेब राजश्री दादोबा व हवालदार वगैरे यांची पत्रे आलीं होती त्याची उतरे लेहून तुम्हाकडे पाठविली ती तुम्ही गडावरी पाठविलीच असतील त्याजवरी मातुश्रीचा व गडावरील सर्वाचा भाव कसकसा जाला रागरग काये विचार कसकसा करितात तुम्हासी काही बोलतात न बोलतात ते तपसीलवार लेहून पाठवणे तेथील खबरदारी चोकसी बरी करणे यावयाची उतावली न करणे सर्व अर्थ लिहून पाठवणे तदोतर तुम्हास लेहून पाठऊन त्याप्रो येणे त्वरा न करणे तुम्ही आलिया कोणाचे कोणी आईकणार नाही यास्तव येथून लिहून ठीक करून मग यावयाचा विचार करणे छ ७ रजब हे आसीर्वाद

---

ले. ३५२ श्री श. १६७३ ज्येष्ठ शुा १२
इ. स. १७५१ मे २५

* चिरंजीव राजश्री नाना याशी सदासिव चिमणाजी आसीर्वाद उपरी येथील कुशल तागाईत छ १० रजब मुकाम धारवाड जाणून स्वकीये लिहीत जाणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले लिहिले वर्तमान कलले चिरंजिवाचें लग्नास जातो तीर्थरूपाचे येणे याचा संशय आहे पाय द्दिष्टीस पडतील तो उतम दिवस आहे आणखी बहूत विनंती करावयाची आहे म्हणून लिहिले ते सविस्तर कलले ऐसियास लग्नसिधी उरकली उतम जाले आम्ही सावनूर सोधे सर्व कारभार उरकले किले बहादुरबिडा व धारवाड दोन आली तेथे तात्याची फौज ठेविली येका दो रोजी येथून कूच होऊन दर मजल येऊ चिकोडी येथून सा गावे आहे भेटीनंतर सर्व कलेल प्रस्तुत मोगलासी तह केला तेव्हा सरदार होते त्यापासून आंतर नसता किले मल्हारबानी वगैरे घेतले याविसी लोक हजार तर्क लिहितात त्यास आमची भेट होऊन मागील पुढील सर्व मनसबे नीट करून त्याणी जावे लौकिकहि वारावा मोगलासी सलूख बिघाड करणे हाहि डौल करणे तो करावा आसे लिहिले येविसी स्थाई भाव मूल काय आहे ते काय करणार

हा शोध घेऊन लिहिणे वरकड घरचे दारचे रिकामे चिताचे पेच फारच आहेत भेटीनंतर सविस्तर कलेल रा। छ मजकूर हे आसीर्वाद

ले. ३५३ श्री श. १६७३ ज्येष्ठ वा।
इ. स. १७५१ मे

आसीर्वाद उपरी राजश्री नी निरोप पाठविला कीं सर्व प्रकारे माझा भार तुह्मावर मजला भरवसा तुमचा असता राजश्री प्रधान पंताचे कारकून मातुश्री आईसाहेबाकडे बोलोन गेले काये विचार करिता म्हणोन सागोन पाठविलियाचा मजकूर तपसिले लिहिला तो कलला तुम्हीं राजश्रीस सागोन पाठवणे कीं आमचा कारकून मातुश्रीसी बोलोन आला त्यात विरुध काही तुम्ही व मातुश्रीनी खाली येऊन राज्यभार चालवावा आम्ही सेवक तुम्हा उभयेताचे आज्ञेने वर्तावे सर्वास वर्तवावे हाच मजकूर पहिला सागितला व हलीहि सागून पाठविला असे म्हणोन सागोन पाठवणे *राजश्रीस खाली आणावे श्वस्तरीतीने राज्यभार चालावा हेच प्रकार आईसाहेबास सागून पाठविले काही राजश्रीचे वाईट व्हावयाचे नाही असे असता संशय का घेतात हे आसीर्वाद

ले. ३५४ श्री श. १६७३ ज्येष्ठ शु॥ १५
इ. स. १७५१ मे २८

चिरजीव राजश्री नाना यासी प्रति बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहिले विशेष तुम्ही लिहिल्या वरून गेद जाडी व जीन मुसनफ सुधा पाठविला आहे घेणे उतर पाठवणे रा। छ १३ रजब वर्ख सुमार १०० शंभर पाठविले आहेत घेणे रा। छ मार वर्ख बलवंतराव याजकडे देणे जाणिजे मार बलवतरायास सकाल पाठऊन देणे कितेक सागणे ते सागून सर्व देखील सातारा मजकूरहि आसेल तो समजाऊन देखील तुम्ही आपला डौल कसा येथे कधी येणार हे सागून उद्या येथे पाठवणे आबईच्या हातच्या तीलवड्या व साडगे फार खात आसो ते पाठऊन देणे हे आसीर्वाद ब्राम्हणा बा। पाठवणे उद्या साजचे जेवणास येत ते करणे नाही तरी उपासी राहू हे आसीर्वाद वाख कातगोल्याची सईच होत नाही हे आसीर्वाद

---

१ पत्र नानासाहेबांचें.

ले. ३५५ श्री श. १६७३ ज्येष्ठ वा १०
इ. स. १७५१ जून ७

*[1] चिरजीव नाना यासी भाऊ आसीर्वाद सविस्तर तेथील मजकूर कराणियाचा तीर्थरूपानी लिहिलाच आहे त्याप्रो करणे काल येथे आडचा प्रहरा आलो तिसरे प्रहरा तीर्थरूप देखील बाबाकडे जाणार पालख्या आणल्या तो बाबा आपा वाडियातच आले भेट जाली हरयेक गोष्ट मजेमध्येच पडेल बाबाचा स्वभाव येक प्रकारचा चौघाचे सागितलियावर आसो नीट होईल उद्या बोलावयाचे मूल लागेल पुढे होईल ते लेहून तुम्ही तूर्तच तातड करून येणे पाच सात रोजात लेहून पाठऊ त्याप्रो येणे वरकड तेथील उर्मी बदोबस्त सविस्तर लिहिणे बलवंतराव आले ते ठिकाण लागेल समाचार पुर्ता घेऊन मागाहून सविस्तर लेहून पाठऊन रा दसमी गुरुवार हे आसीर्वाद

---

ले. ३५६ श्री श. १६७३ ज्येष्ठ अखेर
इ. स. १७५१ जून

पुा सेवेसी विनती उपरी राजश्री दिनकरपंतानी व गणेशपंत दामले यानी पर्वतावरील राजकारण खेलविलें होतें तें आम्हास कांही दखल नव्हते राजश्री सिदोजी राऊत व राघोजी भोसले पुणियाहून छ २४ रजबीं येथें आले ते आलियावर दिनकरपंती राजश्री नारायेणराव तात्या यास व मानाजी पायगुडे यांस बोलाऊन आणिले आम्हास बोलाऊं पाठविले आम्हांस तो शरीरी स्वस्थ नाहीं मग आम्हा उभयेतातून लक्ष्मणपंत वाडियांत दिनकरपंताकडे गेले यांजवल दिनकरपंतानी पूर्व संकेत सविस्तर सागितला कीं वरील मुदे पुणियास गेले पुणि[या]हून करार मदार होणे तो होऊन उभयेपक्षींचा ठहराव सिधातास जाऊन गडावरून राजश्री—चे तर्फेने बहिरंभट कलमदानी व हवालदाराकडून गंगाधरपंत व आबाजीपंत आले आहेत त्यास श्रीमताचे आज्ञेत येक गोष्ट कमती कोणती म्हणाल तर हवालदाराचा भाऊ खालता यावा त्यास खाली ठेऊन घेऊन मग आपलेकडील जे जाणार त्यानी गडावर जाऊन इमान प्रमाण देऊन राजश्रीस खाली घेऊन यावे त्यास हवालदारानी आपला भाऊ पाठऊन दिल्हा नाही

---

१ सर्व पत्र खाशाच्या हातचें.

खामखा आमचा इतबार नसेल तेव्हा वोलीस भाऊ पाठवावा आणि तुम्हास वरते घेवावे इतका मजकूर नलगे सर्व प्रकारे श्रीमंताचे आम्ही आहों त्याजकडील जे येतील त्यास वरते घेऊन बोलून चालून कामकांज उरकून त्यांस खालीं लाऊन देऊं व राजश्रींचेहि जाणे खालते होये तें करूं असे बोलून इतबार दाखऊन भावास मात्र खालता पाठविला नाहीं नसो सिदबा व वाघोजी भोसलें व मानापा व नारायेणराव तात्या व आम्ही यैसे गडावर जावे लागतें याचा विचार काये म्हणून दिनकरपंती विचार पुसिला तेव्हां धण्याचे कार्य होत असतां उभयेपक्षींचा सर्व सिधांत जाला असतां होये नव्हे कोणे काये म्हणावें लक्ष्मणपंती तह दिल्हा परंतु तात्यास मात्र गडावर नेऊं नये वरकडानी सुखरूप जावे असा तह दिल्हा त्याजवरून तात्या मात्र न गेले वरकड सदरहूप्रो अवघे गडावर गेले प्रथम उगेच बहुमानार्थ मातुश्रीकडे गेले मजुरा केला संखलितार्थ मजकूर निवेदन केला त्याचा जाबसाल मातुश्रीनी केला कीं आमचे कारकून मोरोपंत वगैरे गेले आहेत ते आलियावर काये सिधांत होणे तो होईल तोपर्यंत काही नाहीं आसे बोलून पानाच्या पट्या घ्या म्हणोन बोलिली त्याजवर यानी उतर केले साहेबीं सुख करावें आम्हीं आज्ञा घेतों यैसे बोलून विडे घेऊन मग राजश्रीकडे आले हवालदार व राजश्री बसोन बोलणे चालणे जाले त्यात भावगर्भ प्रथम दिवस असा मजकूर निघाला निमे गुजराथ व सिहगड मात्र घ्यावा कर्नाटक सोडावे खासगीचि गांव सेते बाग मले सुतलीचा तोडा देखील जे दुसरेकडे गेलें असेल तें सोडून देवावें प्रतिनिधीचा जिल्हा पूर्ववत्प्रो राखावा चव्हाणास अथनी वगैरे प्रतिनिधीपैकीं दिल्हे त्याचा मुबादला प्रतिनिधीस पुरतून द्यावा शाहुमहाजांचे वेळेस जसे होता तसे आता असावे आमचा कारभार आम्ही चितास येईस तसा करू असा मजकूर प्रथम दिवसाचाच तिकडून निघाला मध्यस्त जे राजकारण घाटीत होते त्यांच्या सागणियात व या बोलीत जे वरते गेले होते त्यांस तफावत दिसोन आला मग यानी गुजराथ व सिंहगडचा मजकूर उजरून त्या कलमाचा व आणिक वरकड सर्व मजकुराचा उलटा भाव समजाऊन दो(न) कलमाचा हातरोखा श्रीमंतास घेऊन खाली उतरून आले श्रीमंतास मानले आणि चहूं दिवसांत जाबसाल उगऊन आला तर इमानप्रमाण देऊन शुक्रवारीं राजश्रीनी खाली यावें असा सिधांत करून आले गणेशपंत दामले यांस मागती तिकडे

रवाना करावें तर पहिलें गणेशपंती वरील मजकूर दिनकरपंताजवल काये सांगितला काये ठेविला याजवलील मजकूर पुणियास श्रीमंताजवल काये सांगितला काये ठेविला तिकडील मजकूर येथे कसा काये सागितला याचा इतबार न ये यास्तव पायेगुड्याकडील राजश्री रामाजीपंत प्रमाणीक जाला मजकूर येथंभूत सांगतील या विचारें त्यांस पाठविलें आहेत त्यांजबरांबर श्रीमंतास इतके तपसीलें वृत लिहिलें नाहीं दिनकरपंत सविस्तर लिहितील व रामाजीपंत सांगतील त्याजवरून विदीत होईल इतकेंच लिहिलें आहे परंतु जाला मजकूर कचे वर्तमान स्वामीस कलावें यास्तव लिहिलें आहे आपले मर्जीस आलें तर श्रीमंतास दाखवावें मर्जीस न ये तर न दाखवावें सदर(हू) वर्तमान आम्हास कलोन श्रीमंतांस न लिहिलें तेव्हां आम्ही छद्म केलेंसें ध्यानांत येईल यास्तव श्रीमंतास येकंदर दाखऊं नये रामाजीपंतानी मुखोतरे सर्व श्रीमंतास व आपणास निवेदन केलेंच असेल हे विनंती[१]

---

ले. ३५७ श्री श. १६७३ आषाढ
इ.स. १७५१ जून

* चिरंजीव राजश्री नाना यासि आसीर्वाद उपरी राजश्रीनी येणेप्रा आयकणे तर कारभार करवावा या मजकुराची याद काल पाठविलीच आहे त्या यादीत येमाजीपंताचे मुले माणसे आमचे हवाली अगदी करावीं आम्ही फौज पाठऊन त्याचे पारपत्य करितो ठाणीहि घेतो हा मजकूर लिहिला नाही यास्तव हाली लिहिला असे जर त्यास सोडणे नसेल तर येमाजीपंत गुरे वलता चुकणार नाही आम्हीहि मन घालून पारपत्यास फौज पाठवणार नाही याचा विचार बोलून ठहरावणे पारपत्य मात्र करवावे माणसे न सोडावी हा प्रकार आमचे मनास येत नाही हे आसीर्वाद

---

ले. ३५८ श्री शके १६७३ आषाढ
इ. स. १७५१ जून

* चिरजीव नानाप्रती भाऊ आसीर्वाद राजे शुक्रवारी खाली येणार होते कामाची आट नाही परतु क्षणभगूर विचार राजमाचकराचा सदेह

---

१ पत्र कोणाचें ? २ पत्र नानासाहेबांचें.

यामुले निमित्य काढून आषाढ मास वा(ला)गेल आसे म्हणतांत श्रावणात उतरा तूर्त चौक्या उठवाव्या आपले आपूणहि करावयाची उमेद वरील विचार तर मातुश्रीचे केवल बंड मोडले नाही हवालदारामुले राजश्रीची पुर्तीच सलाबत परतु तो हरामखोर विस्वास नाही त्यास राजा चौक्या ठेविलिया आपण कजिया करीन आसेहि बोलतो यैसीयास याचा विचार कोणे प्रकारे करावा चौक्या उठवाव्या की नाही याचे सविस्तर लिहिणे येथील मजकूर तर विशेष नाही आहे तेच आहे भूगावचे सिवेस धोंडे ठेवावयासाठी आपला माहीतदार पोरगा पाठवणे त्याबाा समाचार घेऊन कातगोल्या पाठवाव्या रा छ बुधवार प्रातःकाल हे आसीर्वाद

---

ले. ३५९ श्री श. १६७३ आषाढ शुा १०

इ. स. १७५१ जून २२

*आसीर्वाद उपरी ब्राम्हणांनी चोरीहि केली नाही व कोणाचे हातहि कापले नाही सर्व लटके मनास येईल तश्या भलत्याच गपा मारितात मारोत काय चिंता आहे छ ९ साबान हे आसीर्वाद

---

ले. ३६० श्री श. १६७३ श्राव. शुा १०

इ. स. १७५१ जुलई २१

*चिरंजीव राजश्री नाना यासी प्रती रघुनाथ बाजिराव आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष तुम्हाकडून बहूत दिवस पत्र येत नाही अपूर्व आहे तरी सदैव पत्र पाठवीत जाणे येथील मजकूर समजाविसीस प्रारंभ जाहाला आपली फौज लवकर तयार करून सावध राहावे म्हणजे कोण्हाचा पेच नाही हा विचार करून हाली हेच काम करितात म्हणजे सर्वहि फितूर व मोगलाकडील पेच वारितील येणेप्रो विचार आहे तुम्ही घरी किती दिवस राहाणार ते लिहिणे येथे केवडे दाहा पाच पाहिजेत जासुदाबराबर जरूर पाठवणे जाणिजे छ ८ रमजान बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद

---

१ पत्र नानासाहेबांचें.

ले. ३६१ श्री श. १६७३ भाद्र. शुा ५
इ. स. १७५१ आगष्ट १५

आसीर्वाद उपरी आलीकडील वर्तमान तरी तीर्थरूपाची मर्जी उतम आहे साताराचा कारभार पेचटच आहे आईस भरोसे फार आहेत आईचे कारभारी विठलपंत मोरोपंत याबाा जाबसाल जालियाप्रो करार चितापासून त्याणी केला तरी होईल नाहीतरी काजिया आहेत पीकपाणीहि होत आहे उदाजी चवाणहि मिरज प्राते आले मोगलाकडील मजकूर आम्ही जागीर मागतो यामुले आपले जागा तयारीत आहेत आवाई फार आहे आमचेच नेट लागलिया कशास कलह होईल त्यात जानबाहि आठा रोजात येणार त्याणी पाठविले आलियावर होणे ते होईल फौजेची समजावीस चाली लागली आजून पुर्ते लोक आले नाही नवीहि दोन च्यार हजार फौज जुनी पाहून दूर करून ठेविती रघोजीबावाचे कारभारी पुर्ते प्रमाणपुरस्कर होऊन त्याकडे गेले तूर्त दोन च्यार रोज चतुर्थीचे रगमहालात मखर होऊन नाच कथा आहे विशेष रग नाही सेनापतीही आले होते दमाजीचे भाऊहि गेले ते पुर्ते गाठेपणावरच आहे आठा पधरा रोजा कोठे पाठवितील वरकड आम्ही बहूत व्रतीच आहो तुमचा बोभाट कडीकोडी फार काय ते लिहिणे समजाविसीचे काम आहे बलवतरायास लौकर पाठऊन देणे राा छ ४ सवाल बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद

---

ले. ३६२ श्री श. १६७३ भाद्रपद व. ३०
इ. स. १७५१ सप्तं. ८

* चिरंजीव राजमान्य राजश्री नाना यासी प्रती बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहिणे विशेष पत्र पाठविले ते पावले राजश्री स्वामी सरकारच्या जामदारखानीयातील ताटे वाट्या व सनगे नेली त्याचा बयान करून घेईन म्हणतात नाना प्रकारे वलगना करितात त्यास तीन हजार रुा देवपुजेतील व ताटे वाट्या व काही कापड आणिले आहे ते पाठऊन द्यावे व हती पाठविले पागा पाठवावी कारखाने त्याचे हवाली करावे रुा तो पागेस खर्च जाहाले म्हणजे त्याचा कज्या आम्हाकडे काय म्हणोन लिहिले ते कलले ऐशीयास आम्ही तो त्याचे हित करीत असता त्यास अनहित वाटले तरी वाटो

---

* पत्र भाऊसाहेबांचें.

त्याचे जामदारखानियातून ताटे वाट्या वगैरे सुतलीचा तोडा अदिकरून जो तुमच्या मारफातीने बाहेर पडला असेल तो त्याचे त्याजकडे कूल पाठऊन ज्या कारखानदाराकडील त्याचे मारफातीने बज्याऊन तुझ्या मारफातीने हे नेले ते हवाली केले ऐसे करावे म्हणजे पुढे मागे जामदारखाना लुटला ऐसे म्हणतील तो दोष वारला हे राजे लोक याचे शास्वत काय कोण्हे वेलेस काय करितील यास्तव इतेबार न धरिता त्याचे त्यास घ्यावे पागा आणविली आहे ती पाठऊन देतो चौक्या उठऊन कारखाने राजश्री स्वामीच्या हवाली करणे म्हणोन रामाजी माणकेस्वर यास पत्र सादर केले असे यावेगले तुम्ही लिहिणे ते या अन्वये त्यास लिहिणे रा छ २८ सवाल हे आसीर्वाद

---

**ले. ३६३** श्री श. १६७३ कार्तिक
इ. स. १७५१ आक्टो.

* आसीर्वाद उपरी येशवंतराव याजकडील रुपयाचा मजकूर लिहिला तो कलला ऐशीयास मारनिलेनी च्यालीस पनास द्यावयाचा मजकूर बोलतात तरी त्यास हे काही योग्य द्यावयास पडत नाही लाख रुपयेपर्येत कनिष्ट पक्ष त्याजपासून घ्यावयाचे करार करावे वरकड कर्नाटक प्रांती स्वारी जाहालियास भगवतराव यास बरोबर द्यावयाचा मजकूर तरी तूर्त मारनिले तीर्थरूपाजवल आहेत त्यास दोन लाख रुपयेपर्येत द्यावे आणि आमचे कर्नाटक प्राती जाणे जाहालियास भगवंतराव यास न्यावे दाहा पाच हजार रुपये त्यास पावते केले जातील आणि च्यालीस पनास हजार द्यावयाचा मजकूर जाहालियास तितक्यास तितके व्याज होईल विशेष मजकूर जाहाल्याविना असामीचा विचार कसा बनतो हा अर्थ त्यासी उघडून बोलोन किती रुपये देतात काय मजकूर तो ठहरावणे त्यासारखे लिहिणे मग यैवज घ्यावा ते लेहून पाठऊ या येका दो दिवसा मागोन लेहून पाठऊ त्याप्रो घ्यावयाचे करणे सेखमिराकडील रुपयाचा मजकूर तर त्याजपासी रुपयास काही कमी नाही लाख रुपये द्यावयास न मिलतसे नाही आणि ते पहिल्यापासून पदरचे आणि आम्हास पैकियाची वोढ या दिवसात जर ते पैका न देत तरी कैसे कामास येईल यास्तव त्यासी बोलान लाख रुपयेपर्येत ठीक करून लेहून पाठवणे मग घ्यावयाचे

लेहून पाठऊ त्याप्रो घेणे गोपालराव याजकडील मातबर कारभार दोन पर्येत ते बोलत होते त्यास ते आले असतील त्यास बोलला असाल नसिला बोलला तरी बोलोन ते ठीक [क]रून लेहून पाठवणे भालदार व स्वार मागाहून पाठऊ राजश्री दोन्ही माहाल खाली घेऊन आले आणि मातुश्रीहि आली असली जर नरम पडले तरी रावताचे विशेष प्रयोजन नाही जर विशष प्रयोजन पडलिया आम्ही जवल आहो पाहिजे ते फौज येऊन पोहचेल आणि पाठवणे तीहि पाठवितो वरकड सर्व वर्तमान कलले डौंकेचे प्रयोजन नाही राऊत उठऊन नेणे रोजचे रोज नेहमी तावडतोब राऊत पाठवीत जाणे कर्नाटकचे मजकुराविसी तीर्थरूपानी करावें आसे मलमलीत लिहिले आहे बाबूजी नाइकास सरजाम द्यावा असे आहे पुर्ते मागून लिहिले येईल ते लेहून पाठऊन येकूण येक गुता पैका दाहा लाख पाहिजे तीन च्यार आम्ही मेलऊ सातारा तुम्ही सा सातपर्यंत मेलविले तरी जाणे होईल तीर्थरूपाचे मर्जीस आणून आम्ही ठीक करितो तुम्हाकडे पैकियाचा गुता हे आसीर्वाद

---

ले. ३६४ श्री श. १६७३ कार्तिक
इ. स. १७५१ आक्टो०

* चिरजीव नाना यासी भाऊ आसीर्वाद करजवणे पुण्यास कजियाबद्दल दिवालीस आले दौलतरायाचे घरी त्याजकडून उपक्रम जा[ला] कोणेहि गोष्टीने तरी त्यास कलेल म्हणून आपले पहिले आज्ञेप्रो दोन वेल आणून सेवा केली आपलेहि स्मरण केले निरोप दिल्हा कामसमई हजीर होतील सोमवारी पाशाणियास जावयाचे होते तेहि केले साताऱियाचा मजकूर येथून करार जालियाप्रो आईसाहेब खाली देखील राजश्री उतरली परंतु पुढे सर्व रंग भरणे आहेच जाधवराव वगैरे येक दोन मराठे पाठवावयाचे आहेत तेहि जातील येखादा खासा सारे लचाड घेऊन तेथे गेले पाहिजे याचा विचार होईल तो लेहून मोगलाने पैका दिल्हा पुढे सलुखाचा डौल कललाच होता त्याप्रो जानबा रवाना झाले कर्मालियास जरूर काम म्हणून गेले तेथून जातील आपाबा दिल्हे येकूण जालेच पुढे गगातीरी भेटहि होतील फौजहि फार करून समजलीच आहे जमाहि होऊं

---

१ यापुढील मजकूर खुद्द भाऊसाहेबांच्या हातचा.

लागली येथून पुढे गेलिया लौकर होईल तीर्थरूपाची मर्जी सर्वहि विदितच आहे तुम्ही आलिया सर्व कलेल फार भिऊन निराले बोलता पडदा धरता हे काय काही संदेह नसू द्या नाना पुर्ते समजा आम्ही येक तऱ्हेचेच आहो विशेष होईल ते लेहून तुम्ही कधी येणार काय मनसुबा लिहिणे येथूनहि कूच पाच सात रोजात तल हालेल दाभाडियाचा मजकूर कललाच आहे येथून पुढे चाललिया गाईकवाड जागा येखादी धरतील बाई वगैरे बो आहेतच सविस्तर उतर लिहिणे सखाराम येथे आला बरेच आहे वरकड कारभारी आपला कारभार घाट(त)च आहेत हे आसीर्वाद धोंडोबाजवल बाबाची उमेद मनसुबे कलतच आसेल सविस्तर लिहिणे बलवतराव व जगथाप मडली लौकर लाऊन देणे आसीर्वाद पत्र वाचून फाडून टाकणे

विनंती बलवंतरायास गेला ते जाब न लिहिला विशेष संदेहाचे कारण प्रयोजन काय सविस्तर लिहिणे तुम्हीहि लौकर येणे हे विनती

---

**ले. ३६५** श्री

चिरजीव राजश्री नाना यासी प्रती बालाजी बाजिराऊ प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत जाणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले वर्तमान विदीत जाले पाच हजार रुा दमाजी गाईकवाडाकडील तुम्हास द्यावयाचे त्याची चिठी राजश्री मोरो विनायेक दीक्षित या......... ( अपूर्ण )

---

**ले. ३६६** श्री

चिरंजीव राजश्री नाना यासी सदासिव चिमणाजी आसीर्वाद उपरी बलवतराव गणपत यांचे कानाचें तेल फिर्गीयापासून अलनकीखान घेऊन आलेच असतील दुसरें फिर्गीयापासून घेऊन मागाहून पाठऊन देऊ राजश्री मल्हारबाकडील कारभार सर्व जालाच कारकुनाचे गांवाचा काहीं मजकूर राहिला त्यासाठी बहुधा कारकुनानीच चढी लाऊन रुसवा दाखविला यैशास थोड्या मजकुरासाठीं कोणी सांगोन तटी लावावें हे उतम नाही जानबा व अमृतराव पाठविले आहेत हे त्यासी बोलोन ठीक करितील तुम्ही विशेष वर्तमान आढलेल ते लिहून पाठवणे तुमचा खासा निश्चय काय होईल तो लिहून पाठवणे हे आसीर्वाद

---

ले. ३६७ श्री श. १६७२ पौष अखेर

इ. स. १७५१ जानेवारी

आसीर्वाद उपरी तुम्ही गेलिया ताा अलिकडील वर्तमान मोगलाचे कर्नाटकास यावयाचे होते म्हणून किरकोल दोन तीन लाख रुाे खडणी घेतली भीमातीरास यादगिरीपर्यंत आलो मोगलाकडील मजकूर फिरंगी प्रमाणिक बोललेप्राो केले पाहिजे यास्तव नवाबास कलाबर्गीयाकडे घेऊन आले नवाबहि त्याचेच लगामी परतु नेट नाही स्वता हिमत कललीच आहे जानबा खाना याचे समजाविसीस आवसेपर्यंत जाऊन पुढे जाणे न जाले यामुले ते हलके पडणार पुढे नेहमी कर्नाटकास गेलियास स्वरूपच गेले यास्तव सर्व मोगलेयानी येका करून सिबंदीचा वगैरे दंगा करून माघारे फिरणे करार करून येक मजल गेले फिरगी नवाबाचे करारात आंतर नाही परतु घरचा बदोबस्त खानाचे विचारे करावा त्याची भेट जालियावर शहर अगर भागानगर जिकडे जाणे तिकडे जावे आसा मजकूर आहे विशेष परस्परेहि सदेहाचे मूल नाही आसे जाणून आम्हीहि त्याची आनुमत्य जाणून हीच मसलत सागितली आम्ही दर मजल जसे दिसेल तसे काम विल्हे लावीत पुढे जातो पुढे होईल वर्तमान ते लेहून पाठऊ विशेष केवल माहागाई नाही मुजफरखान तीनसे पर्यंत राऊत दीड हजार माणूस मिळाले पंनास हजार दरमाहा करून ठेविले सरदार आपले जागा रुसले ते मुख्यत्वे मल्हारबा मध्यस्त जानबा सखाराम सेवटी होते त्याचे मर्जीप्राो गावाचे करून दिले कारकुनाचा मजकुर थोडासा करावयाचा होता त्याचाहि आग्रह नाही आसे रुबरु बोलले आसून कारकुनानीच चढी लाऊन रुसविले लाहान मजकुरात आम्ही आपले तर्फेने आतर न करावे म्हणून त्यावरच येख्तीयार टाकून गावची याद गगोबा जयापानी देखील कारकून तोडमोड जे करार केली त्याप्राो सनदा देणे म्हणून पुण्यास लेहून पाठविले मल्हारबाचेहि पत्र आले होते यावरून विशेष सदेह वाटत नाही तयारी करून आपले कामास जातील थोडासा पेच मध्ये कारकुनास राखलाच पाहिजे तो राहिलाच येकून याप्राो गावाविसीचा रुसवा मोडला हे आसीर्वाद

---

१ पत्र भाऊसाहेबांचें असून स्वदस्तुरचें आहे.

ले. ३६८ श्री श. १६७१
इ. स. १७४९

( पहिला बंद गहाळ )

क वे ख प्रो करार जाला मातुश्रीचा भाव सभाजी बसवावा तूर्त आपण प्रतिनिधी व पाडवगड देतात हा दस्तायवज घेऊन तीर्थरूपाकडे पाठविले आमचे नावे देणार आम्ही आपले नावे करीत नाही माधवरायाचे आगर रायाचे नावे करावे परतु मातुश्रीपासून करून घेतल्या सभाजीहि कबूल करील त्याकडील मुद्दे स्थापने नंतर करून घ्यावे आपले हाती सारे बदोबस्तास बरे आहे आज होईल ते पुढे होणार नाही याच अन्वये तीर्थरूपास लिहिले येक जुने नेमा त्यासच राखावे म्हणून करणे तरी करावे व सभाजीसी करार केला आधीक न घ्यावे म्हणून करणे तरी करावे वरकड लोभाचे रीतीने करावे हे उतम आसे लिहिले यात तीर्थरूपाचे विचारे उतम ठहरेल त्याप्रो पुढे होईल परभारे ठाईस राहून आज्ञास न्यावे आणि बदोबस्त करावा तो आर्थ तूर्त होत नाही येथे येऊन करणे ते करावेसे दिसते सविस्तर कलावे म्हणून लिहिले आसे रा छ १५ रजब हे आसीर्वाद[1]

---

ले. ३६९ श्री श. १६७१
इ. स. १७४९

आसीर्वाद उपरी करवीरचे करारचे वर्तमान मागून लेहून पाठऊ म्हणून लिहिले होते त्यास याप्रो करार जाला की बदोबस्त गुजराथ द्यावी कर्नाटकच्या मिरज वगैरे सनदा सर्व येख्तीयार तुमचे विचारे चालावे(?) सातारा चदन वदन येथील आधिकार स्वाधीन करावे जवाहीर वगैरे आसेल त्यात शाहू माहाराजाचे कर्ज वारावे त्याचे राज्य चाललेप्रो चालावे व जिजाबाईस खासगी करून येका बाईची द्यावी राजारामास कैद दाखल प्रतिष्ठीने पोटास देऊन ठेवावे पुर्ते ठिकाण लागेल तसे करावे आसा जाला जिजाबाई वेगले सभाजीचे येणे येकदर होत नाही आसे जाले तेव्हा आसा करार जाला तीर्थरूप पुण्यास आलियावर चैत्रवैशाखात करावे आसा करार जाला सर्वहि मजकूर स्थापना जालियावर करावे

---

१ सबंद पत्र भाऊसाहेबांच्या हातचें.

तूर्त कोठे तोंडावाटे काढू नये याप्रो केले मातुश्रीहि मामानी आजून रजा-वंदच राखिली हा करार त्यास ठाऊक नाही परतु काही वसवासाने गडकरियास चढी लाऊन मामावर जात मोजदादेस होते ते मना गडकरि-यानी केली याणी मातुश्रीस पुसल्यावर पारपत्य करावे हे बोलली येथेहि पत्रे पाठविली येथून लोक पाठविले मामानी आदीच चौक्या बसविल्या मग गडकरी फिरून येऊन पहिलेप्रो नि र वे ने चा ( पुढील बंद गहाळ )

---

ले. ३७० श्री

आसीर्वाद उपरी दरमाहाच्या देण्यास व तीर्थरूप राजश्री भाऊसा-हेबाकडे लष्करच्या रवानगीस पैकियांची वोढ जाली आहे रेवापुरी व हसपुरी पासून तीस हजार रुा कर्ज सवोत्रा घेऊन पाठविले कर्जहि पैका मिलत नाहीं काये कोठें आहे ते पाऊणेदुवोत्रा दुवोत्रा व्याज मागतात तरी स्वामीनी काही योजना करून रुा करावी म्हणोन विस्तारे लिहिले ते कलले ऐशास येथेहि पैक्याची वोढ जाली त्याचा विस्तार काये ल्याहावा कोण्हा सावकाराजवल रुपया नाहीं कितेकाची दिवाली निघाली नवे माम-ल्यावर माहालकरी केले रसदा करार केल्या त्यास सावकारापासून रुा न मिले आम्ही तो तो यैवज सिलेदारास देविला तो त्यास काही पावला काहीं न पावला ते फजी[ती] काये ल्याहावी असो तरतूद जाल्यास तुम्हांकडे यैवज पाठविला जाईल तुम्ही तेथें कर्जवा[म] मेलवीतच आहा मेलवणे तूर्त कारभार नवे होऊन कोणे थरास जातात हे दृष्टीस पुर्ते पडे तो सरकारचा ऐवज न देणे येके ताल्यावर बसायास जरूराती पडेल ते मात्र देणे नाहीं तर तुमचे श्वरूपच तेथे राहावयाचे गेले मग कशास तेथे राहावे ऐसा विचार आहे तेथे रुा कोठील येथे येक रुपया नाही पाचा लाखाच्या वराता भाऊच्या तटल्या लोक हाका मारतात गुजराथच्या रसदा कबूल केल्यापैकी निमे ऐवज आला निमे येता दिसत नाहीं लौकर विल्हे कारभार लागला तर बरे नाहीतर येखादीकडे दर मजल जाऊ वसईचे सालाप्रा हे साल प्राप्त जाहाले आता रुा नवा कोठून येईल तेव्हा च सोई पडेल व खरे अथवा लटके देणे वारेल मधे काही मिलत नाही दोन वर्ष मसलतशीर राज्यभार या प्रकारची हे समजून आपले संसाराचे मनन करणे हे आसीर्वाद

---

१ भाऊसाहेबांच्या स्वदस्तूरचें पत्र. २ पत्र नानासाहेबांचें.

ले. ३७१ श्री

चिरंजीव राजमान्य राजश्री धोंडोबा यासी सदाशिव चिमणाजी आसीर्वाद उपरी येथील कुशल ता। छ १८ सफर जाणून स्वकीये कुशल लेखन करीत जाणे विशेष इकडील वर्तमान तरी नगराजवळ तीन कोसावर आलीकडे आमचा मुकाम आहे उद्या परवा तेथून कूच करून पुढे जाऊ नगरकर मुत्या मुषकी यास पत्र पाठविले होते कीं कडेवलीतचे जमीदार व आपला मातबर माणूस पाठऊन देणे पा। मजकूरचा घासदाणा विल्हे लाविला जाईल म्हणून लिहिले त्यास त्याचा जाब आला कीं आपणास बरे वाटत नाही मीच येणार होतो त्यास त्याला बरे वाटत आहे व त्याकडील कोणी आला नाहीं याकरिता गावोगावचे पाटलास रोखे व मसाले करून आणिले काही आले काही येतील पांच सात हजार येथील घासदाणा घेऊन पुढे जाऊ नेवासियाच्या घासदाणियाची खडणी होईल सोपाना गुरव व सबज्या गुरव याचा तळेगावच्या गुरवकीचे भाडण होते हणमताच्या पुजेचे भाडण होते त्यास नानानी पत्र देऊन आम्हाकडे इनसाफ करावयाबदल पाठविले त्यास इनसाफ मनास आणता सबज्या कदीम वतनदार त्यास सोपाना जडकर सबज्यानें आपल्या वतनापैकीं निमे वतन यास दिल्हे असता सगला हणमंत हाच खात होता तो म्हणत आसे की निमे निमे प्रमाणें खाऊ त्यास सोपाना खोटा जाहाला सबज्यास निमे हणमंत द्यावासा इनसाफेकरून जाहाले तेथे तीन हजार रुपये दोघाकडे हरकी गुनेगारी करार केली आहे व पहिले जानबा सोपानाची पाठ राखीत होते पारपत्यच कराव या प्रकारे बोलत असत कोणकोणाजवल बोलले कीं तुम्ही इनसाफ करता हा कसा करता नानाजवल जाईन आणि पचाईताचे पारपत्य करीन नाही तरी राजश्रीजवल जाईन भिडेचे माणूस म्हणून गै जाहाली आम्ही वाजवी करणे ते करून परस्पर वादियाचे कागद लिहिवले व या पेचात कितेक बलुते आले आहेत त्याजवलहि हजार दोन हजार रुपये घेऊ यानंतर खैराई किला पेठकराकडील आहे त्याचा लाग त्रिबक सूर्याजी याणी तेथील लागी सातारियास पाठविला होता तेथें त्याचे वर्तमान मनास आणू बराबर बावाजी व बालोजी खिजमतदार पाहावयास्तव पाठविले होते ते पाहून पुणियाच्या मुकामी आमच्या जवल आले व त्रिबक सूर्याजीहि आले व लागेहि बराबर घेऊन आले होते वर्तमान मनास आणिता पनास साठ हजाराचा मुलूक किलियाखाली

होता व किलाहि बहूत उतम त्याजवरून त्यास सुरगडकरी वगैरे दोनतीनसे माणूस बराबर दिल्हे व बावाजी व बालोजी बराबर दिल्हे व त्याणी उपरालियास दोनशे राऊत मागितले होते त्यावरून सिवाजी बाबाजीस पत्र दिल्हे कीं त्रिबक सूर्याजीचे हवे माणूस ज्या दिवसी जेथे बोलावील तेथे जाऊन पोहचणे म्हणून लिहिले होते त्यास त्रिबक सूर्याजी सुरगडापासून दबियाने तेथें गेले चहू कोसावर आलीकडे गेले वाघेरा म्हणून कोलियाचा जागा आहे तेथें गेले त्यास हे वर्तमान वाघारेकरास कलले त्याणी याजवर छपा घातला त्याचे याचे झुज जाहाले याच्या सभवते ते घेरुन बसले त्याकडील कोली सरदार याणी धरला च्यार महिनेपर्यंत आमच्या लोकाचे पाणी बंद केले मग कोली यानी सलियावर घातले आमच्या कडील सरनोबत व बावाजी यास किलियावर घेऊन गेले बेलभंडार दिल्हा आणि कोलियास सोडून नेले मग बावाजीस व सरनोबत यास कैद केले आणि आमच्या लोकाच्या भोताल्या माणसे बसविली होती त्यास सागितले होते की आम्ही तोफ केली म्हणजे तुम्ही त्यावर पडा आमच्या लोकास ठाऊक नव्हते तोफ होताच आमच्या लोकावर छपा घात(ला) त्याचे याचे झुज होत होते तो सिवाजी बावाजी यास आणावयास माणूस गेले होते त्यास तेहि त्या वेळेस येऊन पावले मग राऊतानी त्यास मोडून काढले मग आपले लोक व राऊत येकत्र जाहाले आणि तेथील गुरढोरे वलून घेऊन भास्करगडाकडे आले वाघोरेकरानी काम नासले नाहीतरी काम जाहालेच आसते वाघेरेकरांचे पारपत्य करणे जरूर यास्तव तेथील लाग करविला आहे मागून वर्तमान आले कीं बावाजीचे व सरनोबताचे डोके मारले ह्मणून आले आहे मियामुष्की यास पाच सा दिवस बरे वाटत नव्हते तो छ १६ सफरी मेला बहूत काये लिहिणे हे आसिर्वाद

---

ले. ३७२ श्री शके १६७३ मार्ग० ते फाल्गून

इ. स. १७५१नोहें. ते–५२ फेब्रु.

यादी हकीकत प्रजापतनाम संवछरे

मार्गेश्वर सुध १४ बुधवार ते मार्गेश्वर सुध १५ गुरुवारी मोदिवसी जाबगावावर नवाब सलाबत कूच करून बंगेपलवें येथे येऊन

जंग व पंत प्रधान याचे जूझ जाले थोडकेच जाले चिमणाजी बापूजी वगैरे दाहा पाच माणूस पडिले पार-नेराखाले येऊन मुकाम केला १

+ग्या हून कूच करून गाजऱ्याचे पिंपलेगाव येथे मुकाम केला

कलम १

मार्गेश्वर वा। ३ रविवारी जवल्यास मुा। जाला जवल्याचा तसनस केला

कलम १

मार्गेश्वर वद्य ६ बुधवारी मोगल कूच करून घोडनदी उतरोन मलठणास आला मागे फौजेस तुटोन तीनेक हजार फौज राहिली होती तिजवर प्रधानपंती हला करून चालोन गेले युध्य मातबर जाले मोगलाचा मोड जाला च्यार पाचसे माणूस जिवे मारिले पाच सातसे जखमी जाले याजकडील च्यार पाचशे जखमी जाल शे + + माणूस लहान मोठे मिळून पडिले च्यार हाती घेतले घोडी घेतली दोन तीन हाती व फौज राहिली ती थोरले फौजेत गे + त्याची कुम [क]हि येऊन पोहचली मलठणी मुा। जाला १

मार्गेश्वर वद्य रुजू पौ। शुध ६ गुरुवार ते दिवसी मोगल कूच करोन तलेगावास माघारा गेला सबब की + नवा मुा। भीमेवर केले सल्याचा मुकाम केला श्रीमंताचा मुकाम सुपे पवाराचे येथें जाला रात्र तीन प्रहर जाली ग्रहण लागले ते समई मोग-लाने छपा घातला फार गल्हाटा केला रा। बाबुराव फडणीस यास गोला लागला तो समये संकटाचा गेला कलम १

मार्गेश्वर वा। ५ मगलवार कुक-डीवर गुणोरियास मुकाम मोगलाचा जाला कलम १

मार्गेश्वर वद्य ७ गुरुवारी मोगल कूच करून गणेगावास आला पवा-राच्या हवेल्या जालिल्या तेथे दोन तीन मुकाम केले कलम १

मार्गेश्वर वद्य १० रविवारी मोग-लाने कूच करून सिकरापुरावर ये-ऊन मुकाम केला सिकरापूरची घरे अगदी जालिली कलम १

मार्गेश्वर वद्य १२ मंगलवारी मोगल कूच करून भीमातीर कोरे-गावास आला श्रीमंत गोलेगाव इंद्र-णीतीरी राहिले कलम १

पौष सुध ९ रविवारी तलेगावीहून कूच करून वाटेने जुझत न्हावीवर भीमातीरी मुकाम केला श्रीमत वड-गाव बडे येथे जाऊन राहिले

कलम १

पौष सुध ११ मंगलवारी मोगल कूच करून वडगाव बडे येथे येऊन मुकाम केला गावापासी नारो आपा

मजकूर जाला होता मागती बिघाड उभयेता कडून जाला म्हणून संतापे जाऊन तलेगाव मारिलें वस्तभाव लुटिली मातबर हवेल्या होत्या त्यास आगी दिधल्या तलेगावचा सत्यानास केला १

पौष सुध १२ बुधवारी वडगाव बडे येथून कूच करून नवाब सलाबतजंग राहूपिपलगावचे मध्ये मुला नदीवर मुकाम केला राहूचा तसनस जाला राहूत पेवे धान्याची निघाली कलम १

पौष सुध १४ सुक्रवारी त्रितीये प्रहरी राजश्री रघोजी भोसले दोनेकसे रावतानसी राजश्री पंत प्रधान याची त्याची भेट जाली वरक[ड] रघोजी बावाची फौ[ज] घोडनदीवर होती सडे येऊन भेटल कलम १

पौष सुध १५ मंदवारी नवाब सलाबतजंग राजणगाव मुलेभिवरेच्या संगमाहून कूच करून रासाईचे वडगाव येथे येऊन मुकाम केला रघुनाथपंत दादा याणी जेजाला घेऊन खासा नदी पलीकडून मार देऊ लागले मोगलाकडू[न] तोफेचे गोले मारू लागले येक गोला दादाच्या पाया जवलून गेला पायेपोस कातरून गेला पायासहि थोडीसी आंच लागली कलम १

पौष वद्य ५ बुधवारी नवाब रघोजी भोसले याजपासील पेसवियापासी सरदार होत ते उठिले त्यास मानेस गोला लागिला ते परलोकास गेले कलम १

पौष सुध १४ सुक्रवारी मोगल कू[च] करून वालकी राजणगावी भिवरा मुलानदीचे संगमी मुकाम केला मार्गी येताना डुमदारींवर राजश्री रघुनाथपंत दा[दा] यानी घालविले मोगलाचा आरबा मार्गाचे अडचणीमुले वाटेने चालिला ते वेलेस घालविले जूज जाले बरेच जालें डुमदारीस हणवंतराव निबालकर होते वगैरे मोगल होते उभयताकडील से दोनसे माणूस जाले दोन तोफा पाडाव जाल्या मोगलाची कुम[क] डुमदारीस आली मग श्रीमंताची फौज माघारी गेली शाहाजी सुपेकर हाणवतराव याजकडील सरदार मातबर होता तो पाडाव जाला १

पौष वद्य १ रविवारी मोगल कूच करून मार्गाने जुझत माडवगण नजिक कानगाव येथे येऊन श्रीमंताच्या तलावर मुकाम केला कलम १

पौष वद्य २ सोमवारी नवाब सलाबतजंग माडवगणाहून कू[च] करून वाटेने जुझत भीमातीरी दौंडेस मुकाम केला ते दिवसी राणोजी बरगे व त्याचा लेक ठार पडिले

सलाबतजंग दौंडेहून कूच करून भीमेच्या काठाने अजनुजेच्या वर पेडगाव याच्या दरम्याने मुकाम केला अजनुजेचा तसनस फार जाला कलम १

पौष वद्य ८ मंदवारीं काष्टी-तांदळीहून नवाब सलाबतजंग कूच करून मार्गेने तोफाचा मार देत बंग देवाचे वाडीस हंग नदीवर मुकाम केला कलम १

पौष वद्य ९ सोमवारी पिपलगावीहून नवाब सलाबतजंग कूच करून मसिदीच्या राजणगावानजीक नदीवर मुकाम केला श्रीमंताचा मुकाम घाटावर मुकाम जाला कलम १

पौष वद्य १० मंगलवारी नवाब सलाबतजंग राजणगांवींहून कूच करून खडकीवर मुकाम केला श्रीमंताचा मुकाम केडगावनजीक जाला ते दिवसी मकर संक्रांत तेथेच जाली खासे काही मोगलाच्या मुकाबल्यास गेले नाहीत + + का मा से च गेले कलम १

पौष वद्य १२ गुरुवारी श्रीमंत लिंबली[क?]हून कूच करून निंबदेहारे याचा घाट उतरोन सिगवे पारगाव येथे मुकाम केला कलम १

माघ सुध १ सोमवारी राजश्री रघुनाथपंत दादा व जानोजी निबा-

आनंदराव बरगे यास गोळी लागली कलम १

पौष वद्य ७ सुक्रवारी नवाब सलाबतजंग पेडगावीहून कूच करून माघारा वाटेने तोफाचा मार देत काष्टी-तादळीस घोडनदीचे उतर तीरी मुकाम केला कलम १

पौष वद्य ९ रविवारी नवाब सलाबतजंग बंगदेवाचेवाडीहून कूच करून वाटेने तोफाचे मार देत पिश्याच्या पिपलगावावर बंग(हंग)नदी तीरी मुकाम केला सायेकाल पावेतो श्रीमंत मोगलामागे होते मग बुनगियांत यावयास रात्र जाली लस्कर सारें चुकले जेथे ज्याच्या मनास आले तेथे तो राहिला सारी तारांबल जाली येगेप्रो रुईस कलम येक १

पौष वद्य ११ बुधवारी नवाब सलाबतजंग खडकीनजीक मुा होता तेथून कूच करून अहमदनगरानजीक शहराचे दक्षणेस कोसावर मुकाम केला श्रीमंत यानी मोगलाकडे जाऊन दुरून मो[क]बला घेऊन प्रहरभर पर्वतमस्तकी बैसोन मग मुकामास निबलीस पाच कोसावर येऊन राहिले कलम १

पौष वाा १४ मंदवारी हणमंतराव निबालकर व राजेश्री जानोजी निबालकर माहाराव अर्जुन बहादर यैसे सल्याच्या मजकुरासाठी श्रीमं-

लकर व हणमंतराव निंबालकर वगैरे श्रीमंताकडील सरदार दाहा हजार फौजेनसी मोगलाच्या लस्करानजीक गेले मोगलाकडून रा। राजे रघुनाथराव बहादर दाहा येक हजार फौजेनसी लस्करापासून दोन कोस आले तेथे वाडे व डेरे दिल्हे होते तेथे भेटी उभयताच्या जाल्या सला जाला त्रिंबक कि(ला) माघारा द्यावासा जाला वगैरे अ + मोगलाचे चालवावेंसे जालें पूर्ववत्प्रा। सला जाला इमानप्रा। बेल भांडार व नानारोटी दादाची व त्याची आली कलम १

माघ सुद ७ रविवारी नवाब सलाबतजंग सिंघवे पारगाव येथे श्रीमंताचा मुकाम होता त्या ++ क मुकाम केला दुसरे दिव(शीं) (आ) ष्टमी सोमवारी जाल्यावर कूच करून मूलखडीस रा × री नजीक मुकाम केला सोमवारीं मुलेहून कूच करून फो × × र बेलापूरचे पश्चिमेस प्र × × नदीवर मुकाम केला श्रीमं(त पु)णतांबे गंगातीर येथे मुकाम होता तो एणेंप्रा। मोगल × × × बातमी आली कलम १

माघ वद्य १ सोमवारी श्रीमंत राजश्री भाऊसाहेब (फौ)जे सहवर्तमान मोगला + + ले बुनगियात श्री(मंत) राजश्री नाना राहिले मोताच्या लस्करास आले श्रीमंत पुढे जाऊन घेऊन आले कलम १

माघ सुध ५ सुक्रवारी नवाब सलाबतजंग यांणीं तीन हती व वस्त्रे व जवाहीर श्रीमंतास पाठविली ती तृतीये प्रहरी दाखल जाली त्याजकडील भले माणूस आले होते त्याजला बिऱ्हाडे देऊन जे सामान त्याणी आणिले होते त्यांजपाशींच होतें नवाबास काही मजकुराचें प[त्र] लिा। होते त्याचे उतर अलियावर वस्त्रें व हती घ्यावे कलम १

माघ सुध १० बुधवारी नवाब सलाबतजंग कोल्हापुराहून कूच करून अशी उबरीस जाऊन मुकाम केला एकादशी गुरुवारी मोगलाचे कूच होऊन संगमनेरावर मुकाम तेच दिवसी श्रीमंताचे पुणताबे येथून कूच होऊन कोपरगावावार ते पच्छमेस दोन कोसावर गंगेचे काठी दक्षण तीरी मुकाम केला कलम १

माग सुध १५ रविवारी श्रीमंताचे कोपरगावापासून कूच होऊन दापुरानजीक वढा होता तेथे मुकाम केला दाहा आकरा कोस मजल जाली धोंडोपंत वकील मोगलाकडे सल्याच्या मजकुरास पा। होते ते माघारे आलें मोगलाचा बिघाड जाला कलम १

माघ वद्य ३ मंगळवारी नवाब

××ते दिवसी कूच करून × × नजीक बारी आहे तेथे मुकाम डोगरांत केला श्री(मंत) रा। भाऊ फौज सुधां बारीपर्येत जाऊन मोगलाचा मुकाम जाला यैसे पाहू नमा×× तीन कोस येऊन सिन(रा) नजीक मुसलगांव होते × × देवनदीवर मुकाम केला रा। महादोबाबा होते

कलम १

माघ वद्य ३ बुधवारी न(वा)ब सलाबतजंग कूच करू(न) मुसलगावापासून सि × × पावेतो मुकाम देवनदी(वर) केला मार्गी येताना श्रीम(त) ( रा। ) भाऊ मोगलावर उठि(ले) + × मागलाने तोफाचा व बाणाचा भडमार केला दाहावीस माणूस जाया जाले व घो(डीहि) दाहा पाच पडली म(ग मा)घारे येऊन दापूरचे प(श्च)मेस देवनदीवर मुकाम केला श्रीमंत रा। नाना बुनगीयां(त)च होते कलम १

माघ वा। ६ मंदवारीं नवाब (सला)बतजंग यांजकडून सैदलस्कररखान माहाराव जानोजी जसवंत निबालकर अर्जू × बहादर हे उभयेता येक घटका रात्री आले रा। भाऊचा × × × व बाबा आपल्या लस्करातून × × × गेले श्रीमंत रा। नानाहि × × × लस्करातून पुढे आले (भे)टी जाल्या श्रीमंत रा। सलाबतजंग डोगरांतून कूच करून थोरथोर पर्वत जवल होते तेथे तोफा नेऊन वरोन फौजेवर श्रीमंताच्या गोले टाकिले आणि रान सारे सोडऊन बारी चढोन वरते आलें सांयंकाल जाला मग बारीचे अलीकड नजीक सीन तेथे वढा होता तेथे मुकाम केला त्या गावचे नावाबढियास पाणी थोडे होतें मोगलाचा मुका[म] जालियावर श्रीमंत रा। भाऊ मुसलगावाखाले दिढा कोसावर देव नदीस मुकाम केला १

माघ वद्य ४ गुरुवारी नवाब सलाबतजंग मुसळगावीहून कूच करून सिनरचे पछमेस देव नदीवर मुकाम केला तीन कोसाची मजल केली श्रीमंत राजश्री भाऊचा मुकाम फरदापुरी देव नदीवर होता मोगल राहिला याजकरिता तेथेच मुकाम केला कलम १

माघ वद्य ९ मंगळवारी श्रीमंत रा। रघुनाथपंत दादा मोगलाची कंहीवर चालोन गेले तेथ याचे व त्याचे जूज जाले याजकडील पाच सात माणून चागले पडिलें संकरराव अमृतराव चिटनीस याचे पुत्र गोली लागून पडिले मोगलाकडील येक हती आणिला व दाहा वीस घोडी आणिली मग मुकामास गेल १

माघ वा। १३ मंदवारी दापुरा-

नानाच्या लस्करात ते उभयेता राहावयास गेले सल्याच्या मजकुरा-(सा)ठी आले कलम १

माघ वाा १० गुरुवारी सैद लस्करखान व जानोजी निबालकर सला करावयास आले होते त्याणी सला क × × माघारे गेलें त्रिबक किला येका [महि]नियाने याणी द्यावा मोगला × [पा]चा लाखाची जाहागीर तीन महिनीया द्यावी याणी जाहागीरेबदल × ज द्यावी यैसा करार करून गेले कलम १

फालगुण सुद १ मंगलवारी नवाब सलाबतजंग दापुराहून कूच करून देव नदीचा × × × चा संगम जाला आहे त × × × न मुकाम केला मजल सात आठ कोस पडिली दाभाडे व बाणराव बारी उतरोन खानदेसांत गेले मजल वीस कोस केली कलम १

हून श्रीमंतानी कूच करून गगेवर चाटोरीपासून दारणा सागवी पर्यंत मुकाम गंगातीर केला कलम १

माघ वद्य ३० सोमवारी नवाब सलाबतजंग सिवराहून कूच करून कसबे दापूर येथे येऊन मुकाम देवनदीवर केला कलम १

फालगुण सुद १ मंगलवारी पुण्याहून खबर आणली की माघ वद्य सोमवारी लोहगडापासून समुद्र-पर्येंत दिवसां धरणीकंप जाला उतरडी पडिल्या दो प्रहरा जाला याप्रमाणे वर्तमान आले[1] कलम १

---

ले. ३७२ श्री श. १६७२ फाल्गून
इ. स. १७५१ फेब्रु.—मार्च

* चिरजीव राजश्री धोंडोबा यासि प्रती बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल छ १६ सफर जाणून स्वकीये कुशल लिहिणे विशेष बोली कोण ठिकाणी जाहाली कोणे दिवसी जेजुरीस येणार तेथें गुता काये तो कितीका दिवसात उरकून सासवडास दाखल होणार नवरीस फोड्या कोणे प्रकारें आल्या नवरी कोठे आहे वराडी यास निरोप सर्वास जाहाला किंवा नाही सासवडास दाखल जाहालियावर जरूराती

---

१ पुढें कागद कोरा असून त्यावर लिहिलेलें नाहीं.

आटोपाआटोप करावयास किती दिवस लागतील साप्रत शरीर प्रकृत कसी आहे हे सविस्तर लिहिणे घरगती कुलाचार नवस वगैरे याचा गुता किती दिवस आहे आमचे मते सत्वर आटोप जरूराती असेल तो करून दशमीस अथवा येकादसीस खामखा वर्षप्रतिपदा तीन च्यार दिवस पुढे आहे तो येणे राहिला गुता येथे आलियावर उरकेल पत्रोतर सत्वर पाठवणे चिरजीव भाऊकडील नवल विशेष वर्तमान आले असते तर लिहिले जाते बेलगावाहून दोन मजली पुढे गेले फौज दाहा पंधरा पावेतो आहे नाईक येथून निरोप घेऊन गेले वरकड यथास्थित आहे छ मार बहूत काय लिहिणे हे आसिर्वाद

चिरंजीव नानास आसीर्वाद येताद्विषई विस्तार वर्तमान लिहिणे आणि सत्वर येथे यावयाचे करणे काम करणे जरूर राहावेसे असेल तर तुम्ही राहून धोंडोबा आज्ञा करतील त्याप्रा गुते व संसारिक बंदोबस्त तेथे आठ दिवस मागे राहून करणे परतु धोडोंबा सत्वर येत ते करणे येथे त्याचे काम तूर्त फार आहे शरिरासहि उपाय येथे वैद्य आहेत होईल तुम्ही मागून येणे अथवा तेथे काम उरकले तरी सारखे अथवा येथे येऊन देणेघेणे आमचे कानावर घालून उरकावे ऐसे असले तर तुम्ही व धोडोबासहवर्तमान येणे धोडोबाचे आज्ञेप्रा वर्तणूक करून त्याचे येणे सत्वर येथे होये ते करणे हे आसीर्वाद

---

ले. ३७४ श्री

आसीर्वाद उपरी नवाब बसालतजंग भागानगरीहून कूच करून दोन मजली आले बेदरकर मवास दोन तीन हजार जमा होऊन मुलूक लुटितो त्यासाठी येणार हैदरजगाचे भाऊ सिकाकोलाकडे बो बस्तनस गुतले दोन तीन महिने येणे होत नाही मुसाबुसी अर्काटाकडेच कजियामुळे आहे लौकर येणे होत नाहीं च्यार पाच हजार फौज च्यार तीन गाडदी पनास पाऊणसे तोफ इतके होतील सुलतानजी निबालकर जाणार येदा गर्व धारूर प्राप्त जाल्यामुळे जाला तिमाजी यास सर चेडे घातले या निमित्ते कान नाक हात पाई तोडून ब्राम्हणास मारले नवाबाकडे जाणार जानबाचे दाजी जाणार दोघात चितशुध पुर्ती नाही परतु बसालतजगाचा आग्रह की निजामआलीचे पारपत्यच करावे आसा आहे निजामआली लडत लडत बरानपुरास गेले लौकर तोफखाना घेऊन माघारे गेले मुलकास ताकीद

केली तर उतम नाहीतर येथेहि वाईट वाटेल करडे भोताले आहेत येक दोन जुजे बरीच केली येथून आता लिहिणे सलूखाविसीच फार करून गेली आहेत मोकले जालियावर वली आबादी करून सरकारचेहि काम करावे आसा मजकूर आहे आद्याप पुर्ता ठराव होऊन वकील रवाना जाले नाही आमचे शरीर प्रकृत आहे तसीच बरी आहे विशेष वाईट नाही लोकास ताकीद होऊन रवाना करतच आहो जवार घेतलियाचे वर्तमान आले सुरतेकडे कृष्णाजीपंत गेले आपन* आत गेला परतु हबसियाचे विचारे ते कामाचे नाही जंजीरियाचे मसलतीस आली नवाजखानाची कुमक करून हबसी हलका करावा हेच उतम आहे पाचसातसे राऊत सारे आरमार जाऊन आजपर्येत पावले आसेल गेलियास काम होईलसे वाटते गाईकवाड तूर्त गंगातिरी आले पाच सात रोजा ते भेटीस येणार आलियावर आर्थ कलेल तो लोक जमा होतील कोलियाचा निवा(र्वा?)ह सहजात होईल इंग्रजाचा वगैरे पेच पडणार नाही आसे वाटते तथाप बदोबस्त आपले जागा आसावा यास्तव लौकर जावे इतकेच आहे उदेरीचे पारपत्य करावे आपला पेच नाही दोहीकडे साहित्य आपण करीत नाही चाचे याचे पारपत्यास आरमार सरकारचे आरमारास सामील होईल म्हणून करार केला सेवट करील तो खरा सर्व खाली गेलियावर द्रिष्टीस येईल तसे लिहिणे नवे राजियाचे शोधास गेले त्याचे पत्र ठिकाण लागत नाही आईकेली एकूण लबाड आसे दिसते कदाचित पळेल यास्तव बदोबस्त करावा आसे पत्र आले म्हणून जेजूरीस बदोबस्त करविला पुर्ता शोध करून बावडियाहून मल्हार गोविद सहवर्तमान येतील तुम्हास कसे तोड फार जाले आहेत काय वर्तमान आहे हे लिहिणे मज्याने आसालच रा छ १२ शालाखर हे आसीर्वाद[1]

---

ले. ३७५ श्री श. १६७४ भाद्रपद पूर्वी
इ. सं. १७५२

आशीर्वाद उपरी आरशाचे मजकुरावरून विस्तारे लिहिले ऐसियास लाहान मनुष्याच्या रीती अशाच असतात तुम्ही जाब लिहून पाठवणे की आरसे सरकारात दाखल आहेत भाऊ अथवा नानापासी लिहिणे ते

---

१ पत्र भाऊसाहेबांचें. * हा शब्द बरोबर लागला नाहीं.

जाबसाल करितील इतके मात्र उतर लिहिणे गणेशपंताच्याने असे मजकूर भाऊसहि लिहवणार नाहीत अथवा तुम्ही भाऊस अतस्ते तिलमात्र सूचना केली तरी दोष नाही वरकड अर्थाचे उतर काये ल्याहावे तुम्ही त्रिबकास जाणार ऐसे आईकतो त्यास हे दिवस तिकडे जावया योग्य नाहीत मोगलाचा पुर्ता सलूख होये तो उतम नाही त्रिबकचा किलेदार रामदासपंताची दूर करून नवा किलेदार पाठविला याजमुले वरील बदलला आहे वेढा खाली आहे नित्य कजिया या दिवसात जाणे युक्त नाही बाबासहि मी हेच सागितले वरकड राजकी विशेष जाहाले नाही कचे जाबसाल मात्र आहेत येथून कूच होताच तुम्ही थोढ्याशा स्वारीचे सामानानसी यावे जो खावेद घरी राहील त्याबरोबर माघारे यावे आपले तर्फेने सेवावृतीस मर्यादेस अतर करावे हेच तुमचे पदवीस युक्तसे मजला सुचते असो तुम्ही सुमुहूर्ते याल ते जे सुचेल ते सागेन तुम्ही आपले पत्राचा जाबसातारियास इतकाच लिहिणे लाहान मोठा कऱ्याजे सरकारचा वगैरे जाब साल पडेल तो खावंदास ल्याहावा ते जाबसाल पुसतील त्याची विनती करू ऐसे दिनकरपंतासी बोलवणे गणेशपंत लुचा आहे मी पत्र पाठविल्यास बरे न दिसे यास्तव तुम्हासच मसलत लिहिली की याचा जाबसाल हुजूर घालवणे मनास आले तर थोडस लिहिणे प्रशस्त न वाटले तर न लिहिणे त्याच्याने हे मजकूर लिहवणार नाहींत लिहिले तर येथें जाबसाल केला जाईल याकाली क्षुद्र हर्षविषाद चितास तिलमात्र मानू न देणे मुख्य पुरुष श्वभाव धैर्य तेच करणे हे आसीर्वाद

---

ले. ३७६ श्री श. १६८० ज्येष्ठ शु. १५ ?
इ. स. १७५८ जून २१

चिरजीव राजश्री नाना यासी बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी तुम्ही गेल्या ता पत्र न आले अपूर्व आहे बहुधा घरीं जाऊन मग्न जाहालेस स्मरण देखील इकडील नाहींसे दिसते अस्तु याउपरी सविस्तर लिहिणे

दिलीकडील सकळ अर्थ चिरंजीव दादा साहेबापासी विनती केला असेल त्याचे उतर प्रतीउतर

सातारियाकडील प्रकारहि चिरजीवास सांगितलाच असेल नवा राजा तो आम्हास करणे याविसी आईसाहेबाची

१ पत्र नानासाहेबांचे नाना पुरंदऱ्यास.

कसे काय ल्याहावे त्याचे मनास कोणता विचार आला तो तपशील-वार लिहून पाठवणे त्याप्रोच कर-ण्यात येईल

मर्जी कसी जर यथास्थित असली तर तो बरेच जाहाले राजा करावा कदाचित त्यानी काही दिकत घेतली तरी राजा आम्हास करणे आतां आहेत असी उदासपणे आ-ईसाहेब आसली तरी आम्हास न-वा राजा करणे

आठा पधरा दिवसात सर्व करून सहपरिवार आबईसुधा येथे यावे हे माझे मनात मामाहि आलेच आहेत बज्या विसाजीपताहि आहेतच आषाढ सुधात छ १४ सवाल हे आसीर्वाद[1]
पौ छ २० सवाल

---

ले. ३७७ श्री श. १६७४ आश्वीन शु. ११
इ. स. १७५२ आक्टो. १८

* तागाईत आश्विन शुा ११ बुधवार प्रातःकाल मुा राक्षसभुवन गंगातीर वर्तमान यथास्थित असे विशेष वडिली बयाजी जासुदाबरोबरी पत्रे पाठविली ती पावली सविस्तर वृत कळो आले येथील वर्तमान तरी रविवारी यजमान येथे मुा आले राजेश्री मल्हारबावाची व जयाप्पाची भेट झाली सैदलस्करखान यांस मीर सागवींचे मुकामीं निरोप दिल्हा ते त्याच तलावर हा कालपर्यंत आहेत नवाब गाजुद्दीखान शहरी होते याचे भेटीस येणार होते त्यांत नासरजंगाची बायेको येक शहरी होती तिणे सोमवारी विषप्रयोग करून गाजुद्दीखानास जिवें मारिले काल मंगळवारी दसमीस रात्रौ पत्रे आली त्यावरून वर्तमान सेवशी लिहिले आहे सलाबत-जंग भागानगरा अलिकडे दोन मजली आहे या अलिकडे आल्याचे वर्त-मान आले नाही रा मल्हारबाची फौज ५००० आहे परंतु तोफा व बाण व जेजाला हा सरंजाम भारी आहे जयाप्पापाशी ८००० फौज आहे श्रीमंताची १५००० पर्यंत फौज आहे पुढें वरचेवर जमा होत आहे मन सुबा श्रीमंतास भारी पडिला आहे. कोण्हे तऱ्हेस जाईल पहावे
पैवास्ति छ १३ जिल्हेज सन हजार ११६२

---

१ सबंद पत्र बाशाच्या हातचें.

ले. ३७८ श्रीशंकर

* तीर्थस्वरूप राजश्री बाबा वडिलाचे सेवेसी चिरजीव. सौ गुजाबाईस रखमाजी येसवंतराऊ [ अत्रे ] आसीरवाद विनंति उपरी येथील वर्तमान तरी आश्वीन सुध द्वादसीस रविवारी राजश्री स्वामीनी राजश्री दाजीस मजमूची वस्त्रे दिल्ही सरासरी बादली मंदील व बादली चादर व बुटेदार जामा व पटका ब रोचन ( ? ) नव वस्त्रें दिल्ही जरदा घोडा बसता आपला व आपली पालखी दिल्ही सोनियाचे कडे दिल्हे मजमूचे दस्तूर हवाली केले आसा ईश्वरे सतोष केला तुम्हास कलावे म्हणून लिा आसे आम्ही दूर देशास जावयाचा विचार करीत होतो तो ईश्वरे जवलीच आणिला याउपरी काही चिता न करणे दाजीनी लिा आहे त्याजवरून कलो येईल या उपरी आठा चहू दिवसी आपलाहि धंदा काय होईल तो लेहोन प्राा कलले पाहिजे

चिरजीव बाबूस [ बाबुराव शामराव अत्रे ] आसीरवाद उपरी वर्तमान लिा आहे त्यावरून कलेल जे दिवसी वस्त्रें दिल्ही ते दिवसाचा महोछाव काये काये म्हणून लेहावा दाजी घरास आले तो दोनीसे ग्रहस्त से दोनसे मागतेकरी व से दीडसे ये कामे लोटले ते समई कारखानियाच्या लोकास वस्त्रे व रुा दिल्हे ब्राह्मणास तिसा रुपयाचा खुर्दा लागला वस्त्रास व पाघुरणास नीत राहिली नाही असी धूम जाली मजमू राजश्रीनी मातुश्रीनी दिल्ही कोण्हाची रद्बदल जाली नाही त्यानीच केले सर्वश्वे आभिमान त्यानी धरिला येसाजी सिवदेऊसाठी हजार रुा देत होते राऊ लाख देता आसे होते सेवट बोलिले याच्या बापाने मजजवली कस्ट करून या राजियावरी बसविले त्याच्या लेकास खायासी नाही येथे आला तरी तुम्हीं ताजीम न द्यावी यासी गोस्टी काये आहे आपण हा जरी रोजगार दिल्हा तरी याची उतीर्णता नाही तेव्हा आगदीच सरकारकून बोलू विसरले आसा ईश्वर पावला तुम्हास सविस्तर कलावे म्हणून लिा आसे तुम्ही रुा १ गूल घेऊन देवाजवली जाऊन आगदी गावास व गोसावी बावास वाटणे खुशाली करणे करणेकरी बालोकरी वाजत्री बाा घेऊन घर घर गूल वाठवणे जाणिजे हे आ. श्री रंगोपंतास नमस्कार विनंति लिा तिा राजश्री नाना स्वामीस नमस्कार

---

ले. ३७९ ॥ श्री ॥

रिचंबीज जारश्री बित्रक दसावीस शाई दसावीस मिचजाणी साई-दर्वि पुआरी थेईल शुकल णाजून कश्वीये शुकल हेलून ठापतीव सइले हापिज शिवेष कीअलीड रस्व रव्तनाम रीथपुरानी वस्तिरस्त हिलले हाए ज्यातरऊन कसल जमरूक लकेल पाअणाडकील लाईडके जमरूक लकत हानी हबुधा लाफनुगासापून दासीधम्ये गम्न सआल जायलुमे वअशाक जनाला सओ या पुअर मिश्रंताचे तप्राचे तुअर वस्तिरस्त हेलून ठापवावे व णाअखी राबीक हाल्यावे ज्यात रवरून तंसोष योहील लमभप्रेरव लाओया पुरअ णोके ष्टोगीचा तुगा हानी रद जमल णेये योलीह ष्णुर्के सापून कोलास रिनोप योलीह पाअण ढुपे नोद्ऱ्याचे वागे वेनूअ वौफसेज भोशा णेदे चुतीय हाये वराना दंत्र वचवादा जरब शैवाख दव्य त्रपीदपा बूहत याक हिलणे भोल सओ णेदे साईर्दावे[1]

---

ले. ३८० श्री श. १६८० चैत्र शुा ५
इ. स. १७५८ एप्री. १२

चिरंजीव राजश्री नाना यासि बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणे विशेष हैदरजंगानी आगोधर शाहनवाखानासी विशेष श्नेह लाविला होताच त्याजवरून मुसाबु-सीस दौलताबादेचा किला पाहावयास हजार दीड हजार गाड्यानसी पाठविले त्याणी वर जाऊन आपला बदोबस्त केला हैदरजंगास बातनी सागून पाठविली याणी लबाडी करून बसाल[त] जंगापासून शाहनवाजखान व मीरमहमद हुसेनखान यांस कैद करविले या उभयेताचे घरावर व त्यांचे सोयरे चाकर यांचे घरावर चौक्या बसविल्या याप्रो कृत्रीम केले पुढे होईल येईल ते वृत लिहिले जाईल * छ २ साबान तुम्ही यात्रेचे गैर गुते उरकून रिकामे होऊन राहाणे हे आसीर्वाद

पौ छ १५ साबान

---

१ सबंद पत्र खाशाचे हातचें.

ले. ३८१ श्री श. १६८१ मार्ग शुा १
इ. स. १७५९ नोवें. २०

चिरजीव नाना राजश्री बलवतराव सखारामपंत

आसीर्वाद विनती उपरी पत्र पाठविले ते पावले सविस्तर अर्थ ध्यानात आला हतीची लडाई पाहावयास तीर्थरूपानी बोलाविले आहे व गोपाळरायाचे घरी लग्न यास्तव जरूर गेले पाहिजे म्हणून विस्तारे लिहिले ऐशास तीर्थरूपानी बोलाविले आहे व लग्नहि आहे यास्तव जरूर जाणे परतु त्रिवर्गानीहि सप्तमींचे मुहूर्ते अगत्य निघावे कदाचित् चिरंजीव नानास चागला मुहूर्त नसला तर मात्र वद्य चतुर्थीस त्यानी निघावे बलवंतराव सखारामपंत या उभयतानी सप्तमीसच निघावे तोच चागला मुहूर्त आहे धायगुडे याचा कारभार तेथे विल्हे लागतो आसा आसल्या विल्हे लावणे सूर्यवसी याजकडील कारभार विल्हे लाविला उतम केले लौकर जमा होऊन येतसे करणे *सप्तमी बहीरव जोसी यास पुसावे नानास चागली नसली चद्रबल नसले तरी वद्य चतुर्थी करावी पाचवे चद्रास दोस नाही बलवतराव सखारामपंत सप्तमीसच यावे मोगलाकडील आली पत्रे प्रस्तुत ते पेशजी लिहिलेच आहे सलाबतजग दीड हजार फौज पाच हजार गाडदी पनास पाऊणसे तोफ कडप्याजवल मुसाभुसी आर्काटमध्ये कृष्णराव गोविद भेटीचे कारभारात परस्परे खेपा घालतात बसालतजग आद्याप दोनी डौलावर आहेत सलाबतजग बाहेर आठरावे तारखेस निघाले निजामआली पंचविसावीस निघणार रा छ २९ रालावल आम्ही फौजेस जमा व्हावयाची ताकीद वरचेवर करतो आमचे वीस बावीस हजारात दीड हजार दोन हजार समजणे वरकड निकाल पाडला दादाकडील च्यार पाच हजार पर्यंत समजणे आहे लौकरच होईल मातबरच लोक राहिले कारभारहि एक प्रकारचा आताजीपंताकडील विशेष खबर आली आसली तर लिहिणे किरकोल आम्हाकडील पाच सातसे राहातील वरकड पाच सातसे राहातील वरकड पाच सात रोजात विल्हे लावितो तिकडील जवलपास लोकास यावयाची ताकीद करणे रा छ मजकूर हे आसीर्वाद विनती

१ सर्व पत्र खाशांच्या हातचें.

ले. ३८२ श्री श. १६८१ कार्ति. वा ७
इ. स. १७५९ नोव्हें. ११

चिरजीव नाना यासी आसीर्वाद विनतीचे सखारामपंतबलवतराव

आसीर्वाद विनती उपरी नगरच्या किल्यास राजश्री विसाजी कृष्ण व महिपतराव गंगाधर परशराम फौजसुधा पाठविले होते त्यास राजकारण ठीकच होते छ १८ रोवल शुक्रवारी दोन घटका दिवस असता किला फते जाला किला बहूत बेस चिरेबदी पका खदकहि पका आहे तोफाहि पचरसी आहेत तुम्हास संतोषाचे वर्तमान कलावे याजकरिता लिहिले असे * तुम्ही सारे सत्वर सप्तमीचेच मुहूर्ते निघून येणे लौकरच जमा जाले पाहिजे करारातीलच स्थल घेतले राहिला निकाल करावा आसे शामजीस गोडच लिहिले इभरामखान खराच त्यापासून तुटला सरकारात राहिला आसी पत्रे आली येथून यावयाचे लिहिणे गेलेच आहे आज उरलीवर मुकाम उद्या नादुरावरून खाबगावाखाली उद्या जाऊ पागा पाहून गोविद बापूस पाठऊन देणे रा छ रविवार प्रातःकाल हे आसीर्वाद विनती

---

ले. ३८३ श्री श. १६८१ चैत्र
इ. स. १७६० मार्च

श्रीमंत राजश्री बाबुराव बावा स्वामीचे शेवेसी

पो अंताजी माणकेश्वर कृतानेक साष्टाग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहिणे विशेष स्वामीकडून पत्र येऊन सेवकाचा परामृष न जाला ऐसे न पाहिजे सर्वदा पत्री सांभाल करीत जावा आम्ही या प्राती आलो घरी न राहाता श्रीमत रा भाऊसाहेबाचे चाकरीस गेलो सेवटी घरास रजा न देता श्रीमत रा भाऊसाहेबी हिंदुस्थानास स्वारीस समागमे नेले त्यास आजी बहूत दिवस आमच्या वराता सेत सनदा पुणे जुन्नर पारनेर वगैरे मिळून आदमासे दोन हजार काही कमजादा आसेत त्यात आजी दोन वर्षे मन होऊन पावल्या नाहीत त्याची विनती श्रीमंतास केली त्यानी आज्ञा राजश्री मोरोबादादास केली की मागील दपतरी रुजू पाहून येदा सन सितैनात या साळच्या मागील

---

* पत्र भाऊसाहेबांचें.

दफ्तरी रुजू पाहून देणे दादानी सागितले येथे दफ्तर नाही तेव्हा स्वामीस सरकारची चिठी घेऊन देणियाचे पत्र दादानी ठेविले स्वामीनी कृपा करून दोन वर्षामागे येक दोन चार साले रुमाल काढून सुखरूप रुजू पाहून दोन हजारास जाजती कमी जे निघतील ते रुजू पाहून सनदा करून सिके करून द्यावे त्याप्रो माहालकरी यास निक्षून सागावे पदरीचे आसो कृपा करावयास अतर न करावे माया निस्टूर न करावी लोभ असो दीजे हे विनती

---

ले. ३८४ श्री श. १६८२ चैत्र शु. २
इ. स. १७६० मार्च १९

चिरंजीव राजश्री बज्याबा यासि बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष तुम्हांकारणे सिमघ्याचा पोशाख येक पाठविला असे घेऊन पावलियाचे उतर पाठवणे रा छ १ साबान हे आसीर्वाद पौ छ २ साबान सितैन

---

ले. ३८५ श्री शके १६८२ ज्येष्ठ शुा १
इ. स. १७६० मे १६

राजश्रियाविराजित राजमान्ये राजश्री बापू स्वामीचे सेवेसी

पो लक्षुमण अबाजी कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ताा छ २९ रमजान पावेतो आपले कृपेकडून येथास्थित आसे विशष आपण गेलिया ताा काही पत्र येऊन वर्तमान कलत नाही तरी ऐसे न पाहिजे सदैव पत्री साभालीत असिले पाहिजे यानंतरी इकडील वर्तमान तरी अतरवेदीत आपली ठाणी पहिले होती त्याप्रमाणे सर्व बैसली नजीबखान रोहिला दिलीकड पाणपतसुनपतावरी आहे सुजातदैला हि पटणियाकड गेला + + + सहज दि + स जाऊन घेऊन पावे ऐसिया विचारावरी गेला आहे पुढे काये मनसबा होईल हे न कलले पाडू तुम्हापासून आजारी आला तो रायेपुरास आला परतु दुखण पधरा वीस रोज भारीच जाले परतु अतां उतार काही पडिला आहे आपणास कलावे आपला च ह ड चा काढावयाचा प्रत्न केला परतु सापडला नाही वरकड आपणास जात समई सागितले आहे त्याप्रमाणे सर्व गोष्टी करून उतर पाठविले पाहिजे बहूत काये लिहिणे कृपा लोभ असो दीजे हे विनति

पोष्य आंताजी कृष्ण सा। नमस्कार विनंती सदैव पत्री साभालीत आसावे हे विनती पौ। कृष्णाजी भिकाजी कृतानेक सिर सा। नमस्कार विनंती तुम्ही गेलिया तागाईत वर्तमान कलत नाही तरी सविस्तर लिहावे इकडील भाऊनी लिहिले आहे त्यावरून कलल आमचे घरचा समाचार वरचेवरी घेऊन उतर———बहूत काय लिहिणे माया न टाकावी हे विनंती

---

ले. ३८६ श्रीगजाननवरद् श. १६८२ आषाढ शुा। १०
इ. स. १७६० जून २३

तीर्थस्वरूप राजश्री मामा वडिलाचे सेवेसी

आपत्ये बाबाने सिरसां नमस्कार विनंती येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत गेले पाहिजे विशेष वडिलाची आज्ञा घेऊन स्वार जालो ते कुचे दर कुचे तीर्थस्वरूप राजश्री मामा व आम्ही शाबडवारियास वैशाख वद्ये १० दसमीस पावलो ते व आम्ही सात रोज एके जागाचे होतो मग तेथे राजश्री महिपतराव पोतनीस यानी बोलाविले ते तीर्थस्वरूप राजश्री भाऊ लस्करात गेले त्याजबरोबर जेष्ट सुध प्रतिपदेस गेले त्याणी आपले खासगीचे कामकाज यास सागितले आहे त्यास या प्रांती आहिरानी दंगा बहूत केला ठाणी जागाजागाची उठविली मग श्रीमतानी राजश्री विठल सिवद्देव याजबरोबर फौज देऊन आहिरावर पाठविले त्यानी आहिराची ठाणी उठऊन मागती आपली ठाणी बसविली काही आहीर मारून काढिले मग ते लस्करात गेले मागती फिरुन आहिरानी बल धरिले आहे राजश्री राघो गोविद याजपासी फौज पाच सातसे ठेविली आहे ते कद्वाईवर राहिले आहेत याचा कमाविसदार व राऊत सेभर (शंभर) किलियास होते त्यास आहिरानी कमावीसदारास जिवेच मारिले राऊत काही पलाले काही जखमी जाहाले राजश्री राघो गोविद याच्यान काही आहिराचे पारपत्य होत नाही येदाचे साल बहूत कठीण आहे पिकेहि जाहाली नाहीत याप्रमाणे आहे दिलीकडील वर्तमान गिलचीचे व श्रीमंताचे काही जुंज जाहाले नाही यानतर आपले सविस्तर वर्तमान लेहून पाठवणे मिती आषाढ सुध १० पावेतो सुखरूप आसो बहूत काये लिहिणे हे विनती सौवती मामीस सा। नमस्कार

हो राजश्री आनदराव व नानास सां नमस्कार विनति ऐसीजे लिा। परीसीजे हे विनंती

---

ले. ३८७ श्री श. १६८२ आषा. वा ३
इ. स. १७६० जुलई १

श्रीमंत राजश्री बजाबा स्वामीचे सेवेसी

विनंति सेवक सखो महादेव कृतानेक नमस्कार विनंति येथिल क्षेम ताा छ १७ जिल्काद पर्येंत मुकाम नजिक अग्रे स्वामीच्या कृपेकरून सुखरूप असो यानंतरी स्वामीकडून बहूत दिवस पत्र येऊन सानंदवीत नाही + + + पत्रें संतोषवीत असिले पाहिजे यानंतरी इकडील वर्तमान उभयेता सरदाराच्या व श्रीमंताच्या भेटी जाहल्या सुरजमल जाट व गाजदिखान वजीर याच्याहि काल भेट जाहली अगदीं फौज एकत्र एथें जाहली आहे सत्तर अशी हजार आहेत नजीबखान रोहिला व अबदाली याची फौज साठ हजार आहे त्याचा मुकाम अंतरवेदीत येमुनेपलीकडे शुक्रतालावरी + + + जोरा बहूत सांगतात याच्या फौजेने सलाबत + + + यामुलें त्याजवरी जावत नाही येमुनेस पाणी आहे सुजावद्दैला वीस हजार फौज तोफखाना भारी आहे त्यांस रोहील्यानें आपल्याकडेस नेला त्यामुळें ही फौज फारच सलाबतीत आहे सुजावद्दौल्याकडे नारो शंकर पाठविले आहेत याजकडे आला तरी मग नजीबखानाचे व अबदालीचे पारपत्यास उसीर नाही सुजावद्दौला यांजकडे येत नाही तरी मग सुधा विचार दिसत नाही ईस्वर इच्छेने घडल ते पाहावे मोठे विघ्न आहे सुजावद्दौला मागेल ते द्यावे ऐसे केले आहे आणि आपल्याकडे आणावा अल्यास उत्तम आहे न ये तरी ईश्वर इच्छा प्रमाण होईल वर्तमान ते लिहू निरंतरि पत्री सांभाल करावा बहूत काय लिहिणे हे विनंति

---

ले. ३८८ श्री श. १६८२ भाद्र. शुा २
इ. स. १७६० सपटंबर ११

चिरजीव राजश्री बज्याबा प्रती बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी तुमचे प्रयोजन आहे तरी पत्र पावताच तयारी करून सत्वर येणे जावे लागते लौकर येणे * छ १ सफर हे आसीर्वाद

पौ छ ३ सफर ईहीदे सीते

---

ले. ३८९

शके १६८२ भाद्र. शु. ७
इ. स. १७६० सप. १६

चि. रा. धोंडो मल्हार यासी सदाशिव चिमणाजी आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणे विशेष तुमचे पत्र आले ते पावोन लिहिले वर्तमान सविस्तर कळले थैसेच निरंतर साकल्य पत्री लिहीत जाणे इकडील वर्तमान तरी फौज सरदार सुद्धा दिल्लीस आलो किल्ला घेऊन आत सरकारचा बदोबस्त केला सुज्यातदौल व नजिबखान वगैरे रोहिलेसुद्धा आबदाली यमुने पलीकडे येऊन मुकाम करून राहिले आहेत नदीस पाणी फार सुज्यातदौला नजीबखान यांचे विचारे सलुखाचा पैगाम लागला त्याचे मते सरंदेची हद्द अबदालीची करून द्यावी पातशाही बदोबस्त आपले हवाला करावा वजिरी बक्षिगिरी सुज्यातदौले मागतात बक्षिगिरी नजीबखान मागतो नदीमुळें उभयता सैन्याचा मोकाबला होत नाहीं तो पैगामहि आहे आमचे मते अटकची हद्द पातशाही बदोबस्त सर्वांखे पूर्वतप्रमाणे राखून चालवावे याप्रमाणे सलूखाचे करावे त्यात काही आमचे जाहलियाशिवाय तह होत नाही बोलता चालता होईल ते पाहो केवळ आमच्याच चित्तानरूप घडणे अगर त्याचे चित्तानरूप होणे हे कसे होईल यास्तव जसे बनेल तसे करावे लागेल होईल ते लेहून पाठवू नदी पायाब जाहालिया लढाई प्राप्त होईल *सरदार दोघेहि बहूत साफ आहे सर्व पेच पोटाचा बाहेरील कजियामुले न मिले कर्ज सावकारी बंद दोनी फौजाबा परतु सरदाराची फौज मोडली यामुले त्याची सलाबत आहे यंदाचे येणे व बाहेरील मसलत भारीच आहे सर्व आशीर्वादे करून परिणामास जाईल लढाई न पडता सर्व प्रेत्न आबरु राहून होतील ते करु सेवटी नेटाने सर्व येकत्र जम्हून लढाई करू ईश्वर बरेच करील आपले वर्तमान शरिराचे वगैरे लिहिणे तीर्थरूपाचे शरीर उत्तम जाले म्हणजे सर्व मनसबे उत्तम येविशी वर्तमान लिहीत जाणे छ ६ सफर बहूत काय लिहिणे हे आशीर्वाद

---

१ मराठी रियासत मध्य-विभाग ३ पृ. १६० च्या पुढे यावरून

ले. ३९० श्री श. १६८२ आश्विन शुा ६
इ. स. १७६० आक्टो. १५

चिरजीव राजश्री महिपतराव त्रिंबक यासि बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत जाणे विशेष तुम्ही दसरिया करिता पत्रदर्शनी येथे येणें येविसी मातुश्री आईसाहेबास व राजश्री विसाजी दादाजी यांस लिहिले आहे तरी लौकर येणे जाणिजे छ ५ रालोवल सुा ईहीदे सितैन मया व अलफ * बहूत काये लिहिणे हे आसीर्वाद पौ छ ९ रावल ईहीदे

---

ले. ३९१ श्री श. १६८२ कार्तिक शु.६
इ. स. १७६० नोंहें. १४

चिरंजीव राजश्री बजू व गोविंदेबापू यांसि त्रीबक सदाशीव कृतानेक आशीर्वाद उपरी येथील कुशल ताा छ ४ रबिलाखर पावेतो मो काा पाणिपत येथे सुखरूप असो विशेष तुम्ही पाच साहा पत्रे पाठविलीं ती पावोन लिहिले वर्तमान कलोन बहूत संतोष जाहला याउपरी घरास वर्तमान वरिचेवरी तपसीलवार बारीक मोठे कचें पकें वर्तमान लिहीत जाणें इकडील वर्तमान तरी श्रीमंत दिलीहून कुंजपुऱ्यास दरमजल जाऊन अबदुल समंदखान व कुतबशाहा बारा हजार फौजसुधा अबदालीच्या साहित्यास होते त्याजवरी चढे घोड्यानसी हला करून मारून लुटून पस्त केले तीन चार हजार गिलजी कापून काढिला त्याच लगटाने कुंजपुराहि फते जाहला नज्याबतखान कबिलासुधा धरला आबदूल समंदखान व कुतबशाहा दोघे मारून टाकिले तेथील बंदोबस्त केला तों आबदाली सुज्याउदौला नजिबखान रोहिले सुधा येमुना उतरून आलीकडे आला हें वर्तमान ऐकोन तेथून आबदालीवरी फिरोन दर मजल येऊन पाणिपताजवळ गाठून सड्या फौजा करून मागें बुनगें गावाच्या आश्रयास व पुढे तोफाच्या आरबा देऊन मजबुदीनें आहों अबदालीस अंतर कोसा दिढा कोसाचें आहे नित्य त्यांची घोडी उंटे बैलें आपले लोक पाडून आणितात लढाया होतात परंतु त्याच्यानें चालून येवत नाहीं महागाई त्याचे लस्करांत रुपयाचे सेर पीठ जाहालें तेहि मिलत नाही त्याणें चालून यावे ही वाट प्राहातों आल्यानंतर एकदाच लगटाने मारून बुडवावा ऐसे आहे परंतु तो

पनास साठा कोसाच्या दौडी करणार असा अबदाली त्याच्याने कोसावरून पुढें येवना असें जाहालें आहे श्रीमंताचे पुण्य समर्थ आहें लौकरी मोगलाचे पारपत्य येथास्थित होईल पुढे होईल ते लिहिलें जाईल तुम्ही सर्व वर्तमान लिहीत जाणें * राजगोपाल आबदुलाचें हवाली करणे आपली मंडली तीर्थरूप आन्या भाऊ दाजीबा बलवंतराऊ समस्त सुखरूप आहेत खंडोजीबावा गंगाजीबाबा चिमाजीबावा व आणखी सर्व खुशाल आहेत हे आसीर्वाद

पौ छ १५ जाखर पलसीकराच्या जासुदाजवल आले

---

ले. ३९२ श्री श. १६८२ पौष शुा ३
इ. स. १७६१ जाने. २९

( वरील ओळ फाटली असल्यानें पत्र कोणास लिहिलें आहे हें समजण्यास मार्ग नाहीं. )

..................साहेब स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक गोपालराव गणेश (बर्वे) कृतानेक साां नमस्कार विज्ञापना ताा छ १ जमादिलाखर मुा मौजे गौरा प्राा दलमरू श्री गंगापार उतरतीर स्वामीचे कृपेकरून सुखरूप आसों विशेष इकडील वर्तमान श्रीमंत राजश्री भाऊसाहेब स्वामीनी श्रीगंगापार उतरून सुज्यातदौलांच्या मुलकात उपद्रव करणे म्हणजे सुज्यातदौलास मागील पायबंद लागेल म्हणजे आबदालीची कुमक सुज्यातदौलाने होणार नाही म्हणजे (आबदा)-ली घाबरा होईल म्हणून ज [फाटले] याची आज्ञा केली [फाटले] विनंती पत्रे लिहिली [फाटले] दोन हजार होती त्यास पूर्वी राजश्री गोविंदपंताचे तैनातीस फौज करावयाची आज्ञा होती त्यापैकी च्यारसे स्वार त्याजकडे राा घोडजी साठे सरनोबत याजसमागमे रवाना केली होती त्यास हाली आमची पतके हुजूर चिरंजीव राजश्री बाजिराव व राा रामचंद्र कृष्ण व राा घनशाम पाडूरंग यासी तिघास रवाना करावे अथवा राजश्री गणेश संभाजीस आज्ञा करावी की गोपालरायासमागमे पार उतरणे ऐसे आज्ञापत्र पाठवावे म्हणोन लिहिले होते त्यास प्रत्योतर तेथून आले की तुमची पथके हुजूर [अपूर्ण]

ले. ३९३ श्रीशंकर श. १६८२ पौष
इ. स. १७६१ जानेवारी

* सेवेसी विज्ञापना आपली आज्ञा व मर्जी की निजामआली यास उसिराचे निमित्य करून शब्द ठेवावा आसा समय दुसरे वेलेस येणार नाही या वेलेस निजामआलीस जिवे मारावे आथवा कैद करावे या अन्वये पत्रे लिहिली आली ऐसियास निजामआली तो बराबरीचा सरदार आम्हाजवल फौज फार व त्याजवल तोफखाना गाडदी फार या अन्वये पाहाता तो थोडासा आम्हापेक्षा उणा नाही तर समानच आहे ऐसियास कोल्ह्याचे सिकारीस जावे तेव्हा वाघाचे सामान असावे तेव्हा इछिला प्रकार होतो यास्तव ह्या सामानसी केवल जिवे मारू आथवा कैद करू हा इजारा कोणाच्याने होईल येक कुत्रे आथवा माजर उंदीर यास जिवे मारिता कितीक प्रयास लागतात अखेर उदीर येखादे बिलात सिरला तरी मरतहि नाही तसा प्रकार पाहाता मरणे दुस्तर आहे दुसरे सलाबतजंगहि फार शाहाणा त्यासहि समजतें की आज निजामआली बुडविला तरी उद्या आपली आवस्था तेच आहे यास्तव ते येकच आहेत आम्ही शाहाणे आणि ते सारेच वेडे ऐसे नाही येक सलाबतजग मात्र जिकडे भरले तिकडे भरतील वरकड सारे शाहाणे दुरंदेसी आहेत ते आपल्या तजविजेस चुकत नाहीत आम्हीहि जितके उपाये तितके करितो सारांश जरबेत आणणे हे तरी होईलसेच वाटते जिवे मारणे आथवा कैद करणे हेहि न होईल आथवा होईल आसा इजारा करवत नाही परंतु येक ईश्वरी दया व स्वामीचे पुण्य येणेकरून होईलसे दिसते आम्ही तरी चुकत नाही तर्तूदा करितो व सिपाईगिरीहि होईल ते करू स्वामी आईकितील तेव्हा कलेल परतु सारे प्रकार कलावे म्हणौन लिहिले आहेत ईश्वरी तंत्र जे होणे ते होईल आम्ही जे होईल ते यावत्सामर्थ्य करणार हे विनती[१]

---

ले. ३९४ श्री शके १६८२ पौष शुा १३
इ. स. १७६१ जानेवारी १८

चिरजीव राजश्री रौऊ प्रधान यासी आसीर्वाद उपरी तुम्हाकडील विस्तारे पत्र हौसेने लाब येत नाही ऐसे नसावे येथील सर्व अर्थ चिरंजि-

---

१ पत्र राघोबाचें नानासाहेबांस. २ विश्वासराव. प्रधान शब्द विचारार्ह आहे.

वाचे पत्रावरून कलेल निरतर कुशलार्थ लिहित जाणे छ १० जमादिलाखर हे आसीर्वाद[1]

---

ले. ३९५ श्री शके १६८२ पौष शुा १२
इ. स. १७६१ जाने. १८

* चिरंजीव राजश्री भाऊ यासी प्रती बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी वीस हजार फौजेनसी दर मजल माळव्यात आलो फौज कोणे मार्गे आपणाकडे रवाना करावी ते जलद ल्याहावे माघमासी पूर्वी लिहित आलो त्या अन्वये कुमक पावावी हेच ईश्वराजवल इछितो मागा-हून पंधरा मजलीचे अतरियाने निजामआली चिरजीव दादा चालीस हजार दोनी फौजेनसी नीट हाडल्यावरून (?) कोटे बुदीवरून जयनगरचे सुमारें येता आपण आबदालीस कोडून राखावे सर्व फौजा येक होताच सपक्षपातीसह याचे उतम प्रकारे पारपत्य करावे येक उतम प्रकारे पारपत्य जाहालिया सर्व कामे त्यात होतात छ १० जमादिलाखर हे आसीर्वाद निजामअलीसी विरोध नाही उसिरामुले गपा उठवितात त्याजवर मदार काय आहे आमचे मागे पंधरा मजलीचे अंतराने येतात संशय नाही मोग-लाई लोक गपा उठवितील त्याजवर काय आहे पैका किती पावला कोठे अटकला आहे हे ल्याहावे छ १० जमादिलाखर हे आसीर्वाद

---

ले. ३९६ श्री श. १६८२ माघ शुा ६
इ. स. १७६१ फेब्रु० ११

चिरंजीव राजश्री नाना यासि बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणे विशेष तुम्ही मथुरेस आला म्हणोन कलले त्यास कोण कोण लाहान मोठे आला ते लिहिणे मथुरा टिकाव धरावयाची जागा नव्हे बहुधा कुभेरीस अगर ग्वालेरीस आला असाल काये मजकूर चिरंजीव सौ पार्वतीबाई आली म्हणून कलले तर सविस्तर लिहिणे चिरंजीव राजश्री भाऊ साहेब व राव जनकोजी सिंदे कोण्हीकडे निघाले कोणे रोखे आले काये वर्तमान ते तुम्हास कलले

---

१ पत्र नानासाहेबांचें

असेल तर सविस्तर लिहिणे आम्ही भेलशाजवळ असो पुढे फौजा रा केल्याच आहेत रा छ ५रजब *हे आसीर्वाद

---

ले. ३९७ श्री श. १६८२ माघ शु. ९
इ. स. १७६१ फेब्रुवारी १३

* तीर्थरूप मातुश्री आबई वडिलाचे शेवेसी

आपत्यें नानानें कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येतील वर्तमान ताा माघ शुध नवमी मुाा ग्वालेर वडिलाचे आसीर्वादे करून सुखरूप आसो विशेष कितेका प्रकारचे लोक जुजाचे वर्तमान वडिलास सांगतील त्यास न ऐकावे जुज जाहले श्रीमंताची फौज निघाली बुनगे हती घोडे सर्व लस्करचे गेले श्रीमंताचे गेले तोफखाना गेला चौकडे चौघे गेले आम्ही मलहारजी व सौ पार्वतीबाई भाऊसाहेबाची बायको ऐसी दाहा हजार फौजेनसी चमेल उतरून ग्वालेरीस अलो येथें आहों पहिले पत्र एक कासिदा बाा पाठविले ते पावले असेल त्यास आपली माणसे पळून लुटली वाटेने वस्त्र-विरहित आम्हापासी आली सखोबा सुभाना सुर्वा जानू खिजामतगा(र) राणू सिंदा खिजमतगार इतके पाठीमागून येतात ऐकतो येतील तेव्हां लेहून पाठऊ वरकड खिजमतगार व घोडके बारगीर खंडू जाधव हवालदार व माहादेव वेलणकर कृष्ण ++ वेकू आच्यारी कोनरी कुसी बटीक व बहिरां हिरीचा ही सर्व येऊन पोहचली घोडी उंटे आगदी गेली मोहनी व शाहा-जादी व तुरकी व करडी व दोन तटे व देवपुजी इतकी मात्र घोडी वाचली वरकड गेली या प्रो सर्व कटकाची गत जाहाली श्रीमंताचे, काही राहिले नाही सर्व गेले आसो होणारास इलाज नाहीं ईश्वरी कृपेने सर्व आनकूल होईल बाला खोरकरहि आला घोडी विकत घेऊन दिल्ही चिर-गूट पाघरून दिल्हे आम्हापासीच आहे हातास बरछीची जखम होती बरा जाहला चिंता नाहीं मातुश्री गंगा मावसीस सागावे सुपेकर बापाहि आले आम्हापासी आहे सुप्यास केसो भिवराव याजला सागून पाठवावे आन्या-भाऊ दाजीबा आबा बाजी नारायेण जगोबा हेहि सुखरूप आहेत बाजी काकाचा लेक गोविद मागून येत आहे आसी खबर आहे येईल परंतु वाटेने जो पळ येतो त्यास अंन मिलत नाही पाघरूण नाहीं उघडी येतात आसे

हाल जाहले आहेत येतील बाजी हरि सुभेदार व त्याचा पुत्र दादा व जावाई बालोबा गोपाल रामाचे पुतणे तिघेहि नाहीत थाक लागलियावर लेहून पाठऊ बलवंतरावचा लेक आपा आम्हापासी आला आहे मातुश्री बाईस सागणे चिमाजी गगाजी खडोजी व जानोजी व पराणजी व आबा मानाजी देशमुखाचा हे आले रामचंद्र जगनाथ मागून येत आहे आम्ही ग्वाल्हेरीस आल्यावर राहुटचा डेरे उंटे घोडी पालखी घेतली भाडेकुडे घेतले सर्व मिलाले चिता कालजी न करणे याउपरी वडिलाचे दर्शन पाय पाहावे ही इछा आहे मार्तंड भैरव पूर्ण करील तो सुदीन आहे संतु कापशा मागून येत आहे लस्करचे मोठे हाल जाहलें बरे काये करावे गोविद बापूस आम्हाकडे पाठवणे हे विज्ञापना

चिरंजी बजू व बापू यासी आसीर्वाद बापू तुम्ही लोटमाल घोडी चागदेवी आहे ती व गिरजा घेऊन येणे सिराजा बजूला बसायासी ठेवणे हे असिर्वाद जानोजी बंगाल्यास आसीर्वाद हे पत्र दाखवणे हे विनंति

राघो निबाजी व चिरंजीव माणकोबा व खडोबा चिंतोबा यासी नमस्कार व आसीर्वाद

सेवेसी जगनाथ रघुनाथ सां नमस्कार सर्व मंडळीस नमस्कार द्या निरतर करीत जावी हे विनंति.

पो छ १५ साबान ईहिदे.

---

ले. ३९८ श्रीशंकर शके १६८२ माघ शुा १३
इ. स. १७६१ फेब्रु. १७

छ ११ रजब मुा पाा डुराब नजीक भूपाल

* सेवेसी विज्ञापना आम्ही लिहिले कीं स्वामीनी अशेर बऱ्हाणपूर या सुमारे राहावे आणि दोहीकडे फौजाचा व ऐवजाचा पुराठा करावा हे केवल स्वामींमध्ये कर्तुत्व नाही या आशयाने लिहिले नव्हते तथापि स्वामीनी त्याजवर व्यत्यास घेऊन दोन चार व्यंगोक्ति लिहिल्या ऐसियासि आम्ही लिहिले होते तेंच मनसुब्यास उपयोगी कसे स्वामी म्हणतील तरी स्वामी लक्षा फौजेचे खावंद आणि दाहा हजार फौजेसी आबदालीजवल जावे हे सलाह आमच्याने देववणार नाही झासी आथवा ग्वालेर येथपर्यंत

जावयास चिंता नाही पुढे खासा न जावे गोपालरायासारिखा जलद सरदार असेल त्यास पाठवावे स्वामीचे दबावाने जे कार्य होईल ते जाऊन होणार नाही स्वामीचे म्हातारपण व शरीर अशक्त जाहाले याजमुलेहि बहूत जपोन मनसुबा करावा शरीरात शक्त असती तरी सर्वहि स्वामी करिते पहिल्या स्वारीया मेहनती स्वामीनी बहूत केल्या आहेत त्या आम्हास व सर्व जनास विदित आहेत असे असता वितर्क घेऊन स्वामी लिहितात यास आमचा इलाज नाही आम्हास मनसुब्यास उपयोगी सुचतें ते लिहीत असतो परंतु आम्हापेक्षा स्वा(मीस) मनसुबा अधीक कळतो तो आम्ही ल्याहावा तोच करावा ऐसे नाही परंतु सुचेल तो विचार बोलावा हे नीतीतहि असेल, श्लोक ॥ अपृष्टस्तस्य तद्ब्रयाद्यस्य नेछेत्परा- भवं ॥ याजसाठी सहजात लिहिला अतःपर ल्याहावयाचे काय प्रयोजन स्वामी उतम जाणतील तो करितीलच आम्हाकडील विचार स्वामीनी लिहिला त्यात खुलासा की तिपट फौज असता फिरोन फौजा कशास आणविता तथापि आबाजी नाईक व कवडे व पिराजी नाईक पाठविले म्हणोन आज्ञा ऐसियासि मनसुबा आमकाच पुढे होईल हे आगोधर कलत नाही येखादा मोठा मनसुबा सहजात होतो येखादा लहानहि लौकर सेवटास जात नाही यास्तव साहा महिने लढाई पडली तरी कामास येई या अन्वये तर्तुद करितो सांप्रतचा येथीलचा मजकूर तरी आम्ही गंगा नांदेडीजवल सोमवारी उतरलो ते दिवसीच त्यास बिगाडाची बातमी गेली तिसरे दिवसी आमचे लस्करात देवाजीपंत आले त्याजपासीहि आम्ही सविस्तर बिगाडाचा मजकूर बोललो स्वामीची पत्रे आली की मंत्र गुप्त जरूर असावा त्यासी आम्ही दर मजल बमये तोफखाना चाललो तेव्हा त्यास कसा विस्वास वाटेल आधीच ते अविश्वासी त्यात संकेतासिवाय दरमजल चाललो तेव्हाच ते सावध जाहाले मग लटकी बेमानी का घ्यावी यास्तव आम्हीहि सांगितले की तुम्ही उशीर लाविला यास्तव तुम्हास शास्त करावयास येतो त्याजवर त्याणी कृष्णराव व मुरादखान याची रवानगी आम्हाकडे करून आपण पलून मेदकाकडे गेले मेदकाकडे जावयास कारण की निजामआलीजवल फौज थोडी टकर न सोनवे व झाडीत तोफखानीयाचा वगैरे गलाठा होईल यास्तव मेदकास मिरमोगल हजार दीड हजार फौज व हजार गाडदी व पाच सात तोफानसी आला त्यास मेलऊन आमलसे तरी बलकट व्हावे यास्तव गेला आम्ही दर मजल साप्रत

पाठीलाग करीत जातो पुढे मल्हार नाईक व नागो राम व राघो बापूजी व देवजी ताकपीर व सयाजी बोरगे व मानाजी सिंदे इतकी पथके रवाना केली चार हजार फौज सडी गेली जर मिरमोगल निराला सापडला तरी पारपत्य करितील नाहीतरी भोवताले फिरतील विना आम्ही गेलिया काम होत नाही श्रीकृपेने आम्हीहि लौकरच पोहचतो तोफखाना मातबर व वाट फार वाईट याजमुळे मजल लहान होते तथापी जितकी कस्त होईल तितकी करितो जीवनराव व शेरजंग औरंगाबादेकडे गेले यास्तव बळवंत बाबुरायाकडूनच थोरले नवाबाकडे सूत्र करविले तिघाहि भावाचा संकेत होता कीं जर आबदालीची बाजू शेर जाहाली तरी खामखा दक्षणेत आमल बसवावा साऱ्यानी येक विचार केला होता मुराररायाचे देखील आत सूत्र होते साराश कोणासहि स्वामीचे सुख नाही जबरदस्तीमुळे सारे दबतात नाहीतरी येका दिवसी सारे हगामा करावयास तयार आहेत सांप्रत दक्षणचा कारभार तरी चहूकडे कजिये आहेत पश्चमेस जंजिरा दक्षणेस पनाळा व श्रीरंगपटण पूर्वेस मोगल ऐसे तिहींकडे कजिये आहेत येकाची वाट येक पाहातात जर आम्ही हिंदुस्थानात स्वामीबराबर येतो तरी मागे निजामआली वगैरे सारे मोगल हगामा करावयास न चुकते या प्राच्च चहूकडील वकिलाच्या बातम्या सांप्रत येतात आता जर ईश्वर-कृपेने निजामअलीने जरब खादली तरी सारे दबतील नाहीतरी सारे डोक उचलतील सारे हिंदुस्थानाकडे पाहातात भाऊसाहेबाची बाजी शेर जाहाली तरी आम्हाकडे येतील आबदालीची बाजी शेर जाहाली तरी सारे येक होऊन लबाडया करितील मुरारराव व उदाजी चव्हाण वगैरे त्याच संमतात आहेत परतु आम्हाकडे ईश्वरी कृपा व स्वामीचे पुण्य आहे स्वामींनी काळजी न करावी इतकेही पेच सारे मारून स्वामीची बाजी शेर राहे जुन्या मुलकास उपद्रव न लागे नवा मुलूक सुटे ऐसेच ईश्वर करील स्वामीनी दक्षणेतील काळजी तिळतुल्य न करावी सर्व वर्त-मान कळले असावे ह्मणौन मात्र तपसीले लिहिले आहे बहुत काये लिहिणे हे विनंती

---

१ पत्र राघोबाचें नानासाहेबास

ले. ३९९ श्री श. १६८२ म १ वा ४
इ. स. १७६१ फे ० २३

चिरजीव राजश्री नाना यासि बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जाणे विशेष राजश्री बाबूजी नाईक यांजसमागमे दोन लाख रुपये पाठविले आहेत याखेरीज नारो शंकर दिलीहून निघाले तेव्हां कांहीं घेऊन आले असतीलच त्याऐव-जपैकी लोकांस तूर्त पोटापुर्ते मात्र द्यावे देशी कर्ज मिळावयाचा प्रकार सध्या कलतच आहे इकडे कमावीसदारापासून या फसादीमुले कर्जवाम मिळत नाहीं सरकारात पनास लाख रुपये कर्ज जाहाले यास्तव प्रस्तुत हात आटोपूनच पोटापुर्ता मात्र खर्च करीत जाणे चिरंजीव भाऊसाहेब मारवाड प्राती आल्यावर ज्यास ज्यास अर्जबाब वगैरे देणे ते द्यावे तूर्त समजून खर्च करावयाचा तो करणे राजश्री गणेश संभाजी यास येथून पत्र पाठविले आहे की फौज सुधा तुम्हापासी मल्हारबापासी ढवलपूरचे सुमारे जाणे म्हणून लिहिले आहे तुम्हीहि त्यास पत्रे पाठऊन आपल्या समीप नेणे तुम्ही ग्वालेरीजवल आल्यावर बाबूजी नाइकाची तुमची भेट होईल मग ताजे फौजेची रवानगी चिरंजीव भाऊसाहेबाकडे फौजेची रवानगी करणे सारांश गणेश सभाजीचे फौज पो जाठास उपयुक्त ते ढवलपुरास ठेऊन बाकी तुम्ही आपले जवल आणणे *रा छ १७ रजब हे आसीर्वाद चिरं-जीव भाऊचे हातचे पत्र व आजमेरीस आले ऐसे पक्के ठहरेल तेव्हां मग त्याचे सुमारे मल्हारबानी तुम्ही जावे आम्हीहि येऊ तो पावेतो ग्वालेरी झासी इतक्यातच राहावे श्रीकृपेने लौकरच पक्के वर्तमान येईल हे आसीर्वाद

---

ले. ४०० श्री शके १६८२ माघ वा ४
इ. स. १७६१ फेब्रु. २३

*चिरजीव नाना यासी आसीर्वाद उपरी माहिपतरायास मात्र आम्हाकडे हर तजविजेने पाठवणे कालपीस पत्रे मल्हारबाची तुम्ही आ-पली पाठऊन गणेश संभाजी असुदा आहे त्यास भिंडेस बोलावणे येथूनहि पत्रे त्यास गेलीच आहेत चिरजीव भाऊ या लोकी नसल्यावरं मजला करणे नाही थोडे फौजेने होत नाहीं भोसले कष्टी होते खरे सर्व प्रकारे रयात करून आणिले येक गोपालराव शाहाजी भापकर मिलोनँ पाच

हजार हुजरात हजार आहे कालच रताजी चव्हाण हजार आले पाहुणे आनंदराव दाजीनी उशीर लाऊन अवरंगाबादेस राहिले मी तो आपणाकडील मनसब्याची सुरत धरून पंनास लाख कर्ज केलें ते सर्व व्यर्थ गेले आता कर्ज पुण्यात बाबुरायास लाख दोन लाख मिलत नाही दोन वर्षांचे ओढीनें कमावीसदार सावकार सर्व गुतले तपसील किमर्थ लिहिणे येक भाऊ वाचून दुनिया दौलत व्यर्थ आहे त्याचे हातचे पत्र पाहीन तेव्हा माझे बायकोस मला जीव येईल आता तो वेडेपणे आहो लेक अल्पायुषी होता सूर्यमंडल भेदून गेला ते दुख परमार्थ शास्त्रपुराणे करून टाकिले परतु चिरजीव भाऊ वाचून दुनिया व्यर्थ आहे छ १७ रजब हे आसीर्वाद

पो छ २६ रजब मुा म्हसेगाव प्रा ग्वालेर

---

ले. ४०१ श्री शके १६८२ माघ वा ४
इ. स. १७६३ फेब्रु. २३

* आसीर्वाद उपरी पेशजी रा बाबूजी नाईक याजबराबर खासी घोडी रवाना केली आहेत त्यांपैकी निमे घोडी माारनिलेबरबर देऊन चिरजीव रा भाऊसाहेबाकडे पाठऊन देणे निमे आपणांजवल ठेवणे नागोजी सिंदे यांस हुजूर माघारा आम्हाकडे पाठऊन देणे रा छ १७ रजब सुा इहिदे सितैन हे आसीर्वाद

---

ले. ४०२ श्री श. १६८२ माघ वा ४
इ. स. १७६१ फेब्रु० २३

खाशांच्या स्वदस्तुराची नकल ( तत्कालीन )

आसीर्वाद उपरी शरीराने केवल क्षीण जाहाले गंगाश्नान करावे यासाठी दाहा हजार फौज घराऊ मात्र घेऊन पौषात निघालो गंगेवरून चिरजीव दादा निजामआलीस आणावयासी दाहा मजली गेले तो प्रकार वरकड पत्रावरून उमजेल सारांष आबदलीचा उत्कर्ष बलवतराव मेलियापासून मातून कुमत्र करू लागताच चिरजीव दादा गला पडावयासी धावताच तो तोफ बुनगे देखील येकून निजामआली तीन हजार फौजेनसी कोडिल सखाराम मल्हारनाईक दाहा हजार फौजेनसी धावोन पुढे गेले

---

१ पत्र नानासाहेबाचे. १ चिठी नानासाहेबांची.

त्यानी कुमकेस बसालतजंग येणार त्यांस विसोबानी शह अद्वानीस दिला चिरजीव दादाची उमेद लाब होती माझी पत्रे शफत घालून लडाई तुमची न(ना?) सल्याचे जयनगरहून वर्तमान नर्मदातिरी येताच तीन पाठविली पाहावे की काय करितात तुम्हाकडे नर्मदेहून दोन लाख रुयये लाख रुपयाचे कापड देऊन बाबूजी नाईक सदासिव रामचंद्र रवाना केले खेचीचे वाटेत कजिया करिता नाईक रागीट गुंतले मी भेलसीयास दाखल होताच फजीत करून लिहिले की हे दिवस जमीदारासी खा(घा?)लावयाचे नाही सर्वांचे अन्याय गिळावे येकदा भाऊचे दर्शन घ्यावे तेव्हां नाईक सुरजेहून कूच करून गेले पावले असतील असो आतां तुम्ही चिरजीव भाऊकडे नाइकास मल्हारबाकडील हजार फौज त्रिबकराव सिवदेव सदा-सिव रामचंद्र कोणी तुम्हातील हिमत धरितील तरी त्याने जावे भाऊसाहेब अजमेरीस दाखल होऊन त्याचे हातीचे पत्र येई तो तोच येत्न करावा नाईक अनमान करू लागले कदाचित जावयासी तरी त्रिब॰ सिवदेव विठलपतानी जावे सर्वांनी मिळोन पाच हजार निदान तीन हजार फौजे-नसी अजमेरीस जाऊन आलाजाट पावतो शोध काढावा मी बहूत माणसे अनेक प्रकारे रवाना तिकडे आज पधरा दिवस करितो अद्यापि पकी खबर येत नाहीं ह–रे–री कागदावरी चहू बेटात सर्व मजकूर बारीक लिहून चिरजिवास पाठविली पावतील तेव्हा खरी माधव सिगास आबद-लीनें लिहीले स्वार पाठविले करोड रुपये घेऊन हुजूर येणे त्यावरून घाबरा होऊन दररोज आम्हास पत्र लिहितो आपण बुदीस यावे मी येतो सर्व रजपूत मेळऊन मी इतकेच लिहीतो आधी तुम्ही चिरजीव भाऊची भेट अजमेरीस घेणे बिजसिग जवळ आहे तोही आणावा रणतबराविसी चिरजीव भाऊनी तुम्हास वचन दिल्हे मल्हारबाजवळून माफ तकसिरा करविल्या असो जे जाले ते उतम जाले पुढे तुंम्ही चिरजीव भाऊची व मल्हारबाची भेट घेतल्यास तुम्ही हिदू तूर्त मातबरा वडील तुमचे मागे प्रसग पडत आले श्नेह करीत आले तुम्ही येकदा उ ला स की त्याचा भरवसा मानिला असो अखेर जाले तरी रजपूत हिदू सावध व्हा आम्हांस मोगला-नी मोडिले नर्मदे पावेतो सारले यैसे खांनदौरा कमर्दी खानानी माडवगड घेतला आता आबदलीचा आम्ही हिसाब बालगीत नाही हिदुस्थान गेले सारे च्यार महिने ध (ज?) र चिरजीव दादा वीस हजार फौजने येईल

तेव्हा कलेल ऐसे वकिलास धोडे राजियांस लिहिले हा मजकूर गगोबा मल्हारबास सागोन येक वर्ष क्षमा करीत ते करणे पत्र माधवसिंगास रणंत-भरचा गैर मजकूर गोड लिहून पाठवणे त्याणी खेल काय काय केले ते दक्षणेत श्रावणमासापासून मजला ठाऊक आहेत तुम्हास तो गुदरले परतु आबदालीनी याचा हरसा केला त्यांस कैद केले याजवर स्वार पचवीस सखत वकील जयनगरी येऊन बैसाला आहे फारच घाबरे जाले आहेत मल्हारबानी चिरजीव भाऊनी मनसब्यावरी नजर देऊन आपले करावे जाठास रुपये मागतो याने न द्यावे च्यार जागे बलाऊन असावे आम्ही कुमक करावी वाजबी परतु घराऊ विचार पाहातां नवी फौज सारी दाहा हजार मजसमागमे आली यापैकी अजमेरीस जाणे तुम्हाजवल असणे काय करावे या कर्मास नवी फौज वीस पचवीस असावी तुम्ही माहीत आहा जे समजाल कराल ते दूरदेसीने ते खरे सारोष चिरजीव भाऊस ईस्वर आणील तेव्हां सर्व ईश्वर तुम्हा जवलून करवील चिरजीव भाऊ आलियावर मग माझी भेट योग्य मी भेलसेयाहून पुढे चिरजीव भाऊ येईतो येत नाही तुम्ही मल्हारबानी भाऊ येत तो येकहि मजल येऊ नये चिरजीव आलिया-वर त्यास भेटोन मग सर्व मनसबे करावे छ १७ रजबू हे आसीर्वाद

पौ छ २६ रजब मुा किला ग्वालेर

---

ले. ४०३ श्री शके १६८२ माघ वा ५
इ. स. १७६१ फेब्रु. २४

* चिरजीव नाना यासी आसीर्वाद उपरी यदा पनास लाख कर्ज जाहाले त्यापैकी इसने सितैनचे रसदे पैकीं निमे रसदचा ऐवज नुस्ते कर्ज पचवीस येकूण पनास जाहाले आता हिंदुस्तान दोन वर्षे बुडाले याखेरीज तुम्हाकडे कर्ज काय जाहाले आसेल ते आमचे कागदी नाही साराश येक रुा पुण्यापासून येथे यावे तो मिळणे नाही दोन लाख सिलक आम्हा-जवल होती ती तुम्हाकडे पाठविली तुम्हाजवल दिलीपैकी यैवज निघाला तो यैवज तुम्हाजवल आहेच इकडून येक रुा कोणेहि प्रकारे नाही जमी-दारासी मागता येत नाही काही फौजेचे बल नाही यास्तव चिरंजीव भाऊस तुम्ही मल्हारबा भेटा अथवा ते बुदीस येत तो पुढे ईश्वरकृपा समर्थ बहुजन हिंदूभाग्यानरूप ईश्वर करील ते खरे तुम्हाकडील साप्रत

पत्रे हमेश येतात परतु महिना जाहाला दीढ महिना जाहाला चिरंजीव भाऊचे हातचे पत्र इकडे तिकडे कोठे नाही मुख्य विचार सर्व त्याजवर छ १८ रजब हे आसीर्वाद[1]

---

ले. ४०४ श्री श. १६८२ माघ वा ६
इ. स. १७६१ फेब्रु० २५

* चिरजीव राजश्री नाना यासी आसीर्वाद उपरी सौभाग्यवती पार्वतीकडे बायको पाठवणे जरूर बायका वेडेपणे जात नाहीत आता वाट चालावयात अंतर नाही त्यास सगुणाबाईसच पाठवावे त्यासमागमे दोन बायका आहेत पायउतारा धाटायाच्या आहेत त्यास ताई पार्वतीची गमावली आलीकडे बाबुराव कानेर झाझीकर याचे घरची अथवा फडनिसाकडील येक दुसरी म्हातारी अथवा अहेव असली तर उतम जाहाले नसली कोणीच तर जरूर जलद: लिहून पाठवणे सगुणाबाईची रवानगी करू जरूर जलद उतर पाठवणे त्यास येथे आणावे परतु चिरंजीव भाऊचे ठिकाण नाही यामुले येणार नाहीचसे वाटते आंलियास तुमचे लस्करचा बंद्बाह फुटत असला तर मात्र न यावे हे राजकीय समध चिरंजीवाचे हातचे पत्र येई तो लागला तर तुमचाहि इलाज नाही तर अती सत्वर दोन तीन उतरे पाठवणे टकरामुले पा(का)गद अद्याप इकडील तिकडे तिकडील इकडे पावत नाहीत कालगत विचित्र आहे छ १९ रजब हे आसीर्वाद.

---

ले. ४०५ श्री शके १६८२ माघ वा ११
इ. स. १७६१ मार्च २

* चिरजीव राजश्री नाना यासी आसीर्वाद उपरी राजश्री बाबुजी नाईक सदासिव रामचद्र शाहाबा सुपेकर हे पावलेच असतील त्रिबकराव सिवदेवहि पावले असतील मागाहून कापड गोपालराव बापूजी बरोबर पाठविले ते पावलेच असेल सारांश हा कालवर चिरजीव भाऊचे हातचे पत्र येत नाही तेव्हा मग हव्यास हिदुस्थानात राहावयाचा लटका मल्हारबा गपा मारतील त्या आयकाव्या परतु भाऊवाचून सकल व्यर्थ हे तुम्ही

---

१ पत्र नानासाहेबांचें. १ पत्र नानासाहेबांचें.

समजत असता काहीच तर्तुद होत नाही तुम्हासी ग्वालेरीस येऊन पंधरा दिवस जाहाले नाना भाऊ वाचून दौलत करणे नाही सवघड जाहाली तरी मग अवघड म्हातारपणी अशक्ततेत कोठे होते महिन्यात घोड्यावर अर्ध कोश बसवत नाही हे माझी अवस्था मजला तो अर्धा फालगूनपावेतो भाऊची वाट पाहाणे पुढे ईश्वर बुधी देईल तैसे करणे बाबूजी नाईक त्रिबकराव शाहाजी सुपेकर मल्हारबाकडील लक्षा प्रकारे तो गगोबा यानी चहू गावाचे मजलीने अजमेरीस जावे कदाचित नाइकानी अनमान केला तर शाहाबास न पाठवावे सदासिव रामचद्र त्रिबकराव सिवदेव मल्हारबाकडील गगोबा यानी जरूर जावे तुम्ही रवाना केलेच असेल साबाजी पाटील वगैरे जानकोबाकडील आले असतील त्यानी तो जावेच माधवसिगास समाधान पूर्वक मल्हारबानी तूर्त पत्रे ल्याहावी जाठासी अती श्नेह केलाच आहे गणेश सभाजी आलिया त्यानी ढवलपूरचा घाट उतरून जाटाचे मसलती प्रा। राहावे हे जरूर करावे सौभाग्यवती पार्वतीस पुढे पाठविल्यास पेच पडत नसला तर पाठवणे सुरोजचे सुमारे जर पाठविल्यास लस्कर-[चल] बिचल व जेर होत असले तर पाठऊ नये पत्र मात्र जलद पाठवणे सगुणाबाईस पाठऊन देऊ चहू दिवसाआड पत्रे रवाना करीत जाणे दिलीचे आतील सुज्याउदौला [व] गैरे सर्व बातमी जरूर दरोज तुह्मास येईसे करणे आगरियास वकील ठेऊन अजूरदार करून दिलीस मनसारामाकडे जाऊन पत्र पाठऊन उत्तर घेऊन येत जावे मनसाराम आहे त्याचे येक पत्र अबदाली दिली दाखल जाहालिया उपरीचे सविस्तर आले होते त्यासहि ल्याहावे की अजूरदार येक जयनगरचे वाटेने येक ढबलपूरचे वाटेने करीत जाणे ऐसे जरूर करणे छ २४ रजब हे आसीर्वाद[1]

---

ले. ४०६ श्री शके १६८२ माघ वा। १३
इ. स. १७६१ मार्च ४

चिरजीव राजश्री नाना यासि बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी प्रस्तुत येथे आगदी फौज पाहाता पाच हजार आहे बाबूजी नाईक आदीकरून तुम्हाकडे पांच हजार पाठविली गणेश संभाजी यांस तुम्ही फौजसुधा आपल्या जवल आणावे चिरजीव भाऊचे खबरीसाठी राजश्री

---

१ पत्र नानासाहेबांचें.

बाबूजी नाईक याजसमागमे आणिकहि थोडीसी फौज देऊन त्रिंबकराव सिवदेव याचे पथक देऊन जलदीने पाठवावे छ २६ रजब हे आसीर्वाद

---

ले. ४०७ श्री श. १६८२ माघ वा। १३
इ. स. १७६१ मार्च ४

आसीर्वाद उपरी आम्ही बुधेल्यास पत्रे पाठविली त्याची नकल पाठविली असे त्याजवरून कलेल याचप्रो तुम्ही हिंदुपती व पहाडसिंग यांस पत्रें पाठऊन आपणांजवल आणून त्याजकडील पैक्या टक्याचा निकाल करून घेणे रयायेत करणे ती करावी चाकरीस आपल्याजवल आणावे रा। छ २६ रजब *दोन च्यार पत्रे बुधलियास पाठवणे म्हणजे खामखा येतील वाजबीत काही रयात करून मागील गुता वारणे गणेश सभाजी लबाड चढखोर कलागत वाढऊ व्यर्थ मुर्सत्वे सिबंदी खर्च जाजती करतो त्याची गोष्ट कामाची नाही छ २६ रजब[1]

---

ले. ४०८ श्री श. १६८२ माघ वा। १३
इ. स. १७८२ मार्च ४

* चिरंजीव राजश्री नाना यासी आसीर्वाद उपरी ग्वालेर किलियास गोहद फार फटकल आहे आमचा कमावीसदारी बंदोबस्त असतो जाठ हरामी जमीदार आहे त्यास जुनी नवी फौज मिलोन तुमचा समीप दबाबास मुकाम आहेच आठ पधरा दिवस मेहनत केलीया येईसी असलीया घ्यावी रिकामे का बसावे विठलपतापासून मल्हारबास भर राग आणून तुम्ही समत देऊन होईसे विठलपताचे मते असले तर करणे चिरंजीव भाऊ येईत तो रिकामे बसावे ते काही काम करावे छ २६ रजब हे आसीर्वाद[1]

---

ले. ४०९ श्री श. १६८२ माघ वा। १४
इ. स. १७६१ मार्च ५

* चिरंजीव नाना यासी आसीर्वाद उपरी नारो शकरास झासी सागणे बाबुरायास येथे पाठवणे म्हणजे भोसल्याची बेबदी जाऊन काही

---

१ पत्र नानासाहेबांचें. १ पत्र नानासाहेबांचे

कामावर पडतील तुम्ही सहसा न येणे त्या लस्करात सावंद तुम्ही चिरंजीव भाऊ येतील त्यास भेटून मग तुम्ही येणे महिपतराव चिटनीस व पाडच्या बालू पलांडे यास जरूर पाठवणे छ २७ रजब हे आसीर्वाद

---

ले. ४१० श्री श. १६८२ फाल. शु. १
इ. स. १७६१ मार्च ७

चिरंजीव राजश्री नाना यांसि बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी तुमचे सविस्तर पत्राची उतरे आलाहिदा लिहिली आहेत त्याजवरून सर्व कलेल चिरंजीव भाऊसाहेब आल्याखेरीज तुम्ही हरगीज न यावे त्य फौजेत आवघा मदार तुमच्याच आहे तुम्ही आल्याने ठीक पडणार नाही राजश्री बाबूजी नाइकास आजमेर पावेतो भाऊसाहेबाचे खबरीसाठी रवाना करणे ते फलाणे ठिकाणी आहेत असी खबर आल्यावर त्यास पाठवावयाची काय मजा यास्तव आगोधरच यांस पाठवावे हे उतम छ २९ रजब हे आसीर्वाद महिपतराव पाडच्या यास पत्रदर्शनी पाठवणे हे आसीर्वाद

---

ले. ४११ श्री शके १६८२ फाल्गून शुा १
इ. स. १७६१ मार्च ७

चिरजीव राजश्री नाना यासी आसीर्वाद उपरी रा बलाल व महिपतराव चिटणीस व पाडुरग कृष्ण यास हुजूर पाठऊन देणे तुम्हाजवल कोणी नाही म्हणाल तर यास फिरोन पाठऊन देऊ रा गणेश सभाजी याजकडे कालपीस पत्र पाठऊन सत्वर आपणाजवल आणणे रा नारो शंकर यास झासीस सत्वर रवाना करून बाबुराव कोन्हेर यास हुजूर रवाना करणे दिलीच्या खजान्यापैकी नारो शकर याणी संभालून आणिला किती दिलीत राहिला किती हे लिहिणे नागोजी सिंदे यास हुजूर सत्वर रवाना कर[णे] * छ २९ रजब गोहद झासी-झासीहून तोफा महिपतरायास पाठऊन आणून काही ग्वालेरीवरील मिलोन विठलपतासी सर्व सजून देऊन मल्हारबाकडील फौज किती आली हे काहीं लिहितच नाही मल्हारबास भर देऊन खामखा गोहद घेवणे आम्ही

१ पत्र नानासाहेबांचे

रिकामे येथे आहो त्यास गोपालराव तोफखाना पाठऊन खेचीचे पारपत्य करून पाहातो मल्हारबाजवल रजबदली सखेची ( ? ) पाठवील त्यास तीन हिसे मुलूक सरकारात येक जागा मध्यम त्याजकडे येक साला पाच सा लाख खडणी याप्रा करसील तर रजबदल करू ऐसा आगोधर पके करून ठेवणे की भीड न घालीत चालते तैसे चालावयाविसी उगेच सविस्तर लिहिले आहे तो मामा माधवसिगाचा सावत्र त्याचे पारपत्य जाहालिया मल्हार[बा]स सतोषच असेल तथापि सविस्तर सूचना लिहिली असे छ २९ रजब हे आसीर्वाद

---

ले. ४१२ श्री श. १६८२ फाल. शु. १
इ. स. १७६१ मार्च ७

*तीर्थरूप राजश्री आपा स्वामी वडिलाचे शेवेसी

आपत्यें नानाने चरणावर मस्तक ठेऊन सिर साष्टांग नमस्कार विनंति येथील वर्तमान ता फालगून शुध प्रतिपदा मुा ग्वालेर येथें वडिलाचे आसीर्वादे सुखरूप आसे विशेष स्वामींनी आसीर्वाद पत्र पाठविले ते पावोन फार संतोष पावलो स्वामीचे पाये द्रष्टी पडलेसमान चितास जाहाले दर्शन होईल तो+++आहे मातुश्री आवईकडे कासीद पाठविले सुखरूप आहे ह्मणौन त्यास उचितच वडिलास आहे इकडील वर्तमान दर्शनांती कलेल बाजी हरी व दादा याचा थाक नाही माणसे जागजागा पाठविली आहेत सुपेकर बापा येथें आम्हापासी आहे सोनजी भापकर येशवतराऊ पवार गगाधर नाइक वोंकार बापू बाजीरायाचे पुत्र याचे ठीक नाही हरी सिवराम दिलीत आहे यासी खबर आली याजवरून हे काम देऊन माणसे शोधास पाठविली आहेत नाना फडणीसाची मातुश्री बहिणाबाईचा शोध नाहीं आपा सरनाईक गोली लागली आहे जखमी जाहे आम्हापासी आहे महिनाभरा बरा होईल कलावे लोभ आसो दिल्हा पाहिजे हे विज्ञापना बलवंतरावाचा लेक आपा सुखरूप आहे हे विनती

---

१ पत्र नानासाहेबांचें.

ले. ४१३ श्री श. १६८२ फाल० शुा ६
इ. स. १७६१ मार्च १२

चिरजीव राजश्री नाना यासि बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जावे विशेष राजश्री मल्हारबानी गोहदकराचे पारपत्य करावे गोहद घ्यावी असे कबूल केल असिले तर तुम्ही येथे येणे पेशजी सनदा झासीच्या पाठविल्या आहेत त्याप्रो राजश्री नारो शंकर याची रवानगी झासीस केलीच असेल व बाबुराव कोनेर यास हुजूर घेऊन येणे नारो शंकर गेले नसिले तर सत्वर माारनिलेची रवानगी झासीस करणे *तुम्ही येणे छ ४साबान हें आसीर्वाद

---

ले. ४१४ श्री शके १६८२ फाल. शुा ६
नकल इ. स. १७६१ मार्च १२

चिरजीव नाना यासी आसीर्वाद उपरी तुम्ही नारो शकरास झ (?) रवाना करून बाबूजी नाईकास पुष्कराकडे रवाना करून मम्हारबा जवळून कबूल करून विठलापतास मल्हारबाजवल याच कामास ठेऊन चैत्र सुधात सुरोजेस आथवा उजेनीस खासा स्वारी आहे येथे येणे अथवा येणेप्रो पुर्ते करून हे पत्र पावताच येणे अद्याप सविस्तर उतरे पत्राची जी जी लिहितो त्याची येत नाही हे अपूर्व वाटते तुम्ही लिहित नाही ऐसी तो रीत तुमची नाही या उपरी चहू दिवसी पत्र सुरोजेस ग्वालेरीहून येत ऐसे करणे बाबूजी नाईक गेले आसले तरी हे पत्र त्यास जेथे आसतील तेथे प्रविष्ट करणे छ ४ साबान हे आसीर्वाद

---

ले. ४१५ श्री शके. १६८२ फालगून शुा ९
इ. स. १७६१ मार्च १५

पौ छ शुक्रवार सध्याकाल मुा नजीक ग्लालेर.

* चिरंजीव नाना यासी आसीर्वाद उपरी कर्जपटीविसी रुक्ष सर्वासी बोलली चिरजीव भाऊसी बाबुराव फडणीस रामचद्रबावाचे रुपयाविसी बोलली येवढा मजकडे अविच्यारी याचे मते दोष माझे मते नाही परतु माहादोबाचा सिष्य त्यास वाईट साक्ष रुक्ष बरे गोष्टीसहि बोलावे येवढा दोष मी त्याचा लाहानपणापासून सिष्य यामुले सख्त त्याचे चतुर्गुणित मी बोलली सर्वानी क्षमा करावी काही चिरंजीव सर्व

प्रकारे गुणगरिष्ट होत्साते धैर्य धरून माझे सख्त बोलणे सोसीत आले चिरंजीव दादाचे तोंडावर मी मारिली मिरजेवर ज्वरात श्वान करीत यास्तव केवल ईश्वरी सिधयोगी माहावीर मी नामर्द व्यसनी पापी असता ऐसे केले असता सोसिले धन्य ते कृतायुगश्वभाव पुरुष सोसिले हे सर्व तुम्हास अवगत असता आधी उगीच कुतर्क करावा हा भाऊचा जातिश्वभाव तोहि आता माझे मते नाही बलवंतराव कर्नाटकात आलियापासून तुम्हास स्मरण माझे सख्त बोलण्याचे राहिले देवो(?) जाणत असता हेच कलिकाल दोषसा वाटतो असो उगेच फार लिहिले वाईट मानु नको सत्वर नारो शंकर म्हणतात तैसे या साली कबूल करून त्यास पाठऊन बाबुरायास आणऊन गोहद मल्हारबा विठलपताजवलून शफत पूर्वक घ्यावयाचे कबूल करून तुम्ही सर्व फौजेसुधा खेचीवाडियात येणे आम्ही खेचीसी खेल जुझ रिकामपअी जुझतो दोन जागा घेतले दोन राहिले आहेत श्री कृपेने सत्वरच येतील मल्हारबाजवल रजबदल कोणी करील तर तिलमात्र न आयकत ते करणे छ ७ साबान हे आसीर्वाद

---

ले. ४१६ श्री शके १६८२ फाल. वा ६
इ. स. १७६१ मार्च २७

चिरजीव राजश्री नाना यासि आसीर्वाद उपरी चिरंजीव पार्वतीबाइस लौकर घेऊन येणें ह्मणौन तुम्हांस दोन च्यार पत्रे पाठविली असतां अद्याप न आला हे काये अत:पर त्यास गेऊन तुम्ही लौकर येणें न ऐकत न येत तरी त्यास तेथे ठेऊन तुह्मी फौज लोकसुधा तुम्ही लौकर येणे येक दिवस न राहाणे लक्षुमण आपाजी *चिरंजीव भाऊनी आलंजाटाचे मुलकात ठविला होता त्यास पत्र जयेनगरचे वकिलाचे प्रविष्ठ करून उतर चिरंजिवाचें सौभाग्यवती पार्वतीबाइकडे पाठविले ऐसे त्यात लिहिले आहे ती पत्रे तुह्मास पाहावयास पाठविली असेत श्रीकृपेने आहेत त्यास संशय नाही जाठाकडील दिलीकडील वर्तमान साप्रत का येत नाही तर दररोज वर्तमान येत जाई ऐसे करणे मल्हारबा गोहदेस गेले की नाही नारो शकर झाशीस गेले किवा नाही छ १९ साबान मुा उजेनी हे आशीर्वाद

---

१ पत्र नानासाहेबांचें.

ले. ४१६ ( अ ) श्री श. १६८२ फाल० वा ८
इ. स. १७६१ मार्च० २९

चिरंजीव राजश्री नाना यासी प्रती बालाजी बाजिराऊ प्रधान आसीवाद उपरी येथील कुशल जाणून स्वाकिये कुशल लिहिणे विशेष सैा पार्वतीबाई व तुम्ही सर्व फौजेनिसी उजनीस येणे + छ २१* साबान हे आसीर्वाद.

---

ले. ४१७ श्री श. १६८२ फाल्गून वा १०
इ. स. १७६१ मार्च ३१

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री हरीपंत तात्या स्वामीचे शेवेसी

पो बालाजी जनार्दन सा नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ता छ २३ साबान पावेतों मुा नजीक शिरोंज येथे असों विशेष तुम्ही पत्र छ ११ रजबचें बेदरच्या मुकामचे पाठविलें ते पावलें लिहिलेत कीं हिदुस्थान प्रांतीचे वर्तमान श्रवण करून दुख जाहालें तें गजानन जाणें परंतु श्रीमंत राजश्री भाऊसाहेब मंडलीसहवर्तमान आहेत म्हणून अईकिलें याजवरून संतोष जाहाला तर याचें तपशीलवार वर्तमान लिहून पाठवावें म्हणुन लिहिलें त्यास पूर्वी मुजरत अजुरदार जोडी करून लिहून सविस्तर वर्तमान पाठविलें आहे परंतु दूरचा पंथ पत्र पावेल न पावेल याजकरतां लिहिलें असे पौष शुद्ध अष्टमीस श्रीमंताची व आबदालीची लढाई जाली प्रहरभर लडले मग पल सुटला श्रीमंत विस्वासराव यांस गोली लागून देव आज्ञा जाली मोठे मोठे सरदार सर्व पलाले खासा भाऊ मात्र पनास राव-तानशी लढत होते तावत्काल मी समीप होतों पुढें गर्दी जाली ज्याला जिकडे ईश्वरें वाट दिल्ही तिकडे तो गेला त्यापासून भाऊचें ठिकाण नाही तो हा काल पावेतों नाही व मातुश्रीचेंही ठिकाण नाही शोधास माणसें पाठविली आहेत ईश्वरी इच्छा प्रमाण प्रारब्धी असलियास चरण दृष्टीस पडतील वरकड आपले मंडली पो पत्र दाखवू नये ( अधोरेखित मजकुर नानांनी तिरक्या टाकानें बारीक लिहिला आहे. )

---

* आकडा संशईत आहे ११ चे २१ केलेसें वाटतें.

आले जखमा बऱ्या जाहाल्या

१ पुराणीक तीन जखमा तीन
१ गोविंद्भट उपाध्ये
१ कृष्णभट
१ आपाजीपत गोंधळेकर
१ गगाधर बावाजी जखमा ( ? )
१ धोंडोपंत लेले
१ खंडोपंत नवे उमेदवार
१ रामचद्र नातू दिलीहू(तृ)न
८
१ पांडुरगपंत बेडेकर

आले नाही

१ बापुजीपंत येक जखम हातावर आहे पाठीमागून येतात ही खबर लागली मग माणसें शोधास पाठविली येतील चिंता नाही
१ हरीपंत केळकर
१ बाजीपंत जोशी
१ बाळाजीपंत आठवले कारकून
१ रामचंद्रपंत आगाशे
१ कासीपंत नवे उमेद्वार
१ बालकृष्णपंत दिा नारोपंत पालचे
१ नारोपंत दिवेकर
१ श्रीधरपंत घाणेकर
९

याखेरीज ब्राम्हण जन व राठी माणसें कितेक आली कितेक नाही रामाजीपत भाऊ व लक्षुमण बलाल व हरी शिवराम नारायणराव बापुजी गंगाधर नाईक ओंकार भवानी शंकर बाबजी व बाजी हरी पितापुत्र व बगाजीपंत पारसनीस मल्हारपंत मुजमदार व कृष्णाजी अनंत बिनी(वाले?) याचे पुत्र व जनकोजी शिंदे सोनजी भापकर तुकोजी शिंदे मानाजी पायगुडे येसवंतराव पवार अंताजी माणकेश्वर इताकियांचे ठिकाण नाही पनास हजार माणुस मारले गेले घोडी उटे नगारे निशाणें दप्तर कुल दौलत बुडाली पनास साठ हजार फौजे पो पाच सा हजार घोडी निभावली बाकी घोडी गेली पायउतारा लोक लंगोट्या लावून आले भक्षावयास नाही पधरा पधरा उपवास ते हकीकत लडाईची वगैरे लिहितां पुरवत नाही कदाचित भेट जाली तर कलेल स्त्रीची गांठ सत्वरच पडली वीरशिगराव बारावकर याणी सभाळून आणिली फार केली श्रीमत पार्वतीबाई यासही खिजमतगाराने साभाळून आणिली मोठा वाखा जाहाला याप्रो हे वर्तमान आहे श्रीमंत भाऊचे वर्तमान तर मी सुरजमल जाटा(कडी)ल कुंभेरीस पंचवीस दिवस होतो तेथे नजीबखान सुज्यातदौला यांचे वकील तेथे आले

होते त्यांची माझी भेटी जाली स्नेहसंपादन केले तदनंतर त्यानी सर्व (यु)ध्याचे प्रकार सांगितले त्यांत भाऊचें वर्तमान खुणामुद्रा (या?) नशी विपरीत सांगितले वरकड वकिलांची कोठुन पत्रें येतात त्यांत लिहितात की भिकानेराकडे आहेत कोणी अला जाटाकडे आहेत असें लिहितात ईश्वरी इच्छा प्रमाण तात्या असी गत का (क)धीही जाली नाही व पुढेंही होणार नाही शिकस्तीचे वर्तमान आईकतांच दिलींत नारो शंकर वगैरे सात आठ हजार फौज किल्यांत दोन महिन्याचा सरंजाम खजाना सात आठ लक्ष रुपये वगैरे टाकुन पलाले तेही दिलीहुन लुच्यानी काही लुटलें काही अले असे ज़ाहाले मल्हारजी होलकर बाबूजी नाईक सदाशिव रामचंद्र वगैरे नवी फौज ग्वालेरीस राहिली पार्वतीबाई धाकटे नाना वगैरे आम्ही दरमजल थोरले श्रीमंताकडे येत आहो गोपालराव भोसले वगैरे येथे ठेविले याणी च्यार दिवस राहून घेतले पुढें येऊ अतःपर चाकरी *करणे नाही टोक्यास राहाणे हाच कृतसकल्प आहे पत्राचे उतर पाठवणे सविस्तर पूर्वील पत्रावरून कलेल बहुत काय लिहिणे कृपा लोभ कीजे ही विनंती अबदाली दिलीस फौजसहवर्तमान आहे परंतु आपले देशास जाणार हे वर्तमान फार दाट आहे डेरेही जाले श्रीमंत माघारे फिरले ही गोष्ट फार वाईट जाली बरे आपल्यास चाकरी करणे नाही मग मनसबा कशास पाहिजे हे विनती

---

**ले. ४१८** श्री श. १६८२ फाल्गून वा। १२
इ. स. १७६१ एप्री. २

* चिरजीव नाना यासी आसिर्वाद उपरी तुम्ही लिहिली मसलत उतम परतु या देशी हवा अतीशय सर्द माझे शरीर चिता शोक औदासीन्य तीन विषे बहूत विवेक केला तरी बाधतात बायको अती उदास रोड मौनी होऊन गेली ते पाहावत नाही गोपालरायास सर्व ठाऊक आहे यास्तव उजेनीहून कूच केले इदुरावरून ओंकारेश्वरास जातो गोपालराव चैत्रात जितके काम होईल तितके करून अक्षत्रितीयेस येतील दिलीहून जयनगराहून बातमी आली की अबदाली दोन मजली माघारा गेला गुता

---

* खुणे पासूनचा मजकूर श्रीकारापाशी खालचे अर्ध्यांत ही विनंती पावेतों लिहून पुनः वरचे अर्ध्यांत पुढील मजकूर लिहून जागा भरली आहे. हें पत्र रा. गोंधळेकर यांच्या संग्रहांतले असून रा. पोतदार यांचे मार्फत मिळालें.

नाही सुज्याउदौला तीन मजली आपले देशाकडे गेला आता मी राहाणे किमर्थ मल्हारबा विठलपत नारो शंकर गणेश सभाजी मजकडील तीन च्यार हजार फौज मिलोन छावणीस राहातील मल्हारबा इदुरास राहातील व राहावे सर्व हिदुस्थानचा यखतियार त्यावर आहे शफतपूर्वक ऐसी दोन पत्रे पाठविली पावली न पावली हे न कले तुम्ही लटके मनसबे न करणे पत्र दर्शनी लाब मजली करून ओकारेस्वरास येणे आठ दिवस तुमची वाट उजेनीस पाहिली या उपर पत्र दर्शनी अनमान कराल तर शफत असे छ २५ साबान हे आसीर्वाद[१]

---

ले. ४१९ श्री श. १६८२ फाल० वा। १२
इ. स. १७६१ एप्रील ४

चिरंजीव नाना यासि आसीर्वाद उपरी शफतपूर्वक मल्हारबावर आमचा येख्तीयार जो माझा तोच चिरंजीव दादाचा कधी संशय नाही तुम्ही सुभेदाराची शफतपूर्वक निशा करून अबदालीसी तह या वर्शी तो जसे म्हणेल तसे करणे पुढे पेच पाच करणे यख्तीयार सुभेदाराचा व लाहान चाकर हर कोठे पाठविल्यास वर येख्तीयारात अंतर नाही हे निशा हे निशा तुमची आहेच तुम्ही मल्हारबापासून गोहद घ्यावी हे कबूल करऊन नारो शकरास झासीस रवाना करून पत्र दर्शनी सर्व फौजसुधा येणे घोडी आनंदी वारू गगा मात्र न देणे वरकड अगत्याअगत्य देणे मी घोडी कामास निकडीस द्यावयास अंतर कधी केले नसता तुमचे मनात आनमान कसा आला सुभेदारास गगा देणे आम्ही खेचीवर दोन तीन ठाणी घ्यावी याप्रो गोपालराव तोफखाना रवाना केला आम्ही सुरोज पाहून खेचीवर आज पहिले ठाणियावर हाला प्रहराभरा गोपालरायास हालेस फौज कुमकेस जाईल याप्रो आजचे येथील वर्तमान तुम्हास कलावे तुम्ही यासुमारे जलद येणे छ ५ साबान हे आसीर्वाद

---

ले. ४२० श्री शके १६८३ चैत्र शु॥ १
इ. स. १७६१ एप्रील ६

* चिरंजीव राजश्री नाना यासी आसीर्वाद उपरी भिकाजी नाइकास पत्र पाठविले आहे हे देऊन समजाऊन सागून पत्र दर्शनी लाब मजल

१ पत्र नानासाहेबांचें.

करून आम्हाजवल येणे चिरंजीव दादानी पाच हजार फौज रवाना केली आहे ते आलियावर छावणीस श्रीकृपेने राहील तुम्ही चिता न करणे श्री कृपेने अबदाली गेला मल्हारबा दोन महिने ग्वालेरीस पुढे छावणी इदुरास करावी श्रीकृपेने सर्व नीट होईल गोपालराव खेचीस अक्षात्रितीये पावेतो वैशाख सरे तो निदान राहून करतील तुम्ही पत्र दर्शनी लाब मजली करून आम्हाजवल येणे निरतर आता तुमचे भेटीची इछा आहे विस्तार काये लिहिणे छ २९ साबान चहू दिवसी ओकारेश्वरास जाऊ आम्ही तेथे पावलो नाही तों तुम्ही येणे सहसा अनमान न करणे सर्व लोकसुधा येणे खर्चास पोटापुर्ते येथे ईश्वर अनकूल करील चिता न करणे सत्वर येणे हे आसीर्वाद[१]

---

ले. ४२१ श्री श. १६८३ चैत्र शुा
इ. स. १७६१ एप्रील

चिरजीव राजश्री नाना यासि बालाजी बाजिराव प्रधान आसीर्वाद उपरी तुम्ही चिरजीव सौ पार्वतीबाईस घेऊन हाड्यास आलेत पुढे पार्वतीबाई येत नाही खरगोणात राहातात ऐसे लिहिले ते त्यास श्रीगोदातीर उतम सर्वाहून आहे तेथे सौ पार्वतीबाईने राहावे चिरजीवसैत भाऊही आला जा[ठा?]चे मुलकात आहे ऐसी पत्रेही आली स्वस्ताक्षरही सत्वरच येईल राजश्री जनकोजी सिदे आहेत त्यास मल्हारबाचे व जाटाचे लोक आणावयास गेले आहेत सत्वरच येतील आम्ही तुमची वाट आशरीस पाहातो सत्वर येणे बहूत दिवस भेटावे हेच इच्छां आहे अती सत्वर येणे शुक्रवार आसेरी होऊन (?) हे आसीर्वाद[२].

---

ले. ४२२ श्री श. १६८३ चैत्र वाा १
इ. स. १७६१ एप्रिल २०

चिरजीव राजश्री नाना यासि आसीर्वाद उपरी तुम्ही कोठे आला काये वर्तमान बरानपुरास किती दिवसात येणार ते सत्वर लेहून पाठवणे आमचा मुकाम आजी इदुवारी बोरगावावरी जाहाला उदैक आशेरी खाली होईल तर तुम्ही सत्वर येणे वर्तमान रोजाचा रोजा लिहित जाणे रा छ

---

१ पत्र नानासाहेबांचें. २ सबंद पत्र नानासाहेबांच्या हातचें.

१४ रमजानं हे आसीर्वाद भेट होणे जरूर आहे *हे आसीर्वाद पौ छ १८ रमजान

---

ले. ४२३ श्री श. १६८३ चैत्र वा १२
इ. स. १७६१ मे १

* तीर्थरूप मातुश्री आबई वडिलाचे शेवेसी

आपत्ये नानाने चरणावर मस्तक ठेऊन शिरसाष्टांग नमस्कार विनती येथील वर्तमान ता चैत्र वद्य द्वा(द)सी मुा येद्लाबाद प्रा खानदेश येथे सुखरूप आसों विशेष श्रीमताबाा लौकरच टोक्यास येतो टोक्यास महिनाभर श्रीमंत राहाणार त्यास आज्ञा केली कीं तुम्ही व चिरंजीव यैसी टोक्यास यावे भेट येथेच होईल गंगाश्नान होईल त्यास उतमच आहे आपण चिरजीवास घेऊन लौकर टोक्यास यावें आनमान न करावा आम्ही श्रीमंतासन्निध ( टोक्या)स राहू भेट जाहाली पाहिजे यास्तव वडिली यावे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

चिरंजीवास आसीर्वाद उपरी मातुश्री पत्र लिहिले ( आहे ) तरी तुम्ही लौकर मातुश्रीस घेऊन टोक्यास येणे आपली घोडी घेऊन येणे माणकोबास आणणें व जोत्यास घेऊन येणे हे आसीर्वाद

---

ले. ४२४ श्री शके १६८३ चैत्र वा १४
इ. स. १७६१ मे ३

चिरंजीव राजश्री दादा यासी आसीर्वाद उपरी चिरजीव नाना याचे मातुश्रीस व स्त्रीस व पुत्रास टोक्यास आणविले आहे पालख्या उटे वगैरे जे साहित्य लागेल ते देऊन जलदीने रवानगी करावी * दोन तीन पालख्या जरूर पाहिजेत त्या द्यावा छ २७ रमजान हे आसीर्वाद

---

ले. ४२५ ॥ श्री ॥

यादी अबदालीचे व भाऊचे फौजेचे जुंज दिली पलीकडे चालसा कोसावर पाणिपतपासी जाले तेथे बुनगेसुधा फौज घेऊन भाऊ जुजले तेथें सरदार व शिलेदार लोक कामास आले सन ११११० सके १६८२ विक्रमनाम संवत्सरे पौश सुध ७ बुधवारी तिसरा प्रहर परीयत जाले बीा

१ विश्वासराऊ
१ भाऊचे ठिकाण नाही
१ जनकोजी सिंदे याचे ठिकाण नाही
१ गोविदपंत बुधले डोके कापले
१ बलवतराऊ
१ येसवतराऊ पवार
१ समसेर बहादुर
१ मानाजी पायगुडे
१ खडेराव निबालकर
१ संताजी वाघ
१ अंताजी माणकेश्वर
१ इभराइमखान
 १ खासा
 १ पुत्र
 १ मेहुना
१. दादजी दरेकर
१ सोनजी भापकर
१ येसवतराऊ भोरडे यांचे पुत्र
१ कुमाजी धायेभर याचा भाऊ
१ सुरसिग निकम सखूबत
१ सेटीयाजी राऊत
१ शाहजी झाबरे पुणे
२ बाजी हरी त्याचे पुत्र
१ सेखोजी शिरवल
१ मल्हारजी सितोले
१ अनाजी सितोले
१ भिवाजी सितोले
१ गोविंद कृष्ण
१ कृष्ण जोशी
१ भुलोजी पाटीलचा नातु
१ नाना परसराम सितोले याचे पुत्र
१ भगवानजी सितोले कुसेगाऊकर
१ जिवाजी ढमढेरे
१ साखरोजी ढमढेरे
१ भगवतराऊ ढमढेरे
२ काकडे सुंदरराऊ व त्यांचे भाऊ
१ विसाजी पवार
१ तुकोजी सिंदे
१ बहिरजी कडू
१ बहिरजीचा भाऊ
१ बालोजी पराडा याचा भाऊ
१ शाबजी अबोले
१ + + + रुस्तुमराव याचा पुत्र
१ महादजी मालवदकर
१ वड जोशी मालदकर
१ नारोजी मालदकर
१ कलमकर अंताजी माणकेश्वराकडील
१ म्हालोजी सेटकर याचा पुतन्या
१ माणकू परीट
१ महादजी हरफला ठिकाण नाही
१ दादजी हरफला याचा ठिकाण नाही
१ मल्हारजी कामथा
१ हवालदार म्हालोजी मुठे याजकडील
२ बहिरजी कामथे यांचे पुत्र

१ फिरंगोजी सिंदा पिंगोरकर
१ घाटे चावलीकर बहिरजीचा पुत्र
१ सभाजी

ले. ४२६ श्री

आनंद सवत्सरी भाद्रपद शुध आष्टमीस आबाजीपंत तात्या पुरधरे निधन पावले बयाबाई बराबर सहगमन गेली

श्रीमंत बाजिराव प्रधान रौद्र सवत्सरी वैशाख शुध त्रयोदसीस नर्मदातीरी निधन पावले कालार याजवल रौद्र सवत्सरी पौष शुध येकादसीस राजश्री चिमणाजीपंत आपा पुण्यात वारले आनपुर्णाबाई सहगमन गेली

वृषा संवत्सरी मातुश्री ताराबाई आईसाहेब सातारा पौषमासी वारली

विक्रम संवत्सरी पानिपतात आबदालीचा व भाऊसाहेब विश्वासराऊ याची लडाई जाहाली तेथे लडाई सिकस्त खाली विश्वासराऊ पडले भाऊसाहेबहि थाक नाही जनकोजी सिंदे येशवंतराऊ पवार इभ्रामखान पडले बलवतराऊ गणपतहि पडले स्त्री सहगमन केली

यम रस नृप शाके रौद्र सवत्सरे मांधव धवल त्रयोदश्यार्कवारे निशायां ॥ नृप मुकुटमणि श्री शाहु मुख प्रधानो सुरपतिमपिद्रष्टु प्रस्थितो रावबाजी

येनाकर्ण वीकर्ष कार्मुक चलत् कांडावली प्रस्धित ॥
प्रत्यर्थि क्षीतपालमोलि कमळे अभयर्च्य विश्वंभरा ॥

मातुश्री आबई याचा काल पुण्यात चैत्र वद्य प्रतिपदा प्रातःकाली जाहाला शके १७०४ शुभकृत संवछरे शनवारं[१]




१ शेवटची शिवाय बाकीच्या सर्व नोंदी नाना पुरंदऱ्यांच्या हातच्या असून शेवटची दुसऱ्याच्या हातची आहे. श्लोक बालबोधींत आहेत.

# सूची

( कृ. वा. पुरंदरे-पूर )

[ नांवापुढील आंकडे पृष्ठांकाचे आहेत. ]